# नामचिंतामणि

## [ नामजपाचें महत्त्व – भाग दुसरा ]



नामचिंतामणिः कृष्णश्चैतन्यरसविग्रहः ।
पूर्णः शुद्धो नित्यमुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः ॥ – पद्म पु.

*   *   *

" करितां नित्य नामस्मरण । तेणें उपजे परमपुण्य ।
जें भोगक्षयें नव्हे क्षीण । ब्रह्म परिपूर्ण प्रापक ॥ "

— श्रीभावार्थरामायण


लेखक

**रामचंद्र कृष्ण कामत, चंदगडकर,**

श्रीदुर्गादत्तमंदिर, माशेल ( गोवें )



द्वितीयावृत्ति : शक १८७४, सन १९५२




मूल्य साडेतीन रुपये

# द्वितीय आवृत्तीची प्रस्तावना

**नाम स्मरे निरंतर । तें जाणावें पुण्यशरीर ।**
**नाना दोषांचे गिरिवर । रामनामें नासती ।**

—दासबोध, द. ४

**भौ**तिक शास्त्रें हीं मनुष्याच्या इहलोकच्या सुखाचा मात्र विचार करितात, पण धर्मशास्त्र हें मानवाच्या इहलोकच्या सुखासह परलोकच्या सुखाचाही विचार करितें. '**यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः**' अशी धर्माची मुळीं व्याख्याच आमच्या शास्त्रकारांनीं केलेली आहे. देव न मानणाऱ्या कोणाही नास्तिक मनुष्याला विचारलें, तर तो आपणास सुख पाहिजे, दुःख नको असेंच सांगेल आणि हें सुख सुद्धां दुःखमिश्रित नसावें, विटणारें नसून अवीट असावें व तें चिरकाल टिकणारें असावें, असेंच म्हणेल. असें 'दुःखलेशरहित **सुख**' अथवा '**निर्दुःखानंद – निर**तिशयानंद' यालाच आमचे शास्त्रकार **दे**व अथवा **पर**मेश्वर म्हणतात. '**सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर**' हें वचन प्रसिद्धच आहे. सारांश, '**पर**मेश्वरप्राप्ति' हें प्रत्येक जीवाचें ध्येय ठरतें आणि हें ध्येय साधण्याच्या प्रयत्नाला '**पर**मार्थ' म्हणतात, त्या अर्थीं परमार्थही प्रत्येक मनुष्याला हवा आहे हें सिद्ध होतें.

**जगांत नास्तिक व परमार्थ-विमुख कोणीही नाहीं.**

जीव हा अमर आहे. देहाच्या मरणानंतर जीवाचा पुढील दीर्घ प्रवास म्हणजे त्याचें पुढील आयुष्य सुखाचें कसें जाईल व त्याला शाश्वत सुख कसें मिळेल, या गोष्टीचा शोध आमच्या प्राचीन अतींद्रियद्रष्ट्या ऋषींनीं लावून, तो जीवांच्या कल्याणाकरितां लिहून ठेवला, त्याचेंच नांव **धर्मशास्त्र.** पृथ्वीवरील कोणत्याही धर्मशास्त्रांत मरणोत्तर जीवाचें अस्तित्व कबूल केलें असून, सद्गति व असद्गति म्हणजे **स्वर्ग** व **नरक** सांगितलेच आहेत. परंतु आमच्या अत्यंत प्राचीन अशा सनातन धर्मासारखा सूक्ष्म विचार इतर कोणत्याही धर्मांत केलेला नाहीं, असें निर्मत्सर पाश्चात्य विद्वानही कबूल करीत आहेत. स्वर्गसुखा-पलीकडच्या मोक्षसुखाचा विचार इतर धर्मांत केलेला दिसत नाहीं. **स्वर्ग हा 'अनित्य' असून मोक्ष हा 'नित्य' आहे;**' स्वर्ग '**परोक्ष**' असून मोक्ष हा '**अपरोक्ष**' म्हणजे प्रत्यक्ष आहे; स्वर्गसुख '**पराधीन** असून, मोक्षसुख

**मरणाचें भाग्य फक्त जीवन्मुक्ताच्याच नशिबांत असतें**

'**स्व**–आधीन' आहे; तें अपरोक्ष – आत्मस्वरूपभूत असतें म्हणून '**स्वा**धीन' म्हणतात; मोक्षसुख 'इंद्रियवेद्य' किंवा मनोवेद्य नसून '**स्व**संवेद्य' आहे; मोक्षसुख हें स्वर्गसुखाप्रमाणें 'अप्राप्ताची प्राप्ति' नसून कंठचामीकर न्यायाप्रमाणें 'प्राप्ताची प्राप्ति' आहे आणि हें मोक्षसुख उधारीचें म्हणजे मेल्यानंतर मिळविणेचें नसून '**याच देहीं याच डोळां। भोगिजे मोक्षाचा सोहळा**' असा हा रोखठोकीचा व्यवहार आहे. सामान्य जीवाचें मरण हें मरण नसून 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' – अशा प्रकारचें अर्थात् नुसतें बिऱ्हाड बदलणें आहे. मरणाचें भाग्य जीवन्मुक्ताशिवाय सामान्य मनुष्याच्या नशीबीं नाहीं! (असें श्री**सिद्धा**रूढस्वामी म्हणत असत.) "**आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां। तो झाला सोहळा अनुपम्य ॥ आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें। सर्वात्मकपणें भोग झाला ॥**" हा श्री**तु**काराममहाराजांचा अभंग प्रसिद्धच आहे.

मोक्षाचीं म्हणजे परमार्थप्राप्तीचीं अनेक साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत. 'अधिकारभेदात् शास्त्रभेदः' या वचनाप्रमाणें जीवाच्या अधिकारभेदानुसार अथवा प्रकृतिभेदानुसार परमार्थसाधनांचे अनेक प्रकार शास्त्रांनीं व संतांनीं सांगितले आहेत. त्या सर्व साधनांत नामस्मरणासारखें सोपें साधन दुसरें नाहीं असें भागवतधर्मीय संतांनीं – महाराष्ट्रांतील व दक्षिणोत्तर प्रांतांतील सर्व संतांनीं – आपापल्यापरी आपापल्या भाषेंत मोठ्या अट्टाहासानें सांगितलें आहे. त्याचाच अनुवाद नामचिंतामणि ग्रंथांत शास्त्र व संतवचनांच्या आधारें केला आहे.

**श्री**संत-सद्गुरुकृपेनें तयार झालेल्या या ग्रंथाचीं प्रथमावृत्तीचीं सर्व पुस्तकें संपून द्वितीय आवृत्ति पूर्वीपेक्षांही सुंदर रीतीनें छापलेली पाहण्याचा योग माझ्या आयुष्यांत आला हें माझें मोठें भाग्य असें मी समजतों. माझ्या वयाला यंदा ८० वें वर्ष लागलें असून शरीर अशक्त व विकारी झालें आहे. तथापि मन सशक्त व निर्विकार राहण्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना व सज्जनांच्या आशीर्वादाची अपेक्षा करितों.

माझी 'प्रत्यक्ष' ओळख नसतांही माझ्या (?) ग्रंथांवरून मला ओळखणारे व मजवर 'निर्निमित्त' प्रेम करणारे असे **श्री**गुरुचरित्राचे व **नाम**चिंतामणीचे सज्जन वाचक यांचीं कांहीं तरी निमित्तानें पत्रें येत, त्या वेळीं त्यांच्या पत्रांतील प्रश्नांचीं यथामति उत्तरें देऊन त्या वेळच्या प्रकृतीच्या विकृतीबद्दल सहज लिहीत असें. तें वाचून कित्येक सज्जनांनीं मला 'दीर्घायुष्य व उत्तम आरोग्य' मिळण्याकरितां **वि**ष्णुसहस्रनामाचे पाठ घातले, कित्येकांनीं **गुरु**चरित्राचे सप्ताहही मोठ्या कळकळीनें वाचून मला प्रसादोत्तरें पाठविलीं! याबद्दल त्यांचे आभार

मानण्यास माझ्याजवळ शब्द नाहींत. परमेश्वर अत्यंत कृपाळू खरा, पण त्याची कृपा म्हणजे **"जो मातें भजतो जैसा, मी त्यातें भजतों तसा"** अशा कांटेतोल हिशेबाची असते, पण संतसज्जनांच्या कृपेला तोल नसल्यामुळें मोल नाहीं. जन्मदात्या मायबापांपेक्षां जीवांचे संत हेच खरे मायबाप होत. कारण, देहाचे मायबाप हे जन्म-मरण देणारे व संत हे जन्ममरण चुकविणारे असतात. म्हणूनच **"तुम्ही संत माय-बाप कृपावंत"** असे श्रीतुकाराममहाराजांनीं उद्गार काढले आहेत. तात्पर्य, अशा मायबापांचे उपकार मानावे तेवढे थोडे वाटतात.

मला नामचिंतामणि ग्रंथ लिहितांना माझे प्रिय सहोदर **विठ्ठल कृष्ण** ऊर्फ **दिगंबरदास** यांचें अमोलिक साहाय्य झालेलें होतें. ( ह्याबद्दल मीं प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेंत लिहिलेंच आहे. ) हे माझ्यापेक्षां वयानें पांच वर्षांनीं लहान पण अध्यात्म-मार्गांत माझ्यापेक्षां थोर म्हणजे फार पुढें गेलेले होते, तसेच वैकुंठमार्गांतही माझ्यापुढेंच ते निघून गेले ! ( मार्गशीर्ष शु. १२, शक १८७१ ). सगुणदर्शनाबद्दल त्यांनीं मरणान्त साहस करून तें साध्य करून घेतलं व वंशाचा उद्धार केला. आपल्या व इतर शेंकडों गांवच्या शेंकडों मित्रांच्या कुटुंबांत त्यांनीं ईश्वरोपासनेचें बीज पेरून सोडलें. नामचिंतामणीची ही सुंदर द्वितीय आवृत्ति निघालेली पाहण्यास ते स्थूल शरीरानें राहिले नाहींत ह्याबद्दल वाईट वाटतें, तथापि त्यांचा अमर आत्मा ही घटना पाहणार व प्रकाशकाला आणि वाचकवर्गाला आशीर्वाद देणार असा माझा विश्वास आहे.

प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेंत '**उपकारस्मरण**' या सदराखालीं, मला हा ग्रंथ लिहिण्याच्या कामीं ज्यांच्या ज्यांच्या विचारांची, सहवासाची व ग्रंथ वगैरेची मदत मिळाली, त्यांच्या त्यांच्या नांवाचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून, त्यांच्याशीं प्रभुकृपेनें व यदृच्छेनें त्या त्या वेळच्या घडलेल्या प्रसंगांचीही माहिती दिली आहे. त्याप्रमाणें आतांच्या प्रस्तावनेंतही कांहीं सज्जनांचे कृतज्ञता बुद्धीनें योग्य शब्दांत आभार मानणें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों. वाचकांस यापासूनही कांहीं तरी लाभ होऊन आनंद वाटेल अशी मला आशा आहे.

प्रथमावृत्तीचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं मला खानदेशांतील प्रसिद्ध सत्पुरुष परमपूज्य **श्रीकेशवदत्तमहाराज**, ह्यांनीं धुळ्याजवळ असलेल्या आपल्या **सोनगीर** क्षेत्रांत प्रेमानें बोलावून नेऊन आपल्या गुरुमहाराजांच्या पुण्यतिथीच्या उत्सवांत 'हे नामचिंतामणिग्रंथकार' म्हणून मोठ्या प्रेमानें माझी ओळख तिकडे जमलेल्या सर्व लोकांना करून दिली व सुंदर लोकरी शाल वगैरे

देऊन माझा सत्कार केला. महाराजांचें त्या उत्सवांतील अन्नदान, कथाकीर्तन, प्रवचन, भजन व वेदघोष वगैरे एकापेक्षां एक सुंदर कार्यक्रम पाहून मनाला मोठा आनंद झाला. ईशभक्तीसहित देशभक्तीला उत्तेजन देणारीं त्यांचीं ओघवती व रसवती भाषेचीं प्रवचनें ऐकून धन्यता वाटली. त्यांनीं धुळें येथें ' **भागवत-धर्ममंडळ** ' नांवाची संस्था स्थापन करून तिच्या द्वारें धर्मोद्धाराचें मोठेंच कार्य चालविलें आहे. ज्येष्ठ मासांतील **श्री**गुरुगोविंदमहाराजांचा उत्सव शक्य असेल त्यांनीं तेथें जाऊन पाहावा म्हणजे वेदोक्तधर्माला न सोडतां भागवत धर्मांतील भक्तिमार्गाचा आनंद तेथें कसा दुमदुमून राहतो हें समजून येईल अशी मी शिफारस करितों.

याचप्रमाणें श्रीक्षेत्र **निजंपूर** ( जिल्हा धुळें – खानदेश ) येथील मठांत आषाढांत होणाऱ्या **श्री**पांडुरंगाचा उत्सव सत्साधकांनीं जाऊन पाहावा अशीही मी शिफारस करितों. यंदाच्या कार्तिक महिन्यांतील **म**डगांव ( गोवा ) येथील हरिमंदिरातर्फे होणाऱ्या दिंडी उत्सवांत ह. भ. प. ' कीर्तनरत्न ' **लक्ष्मणबुवा निजंपूरकर** यांचीं भक्तिरसपरिप्लुत कीर्तनें ऐकण्याचा योग आला. प्रत्येक कीर्तनांत पूर्वरंगाच्या आरंभीं नामस्मरणाचा महिमा सांगून नंतर अध्यात्मविषयाच्या भाषणास हे आरंभ करितात. माझी भेट व ओळख होण्यापूर्वीही हे आमच्या **नाम**चिंतामणि ग्रंथाची मोठ्या प्रेमानें शिफारस करीत असत असें मी ऐकत होतों, तें प्रत्यक्ष पाहण्यांत येऊन आनंद व आभार वाटले. यांच्याप्रमाणें कीर्तनांत रोज नामवैभव सांगून नामनिष्ठा वाढविणारे व संतांनीं घालून दिलेली ' **की**र्तनमर्यादा ' मोठ्या श्रद्धेनें व संयमानें पाळून ' निर्मळ हरिकीर्तन ' करणारे व नास्तिकांसहित अभाविकांचेंही मन भक्तिमार्गाकडे व तदंतर्गत नामस्मरणाकडे वळविणारे हरिदास आजपर्यंत गोव्यांत आले नाहींत असें इकडील विद्वान लोकही म्हणत आहेत. हे एकनाथसंप्रदायी असून, **ना**थरायांना त्यांच्या घरीं सेवकरूपानें राहणाऱ्या **श्री**खंड्याचें खरें स्वरूप द्वारकेहून आलेल्या ज्या तपस्वी ब्राह्मणानें दाखवून दिलें, ते **म**दनरायशर्मा ब्राह्मण **नि**जंपूरकरांचे ज्ञात मूळपुरुष होत. यांची समाधि **नि**जंपूर गांवांत **रो**हिणी नदीच्या कांठीं यांच्या मठापासून थोड्या अंतरावर आहे. त्यांच्यापासून आठव्या पिढीचे वंशज **ग**णेशबुवा उपासनी ऊर्फ **नि**त्यानंद-**स**रस्वती स्वामी नांवाचे मोठे तपस्वी पुरुष होऊन गेले. हेच श्रीलक्ष्मण-बुवा निजंपूरकर यांचे जनक होत. यांनीं अंधस्थितींत १८ वर्षें लागून सव्वालक्ष ब्राह्मणभोजन घातलें ! यांची नामनिष्ठा मोठी अलौकिक होती. दोन वर्षाखालींच ते समाधिस्थ झाल्याचें समजतें. ' शुद्धबीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ' या वचनाप्रमाणें यांचें संतान असल्याचें समजून संतोष होतो. श्रीलक्ष्मणबुवांचे तिघे बंधूही एकापेक्षां-

एक विद्वान व नामनिष्ठ असल्याचें ऐकतों. भगवंताची नामकीर्ति पसरविणाऱ्याची कीर्ति भगवत्कृपेनें जगांत पसरत राहणें हें निसर्गनियमास अनुसरूनच आहे. श्रीलक्ष्मण-बुवांनीं एका कीर्तनांत ' रामकृष्णहरि ' नाममंत्राचें फारच सुरस वर्णन केलेलें ऐकण्यांत आलें. तें मीं तिसऱ्या भागांत छापण्याकरितां लिहून देण्याची विनंति केली असून ती त्यांनीं मान्य केली आहे.

तिसऱ्या एका महान् नामनिष्ठ सत्पुरुषाची वाचकांना थोडीतरी ओळख करून दिल्याशिवाय ही प्रस्तावना संपविण्यास हात तयार होत नाहींत. ह्या सत्पुरुषाचें नांव **श्रीविठोबानाथ लक्ष्मणशेट अडिवरेकर** ( समाधि सन १९४६, मु. **जांबें**, पोस्ट **चिं**चवड, जि. **पुणें** ) ह्यांनीं आमचीं **ना**मजपाचीं पुस्तकें आपल्या शिष्य-वर्गास देऊन त्यांना नामजपास प्रवृत्त केलें. परंतु पुष्कळांना त्या विषयाची त्या वेळीं फारशी आस्था वाटली नाहीं. कांहीं दिवसांनीं त्यांनीं गांवोगांवच्या प्रिय शिष्यांना पत्रें पाठवून कळविलें कीं, आम्ही कार्तिक वद्य ८ मी रोजीं दुपारीं १२ वाजतां समाधि घेणार आहों, त्या वेळीं तुम्ही जवळ असावें अशी आमची इच्छा आहे. हा अगदीं निर्वाणीचा संदेश कळतांच कांहीं शिष्य भयानें व कांहीं कुतूहल दृष्टीनें त्यांच्या-कडे आले. त्या वेळीं सकाळीं १० वाजल्यापासून १२ वाजेपर्यंत त्यांना नामस्मरणाचें महात्म्य सांगून, पूर्वी कळविल्याप्रमाणें १२ वाजतां ' राम-राम-राम-राम ' म्हणत एकदम देहविसर्जन केलें ! हें पाहतांच जमलेल्या सर्व लोकांस सविस्मय दुःख वाटलें व यापूर्वी गुरुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें आपण नामस्मरणास आरंभ केला नाहीं म्हणून पश्चात्ताप वाटला व गुरुमहाराजांच्या समाधीची व्यवस्था करून संख्यायुक्त नामजपास त्यांनीं व्यवस्थितपणें आरंभ केला. ही माहिती गु. भ. प. **पां**डुरंग **बा**पूजी **ज**गताप ( **ना**थसंप्रदायमंडळ, मु. **जांब**, पोस्ट **चिं**चवड, जि. **पुणें** ) यांनीं आपल्या गुरु-महाराजांच्या त्रोटक चरित्रासह व कांहीं लोकांच्या नामस्मरणाच्या अनुभवासह प्रेमानें लिहून कळविली, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडे वाटतात.

आपल्या मृत्यूचा काळ आगाऊ समजणें व बरोबर त्याकाळीं देहाला व मनाला किंचितही विकलता न येतां, अंगावरील उपरणें अथवा सदरा आपण जसा सहज रीतीनें काढून बाजूस ठेवतों, त्याप्रमाणें देहविसर्जन सहज लीलेनें करणें ही गोष्ट सामान्य नव्हे, आणि हें सामर्थ्य श्री**वि**ठोबानाथांना फक्त अखंड नामस्मरणानें प्राप्त झालें ही गोष्ट नामचिंतामणीच्या वाचकांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. गु. भ. प. **ज**गताप यांनीं जगाचा ताप निवारण करणाऱ्या आपल्या गुरूच्या व गुरुबंधूंच्या अनुभवाच्या आश्चर्यकारक गोष्टी लिहून कळविल्या आहेत, त्या ' नामजपाचें महत्त्व '

भाग ३ रा प्रसिद्ध करण्याचा योग आल्यास त्यांत देण्याची इच्छा करितों. इतर कांहीं नामधारकांचे अनुभवही लिहून आलेले आहेत. ते मुमुक्षूजनांच्या उपकारार्थ प्रसिद्ध करण्यास त्यांजकडून परवानगी मिळेल अशीही मी आशा करितों. असो.

"**जगाला नवजीवन संतच देऊं शकतात, शास्त्री म्हणजे विद्वान देऊं शकत नाहींत ... श्री**शंकराचार्य, व स्वामी **वि**वेकानंद, **राम**तीर्थ, इत्यादिकांकडून जगाला नवजीवन मिळालेलें आहे; हे लोक शास्त्री होते, तसेंच संतही होते म्हणून ते नवजीवन देऊं शकले" असें एका विद्वान ग्रंथकाराचें म्हणणें आहे. **श्री**रामकृष्ण परमहंस हे शास्त्री नव्हते, पण संत होते; त्यांच्याच कृपेनें **वि**वेकानंदस्वामींनीं जगांत वेदान्तधर्माचा ध्वज फडकविला. इत्यादि गोष्टींचा प्राचीन काळापासून आधुनिक काळाच्या इतिहासावलोकनानें विचार करितां असें म्हणावेंसें वाटतें कीं, धर्मप्रसाराचें व धर्मरक्षणाचें पवित्र कार्य भागवतधर्मीय संतांकडूनच होत आलें आहे व होत राहणार आहे. स्थायिक उत्पन्नदार धर्मपीठाधिपतींनींही संतांचे आभार मानून त्यांनीं चालविलेल्या कार्याला आत्मीय प्रेमानें व गुप्त रीतीनें उत्तेजन देत राहिलें पाहिजे. या गोष्टीचा विचार धर्मपीठें करतील व धर्मपीठानुयायी लोक प्रेमविनयपुरःसर त्यांना करावयास लावतील अशी मला आशा आहे.

**नाम**चिंतामणीची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर त्या पुस्तकासंबंधानें ब्रह्मश्री पं. **अनंत**शास्त्री **फ**डके, बनारस, कै. श्रीमंत **रामराव कृ**ष्ण **ज**ठार, ग्वाल्हेर, कै. **लक्ष्मण रामचंद्र पां**गारकर, श्रीरमणमहर्षि यांचे स्वात्मानुभवी शिष्य **श्री**गुरु-देवानंदस्वामी, **न्यायरत्न धुं**डीराजशास्त्री **वि**नोद, **के**सरीकर्ते श्री **ज. स. क**रंदीकर, '**ध**र्मवीर' कर्ते श्री. **वि**नायक **म**हादेव **जो**शी, '**हं**स' कर्ते श्री. **वे**लणकर, **रा**मदास-**रा**मदासी कर्ते श्री. **शं**कर **श्री**कृष्ण **दे**व, **गो**भक्तावतंस श्री. **चौं**डेमहाराज, परमगुरुभक्त व मातृभक्त श्री**न**रहरशास्त्री **ख**रशीकर वगैरे वगैरे सज्जनांनीं आपले हार्दिक प्रशंसोद्गार लिहून पाठविल्याबद्दल त्यांचे आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं.

ही द्वितीयावृत्ति म्हणजे प्रथमावृत्तीचें 'पुनर्मुद्रण'च म्हणण्यास हरकत नाहीं, तथापि किंचित् सुधारणा केलेली आहे. प्रथमावृत्तींत एके ठिकाणीं भोजनाच्या वेळीं नामस्मरण कसें करावें याबद्दल पुढें नामयोगरहस्य—प्रकरणांत लिहिलें जाईल असें लिहून गेलों, पण विस्मरणानें तें राहून गेलें! एका मार्मिक वाचकानें ही गोष्ट पत्रद्वारा माझ्या नजरेस आणली. त्याला पत्रद्वारेंच त्या वेळीं संतवचनाधारें ती गोष्ट लिहून कळविली व या आवृत्तींत ती भरून काढली. या गोष्टीबद्दल आणखी बरेंच रहस्यात्मक लेखन करावेंसें वाटतें, पण विस्तारभयास्तव तसें केलें नाहीं. प्रभुकृपेनें

नामस्मरणाबद्दल आणखी बरीच महत्त्वाची सामुग्री मिळाली असून, आयुष्यादि अनुकूलता लाभल्यास **नाम**कल्पतरु अथवा **काम**धेनु ह्या नांवानें तिसरा भाग प्रसिद्ध करावा अशी अंतरांत स्फूर्ति होत आहे. हरि व हरिभक्त यांच्या कृपेनें घडून येईल तेव्हां खरें.

नजरचुकीनें झालेल्या ठळक• ठळक मुद्रणदोषांचें शुद्धिपत्र पुढें दिलें आहे, त्याप्रमाणें वाचकांनीं ते दोष सुधारून घेण्याची तसदी घ्यावी अशी विनंति करून, त्याचप्रमाणें त्यांच्या अभ्युदय–**निः**श्रेयसाबद्दल **प**रमेश्वरचरणीं अनन्यभावें प्रार्थना करून प्रस्तावना पुरी करितों.

**‘ नामा म्हणे तयां असावें कल्याण ।**
**ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ”**

| | |
|---|---|
| **श्रीदुर्गामंदिर, माशेल–गोवा** | **नामधारकांचा दासानुदास–** |
| **श्रीगुरुप्रतिपदा, शक १८७३** | **रामचंद्र कृष्ण कामत, चंदगडकर** |



श्रीर्जयति।

# अगोदर हें वाचावें !

## ( प्रथमावृत्तीच्या प्रकाशकाचे दोन शब्द अथवा विषयप्रवेश )

**" सर्वचैतन्यरूपां तामाद्यां विद्यां च धीमहि।
बुद्धिं या नः प्रचोदयात्॥ "**

" The price of wisdom is above rubies. "

" Without books, God is silent, Nature is speechless, apparition and human life is a wiered, solemn and impenetrable mystery. They are a guide to youth, a feast to manhood and an entertainment to oldage. —*R. P. Downes*

( १ ) हल्लीं चोहोंकडे चाललेली आचारहीनता पाहून, " धर्म बुडाला, पुढें भयंकर प्रसंग ओढवणार! लोक नास्तिक झाले! राजा कालस्य कारणम्! " इत्यादि निराशेचे उद्गार धर्मनिष्ठ म्हणविणाऱ्यांच्या तोंडून निघालेले ऐकूं येतात. पण ही निराशा सर्वथैव खरी समजण्याचें कारण नाहीं. कारण, एकीकडून अनादिरूढ आचारांची उचलबांगडी, तर दुसरीकडून धर्मरहस्याची तीव्र जिज्ञासा; एकीकडून ढोंगी व आपमतलबी साधूं (?) च्या स्वैराचाराचा तीव्र निषेध व तो होतां होतां भजन-पूजन-श्रवण-मननादि सत्कर्मांचा व सद्वृत्तींचा तिटकारा, तर दुसरीकडून **श्री**रामकृष्णपरमहंस, स्वामी **राम**तीर्थ आणि **गौ**रांगसंप्रदायी महानुभाव विद्वान् स्वयंसेवकांचा लंडन, केंब्रिज, बर्लिन, न्यूयार्क सारख्या युरोप-अमेरिका खंडांतील राजधान्यांच्या शहरांतही अत्यंत यशस्वी दौरा आणि सगुणमूर्तींच्या मंदिराची तेथें स्थापना; एकीकडून हिंदुमुसलमानांतील रक्तपातात्मक भयंकर कलह, तर दुसरीकडून विश्वप्रेमवर्धक व शांतिस्थापक व्यवस्थित चळवळी; इत्यादि क्रियाप्रतिक्रियात्मक गोष्टी नित्य नव्या नव्या दृष्टीस पडत आहेत. या सर्व प्रकारावरून विशिष्ट अन्तर्दृष्टीचे लोक मात्र निराश न होतां प्रभुकृपेचे दिवस, शांतिप्रेमाचें युग, सुखभाग्याचा काळ फार दूर नाहीं, असेंच मानीत आहेत व तें सप्रमाण प्रतिपादनही करीत आहेत. नवीन पिढींतील नवीन विचारसरणीच्या लोकांना येथील शेंकडों सामान्य मासिकांपेक्षां युरोप-अमेरिकेच्या Unity, Herald of the New world, Nautilus वगैरे मासिकांमधून फारच दूरदर्शी अथवा तत्त्वदर्शीहि म्हणण्यास हरकत नाहीं अशा लेखकांच्या शब्दांतून

ही गोष्ट स्पष्ट होत आहे. आपल्या देशांतही अलीकडे **चैतन्य, विश्वप्रेम,** Vision, Peace, इत्यादि मासिकांतूनही ह्या विचारांचें दिग्दर्शन होत आहे ही सुदैवाची गोष्ट होय.

( २ ) " **धर्म** म्हणजे दुःखग्रस्त लोकांना दुःख भासूं न देण्याची एक ' अफूची गोळी ' आहे व देव म्हणजे लहान मुलांचा बागुलबोवा आहे ; तो १९ वें शतक लागतांच पार नाहींसा झाला ! " अशीं ओंगळ वाक्यें लिहिणारे परदेशी लेखक व तीं उराशीं धरून नाचणारे स्वदेशी वाचक हल्लीं बरेच झाले आहेत. पण त्यांचें खंडण करून ' सायन्सच्या उत्कर्षामुळें देवाचें अस्तित्व सिद्ध झालें आहे अथवा होत आहे, ' असें म्हणणारे महाभागही पुढें येत आहेत. एकीकडे अश्लील वाङ्मयाच्या हजारों प्रती छापताहेत व खपताहेत, तर दुसरीकडे भागवत, भारत, रामायणाच्या संशोधित प्रती व त्यांच्या मराठी भाषांतरांचीं पुस्तकेंही छापताहेत व खपताहेत ! श्रीक्षेत्र पंढरी किंवा काशी यांस भूवैकुंठ किंवा भूकैलास म्हणण्यापेक्षां अथवा मानण्यापेक्षां प्रत्येक मानवी शरीर हें भूवैकुंठ अथवा भूकैलास आहे, हें समजावून देणारे अस्सल संत ( नकली नव्हेत असे ) पुढें येत आहेत व तें तत्त्व जाणण्याची इच्छा करणारे तीव्र जिज्ञासुही वाढत आहेत. ह्या गोष्टी म्हणजे आशेचे स्फूर्तिदायक किरणच होत, असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं.

( ३ ) " **परम मूर्खांमाजीं मूर्ख । जो संसारीं मानी सुख ।**
**संसाराएवढें दुःख । आणिक नाहीं ॥** "

किंवा " **जैशी स्थिति आहे तैशापरी राहें ।**
**कौतुक तूं पाहें संचिताचें ॥** "

तसेंच ' Try to love god & be patient under his afflicting hand. " अशीं वाक्यें ऐकूं येतात, तर याच्या उलट —

" **या या प्रपंचीं पाहतां दुःख कैंचें रे** "

किंवा " **म्हणे चिदंबरदास, मुंगी ब्रह्म चिद्विलास ॥** "

तसेंच — " Seek ye first the kingdom of god within, and all things will be added. " हीं वाक्यें कानावर व मनावर आदळतात. सकृद्दर्शनीं विरुद्ध भावात्मक वाटणाऱ्या दोन्ही जातींच्या वचनांची एकवाक्यता करून घेण्यासाठींच थोरांचा, तज्ज्ञांचा सहवास भरपूर घडला पाहिजे. बुवाबाजीची भीति वाटणाऱ्या काळांत खऱ्या मुमूक्षूंनीं त्या वाटेसच न जातां,

**“ठायींच बैसोनि करा एकचित्त। आवडी अनंत आळवावा ”**
हें वचन नीट ध्यानांत घेऊन, मग

**“न लगती सायास जावें वनांतरा। सुखें येतो घरा नारायण ॥”**

ही फलश्रुति अनुभवावी, म्हणूनच प्रस्तुतसारख्या पुस्तकाची गरज आहे. त्याची महतीही त्यांतच म्हणजे हृदयस्थ परमात्म्याची स्वावलंबनानें गांठ घेण्याची शिकवण देण्याच्या अपूर्व शैलींतच आहे.

(४) ‘**दुःखनिवृत्तिपूर्वक सुखाची प्राप्ति**’ हें सर्व जीवांचें सामान्य ध्येय आहे; पण हें साधतां साधत नाहीं. एका दुःखाची निवृत्ति होते न होते तों दुसरें तयार! सुखाची प्राप्ति झाली असें म्हणतों न म्हणतों तों उत्तर क्षणींच अंधकार! असा अनुभव रंकापासून राजापर्यंतचा आहे. पण मोहमदिरेमुळें डोळे उघडत नाहींत! जें सुख प्राप्त झालें असतांना दुसऱ्या सुखाची इच्छाच उरत नाहीं व कसल्याही दुःखाची बाधा होत नाहीं,

**‘यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥’**
—(गीता, अ. ६)

असलें अविनाशी व अत्युच्च सुख प्राप्त करून घेणें हेंच मनुष्याचें अंतिम ध्येय अथवा खरा पुरुषार्थ होय. ह्या आत्यंतिक सुखालाच **परमात्मा, परमेश्वर, परमार्थ** असें म्हणतात. ‘**सर्व सुखाचें आगर, बाप रखुमादेवीवर।**’ याचा अर्थ हाच आहे. हा रखुमादेवीचा वर म्हणजे पति (मायापति) परमात्मा होय. हा इंद्रिय-मन-बुद्धीच्या पलीकडे आहे. (‘**यो बुद्धेः परतस्तु सः**’) ह्या आत्यंतिक सुखाला **आत्मानंद, परमानंद, ब्रह्मानंद, निरतिशयानंद, महासुख** अशींही नांवें आहेत. इंद्रियसुखाचा अनुभव पशुपक्षी व कृमिकीटकही घेतात. मनुष्यही तसाच अल्पतृप्त राहिला, तर त्याच्यांत व पशुपक्ष्यांत काय भेद? विषयानंद हा सर्व योनींमध्यें आहे: **मनुष्ययोनि ही ब्रह्मानंदप्राप्तीकरितां आहे** आणि हा आनंद अतींद्रिय आहे. (‘बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम्’) हा अनुभविल्यावांचून गर्भवास चुकावयाचा नाहीं. **जितेंद्रियता संपादिल्यावांचून अतींद्रिय सौख्य लाभावयाचें नाहीं,** हें या पुस्तकांत फारच जोरानें अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें आहे. (पृष्ठ ९६, ९७...११६, ११७ व पुढेंही ओघानुसार पुष्कळ वेळां.) ‘विजातीयप्रत्ययतिरस्कारपूर्वक सजातीय प्रत्ययाचा प्रवाह वाहूं देणें’ हाच **अभ्यास**

(पृष्ठ १२१), 'आत्म्यानें मोक्ष नाहीं, आत्मज्ञानानें मोक्ष' व हें अविद्यानाशक 'आत्मज्ञान म्हणजे आत्माकारवृत्त्युदय' (पृष्ठ १२६), 'वृत्तींचा बहिर्मुखपणाचा स्वाभाविक धर्म आहे तो बदलून त्यांना आत्माभिमुख करणें हीच **रास**क्रीडा (पृष्ठ १२६, १२७), **बाय**को ही काम जिंकण्याकरितां व **मुलें** हीं क्रोध जिंकण्याकरितां आहेत' (पृष्ठ १३०) इत्यादि सुंदर सुंदर व स्वतंत्र स्फूर्तिदायक वाक्यांचें समालोचन ( Review ) श्रोत्यांचें लक्ष त्या विषयाकडे विशिष्ट तऱ्हेनें वेधण्याकरितां आरंभींच्या प्रस्तावनेंत लिहिण्याचा संप्रदाय आहे. हें काम करण्यास मजपेक्षां कोणीतरी विद्वान मनुष्यच पाहिजे होता. पूज्यपाद कामत महाशयांचे तसे अनेक मित्र आहेतही. पण एवढें मोठें पुस्तक वाचून त्यांजकडून समालोचनात्मक लेख लिहविण्यास आतां अवकाश राहिला नाहीं व ती खटपट आतां नको असेंही त्यांचें म्हणणें आहे. परंतु मला तसें करणें बरें वाटत नाहीं. कारण पहिल्या भागाच्या पुस्तकांत श्री. **नारायण दामोदर जोशी**, वकील, ( **शहापूर – बेळगांव** ) यांनीं विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली आहे, त्यांत त्यांनीं समालोचन लिहून अंतर्गत विषयावर चांगला प्रकाश पाडला आहे. तसें केलें नसतें तर तेवढा प्रकाश वाचकांना झाला नसता, असा माझा तर अनुभव आहे. त्याकरितां ही कामगिरी माझ्या योग्यतेच्या बाहेरची असली तरी ती यथामति-यथाशक्ति करण्याचें मीं योजिलें आहे. ( छापून झालेले कागद क्रमवार मजकडे येत असल्यामुळें मी ते यथा-अवकाश वाचीत होतों. त्यामुळेंही मला ही स्फूर्ति झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ) यांतील न्यूनतेची पूर्णता व अधिकतेची ( वावगेपणाची ) उपेक्षा अथवा क्षमा करून सज्जन वाचक व ग्रंथकार मला आशीर्वादच देतील अशी मी आशा करितों.

(५) **हें पुस्तक कसें वाचावें,** याबद्दल माझ्या अल्पबुद्धीनुसार मला असें सांगावेंसें वाटतें कीं, जसें वाल्मीकिरामायण वाचण्यास सुरुवात करते वेळीं पहिल्या बालकांडापासून सुरुवात न करितां प्रथम सुंदरकांड वाचावें, नंतर बालकांड वगैरे, असा संप्रदाय असल्याचें ऐकतों; त्याप्रमाणें वाचकांनीं यांतील **'प्रारब्ध व प्रयत्न' हा विषय प्रथम वाचावा,** नंतर '**साध**कांच्या अडचणी व कांहीं सूचना' वाचून मग आरंभापासून '**बारा** प्रकारचे गुरु व भारतांतील गुरुसंस्था' वाचावी. त्यानंतर '**थो**डासा वेदान्त' व त्यापुढील प्रकरणें वाचावयास सुरुवात करावी. प्रारब्ध – प्रयत्नाचा वाद जगाच्या अंतापर्यंत चालतच राहावयाचा; अनेक प्राचीन व अर्वाचीन पुस्तकांतून या विषयावर आजपर्यंत अनेक विद्वानांनीं आपापल्या

बुद्धीनुसार अनेक लेख लिहिले आहेत; पण प्रस्तुत पुस्तकांत या विषयाची जशी मांडणी केली आहे व जितका सांगोपांग विचार केलेला आहे, तितका दुसरीकडे पाहावयास मिळणार नाहीं अशी माझी समजूत आहे. शिवाय त्यांत प्रसंगानुसार इतके सुंदर विचार आलेले आहेत कीं, ते वाचून जो त्यांना आत्मसात् करील तोच परमार्थाचा खरा खरा अधिकारी होईल, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटल्यावरून प्रेमळ वाचकांना मी तशी सूचना करीत आहें. मला हें प्रकरण रामायणांतील '**सुंदरकांड**' वाटतें ! असो.

( ६ ) आतां प्रकृत विषयाकडे वळूं. पहिल्या पृष्ठापासून ४७ व्या पृष्ठापर्यंतच्या विषयांचीं नांवें अनुक्रमणिकेचें पान उघडून वाचून पाहावीं. तीं नांवेंच वाचलीं असतां असें कळून येईल कीं, आजपर्यंतच्या मराठी वाङ्मयांत हे विषय ( विशेषेंकरून **मं**त्रांची उत्पत्ति व **सि**द्धि, **मं**त्रयोगाचीं सोळा अंगें, **सि**द्धारिचक्रशोधन, इत्यादि ) दुसरीकडे कुठेंही इतक्या चांगल्या रीतीनें लिहिलेले आढळणार नाहींत. त्यानंतर '**बा**रा प्रकारचे **गु**रु व **भा**रतांतील **गु**रुसंस्था' ( पृ. ४८ ते ८२ ) हें प्रकरणही तितक्याच शोधक बुद्धीनें लिहिलेलें दिसेल. "**गु**रु व गुरुदीक्षेची आवश्यकता, हल्लींची बुवाबाजी – भोंदू गुरु व कपटी शिष्य, **मा**नवी केंद्रास गुरु न मानतांही कोणत्या अधिकारी साधकाला परमार्थांत पूर्णाधिकार प्राप्त करून घेतां येतो; **ई**श्वरच सर्वांचा गुरु व आदिगुरु होय; **शि**ष्याचें बुद्धिवर्धन करणें हेंच गुरूचें मुख्य लक्षण ( अथवा कर्तव्य ) होय; **च**मत्कार दाखविणें हें लक्षण नव्हे; **के**व्हां केव्हां गुरूलाही शिष्य लफंगे, मूर्ख व नादान मिळतात याविषयीं श्री**तु**काराममहाराजांचा अभंग; **ना**थांचें गुरुस्वरूपवर्णन; **शि**ष्याच्या अंतरंगांत गुरुप्राप्तीची तळमळ उत्पन्न झाली म्हणजे प्रकृतिभेदानुसार व सुकृततारतम्यानुसार परमेश्वर तसतशा अधिकाराच्या गुरूची गांठ घालून देतो; **म**हाभारतोक्त १२ प्रकारच्या गुरूंची परिस्फुटता; **उ**पास्यदेवताच गुरु; **गु**रूच्या आवश्यकतेबद्दल श्रीविवेकानंदस्वामींचें मत" इत्यादि विषय गुरु म्हणवून घेणाऱ्यांना, गुरुभजकांना, तसेच गुरुनिंदकांनाही चटका लावून सोडणारे आहेत !

( ७ ) त्यानंतर '**साधकांच्या अडचणी व कांहीं सूचना**' ( पृ. ८३ ते १३३ ) हें प्रकरण इतक्या कळकळीनें व इतकें जपून, म्हणजे विचार करून लिहिलेलें आहे कीं, तें लक्षपूर्वक वाचून पाहाणाऱ्या साधकाची गतानुगतिक भक्तीची कृति व अल्पतृप्ति नाहींशी होऊन, अंतिम ध्येय नेहमीं त्याच्या डोळ्यांपुढें राहील व तो कोठें न घसरतां अथवा मागें न येतां पुढेंच जात राहील व आपलें ध्येय अथवा

मुक्काम लवकर गांठील. यांतील ‘ **सिद्धपणाची** खोटी समजूत ’ हा विषय तर इतका चटका लावून सोडणारा आहे कीं, अगदींच भोंदू लोक सोडून द्या, पण “ कित्येक साधक साधनाची पराकाष्ठा करून पूर्णत्व मिळविल्यावांचून आपण सिद्ध झालों असें स्वतः मानितात व लोकांसही भासवितात. त्यायोगें ते लोकांस फसवितातच, पण आपणांसही फसवून घेतात. ” असें सांगून “ आत्माकारवृत्तीच्या संतताभ्यासानें निजानंदाचा अनुभव येईल तेव्हांच विषयानंदाची प्रवृत्ति मोडेल ( ‘ परं दृष्ट्वा निवर्तते ’ ) नसल्यास नाहीं ” हें फारच उत्तम रीतीनें प्रतिपादन केलें आहे ( ९६।९७ ). विषयभोगाच्या वासनेचें गांठोडें देहप्रारब्धाच्या खुंटीवर अडकवून ठेवून आपण मोकळे वसूं पाहतों, ही लबाडी होय, हें “ **कर्मफळ म्हणुनि इच्छूं नये काम। तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥** ” या सुंदर अभंगाच्या द्वारें दर्शवून, यथेष्टाचरणाचा तिरस्कार करून, ‘ **इंद्रिया सवडीं लपूं नको** ’ अशी संतांच्या तोंडची सूचना दिली आहे. ‘ हे संतांचे इषारे लक्षांत घेणार नाहीं, त्याचा अधःपात झाल्यावांचून राहणार नाहीं, ’ ( ९८ ), असें मोठ्या कळकळीनें सांगून श्रीकृष्णचरित्राचा मोठ्या मार्मिकतेनें उल्लेख केला आहे. विषयसेवनाच्या कामीं “ शास्त्रांनीं घालून दिलेले नियम म्हणजे जीवावर उगीच लादलेले जुलूम नसून, आपल्या अतींद्रियद्रष्ट्या ऋषींनीं शोधून काढलेले ते निसर्गाचे कायदे आहेत व निसर्ग राजाचे कायदे पृथ्वीवरील कोणत्याही जुलमी राजाच्या कायद्यांपेक्षा अत्यंत कठोर असतात, कारण त्या कायद्यांत क्षमा हा शब्दच नाहीं ” ( ९९ ) असें म्हटलें आहे, तें किती सार्थ आहे व निजकल्याणेच्छूंनीं तें किती लक्षांत ठेवण्यासारखें आहे याचा सुज्ञांनींच विचार करावा.

यानंतर ब्रह्मचर्य व **शांति** वगैरेचें महत्त्व सांगून ‘ **आत्मानंद** अथवा **ब्रह्मानंदसाक्षात्कार हेंच साधकाचें अंतिम ध्येय** ’ असें कळतांच, त्याचें पूर्वींचें अजमासपंचकाचें ‘ अनुमानज्ञान ’ नाहींसें होतें व त्याच्यांत ‘ निश्चयज्ञान ’ उदय पावतें व अभ्यासानें हा लाभ आपण हरिगुरुकृपेनें ‘ याच देहीं याच डोळां ’ पाहूं, असें स्फुरण चढतें ! ( १२६–२८ ). यानंतर भ्याड मनास उद्देशून असलेला श्रीतुकाराममहाराजांचा एक **गंमतीचा अभंग** दिला आहे ( १३० ). तो व त्याचें विवेचन वाचून खरोखरच मोठी गंमत वाटते. परमेश्वरानें मनुष्यास बहाल केलेले उपाय अज्ञ मनुष्याला कसे अपाय दिसूं लागतात, हें तत्त्व या अभंगांत सुंदर रीतीनें सांगितलें आहे. शास्त्रांतील जीं वचनें अथवा ज्या गोष्टी कामक्रोध जिंकण्याच्या उपयोगी आहेत, तींच कामक्रोध वाढविण्याच्या उपयोगीं लावून पुष्कळ साधक विषय-

कर्दमांतील बेडूक बनतात ! ' बायको ही काम जिंकण्याकरितां व मुलें हीं क्रोध जिंकण्याकरितां आहेत ' हें येथेंच (१३०) सांगितलें आहे. सारांश, **अतींद्रिय अशा ब्रह्मसुखाचा लाभ पाहिजे असल्यास जितेंद्रिय राहिलें पाहिजे** ; हें सप्रमाण व सुंदर रीतीनें प्रतिपादन केलें आहे ( १३३ ). विशेष तपशील अनुक्रमणिकेंत पाहावा.

( ८ ) यानंतर ' **थोडासा वेदान्त** ' हें प्रकरण सुरू केलें आहे ; याचें कारण या पुस्तकांतील शेवटचें प्रकरण ' नामयोगरहस्य ' यामध्यें ' **नामानें** नामीचें अनुसंधान कसें करावें ' हें सांगावयाचें असल्यामुळें त्या नामीचें स्वरूप प्रथम बुद्धिगम्य झालें पाहिजे व त्याकरितां त्याची चर्चा थोडी विशद ( स्पष्ट ) रीतीनें करणें जरूर झालें. नुसता वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून पांडित्य मिळविण्याची अथवा मिरविण्याची इच्छा असणारांकरितां वेदान्तशास्त्राचीं इतर अनेक पुस्तकें आहेत, पण वेदान्त**शास्त्रा**पेक्षां वेदान्त**तत्त्वाचा** अभ्यास करून ज्यांना वेदान्त पचनीं पाडण्याची म्हणजे अनुभवांत आणण्याची इच्छा असेल, त्यांनीं हा ' थोडासा वेदान्त ' लक्षपूर्वक वाचावा. यांत प्रथम **बंध** म्हणजे काय, **मोक्ष** कशाला म्हणतात हें थोडक्यांत सांगून, वेदान्ताचें सार एकेक श्लोकांत व ओवींत असलेलीं निवडक वचनें देऊन ( १३४–१४१ ) त्यांचें सुंदर विवरण पुढें केलें आहे. ' **ज्ञा**नाच्या सप्त भूमिका ' ( १४२ ) सुलभ करून सांगितल्या असल्यामुळें, ती माहिती वाचून आपण कुठल्या भूमिकेवर ( पायरीवर ) आहों हें ठरवितां येतें. आपल्या भूमिकेचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळेंच साधक जन्मभर ' अजमासपंचकाच्या भ्रमांत ' राहतो. सप्त भूमिकेच्या ज्ञानाचें विवरण जो लक्ष्यपूर्वक वाचून पाहील, त्याचा हा अनुमान-भ्रम समूळ नष्ट होऊन आत्मनिरीक्षण करण्यास हा एक सुंदर आरसाच आहे, असें त्यास वाटेल व पुढची भूमिका गांठण्यास त्याचे पाय उचलूं लागतील. ज्ञानोदयाचे प्रतिबंध – **आ**वरण व **विक्षेप** – हे अनुक्रमें **व्यतिरेक** व **अन्वय** – ज्ञानानें कसे नाहींसे करावे हें समजेल. ( १४८–१५० ) ' श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् ' या गीतावचनांतील **अभ्यास** व **ज्ञान** यांचें स्वरूप काय आहे हें समजून घेतल्यानंतर **शुद्ध** मन हें आत्मसाक्षात्काराचें करण ( प्रत्यक्ष साधन ) कसें हें लक्षांत भरेल व असें शुद्ध मन कसें संपादावें हें कळेल. हें शुद्ध मन म्हणजेच तिसरी भूमिका ' **तनु**-मानसा ' होय ( तनुमानसा म्हणजे मनाचें तन्वीकरण – सूक्ष्मीकरण ) हें कळल्यानंतर अर्थात् ही भूमिका हस्तगत झाल्यानंतर साधक ' **सत्त्वापत्ति** ' नामक चतुर्थ भूमिकेवर आरोहण करील. या भूमिकेवरच **आ**त्मसाक्षात्कार होतो. यालाच ' अपरोक्षानुभव ' अथवा ' **स्वानुभूति** ' म्हणतात. येथेंच साधक कृतार्थ होतो. ( १४७ ). साक्षात्काराचें **स्वरूप**च न

समजल्यामुळें साधक अंदाजाच्या – अनुमानाच्या – अंधकारांत चांचपडत राहतो. यानंतरच्या भूमिका, कोमल अपरोक्षाचें दृढापरोक्ष होण्याकरितां आहेत. तो व त्याच्यापुढील विषय सर्व अमोल आहेत. नुसता **जड चैतन्याचा** म्हणजे **अनात्मा व आत्मा** यांचा विवेक समजल्यानें ज्ञानाची पूर्णता होत नाहीं. ( हें व्यतिरेकज्ञान होय.) तर दिसणारें **जड सुद्धां चिन्मात्र आहे** हें समजेल ( हें अन्वयज्ञान, ) तेव्हांच ज्ञानाची पूर्णता होते व असें समजावून देणें, हीच '**गुरुत्वाची सीमा**' होय. अर्थात् 'तत्पद-साक्षात्कार' हीच '**ज्ञानाची पूर्णता**' ( १५४ ) हें फारच उत्तम सांगितलें आहे. जडाचा निरास करून चैतन्य घेतल्यानें जड म्हणून एक शिल्लक राहतेंच ; अर्थात् द्वैत शिल्लक राहिलें. मग त्याला संत अद्वैत ज्ञान कसें म्हणतील ? तर ज्या ज्ञानानें सर्व चराचर ब्रह्मरूप आहे असें कळेल, तेंच अद्वैतज्ञान होय. हा अद्वैत-वेदान्ताचा सिद्धांत **श्री**शंकराचार्य, **ज्ञा**नेश्वरमहाराज, **वा**मनपंडित वगैरेंच्या ग्रंथांचे निवडक उतारे देऊन सुव्यवस्थित रीतीनें मांडला आहे. एकच चिति म्हणजे चैतन्य शब्द-स्पर्श-रूप-रस-गंधरूपानें नटलें आहे हाच त्या परमेश्वराचा '**ऐश्वर योग**' होय ( १५५ ) असें सांगून त्यास **निजगुण शिवयोग्याच्या** ग्रंथांतील मनुष्याच्या कंठांतील स्वर व त्याचीं बनलेलीं स्वरव्यंजनात्मक अक्षरें व रागरागिणी याचा दृष्टांत किती समर्पक आहे ( १५५–५६ ) तो पाहून मनाला परम शांति व समाधान वाटतें. प्रथम परोक्षज्ञान तरी निःसंशय झालें पाहिजे. मग अभ्यासानें व हरिगुरुकृपेनें तें अपरोक्ष होऊन कृतार्थता लाभेल. उगीच वेदान्ताचीं भाराभर पुस्तकें वाचून ज्ञानाभासावर तृप्त राहणें योग्य नाहीं. **ज्ञानाभास मावळल्यावांचून ज्ञानाभ्यास करितां येणार नाहीं.** असो. 'आत्यंतिक सुखा'चें वर्णन पुनः येथें पृष्ठ १६६–६७।१७५–७८ यांमध्यें आलें आहे. **चित्त**-चैतन्याच्या भेटीची 'खूण' येथें सांगितली आहे. 'अद्वैतानुभवाचें साधन व **स्वरूप**' हें येथें अत्यंत स्पष्ट सांगितलें असून ( १७८–८१ ) त्यानंतर '**प्रपंच** मिथ्या' म्हणजे काय ( १८१–८३ ) हें इतकें प्रांजल करून सांगितलें आहे कीं हरिदास-पुराणिकादिकांच्या कथापुराणांमध्यें 'प्रपंच मिथ्या' म्हणून जी ओरड आजपर्यंत आपण ऐकत आलों व त्यामुळें, प्रपंच तर सोडवत नाहीं व परमार्थ गोड लागतो पण धरवत नाहीं, अशी जी भयंकर अडचण वाटत होती ती नाहींशी होऊन, मनाला मोठा धीर वाटतो ! तसेंच पुढील प्रकरण '**ज्ञानी व्यवहार करूं शकतो कीं नाहीं**' ( १८३–८६ ) हें वाचलें म्हणजे तर परमार्थास लागल्या-नंतर प्रपंच सोडावा लागेल अशी वाटणारी भीति पार नाहींशी होऊन संसारी

साधकास नवनागसहस्रबळ प्राप्त झाल्याप्रमाणें वाटेल अशी माझी तर समजूत आहे. साधकानें मात्र ज्ञानसिद्धि पदरांत पडेतोंपर्यंत व्यवहाराची उपाधि कमी करून अभ्यासाकरितां एकांतसेवन करीत असावें ( १८७ ), ही सूचनाही किती गोड व हितकारक आहे हें प्रामाणिक व मर्मज्ञ साधकच जाणतील. शेवटीं **'पुनश्च सर्वात्मभाव व गुरुकृपा'** हें प्रकरण दिलें आहे, तें अंध व डोळस गुरुभक्तांनाही आवडल्यावांचून राहाणार नाहीं. **गुरुकृपेचें सामर्थ्य व आवश्यकता** श्रुतिस्मृतिपुराणादिकांना व प्राचीन संतांना संमत असून श्रीविवेकानंदांसारख्या अर्वाचीन विद्वान संतांनाही मान्य आहे. ( याबद्दल स्वामी विवेकानंदांचे उद्गार मागें पृ. ८१–८२ मध्यें दिले आहेतच. ) पण विवेकानंदस्वामी ग्रॅज्वेट झाले तरी ते भारतीय ( इंडियन ) होते, पिढ्यानुपिढ्या मुरलेला गुरुभक्तीचा मोह त्यांस आवरला नसेल, अशी शंका येथील आधुनिक विद्वानांना कदाचित् येईल, म्हणूनच न जाणों, परमेश्वरानें युरोपीय प्रख्यात विद्वान **पॉल**ब्रंटनसाहेबांना, हिंदुस्थानांत अध्यात्मकोविद ( Spiritual ) म्हणून प्रसिद्ध असलेले बावा बैरागी, फकीर अवलिया, साधुसंत यांची अध्यात्मसाक्षात्काराच्या उद्देशानें भेट घेण्याकरितां आणलें ! त्यांनीं आसेतुहिमाचल फिरून वरील लोकांच्या गांठी घेतल्या, तीव्र जिज्ञासेनें त्यांच्याकडे प्रश्नोत्तरें केलीं. या खटपटींत असतां त्यांना भोंदू, मूर्ख, अर्धकच्चे अशाही लोकांची गांठ पडली. शेवटीं मद्रास इलाख्यांतील अरुणाचल क्षेत्रांत वास करून राहिलेले **श्रीरमणमहर्षि** यांची गांठ पडली व तेथें त्यांचें समाधान झालें. त्यांनीं त्यानंतर 'A Search in Secret India' नांवाचें आपल्या अनुभवाचें एक मोठें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. तें वाचून युरोपांतील व हिंदुस्थानांतील विद्वान लोक त्या साधुवर्याच्या दर्शनास हल्लीं येऊं लागले आहेत. **पॉल**ब्रंटनच्या व **र**मणमहर्षींच्या मुलाखतीचे एक दोन लेख केसरीमध्येंही थोड्या दिवसांपूर्वी प्रसिद्ध झाले आहेत. तात्पर्य सांगण्यास कारण, त्या पॉलब्रंटनला श्रीरमणमहर्षींच्या सहवासानें व कृपेनें जो लाभ झाला त्याचें वर्णन त्यांनीं दिलें आहे. अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या "Secret path" नांवाच्या पुस्तकांत अशा कृपेसंबंधानें ते म्हणतात —

"Grace ! Grace !! Grace !!! Grace is the essential prerequisite for enlightenment, yet you cannot supply it. Only your Overself ¦ or a true Adept can do it." इत्यादि, इत्यादि.

¦ आपले प्राचीन संत ज्याला 'हृदयस्थ' म्हणतात, त्याला जे. कृष्णमूर्ति हे इंग्रजींत 'Beloved' **शब्द** लावतात व **पॉलब्रंटन** हे 'Overself' म्हणतात. पहिल्यांत प्रियत्वभाव व दुसऱ्यांत सत्ताभाव दिग्दर्शित असल्यामुळें दोन्ही शब्द गोड आहेत.

हें वाचलें म्हणजे आपल्या संतांनीं व शास्त्रकारांनीं गुरुकृपेचें जें इतकें वर्णन केलें आहे, तें भोळ्याभाविकतेचें किंवा अर्थवादाचें नसून, त्यांत कांहीं तरी तथ्य आहे, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. आंग्लभाषाभिज्ञ साधकांनीं तें इंग्रजी पुस्तक एकदां जरूर वाचून पाहावें अशी मी विनंतिवजा शिफारस करितों. तें वाचणाऱ्यास प्रस्तुत पुस्तकांतील '**भावशक्तीनेंच भावोत्पादन होत असतें**' (१९२) '**गुरुभावाच्या पोटीं ब्रह्मभाव जन्मास येतो**' (१९५) ह्या विधानांचें सत्यत्व पटून आनंद वाटल्यावांचून राहणार नाहीं अशी मला खात्री आहे. स्वामी विवेकानंद अमेरिकेंत 'माय मास्टर' (माझे सद्गुरुनाथ) या विषयावर बोलावयास उभे राहतांक्षणीं त्यांची जी अवस्था झाली तिचें वर्णन (१९३) वाचलें म्हणजे 'धन्य अशा महापुरुषाची!' असें वाटल्यावांचून राहत नाहीं.

(९) ह्या वेदान्तविषयानंतर '**ज्ञान व भक्ति**' अथवा '**निर्गुण व सगुण**' ह्या विषयास सुरुवात झाली आहे (२०१–५). यांत प्रथम चिदाभासाच्या (जीवाच्या) सप्तावस्थांचें वर्णन करून वेदांचीं तीन कांडें – **कर्म**, **उपासना** व **ज्ञान** – हीं जीवाच्या त्रिगुणांला अनुलक्षून केल्याचें सांगून, तसेंच **कर्म** उपासना – ज्ञानानें चित्ताचें मल – विक्षेप – आवरण हे दोष नाहींसे होऊन '**चित्ताचें चैतन्य**' होतें व साधक कृतार्थ होतो, असें सांगितलें आहे. पुढें 'उपासना व **भक्ति** यांतील **तारतम्य**' सांगून ज्ञानोत्तरभक्तीचें वर्णन अत्यंत प्रेमळपणानें केलेलें आहे (२०६–१०). त्याची गोडी भाग्यवान प्रेमळ भक्तच जाणूं शकतील. त्यानंतर '**भावेंवीण भक्ति**' – 'भक्तीच्या शाळेंत भावाचें शिक्षण दिलें जात नाहीं' (२११ ते २२२) ह्या विषय तर इतका सुरस वठला आहे कीं, त्याचें वर्णन करण्यास माझी लेखणी अगदीं असमर्थ आहे! जनरूढींत चालू असलेली अथवा मानली गेलेली भक्ति किती व्यंगांनीं भरलेली आहे, भजनभक्तीमध्यें अथवा वैदिक कर्मानुष्ठानामध्येंही 'भावशून्य' क्रियाच कशा चालतात, याबद्दलचें दिलेलें अनुभविक वर्णन कोणालाही खोडून काढतां येण्यासारखें नसल्यामुळें लेखकाच्या मार्मिक निरीक्षणाची निर्मत्सरी व रसिक विद्वान तारीफच करतील व समाजांतील हे दोष काढून टाकल्याशिवाय असल्या कर्मानुष्ठानापासून व भजनादिकांपासून गुणप्राप्ति बाजूलाच राहिली, पण न कळत प्राप्त होणारे अनर्थ चुकणार नाहींत, असेंच त्यांना वाटेल अशी मला खात्री आहे. समाजाच्या कल्याणाकरितां या विषयाची सर्वत्र चर्चा होण्यासाठीं या प्रकरणाचीं स्वतंत्र पत्रकें अथवा पुस्तिकाही समाजधुरीणांनीं काढून वांटाव्यात असें मला वाटत आहे!

ह्या चुका सुधारण्याची सद्बुद्धि समाजाला होईल तेव्हां खरें. असो. शास्त्रकारांनीं रचलेले पूजादिकांतील मंत्र अथवा आपल्या संतांनीं गाइलेले अभंग वगैरे यांमध्यें, त्यांच्या भावांतून शब्द निघालेले आहेत, आम्हांला त्या शब्दांतून त्यांच्या भावाकडे जावयाचें आहे. 'आम्ही शब्दांवरून त्यांच्या त्या भावाकडे पोंचलों, शब्दोत्पादक भावाशीं आमचें तादात्म्य झालें, तर त्या संतांवर झालेली भगवंताची कृपा आमच्यावर होण्यास वेळ लागणार नाहीं' ( २१६ – २२ ) ही सूचना किती मर्मस्पर्शी, किती अमोल व कशी हितदायक आहे हें रसिक व भाग्यवान् वाचकच जाणूं शकतील. त्यानंतरचे '**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**', '**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्**' या भगवद्वचनाचे उतारे ( २२२ – २४ ) मागें सांगितल्याप्रमाणें प्रसादाची म्हणजे कृपेची अचिंत्य शक्ति दर्शविणारे आहेत. याबद्दल दिलेला सूतसंहितेंतील उताराही फारच महत्त्वाचा आहे.

( १० ) यानंतर '**प्रारब्ध व प्रयत्न**' ( २२५ – २७० ) हा मोठा वादग्रस्त विषय, प्रापंचिक व पारमार्थिक दोन्ही लोकांमध्येंही नेहमीं चर्चेस येणारा, असा सुंदर लिहिला गेला आहे कीं, हाच विषय वाचकांनीं प्रथम वाचावा अशी शिफारस मीं त्यांना पूर्वीच केली आहे व त्या विषयाबद्दल माझे प्रेमोद्गारही मीं तेथें लिहिले आहेत, करितां त्याची येथें द्विरुक्ति करीत नाहीं. वाचकांनीं **अनुक्रमणिकेंतील तपशील** पुनः वाचून पाहावा, नंतर विषयच वाचावा, म्हणजे त्यांची खात्री होईल.

( ११ ) त्यानंतर '**साधकांसाठीं खास सूचना**' ( २७१ – ३१६ ) या प्रकरणास सुरुवात केली आहे. साधकांत '**निःस्पृह**' व '**संसारी**' साधक असे दोन भेद. निःस्पृह साधक म्हणजे सर्वसंगपरित्याग करून रानावनांत जाऊन परमार्थसाधन करणारा व संसारी साधक म्हणजे घरीं बायकामुलांत राहून परमार्थसाधन करणारा. पैकीं दुसऱ्या वर्गाचेच लोक जास्त असल्यामुळें आणि त्यांच्याच हातांत हें पुस्तक जाणार असल्यामुळें संसारांत कशा रीतीनें वागलें असतां परमार्थसाधन सुलभ होईल हें इतक्या चांगल्या रीतीनें सांगितलें आहे कीं, तें परमार्थाची इच्छा नसणाऱ्या केवळ संसारी लोकांनींही वाचलें, तरी

**" अवघाचि संसार सुखाचा करीन ।**
**आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ "**

ही ज्ञानेश-उक्तीची प्रतिज्ञा आपण तडीस नेऊं असें त्यांस वाटेल ! मग परमार्थसाधकांची गोष्ट काय विचारावी ?

**संसारत्याग न करितां। प्रपंच-उपाधि न सांडितां।**
**जनामध्यें सार्थकता। विचारेंचि होय ॥**
**...याचि जन्में येणेंचि काळें। संसारीं होइजे निराळें।**
**मोक्ष पाविजे निश्चळें। स्वरूपाकारें ॥ "**

असें सांगून समर्थांनीं —

**"ये गोष्टीस करी अनुमान। तो सिद्धचि पावेल पतन।**
**मिथ्या वदे त्यास आण। उपासनेची ॥ "**

असें मोठ्या त्वेषानें, उपास्यदेवतेची शपथ घालून, समर्थांनीं सांगितलें आहे! यांत 'विचारेंचि सार्थकता होय' म्हटलें आहे, तो विचार कसा करावा, कोणत्या विचाराच्या बैठकीवर बसून संसार केला असतां तो बाधणार नाहीं, नव्हे, संसारच परमार्थ कसा होईल, हें ह्या प्रकरणांतच वाचून पाहावें. मी त्याचें वर्णन करूं लागलों तर रसभंग होईल म्हणून करीत नाहीं. त्यानंतर —

(१२) '**खास स्त्रीसाधकवर्गासाठीं**' (३१७–३६७) या प्रकरणांत तर कमालीच्या कळकळीनें स्त्रीवर्गाला परमार्थसाधनाच्या सूचना केल्या आहेत. मागील प्रकरणांतील 'खास सूचना' ह्या स्त्रियांनाही उपयोगी आहेतच, पण स्त्रीत्वामुळें व्यवहारांत कांहीं विशेष परिस्थिति उत्पन्न होत असल्यानें त्यांच्यासाठीं म्हणून कांहीं निराळ्या सूचना करणें अवश्य वाटलें. मागच्या व ह्या प्रकरणावरून ग्रंथकाराच्या अंगीं धर्माभिमानाप्रमाणें देशाभिमानाची ज्योतही कशी पेटत आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल. [ त्यांच्या वयाच्या १८ व्या वर्षापासून तों आज – ( शके १८५७ वय ६४ ) पर्यंत त्यांच्या अंगावर परदेशी सूत नाहीं ! लोकमान्यांच्या चळवळीपूर्वी म्हणजे कै. गोपाळराव इंदापूरकर व पुण्याचे सुप्रसिद्ध सार्वजनिक काका यांच्या चळवळीपासून त्यांचें स्वदेशी व्रत चालू असल्याचें समजतें. हे दुसऱ्या प्लेगच्या वेळीं गोमांतकांत राहण्यास जाऊन तेथें एका गांवीं यांनीं व त्यांचे बंधूंनीं मराठी, इंग्रजी व संस्कृत शिकविण्याची शाळा काढली व सार्वजनिक कार्यासाठीं 'सरस्वतीमंदिर' नांवाची संस्था स्थापन करून मुष्टिफंड सुरू केला. तसेंच मराठेशाहींत प्रसिद्धीस आलेले गोमांतकांतील एक शूरवीर पुरुष कै० जिवबादादा बक्षीबहाद्दर (महादजी सिंदे यांचे मोठे यशस्वी सेनापति) यांचा स्मारकोत्सव सुरू केला. पण त्या वेळची तेथील परिस्थिति अनुकूल नसल्यामुळें २।३ वर्षांनीं त्यांची चळवळ बंद पडली. मुष्टिफंडास त्यांचे मित्र 'भिकेचे डोहाळे' म्हणूं लागले ! परंतु तीच कल्पना पुढें

थोड्या दिवसांनीं तरुणांनीं घेऊन तेथें कांहीं गांवीं शाळा स्थापन केल्या व त्या आतां उत्तम चालल्या आहेत असें समजतें. असो. ] पृथ्वीवरील इतर देशांपेक्षां आपल्या भरतखंडाचें वैशिष्ट्य अनेक बाबतींत आहे, त्या सर्वांत आर्यस्त्रियांचें पातिव्रत्य हें ' मुकुटमणिवैशिष्ट्य ' आहे ( ३१८ ) असें सांगून आपल्या देशांतील शूर, वीर, धीर, उदार, बुद्धिमान, कलावान व तत्त्वज्ञानी पुरुषांशींही स्पर्धा करणारे कोणी इतर देशांत सांपडतील, पण आर्यस्त्रीरत्नाच्या पातिव्रत्याशीं स्पर्धा करणारी एकही स्त्री इतर देशांच्या इतिहासांत सांपडणार नाहीं, असे यथार्थ उद्गार काढले आहेत. त्याबरोबर पातिव्रत्य म्हणजे केवळ परपुरुषास स्पर्श न करणें इतकेंच नव्हे (' तथा पतिव्रता न स्यात् केवलं योनिरक्षणात् ') हें सांगण्याची खबरदारीही त्यांनीं घेतली आहे. पतिव्रताधर्मानें ऋतंभरा प्रज्ञा, धर्ममेघसमाधि व त्रिकाळज्ञानही प्राप्त होतें, मोठमोठ्या तपस्व्यांना व योग्यांनाही अगम्य अशा शक्ति स्त्रींत केवळ पतिनिष्ठेनें उत्पन्न होतात; याचीं प्राचीन उदाहरणें देऊन हल्लींच्या एका सतीची प्रत्यक्ष घडलेली गोष्ट दिली आहे. ती वाचून अंगावर रोमांच उभे राहतात, डोळे प्रेमाश्रूंनीं व हृदय धन्यतावृत्तीनें भरून येतें ! आपल्यांतील विवाहसंस्कार हा केवळ विषयसुखाकरितां नाही, त्याचा हेतु फार उच्च आहे, हें तात्त्विक दृष्टीचे लोक जाणूं शकतीलच; पण सावित्री, सीमंतिनी, दमयंती, लोपामुद्रा, अरुंधती, अनसूया, रेणुका, सुकन्या यांचीं चरित्रें ऐकणाऱ्यांस सुद्धां विवाहाचा उद्देश केवळ इंद्रियसुख नव्हे हें समजून येईल. लोपामुद्रा, रेणुका, सुकन्या या राजकन्या असून त्यांनीं अनुक्रमें अगस्ति, जमदग्नि व च्यवन अशा अरण्यवासी ऋषींना वरलेलें आहे. सुकन्येचा पति च्यवन ऋषि हा तर जगदीं जरठ व अंध होता ! या आर्यकन्या आपल्या तपस्वी पतींबरोबर, आपलें जन्मापासूनचें राजवैभवी सुख विसरून अरण्यांत ऋषिपत्न्यांचेंच जीवन मोठ्या आनंदानें कंठीत असत. यावरून त्यांच्या धैर्याची व त्यागवृत्तीची आपणांस कल्पना करितां येईल. या पुराणांतील गोष्टी घटकाभर बाजूस ठेवून, गेल्या स्वदेशी चळवळीमधील एका आर्यकन्येचें विवाहाबाबतींतील धैर्य पाहिलें असतां त्याच त्यागवृत्तीची आठवण होते व आपल्या आर्यकन्यांबद्दल मोठा अभिमान वाटतो. प्रसिद्ध मीरतच्या खटल्यांतील एक कैदी तुरुंगांत असतां तो उद्यां काळ्या पाण्यावर जाईल किंवा फासावर चढेल याचा नेम नाहीं असें माहीत असतांही, या तरुण सुशिक्षित आर्यकन्येनें तुरुंगाच्या भिंतीबाहेर उभी राहून त्याशीं लग्न लावलें ! ही गोष्ट थोड्या वर्षांपूर्वी सर्व वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध झाली होती. तो लग्नविधि कसाही असो, तिच्या निश्चयाची व धैर्याची विद्वान लोक कोणत्याही दृष्टीनें तारीफ करोत,

पण **आर्यकन्यांच्या वैषयिक वृत्तीच्या त्यागाचेंच हें उत्तम उदाहरण** असें मानून तिला मी धन्यवाद देतों व वंदनही करितों. केवळ विषयसुखासाठीं लग्न असें समजणाऱ्या व्यक्तीकडून असा निश्चय करवेल काय ? हा केवळ आर्यांच्या रक्ताचा गुण आहे. अलीकडे पाश्चात्य शिक्षणानें कितीही अनार्यकल्पना समाजांत रूढ झाल्या, तरी आपल्या आर्यभूमींत त्या दृढमूल होऊन बसणार नाहींत, अशी शुभ आशा अथवा आत्मविश्वास लेखकांनीं प्रगट केला आहे ( पृ. ३१९ ), तो यथार्थ आहे अथवा ठरो असें मी परमेश्वराकडे मागतों. ' विवाह केवळ विषयभोगाकरितां नाहीं, ' हें मत आर्यभूमीशिवाय इतर भूमींत ऐकूंही येणार नाहीं. असो. '**विषयानंदाचा लोभ हा निर्विषयानंदाच्या लाभाला मुकविणारा आहे**' ( ३२७ ); '**शा**लिग्रामांत विष्णुबुद्धि करितात त्याप्रमाणें पतींत ईश्वरबुद्धि करावी, त्याचप्रमाणें बालकांना सुद्धां भगवद्बुद्धीनें पाहून त्यांची शुश्रूषा करावी ' ( ३२९–३० ), हा विषय इतका गोड लिहिला आहे कीं, त्या दृष्टीनें वागत राहिल्यास परमार्थ म्हणून दुसरीकडे शोधण्याची गरजच वाटणार नाहीं. बायकांनीं ' **चूल** व **मूल** ' सांभाळण्याचें कर्तव्य करण्यांत दक्ष राहणें ही किती पवित्र व किती कठिण गोष्ट आहे याची कल्पनाही पुरुषांना येणें शक्य नाहीं ; खानावळींतील किंवा स्वैंपाक्याच्या हातचें जेवण आणि घरांतील माता-पत्नींनीं करून वाढलेलें जेवण यांत कसा फरक असतो ( ३३२ ), तसेंच '**लहान** मूल म्हणजे **जुलमी** राजा, ' या राजाची सत्ता घरांत सर्वांवर चालते, त्याचेवर कोणाची सत्ता चालत नाहीं, त्यांची गोपाळकृष्णबुद्धीनें सेवा केल्यास किती आनंदाची असते, हें वर्णन इतकें हृदयंगम झालें आहे कीं, ( यशोदामातेबरोबर सगळ्या गोकुळास सतावणारे ) हे गोपाळकृष्ण ज्यांच्या घरीं अधिक असतील ते ' धन्याः खलु ' असें वाटल्यावांचून व ह्या सात्त्विक विनोदानें हसूं आल्यावांचून राहत नाहीं. '**दे**वाला भट व **मु**लांना मास्तर ' लावून त्यांच्याकडे पुनः न पाहाणारे आईबाप कशी चूक करितात ( ३३४ ), ' मुलें हीं राष्ट्रवृक्षाचीं उमलणारीं फुलें आहेत ' हें त्यांच्या कसें लक्षांत येत नाहीं व असे उदासीन आईबाप राष्ट्रदेवतेचाही कसा अपराध करतात हें वाचलें, तसेंच आम्ही मुलांस शिकवितों त्यापेक्षां मुलेंच आम्हांस प्रेम, क्षमा, दया, आनंद व सरलता, इत्यादि दिव्य गुण कशीं शिकवितात हें वाचलें म्हणजे मनाला विस्मयानंद वाटतो. '**मुलांना विद्यावान करण्यापेक्षां गुणवान करण्याकडे लक्ष ठेवावें**' '**मुलांवर भीतीचा दाब ठेवण्यापेक्षां प्रीतीचें वजन ठेवावें**' हीं वाक्यें ( ३३५–३६ ) वाचलीं म्हणजे आपल्या नित्याच्या प्रपंचव्यवहारांत आपण कशा चुका करितों हें दिसून येऊन पश्चात्ताप होतो. मुलांच्या डोक्यावर हल्लीं

पुष्कळ लोक ख्रिश्चन टोपी (हॅट) ठेवतांना दृष्टीस पडतात. त्याबद्दल लेखकाचे उद्गार धर्माभिमानी व देशाभिमानी लोकांनींही मनन करण्यासारखे आहेत (३३६). मुलांचें शिक्षण कधींपासून सुरू करणें योग्य आहे, याबद्दलचे उद्गार तर प्रत्येक तरुण-वृद्ध स्त्रीपुरुषांनीं वाचून पाहिले पाहिजेत (३३७). मुलींच्या शिक्षणसंबंधाचे उद्गारही तसेच बहुमोल आहेत. हें मुलामुलींचें शिक्षण साधकाच्या कर्तव्यकक्षेबाहेरचें नाहीं; आपल्या वंशांत सुप्रजा निर्माण व्हावी असा पितरांचा संकल्प असतो; आपल्या कुळांत 'अब्रह्मवित्' संतति निपजूं नये अशी उपनिषत्कालीन ऋषींची मागणी आहे, मुलांना शालेय-शिक्षणाबरोबर दैवी संपत्तीचें शिक्षण देणें हें ईश्वरसंकल्पास साहाय्यकारक असल्यामुळें तसें करणारे आईबाप थोरल्या देवाच्या व राष्ट्रदेवतेच्याही कृपेस पात्र होतील (३३८); पुत्रजन्मापेक्षां कन्याजन्माचें महत्त्व शास्त्रांत अधिक सांगितलें आहे (३४०), वगैरे उद्गार वाचले म्हणजे लेखकाची परमार्थशिकवण एकांगीं नसून कशी सर्वांगीण व सुंदर आहे हें दिसून येऊन मोठें कुतूहल वाटतें! वैवाहिक जीवनाच्या महत्त्वाचे उद्गार व त्यावरील पाश्चात्य व पौर्वात्य मोठमोठ्या विद्वानांचीं दिलेलीं मतें किती विचारणीय आहेत, तीं वाचूनच पाहावीं म्हणजे समजेल. त्यानंतर नामनिष्ठेच्यायोगें झालेल्या दोन प्रौढ कन्यांच्या विवाहाची गोष्ट सांगून, तसेंच ऋग्वेदकालीन विवाहाची वयोमर्यादा कशी होती हें सप्रमाण दर्शवून **श्री**दत्तजन्माची एक सुंदर गोष्ट त्यांनीं सांगितली आहे (३४३–४७). ती पाहातां स्त्रियांचें वैवाहिक जीवन किती उच्च व पवित्र आहे, तसेंच ब्राह्मणांच्या मुलांना जशी मुंजीची आवश्यकता, तशीच स्त्रियांना विवाहाची आवश्यकता आहे, हेंही दिसून येतें. 'स्त्रियांना विवाहविधीच वैदिक संस्कार, पतिसेवाच गुरुकुलवास व गृहकृत्येंच त्यांचें अग्निहोत्र असें मन्वादि स्मृतिकार म्हणतात' यांत किती अर्थ भरला आहे, हें पवित्रांतःकरणी स्त्रियाच जाणूं शकतील (३४७).

यानंतर असवर्ण अथवा भिन्नवंशीय विवाहाबद्दल सुधारलेल्या जर्मन लोकांचें निषेधात्मक मत सांगून, हल्लींचें संततिनियमन-मत किती राष्ट्रबलविघातक आहे हें सांगितलें आहे. 'समाजाचा चारी बाजूंनीं होत असलेला अधःपात धर्मवीर अशा आर्य महिलांनींच मनावर घेतल्यास बंद होईल' (३४८–४९) अशी इच्छा प्रगट केलेली किती सत्य आहे हें तशा स्त्रियाच जाणूं शकतील.

संततिनियमनाच्या घातुक चालीपासून लोकसंख्येवर व आरोग्यावरसुद्धां कसा भयंकर परिणाम होतो हें सप्रमाण दाखविण्याच्या उद्देशानें हल्लीं **आस्ट्रिया** देशांतील राजधानीच्या शहरीं एक जंगी प्रदर्शनहि उघडण्यांत आल्याचें **वर्तमानपत्रांमधून**

प्रसिद्ध झालें आहे ! प्रथम त्या चालीच्या ‘ गुणाचा ’ दुंदुभि पश्चिम दिशेंत वाजलेला आमच्या लोकांच्या कानीं पडला व ती चाल येथें सुरू झाली ; तसा त्या चालीच्या ‘ दोषाचा ’ दुंदुभिही कानीं पडला पाहिजे, म्हणजे मग आमचे लोक सावध होतील. पण तो केव्हां पडतो पाहावें ! आमच्या पूर्वजांनीं मानवी स्वभावाचा चांगला अभ्यास करूनच विवाहसंस्था सुरू केली आहे व त्या सर्वांना धर्माच्या दावणींत अशा रीतीनें गोवून टाकलें आहे कीं मानवांना त्यायोगें ‘ भोगांतही मोक्ष ’ साधतां येईल ! पण आपल्या धर्माच्या आचारविचारांचें थोड्या दमानें मनन करतील तेव्हांच ना त्याच्या रहस्याचा प्रकाश होईल ! असो.

यानंतर ‘ **मु**लींचें कॉलेजांतील शिक्षण ’ ( ३४९–५५ ) हा विषय ‘ कल्याण ’ **मा**सिकाच्या आधारें लिहिलेला विचारी आईबापांनीं खरोखर मनन करण्यासारखा आहे. त्यानंतर स्त्रीशिक्षणाबद्दल, संततिनियमनाबद्दल वगैरे महाराष्ट्रीय विद्वानांचीं मतें देऊन ‘ **स्त्रि**यांची समाजसेवा ’ ( ३५६ ) म्हणजे काय, शिक्षणावांचूनही पुरुषांपेक्षां स्त्रिया कशा बुद्धिमान् असतात, वगैरे सांगितलें आहे ( ३५७ ). **वि**धवा स्त्रियांनीं परमार्थसाधनास या बुवाबाजीच्या काळांत तर किती जपून वागलें पाहिजे हें सांगून, त्यांनीं ध्यानयुक्त नामस्मरण करीत व संतांचे प्रासादिक ग्रंथ वाचीत असावें, अशी सूचना केली आहे ( ३५७–५८ ). मुमुक्षूंनीं प्रासादिक ग्रंथ कसे वाचावे, याबद्दलची एक विशिष्ट पद्धत ( ३५८ ) सांगितली आहे. ती स्त्रियांना तर बिनधोक्याची, पण पुरुषांनादेखील फारच फायद्याची आहे. त्या पद्धतीपासून देवतादर्शनाचा अनुभव मिळविलेल्या एका वकीलाची गोष्ट ( ३५९ ) सांगून, त्यापुढें ‘ देवतादर्शनाचे इतर कांहीं अनुभव ’ ( ३६० ) सांगितले आहेत, ते वाचून साधकांना तसे अनुभव आपणही मिळवूं शकूं असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. नंतर स्त्रियांना परमार्थाचा अधिकार केव्हां येतो अथवा आला असें समजावें व स्त्रियांना उपदेश करण्याचा अधिकार कोणत्या पुरुषास येतो, याबद्दलचे श्रीएकनाथ महाराजांचे उद्गार सांगून ‘ कोणती स्त्री वैकुंठास जाऊं शकते ’ ( ३६४–६५ ) हें नाथांच्याच वाणीनें सांगितलें आहे. तें वाचून प्रत्येक स्त्रीला आनंद व उत्साह वाटल्यावांचून राहणार नाहीं. यांत ‘ **कर्मानुसार गति** ’ या सिद्धांताचें रहस्य इतकें सोपपत्तिक सांगितलें आहे कीं, ‘ अखंडनामानुचिंतन-भक्तीनें ’ जडदेहाचे परमाणुही कसे ‘ चिन्मय ’ बनतात, हें समजून चिकित्सक बुद्धीच्या मनुष्याचेंही मन विरघळल्यावांचून राहणार नाहीं.

यानंतर या ग्रंथाचें अंतिम प्रकरण – ज्याला **नरजन्माचेंही अंतिम ध्येय** म्हणतां येईल तें —

( १३ ) '**नामयोगरहस्य**' ( ३६८–९५ ) शक्य तितक्या सोपपत्तिकपणें अगदीं उघड करून सांगितलें आहे. '**नामोच्चारण**' व '**नामस्मरण**' यांतील भेद सांगून, उच्चारणाचे प्रकार **वाचिक**, **उपांशु**, **ध्वान**, **मानस**, इत्यादींची माहिती दिली आहे. तसेंच **ध्यानजप** व **अनन्यजप** यांबद्दल एका महात्म्याचे गूढ विचार दिलेले आहेत ( ३७२–७५ ). यानंतर '**नामानें नामीचें अनुसंधान कसें करावें**' हा विषय इतका सुंदर सांगितला आहे कीं तसा दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत आढळणार नाहीं. तसेंच '**चार** वाचा व त्यांचीं स्थानें', '**श्वासांत** नामस्मरण', '**श्वासांतील** नामजपाचे प्रकार' वगैरे विषय अगदीं अपूर्व आहेत ! हें सर्व पाहिलें म्हणजे मला पहिल्या भागाच्या पहिल्या आवृत्तीचे प्रकाशक यांनीं लिहिलेल्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेंत रस्किनचे जे शब्द दिले आहेत ते येथेंही द्यावेसे वाटतात —

> " So far as he knows, no one has yet said it ;
> So far as he knows, no one else can say it. "

तसेंच " A good book for all times " असा हा ग्रंथ झाला आहे. महाराष्ट्र वाङ्मय आणि जनता यांस ग्रंथकर्त्यानें या लेखांच्या योगानें अत्यंत ऋणी करून ठेवलें आहे. असा ग्रंथ कित्येक पिढ्यांत एकादाच होतो, असें म्हणण्यास मला प्रत्यवाय वाटत नाहीं.

( १४ ) जगांतील प्रत्येक धर्मात अनेक प्रकारचीं दानें सांगितलीं आहेत. अन्नदान, वस्त्रदान, विद्यादान, भूमिदान, कन्यादान, प्राणदान इत्यादि; व हीं दानें यथाशक्ति कमीअधिक प्रमाणांत करणारे दातेही पुष्कळ आहेत व ते धन्य होत. पण सर्व बाजूंनीं पूर्ण विचार करून आमच्या संतवर्यांनीं सर्वांत अधिक महती कोणत्या दानाची वर्णन केली आहे ती पाहा —

**दाता तोचि एक जाणा । नारायणा स्मरवी ॥** — तुकाराम

असे त्यांचें वचन आहे.[1] या सूत्रप्राय वचनांत सर्व दानांचें श्रेय एकदाच व एकदमच मिळण्याजोगी सर्वसुखोत्पादक योग्यता अंगीं आणविणारी जी भगवत्कृपा, ती संपादन करण्याचें अचूक व सामर्थ्यवान साधन जें नाम, त्याचें दान असंख्य लोकांना करणारे ( अनेक अश्रद्ध लोकांस श्रद्धा लावणारे, श्रद्धावंतांस निष्ठावंत करणारे व निष्ठावंतांची निष्ठा शतपटीनें वाढविणारे ) आमचे परमपूज्य अण्णासाहेब

1. **नामैव परमं दानं** नामैव परमा क्रिया ।
नामैव परमो धर्मो नामैवार्थः प्रकीर्तितः ॥ – ( सात्वततंत्र )

कामत खरे 'श्रीमंत' व 'दानशूर' असें मी समजतों. पहिल्या भागाचें पुस्तक ज्यांच्या ज्यांच्या हातीं पडलें, त्यांच्याकडून दुसऱ्या भागाला मागणी करतांना जे प्रेमोद्गार लिहून आले ( यांत मोठमोठे विद्वान लोकही आहेत ) त्यावरून मला तसें म्हणण्यास अत्यंत प्रेम व धैर्य वाटतें.

( १५ ) लिहितां लिहितां पुस्तक फार वाढलें म्हणून ते कष्टी होऊं लागले. मध्यंतरीं एक दोनदां फार आजारीही झाले; त्या वेळीं त्यांना हें एकदां कसे शेवटास जाईल असें होऊन गडबड करून संपविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण तें कांहीं त्यांना करितां आलें नाहीं. हा ईश्वरी संकेतच असें मी समजतों. कारण लिहिणें, न लिहिणें अथवा अमुक एक लिहिणें हें त्यांच्या स्वाधीनचें नव्हतें; असंख्य प्रेमळ वाचकांची जिज्ञासाबुद्धिच त्यांना आंतून गुप्तपणें प्रेरीत होती, त्याप्रमाणें हें लेखन चाललें होतें, असेंच मला वाटतें. '**पुस्तकांतील शब्दांच्या मागें कोण असतो**' याबद्दल एका इंग्रज ग्रंथकाराचे उद्गार येथें मला द्यावेसे वाटतात —

"Behind the words of a book stands the writer himself; behind the writer, the weaver of his thoughts & dreams; behind the weaver of his thoughts and dreams, the Divine Dreamer and Thinker Himself. Words, therefore, are but the masks of the Master-mind; pierce through them, O student, if thou would'st have a glimpse of the Great Master."

—*The Young Builder, August, 1934, P. 16*

आपल्या ग्रंथकार संतांचेही अशाच तऱ्हेचे पण थोड्या वेगळ्या शब्दांनीं बोललेले उद्गार आहेत. कांहीं झालें तरी या वेळीं हा ग्रंथ सृष्टिदेवतेला हवा होता म्हणूनच झाला आहे, असें मी समजतों. कारण 'Demand and Supply' म्हणजे मागणी-प्रमाणें पुरवठा हा सृष्टीचा नियम आहे.

( १६ ) आतां ग्रंथकार ज्याप्रमाणें आपणांस नांवाचे लेखक समजतात, त्याचप्रमाणें मीही नांवाचा प्रकाशक आहें; अनंत मुमुक्षु जनांच्या आनंदास व ज्ञानी जनांच्या कौतुकास कारण होणारा हा ग्रंथ असल्यामुळें त्यांचे आशीर्वाद मिळण्यासाठीं तो छापून प्रसिद्ध करण्याची बुद्धि व शक्ति त्या प्रभूनेंच मला दिली व त्याचें कार्य त्यानेंच करून घेतलें, असें मी मानितों. शेवटीं मागें उल्लेखिलेल्या पॉलब्रंटन साहेबाच्या इंग्रजी पुस्तकाच्या सुंदर प्रस्तावनेंतील दोन वाक्यें देऊन मी प्रेमळ

वाचकांची रजा घेतों. हीं वाक्यें मजप्रमाणें मार्मिक वाचकांनाही फार गोड व अनुरूप वाटतील अशी मला आशा आहे.

"The timeliness of this book is real. It expresses with a beautiful clarity truth, which has been too often hiden under ponderous phrase, difficult oriental symbolism and mystical vagueness.

It will be welcomed by those who are alive to moment's urgency and to the people's new readiness for spiritual revealation."

ॐ शांतिः ! शांतिः ! ! शांतिः ! ! !

**मुंबई – गिरगांव**
त्रिभुवन रोड, नं. १८
मि. आश्विन १५ श. १८५७

वाचकांचा प्रेमांकित
**रंगनाथ दत्तात्रेय रेगे**



---

या पुस्तकांत दिलेल्या फोटोचे ब्लॉक्स श्रीयुत **विष्णु** रवळनाथ **प्रभु**, आर्टिस्ट, यांनीं प्रेमानें करून दिल्याबद्दल त्यांचे फार आभार आहेत.

॥ ॐ तत्सत् – श्रीसद्गुरु प्रसन्न ॥

# लेखकाचें हृद्गत

**सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥ १ ॥**
**चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥ २ ॥**
**नेत्रीं जळ वाहो सदा । आनंदाचे रोमांच ॥ ३ ॥**
**तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥**

**श्री**हरीच्या व हरिभक्तांच्या कृपेनें व प्रेरणेनें ' **नाम**चिंतामणि ' लिहून व छापून संपला ! **हरि** व **हरि**नाम एक असल्यामुळें या पुस्तकरूपानें जी नामसेवा झाली, ती श्रीहरीचीच सेवा झाली आणि ती **त्या**ची **त्या**नेंच करून घेतली. ' त्यानेंच करून घेतली ' असें म्हणण्याचें कारण, **त्या**ची इच्छा नसेल तर सेवा करणारा कितीही करितों म्हणाला तरी ती घडत नाहीं ! नानातऱ्हेचीं अंतर्बाह्य विघ्नें उत्पन्न होतात, हा शास्त्रांचा व संतांचा अनुभव आहे.

**प**हिल्या भागाचें पुस्तक प्रसिद्ध होऊन त्याच्या तीन वर्षांत दोन आवृत्ति निघाल्या. त्यांत दिलेल्या दुसऱ्या भागाच्या जाहिरातीवरून त्या पुस्तकाबद्दल म्हणजे ह्या ' **नाम**चिंतामणी ' बद्दल सज्जन वाचकांच्या मागण्या येऊं लागल्या, त्यामुळें तें छापण्याचें काम हातीं घेतलें. यांतील कांहीं भाग ' **मुमुक्षु** ' मासिकांतून पूर्वीच प्रसिद्ध झाला होता; तो लवकर छापून निघाला. त्यास अनुसरून त्या विषयास पोषक असे सुंदर विचार स्फुरूं लागले, ते लिहितां लिहितां ग्रंथ वाढूं लागला. २०० पानांचा पूर्वीचा अंदाज होता, त्यास ३०० पानें झालीं; छपाईचा खर्च वाढत चालला, तेव्हां आतां हात आटोपता घेतों, असें या पुस्तकाचे प्रकाशक माझे प्रिय मित्र श्रीयुत **रंगनाथ दत्तात्रेय रेगे** यांना मीं लिहून कळविलें. तें माझें पत्र वाचून त्यांनीं मला उत्तर पाठविलें कीं, अशीं पुस्तकें वरचेवर निघत नसतात, करितां आलेली स्फूर्ति दाबूं नये, प्रकाशनास थोडा उशीर लागला तरी हरकत नाहीं, इत्यादि. हे त्यांचे उत्तेजनात्मक प्रेमाचे उद्गार वाचून मला आनंद वाटला व अंतर्यामीच्या प्रेरणेप्रमाणें मी लिहूं लागलों ! अंतरंगांत नवनवोन्मेष स्फुरूं लागले व फार दिवसांनीं आलेल्या प्रीतीच्या पाहुण्यास काय काय करून घालूं व काय नको असें जसें स्त्रियांना होतें, त्याप्रमाणें नामचिंतामणीच्या प्रेमळ वाचकांना कोणकोणत्या गोड भावांचा पाहुणेर करूं व किती करूं व करीन तेवढा थोडाच, असें मला होऊन गेलें आणि त्याप्रमाणें करूं लागलों, त्याला हें स्वरूप प्राप्त झालें !

'**प्रपंचांत वित्त व परमार्थांत चित्त**' असल्याशिवाय दोन्ही चालावयाचीं नाहींत. वित्त म्हणजे द्रव्य असल्याशिवाय व्यवहारांत पाऊलही टाकतां येणार नाहीं. मग तो व्यवहार स्वार्थाचा, परार्थाचा किंवा उभयात्मक कसाही असो. आमच्या या पुस्तकाच्या प्रकाशनास मदत म्हणून (पहिल्या भागाच्या पहिल्या आवृत्तींतील प्रकाशकाच्या सूचनेवरून) दोन वर्षांपूर्वी कांहीं प्रेमळांनीं ५,.५, २॥, २॥, ५, ५, २, १ असे रुपये पाठविले. पण यांनीं काय होणार? मुमुक्षु जनांच्या प्रेमाकरितांच परमेश्वरानें आमचे प्रिय मित्र श्री. **रंगराव रेगे** यांना प्रेरणा केली व त्यांनीं हें जोखमीचें काम शिरावर घेतलें. त्यानंतर या वर्षी १०, १०, २५, १० अशी कांहीं सज्जन मित्रांकडून अयाचित देणगी मिळाली. पण प्रस्तावनेंत आपला नामनिर्देश नसावा या साग्रह विनंतीनें त्या प्रेमळांच्या इच्छेला मान देऊन तसें करणें भाग आहे. देणगीचा आंकडा कमीजास्त कसाही असला तरी प्रेमाबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. पण श्रीरामानें राज्यारोहणानंतर बिभीषण, सुग्रीव, अंगद, जांबवंतादि एकूणएक साहाय्यकर्त्या लोकांना पारितोषिक देऊन गौरविलें, पण मारुतिरायाला आलिंगनाशिवाय कांहींच दिलें नाहीं म्हणतात, तसेंच आम्ही आमच्या रंगनाथरायाला करितों. त्यांचे आभार मानायला आमच्याकडे शब्दच नाहींत! तें काम '**चिं**तामणी-' चे प्रेमळ वाचकच करितील व त्यांना आशीर्वाद देतील अशी आमची खात्री आहे. असो.

या पुस्तकांत '**खास स्त्रीसाधकवर्गासाठीं**' म्हणून कांहीं सूचना लिहून पाठविण्याकरितां आमचे वयोवृद्ध, तपोवृद्ध व ज्ञानवृद्ध मित्र महाशय **आनंदघनराम**, तासगांव, व ह. भ. प. महाशय **नरहरशास्त्री** खरशीकर या अधिकारी लेखकांना विनंति केली होती. पण त्यांचे लेख उशीरा पोंचल्यामुळें यांत घेतां आले नाहींत, याबद्दल फार वाईट वाटतें. म. आनंदघनराम यांजकडूच **वाचिक**, **उपांशु**, **मानस**, **ध्यान** व **अनन्य** या पांच **प्रकारांवर** आनुभविक लेख लिहून आला, तो आम्ही '**नामयोगरहस्य**' प्रकरणांत छापला आहे (पृ. ३७३–७४), त्याची योग्यता अधिकारी वाचकच जाणूं शकतील. प्रेममूर्ति खरशीकर यांची साध्वी पत्नी फार मोठ्या अधिकाराची होऊन गेली. तिचें चरित्र साधक स्त्रीवर्गाला अगदीं आदर्शभूत होतें. तें स्वतंत्रच छापून निघावें अशी माझी इच्छा आहे. परमेश्वर योग घडवून आणील तेव्हां खरें.

* * *

पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें **श्रीबोधेंद्रसरस्वतीकृत** संस्कृत '**नामामृतरसायन**' ग्रंथ, जो मला नामयोगशास्त्रावरील ग्रंथांत '**कोहिनूर**' वाटतो

म्हणून लिहिलें आहे, तो मराठींत भाषांतर करून छापावयाचा आहे. तो शास्त्री पंडितांचे संशय निवारण करणारा महापांडित्याचा ग्रंथ आहे. याशिवाय नामयोगावरील सुंदर मुंदर वाङ्मय माझ्याकडे हल्लीं, प्रस्तुतच्या '**नामचिंतामणि**' पुस्तकाएवढीं पांच सहा पुस्तकें होतील इतक्या अंदाजाचें आहे. तें सर्व प्रकाशित व्हावें अशी इच्छा आहे. ती पूर्ण होणें श्रीलक्ष्मीसरस्वतीच्या कृपासाहाय्यावर अवलंबून आहे. लक्ष्मीच्या साहाय्यावांचून तर होणें नाहींच, पण सरस्वतीच्या साहाय्याचीही अपेक्षा आहे. हें सरस्वतीचें साहाय्य म्हणजे दुसरी सजातीय सहचरी लेखणी. तीवांचून हें असाध्य वाटत आहे. जशी श्रीहरीची इच्छा असेल तसें होवो, यापेक्षां तूर्त दुसरें कांहीं म्हणवत नाहीं. श्रीहरिगुरुकृपेनें आयुष्यासहित तशी अनुकूलता घडून आल्यास, एक व्यवस्थित योजनापत्रक तयार करून जाहीर करूं. तोंपर्यंत प्रेमळ वाचकांनीं आपलीं आश्रयदानाबद्दलचीं मतें प्रकाशकाच्या नांवें पत्रें पाठवून कळवून ठेवावीं.

वाचकांना दुसरी एक महत्वाची विनंति करावीशी वाटते, ती ही कीं हें पुस्तक वाचून कोणी मला एक मोठा ज्ञानी सिद्ध पुरुष समजून भेटण्याची किंवा पत्रव्यवहार करण्याची तसदी घेऊं नये. मी एक आपणासारखा गरीब साधक आहें असें मानून कृपेनें मला आशीर्वाद द्यावे. महानुभाव संतसज्जनांनाही तीच प्रार्थना आहे.

*          *          *

## पुस्तकावरील आक्षेप व त्यांचें निरसन

पहिल्या भागाचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर त्याच्या स्तुतीबरोबर कांहीं आक्षेप कानावर आले. पहिला आक्षेप – 'लोक आळसी होतील' (हा देशभक्तांचा) व दुसरा आक्षेप – 'लोक वर्णाश्रमधर्म सोडतील' (हा शास्त्रीपंडितांचा). एकेका कोटिजपानें जन्मकुंडलींतील एकेका स्थानाची शुद्धि होऊन बारा कोटींनं बारा स्थानांची शुद्धि होते, अर्थात् 'अनिष्टनिवृत्ति व इष्टप्राप्तीसाठीं' नामजप केला म्हणजे पुरे, दुसरें कांहीं करावयास नको, असें सांगितल्यामुळें लोक आळसी होतील ; अथवा अशा सांगण्यानें तुम्ही लोकांस आळसी बनवितां असा एक आक्षेप ! त्याचें उत्तर असें कीं, मीं माझ्या त्या पुस्तकांत नामजप करणाऱ्यांनीं दुसरें कांहीं करूं नये असें कोठेंही सांगितलेलें नाहीं. त्यांत पुनः सांगावयाचें हें कीं, नामाच्या शक्तीची प्रशंसा मीं माझ्या मतानें मुळींच केलेली नाहीं, शास्त्राच्या व संतांच्या मताचा मीं नुसता अनुवाद केलेला आहे. तथापि आक्षेपकांना प्रेमानें असें सांगावेंसें वाटतें कीं, **केवळ**

**प्रयत्नानेंच सर्व साध्य झालें असतें, तर जगांत एकही राष्ट्र किंवा व्यक्ति दुःखी व दरिद्री राहिली नसती.** दृश्य ( लौकिक ) प्रयत्नास एका सामर्थ्यवान अदृश्य शक्तीचें पाठबळ असावें लागतें. या अदृश्य शक्तीलाच दैवी शक्ति किंवा '**भगवंताचें अधिष्ठान**' म्हणतात. परमेश्वराच्या अनंत शक्ति आहेत. त्या जगांत गुप्तरूपानें वावरताहेत. त्यांच्यांतून आपल्या इष्टकार्यास इष्टशक्तीचें आकर्षण करून घेण्याचें सामर्थ्य तपांत आहे.

**यद्दूरं यद् दुराराध्यं, यच्च दूरे व्यवस्थितम् ।**
**तत्सर्वं तपसा साध्यं, तपो हि दुरतिक्रमम् ॥**

आज जें कोणास कमीअधिक सुख व ऐश्वर्य प्राप्त आहे, तें त्याच्या त्याच्या पूर्व तपाचें फळ होय. सुखें जशीं अनेक प्रकारचीं, तशीं तीं प्राप्त करून घेण्याचीं तपेंही अनेक जातीचीं आहेत. पांडव वनवासांत असतां श्रीव्यासांनीं एकदां येऊन त्यांना विचारलें कीं, तुम्हीं स्वराज्य परत मिळविण्याच्या बाबतींत काय तजवीज केली आहे ? कोणाच्या बळावर निश्चिंत राहिला आहांत ? त्यावर अर्जुनानें मोठ्या बढाईनें आपलें गांडीव धनुष्य त्यांच्यापुढें उभें केलें व भीमानें मोठ्या दिमाखानें आपले पिळदार पुष्ट बाहु उभारून दाखविले ! तेव्हां व्यास हसून म्हणाले, हें तुमचें धनुष्य व बाहु पूर्वी कोठें गेले होते, म्हणून आतां आहेत असें सांगतां ? हें ऐकून भीमार्जुन मनांत शरमले; कारण बाहु व धनुष्य आमचेकडे असतांना आम्ही कष्ट कां भोगीत असावें असें त्यांना वाटलें. तेव्हां धर्मराजानें स्वराज्यप्राप्तीसाठीं आम्ही आतां काय करावें, असा मोठ्या नम्रतेनें प्रश्न केला. त्यावर व्यासदेव म्हणाले—'दृष्ट साधना-' स 'अदृष्ट साधना-' ची जोड असेल, तरच कार्यांत यश येतें. याकरितां शत्रूवर जय संपादन करण्याची इच्छा असेल, तर अर्जुनास तपाकरितां हिमालयांत पाठवून शंकराकडून पाशुपतास्त्र प्राप्त करून घेऊन येऊं द्या, असें सांगून त्याचें विधिविधान वगैरे समजावून देऊन वेदव्यास गुप्त झाले. जगद्धितचिंतक गुप्त महात्मे ( Invisible Helpers ) अधिकारी सज्जनांना कल्याणाच्या अशाच प्रेरणा गुप्त अथवा प्रगट रूपानें देत असतात. असो. अर्जुनानें त्यानंतर हिमालयांत जाऊन तपानें शंकरांस प्रसन्न करून घेऊन पाशुपतास्त्र मिळविलें, वगैरे पुढील गोष्ट सर्वांना माहीतच आहे. युद्धास अगदीं आरंभ होते वेळींही व्यासांनीं प्रगट होऊन युधिष्ठिराला दुर्गेची स्तुति करावयास सांगितली आहे, याचें कारणही तेंच; म्हणजे 'दृष्टसाधन' व 'अदृष्टसाधन' यांचा जोर सारखा झाला पाहिजे. ( हें युधिष्ठिरकृत दुर्गास्तोत्र सर्वत्र प्रसिद्ध आहे. ) तात्पर्य, श्रीरामकृष्णादि अवतारी पुरुषांनीं सुद्धां आपल्या कार्यांत यश येण्यासाठीं तपें

केलेलीं आहेत. ‘ छू मंतर ’ करून कांहीं त्यांनीं शत्रूंस मारलेलें नाहीं ! रामाची सीता रावणानें चोरून नेली, राम शोक करीत अरण्यांत फिरूं लागले. तेव्हां त्यांस अगस्ति ऋषि भेटून त्यांनीं उपदेश केला कीं, रामभद्रा ! अरे कोणाची बायको ? कोणाचे पुत्र ? हा सर्व संसार नाशवंत आहे. तुझ्यासारख्या ज्ञान्यानें असा शोक करणें उचित नाहीं. हें ऐकून श्रीराम अगस्तीला म्हणाले – मुनिराज ! हा वेदान्त वशिष्ठ गुरूंच्या कृपेनें मला पुष्कळ माहीत आहे ! मी क्षत्रियपुत्र आहें, माझी बायको त्या राक्षसाधमानें चोरून नेली आहे, त्याचा नाश करण्याचा कांहीं उपाय सांगत असाल तर मी ऐकण्यास तयार आहें. हें ऐकून अगस्ति मुनि हसून म्हणाले – भिऊं नको ; त्या बलाढ्य व विश्वकंटक शत्रूचा नाश करण्याचा उपाय मी तुला सांगतों. असें म्हणून रामाला शंकराची उपासना सरहस्य सांगून पाशुपतास्त्र मिळवून दिलें व स्वतः एक दिव्य बाण दिला. याच बाणानें श्रीरामानें नंतर रावणाला मारलें आहे !

वेदान्तानें मनुष्य नेभळट व क्रियाशून्य होतो असें म्हणणाऱ्यांनीं हा इतिहास लक्षांत घ्यावा. गीता म्हणजे वेदान्ताचा गड्डा आहे. ती सांगून भगवंतानें अर्जुनास समाधि लावून बसविलें नाहीं, तर त्याजकडून घोर अशा प्रकारचें युद्धकर्मच करविलें ! वेदान्तशास्त्राचा संप्रदाय किंवा परंपरा न जाणतां उगीचच्या उगीच तोंड-मुख घेणें व आपल्या कलुषित मताचे शिंतोडे उडविणें योग्य नाहीं. परंतु अशा प्रकारची परंपरा समजून घेण्याचे श्रम कोणीं घ्यावे ? लोकांना दोष देणें हें सोप्यां-तलें सोपें काम, हें करण्याची ज्यांना संवय आहे, तेच लोक असे आक्षेप घेत असतात. अवतारवादी लोकांनाही ते असेंच दूषण देतात. वर सांगितल्याप्रमाणें प्रत्यक्ष अवतारी पुरुषांनींही त्या काळीं योग्य अशा घोर प्रयत्नाचाच अवलंब केलेला आहे. तसेंच त्या अवतारी पुरुषांचे भक्त अथवा अनुयायीसुद्धां ‘ हा प्रभूचा अवतार झालेला आहे, आपणांस आतां कांहीं करावयास नको ’ म्हणून हातांत जपमाळ घेऊन स्वस्थ बसले नव्हते. अवतारी पुरुषाच्या खांद्याला खांदा भिडवून योग्य अशीं कर्मेंच त्यांनीं केलेलीं आहेत ! ही परंपरा माहीत नसणारे व स्वतःच्या प्रयत्नावर फाजील विश्वास ठेवणारे लोकच, अवतारवादानें लोक आळसी बनतात असें म्हणत असतात ! कदाचित् कोणी तसे आळसी बनत असतील, तर तेही शास्त्रपरंपराज्ञानशून्यच म्हटले जातील. तात्पर्य, चळवळींत म्हणजे कर्मांत अथवा उद्योगांत सामर्थ्य आहे, पण त्यास ‘ भगवंताचें अधिष्ठान ’ पाहिजे, असें शास्त्राचें व संतांचें सांगणें आहे, एवढें मुज्ञांनीं लक्षांत ठेवलें म्हणजे झालें.

**“ सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें ।**
**परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ ” — ( दासबोध )**

‘ भगवंताचें अधिष्ठान ’ म्हणजे अदृश्य दैवी शक्ति. ही वर सांगितल्याप्रमाणें आकर्षून घेण्याचें सामर्थ्य तपांत आहे. अशा नानाविध तपांमध्यें भगवन्नामस्मरणा-सारखें अत्यंत सुलभ, हिंसादिदोषवर्जित, द्रव्यांतराची व पुरुषांतराची अपेक्षा न करणारें, इतर कर्मांत अवश्य असणाऱ्या शुचिअशुचित्वाचा व देशकालादिकांचा निर्बंध नसणारें व सुखसंपादनीय असें दुसरें तप नाहीं.

**“ फुकाचें, सुखाचें, कांहीं न वेंचे भांडार । ( पण )**
**कोटि यज्ञापरीस तुका म्हणे हें सार ॥ ”**

म्हणून यास ‘ साधनराज ’ म्हणतात. पण हें ‘ सोपें ’ म्हणजे अल्पप्रयास-साध्य असल्यामुळेंच याचेवर विश्वास बसावा तसा बसत नाहीं ; म्हणून ‘ फार कठीण ’ असेंही म्हटल्याशिवाय राहावत नाहीं. हें मीच म्हणतों असें नाहीं, तर यास श्रीज्ञानेश्वर-तुकारामांचाही पाठिंबा आहे. “ **जन्मजन्मांतरीं असेल पुण्य-सामग्री । तरीच नाम जिव्हाग्रीं येईल श्रीरामाचें ॥** ” असें श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात. अशी जन्मजन्मांतरींची पुण्यसामग्री काय वाटेवर पडली आहे ? तसेंच “ **तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनी । ( परी ) शहाणा तो धणी घेत आहे** ” असे शहाणे काय रस्त्यावर पडले आहेत ? तात्पर्य, कठिणच आहे यांत संशय नाहीं. परंतु ‘ बहुत सुकृताची जोडी ’ पदरीं असेल, त्याला मात्र सोपें आहे. असो.

आमच्या या पुस्तकावर म्हणजे पर्यायानें नाम-साधनावर दुसरा एक आक्षेप असा आहे कीं, या नामप्रशंसेनें लोक वेदोक्त वर्णाश्रमधर्म सोडून देऊन, आचारभ्रष्ट व त्यामुळें श्रेयोविमुख होतील. त्याचें उत्तर असें कीं, मी माझ्या पुस्तकांत किंवा संतांनीं कुठेंही ‘ नामजप करणाऱ्यांनीं स्नानसंध्यादि कर्मानुष्ठान करूं नये ’ असें मुळींच सांगितलेलें नाहीं. श्रीएकनाथ-रामदासांसारख्या नामनिष्ठ ब्राह्मणसंतांनीं वेदोक्त वर्णाश्रमाचार सोडलेला ऐकिवांत नाहीं, तर उत्तम रीतीनें पाळलेलाच पुरावा सांपडतो. स्वतः माझ्याविषयीं सांगावयाचें तर मोठ्या कष्टानें सांगतों कीं, मला स्नान केल्यानंतर नित्याचें आन्हिक आटपावयाला दीड दोन तास लागतात ! कांहीं मित्र मला म्हातारपणांत एवढे श्रम घेऊं नयेत, असा उपदेश करितात. पण तें एक व्यसन जडलें आहे, त्याला काय करणार ? यासंबंधानें माझें असें खासगी मत म्हणून

कोणी विचारील, तर त्यास मी असें सांगेन कीं, खानपानादिकांचे पूर्वील व्यवस्थित नियम ज्यानें सोडले असतील, तसेंच लौकिक व्यवहारास ज्यानें अजिबात फाटा दिला असेल, व जो अखंड २४ तास नामस्मरणांत घालवीत असेल, त्यानें वर्णाश्रमाचार हवे तर खुशाल सोडून द्यावे ! त्याला ते सोडण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे, असें मी समजेन. तसें नसून, नित्याच्या तब्बेतींत काडीइतकेंही कमी जास्त झालेलें ज्यास पुरवत नाहीं, लौकिक व्यवहार यथापूर्व जशाचा तसा चालू आहे, आणि स्नान-संध्या, सोवळें-ओवळें, इत्यादि बंधन मात्र क्लेशकारक म्हणून जो सोडूं इच्छील, त्यास प्रत्यवाय-दोष बाधल्याशिवाय राहणार नाहीं.

**" सर्व कर्म हें प्रकृतिगुणांचें । सांडिलें न वचे शरीराचें ।**
**मग स्वकर्म वेदोक्ताचें । कां पां हिताचें सांडावें ? ॥ "**

—श्रीरमावल्लभदासकृत गी. च. टीका, अ. ३

असा संतांचा प्रश्न अशा लोकांना आहे.

जेवणखाण, स्त्रीपुत्रादिपरिग्रह, उद्योग-व्यापार, इत्यादि कर्मे करितांना तीं बाधत नाहींत, त्यांत अकर्तृत्व पाहावयाचें, आणि वेदोक्त कर्मे करितांना मात्र तें सोडावयाचें, हें कुठलें ज्ञान ? त्या संध्यादि नित्यकर्मांत व श्राद्धादि नैमित्तिक कर्मांत अकर्तात्मबुद्धि अथवा ईश्वरार्पणभावना ठेवतां येत नाहीं काय ? वेदार्थाचें गुह्य एका परमात्म्यावांचून जाणणारा दुसरा कोणी नाहीं. त्याच्या कृपेवांचून तें ब्रह्मादिकांलाही कळणें शक्य नाहीं.

**" एवं वेदाचें अचळ मूळ । विधिविधानासी मुख्य फळ ।**
**जाणावया गा केवळ । नाहीं ज्ञानबळ सुरनरां ॥**
**या वेदार्थातें तत्त्वतां । मीच एक सर्वज्ञ ज्ञाता ।**
**माझे कृपेवीण सर्वथा । हें नयेचि हातां ब्रह्मादिकां ॥ "**

असें खुद्द भगवान म्हणतात. —( एकनाथी भागवत, अ. २१ )

**" कर्मकांड उपासनाकांड । इहीं त्रिकांडीं वेदु आपण ।**
**चित्तशुद्धिद्वारा जाण । ब्रह्मसंपन्न जीव करी ॥ "**

असा वेद उपकारक आहे. वेदाच्या रोचनार्थाची क्वचित् निंदाही संतांनीं केलेली आहे. तेवढींच नेमकीं वाक्यें काढून घेऊन वेदाची निंदा करण्याची प्रवृत्ति कांहीं संतांमध्यें दिसून येते. ती चुकीची आहे असें समजावें.

कांहीं भक्तिमार्गी लोक मोक्षाची निंदाही करतांना आढळतात ! श्रीतुकाराम-महाराजांनीं " **मोक्षा द्याणूं लाथा । सत्ता निकट करूं सेवेसी ॥** " इत्यादि म्हटलें आहे. त्यांच्याच वचनाचा आधार घेऊन — " **गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी** " असें मोठ्या डौलानें हे म्हणतात. पण **असें म्हणण्याचा अधिकार केव्हां येईल?** तर " **किती वेळां जन्मा यावें । किती व्हावें फजीत ॥** " अशा वृत्तीनें त्याच तुकोबारायासारखें अंतःकरण होरपळून निघेल व नामाचा अखंड निजध्यास लावून घेऊन मरणाआधीं मरून उरतां येईल, " **आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां** " असे उद्गार पोटांतून ( ओठांतून नव्हे ) काढतां येतील, तेव्हांच ! " **नामाचा विश्वास । आम्हां कैंचा गर्भवास** " या वचनाप्रमाणें प्रथम गर्भवासास भ्यावयाला शिकल्यानंतर, मग गर्भवास घ्यायला अधिकार प्राप्त होईल ! ही खूणगांठ माझ्या साधकबंधूंनीं लक्षांत ठेवावी. नसल्यास मोर नाचतो म्हणून लांडोर नाचल्याप्रमाणें हास्यास्पद होईल. ती आत्मवंचना होईल. करितां फार सावध असावें. संतांचीं वचनें तारक आहेत, पण आत्मवंचनेनें मारक न करून घ्याल तर ! ज्यांना खरेंखुरें आत्महित साधावयाचें आहे, त्यांनीं नामाचा अखंड निजध्यास लावून घ्यावा. रोज दोन किंवा एक प्रहर तरी त्यांत घालावा. अंतःकरणास रजतमाचा मळ न लागूं देण्याचा प्रयत्न करावा. त्यांना हें पुस्तक फारच साह्यता देईल. यांत सांगितलेल्या ' **साधकांच्या सूचना** ' जो नीट लक्षांत घेईल त्यावर परमात्मा कृपा करील.

*  *  *  *

## लेखनाचें कर्तृत्व कोणाकडे ?

**पुस्तक लिहितांना आलेले अनुभव** लक्षांत घेतले असतां लेखनकर्तृत्वाचा अहंकार मला धरतांच येत नाहीं, असे अनेक वेळां दाखले आले आहेत. त्याबद्दल मीं पहिल्या तीन पृष्ठांत उद्गार लिहिले आहेत, त्यांवरून वाचकांच्या ध्यानांत येईलच. तथापि त्यानंतरच्या अनेक दाखल्यांपैकीं एकदोन द्यावेसे वाटतात. यांतील ' **थोडासा** वेदान्त ' हा विषय लिहीत असतां रात्रीं १२॥ वाजतां ( आमच्या लेखनाच्या आफीसची वेळ आज तीन वर्षांपासून चालू आहे ती रात्रौ १०॥ ते २-२॥ पर्यंत ! दिवसां अनेक उपाधींमुळें वेळ व स्वस्थता पाहिजे तशी मिळतच नाहीं ) डावीकडे असलेल्या कपाटाचीं दोनी दारें खाडकन एकदम उघडलीं व कपाट अगदीं उघडें झालें ! घरांत सर्वत्र सामसूम असतां अकस्मात् आवाज झाल्यामुळें मन दचकलें ! दिवा घेऊन

आजूबाजूस पाहिलें तों उंदीर, मांजर कोणी नाहीं. मोठें आश्चर्य वाटलें ! ज्या मजकुराचें त्या वेळीं लेखन चाललें होतें, त्यास आधाराचे संस्कृत श्लोक पाहिजे होते. माहीत होते, पण किती वेळ झाला तरी आठवेनात. डोक्याला हात टेकून एकाग्र चित्तानें आठवण करीत बसलों होतों, तोंच वरील आवाज झाला. कपाट एकदम उघडलेलें पाहून आश्चर्य वाटलें ! त्या कपाटांत अनेक विषयांवरचीं लहान मोठीं मिळून तीनचारशें पुस्तकें होतीं. कोणत्या पुस्तकांत हे प्रमाणाचे श्लोक सांपडतील म्हणून विचार करूं लागलों व अगदीं खालच्या खान्यांत सहज हात घालून एकदोन पुस्तकें काढलीं. तीं पाहून दुसरीं शोधावीं असा विचार होता. तों हातीं आलेल्या एका पुस्तकांत पान उघडतांच मला पाहिजे असलेलेच श्लोक मिळाले ! तेव्हां किती आनंद झाला म्हणून सांगूं ? ज्याचा कार्यकारणभाव मोठ्या विचारानेंही लागत नाहीं, त्यालाच चमत्कार म्हणण्याची चाल आहे. याचप्रमाणें पुढेंही '**खास स्त्रीसाधकवर्गासाठीं**' हें प्रकरण लिहितांना हिंदी कल्याणचे दोन अंक एका मित्रानें पाहाण्यास म्हणून आणून दिले. **त्यां**तील दोन सुंदर उद्‌बोधक लेख तेथें अगदीं घेण्यासारखे होते. ते नांव देऊन घेतले आहेत. तात्पर्य, यांत माझा बुद्धिपुरःसर प्रयत्न कांहींच नाहीं हें मला निरभिमानपणें कबूल करावें लागतें. कोणी तरी अदृश्य शक्ति माझ्या हाताचें निमित्त-मात्र साहाय्य घेऊन हें काम करीत आहे असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

* * * *

आतां, लौकिकदृष्टीनें किंचित् अहंकर्तृत्व अंगावर घेऊन बोलावयाचेंच झाल्यास असेंच सांगतां येईल कीं – "**संतांचीं उच्छिष्टें बोलिलों उत्तरें**" एवढेंच मीं केलें आहे. यांत माझें कांहीं नसून संतांचा हा महाप्रसाद ताटांत वाढून तें ताट प्रेमळ वाचकांच्या पुढें ठेविलें आहे. त्याची चव जाणणारे तेच आहेत. किंवा असेंही म्हणतां येईल कीं, मीं हें माळ्याचें काम केलें आहे. संतांच्या बगीच्यामध्यें फुललेलीं सुंदर सुंदर वाक्पुष्पें तोडून त्यांचा श्रीहरीच्या व श्रीहरिभक्तांच्या गळ्यांत घालण्याकरितां हा हार गुंफून तयार केला आहे. अथवा असेंही म्हणण्यास हरकत नाहीं कीं, मी मधुमक्षिका होऊन संतांच्या पुष्पवाटिकेंत फुललेल्या पुष्पांतून मधुबिंदु घेऊन श्रीहरि व हरिभक्त यांच्या मधुपर्कपूजेच्या उपयोगासाठीं मधाचें पोळें तयार केलें आहे ! यांतील माझें बुद्धिदोषरूप मेण पिळून टाकून सुज्ञ वाचक मध तेवढा ग्रहण करतील व मला आशीर्वाद देतील अशी आशा आहे. किंवा असेंही म्हणणें शोभेल कीं, ही नामगंगा महेशहिमाचलांतून निघून वाल्मीकिगंगोत्रीमधून वाहत वाहत श्रीज्ञानेश्वर – एकनाथ – तुकाराम – रामदास – तुलसीदासादिरूप हरिद्वार –

प्रयाग – काशी, इत्यादि क्षेत्रांतून धो धो करीत ब्रह्मसागरास सहस्रमुखानें जाऊन मिळत आहे. प्रस्तुतचा ' नामचिंतामणि ' हा त्या गंगेचा एक कालवा रामचंद्र – कृष्णाच्या मनबुद्धिरूप दगडाच्या दुथडींतून वाहात आहे ! दुथडी ही दगडाचीच, पण जल गंगेचें. त्या पवित्र गंगेचें स्नानपान करून वाचकांनीं आपली मनोभूमि त्या पवित्र जलानें भिजवून चतुर्विध पुरुषार्थांचें पीक लीलेनें पिकवून घ्यावें व बसल्या ठायीं शाश्वत सुख भोगावें ! असो.

*　　*　　*　　*

## उपकारस्मरण

ईश्वरकृपें पुण्यशील अशा हरिभक्त ब्राह्मणकुळांत जन्म होऊन, निर्व्यंग तनु व इंद्रियपाटव मिळालें. लहानपणींच वडिलांकडून वेदोक्त कर्माचरणनिष्ठेसहित हरिभक्तीचें वळण लाभलें. हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, इत्यादि ग्रंथ वयाच्या दहाव्या वर्षांपर्यंत वडिलांनीं मजकडून वाचून घेतले. परंतु वडिलांचा तो पुण्यसहवास दुर्दैवानें वयाच्या १४ व्या वर्षीच अंतरला ! त्यांनीं सुरू केलेलें शालेय शिक्षण सुरू होतें. १६ व्या वर्षी प्रवेशपरीक्षेकरतां बसणें झालें. त्यानंतर परिस्थितीमुळें शिक्षणाचा पुढील प्रयत्न बंद ठेवून नोकरीचाकरी धरावी लागली. सन्मित्रांच्या संगतींत भजनपूजन, परमार्थविचार सुरू होऊन योग्य अशा गुरुपदाचा आश्रयही लाभला. श्री. रामचंद्र मंगेश ऊर्फ भाऊसाहेब फडणीस असें त्यांचें नामाभिधान होतें. ते ' शाब्दे परे च निष्णात ' असे गृहस्थाश्रमी महापुरुष होते. त्यांच्याकडे श्रवणमननास जाऊं लागलों. तो संस्कार होतो न होतो, तोंच त्यांनीं आपलें सगुण स्वरूप निर्गुणांत नेलें ! परंतु त्यांच्या थोड्याशा सहवासांत झालेले वेदान्तविचाराचे संस्कार मात्र हृदयांत दृढ मूळ धरून बसले. वयाच्या लहानपणामुळें व बुद्धिजाड्यामुळें नेणों, अंतःकरणाची तळमळ शांत झाली नाहीं. त्या वेळीं आमचा वास शहापूर-बेळगांवास होता. तेथें पहिला प्लेग आला व त्यानें गांवांत कहर करून सोडला ! त्या वेळीं आम्ही गोव्यांत आलों. भजनपूजनाचें व संतसंगतीचें वेड होतेंच. गोमांतकांतील त्या वेळचे प्रसिद्ध सत्पुरुष महानुभाव श्रीकृष्णभट्ट बांदकर यांचीं स्वानुभवी पदें एका भजनप्रेमी मनुष्याकडून कानांत पडलीं. जुन्या संतांसारखी स्वानुभवानें भरलेली कविता करणारे हे संत आज हयात आहेत असें समजल्यावरून मोठ्या उत्कंठेनें त्यांच्या दर्शनास गेलों. त्या वेळीं तिकडे ( डोंगरी नांवाच्या गांवीं ) त्यांच्या येथें श्रीरामजयंतीचा उत्सव सुरू होता. तो अनुपम सोहाळा पाहून व त्यांचीं कीर्तनें ऐकून, तसेंच त्या उत्सवाच्या निमित्तानें

आलेल्या त्यांच्या अधिकारी शिष्यमंडळींची भेट होऊन खरा संतसहवास तेथें मला लाभला. भटजीमहाराजांनीं करून ठेवलेलीं एकापेक्षां एक सुंदर पदें तेथें त्यांच्या तोंडूनच ऐकावयास मिळालीं! त्यांच्या त्या रसाळ वाणीसंबंधानें ऐकण्यांत आलें, कीं कांहीं वर्षांपूर्वी गोव्याचें मिठाचें कंत्राट इंग्रज सरकारकडे होतें, त्या वेळीं क्राफर्डसाहेबाबरोबर कै. अण्णासाहेब किर्लोस्कर हे तेथें सरकारकून म्हणून आलेले होते. त्यांनीं भटजीमहाराजांची कीर्ति ऐकली व श्रीरामजन्मोत्सवांत नाटकें चाललीं होतीं तीं पाहाण्याकरितां मुद्दाम ते पणजीहून मित्रमंडळीबरोबर होडीमधून आले. त्या दिवशीं तेथें 'शुकरंभासंवाद' नाटक चाललें होतें. त्यांतील पात्रांचीं भाषणें संगीत होतीं. तीं पाहून अण्णासाहेब इतके खुष झाले कीं, नाटक आटपल्यानंतर मुद्दाम कांहीं वेळ थांबून त्यांनीं भटजीमहाराजांची भेट घेतली व हीं नाटकें घेऊन तुम्ही मजबरोबर मुंबईस या, रुपयांनीं तुम्हांस न्हाऊं घालीन असें सांगितलें! पण हीं नाटकें देवाकरितां केलीं आहेत, पैशाकरितां केलीं नाहींत, असें भटजींनीं सांगितलें. तेव्हां किर्लोस्करांनीं तीं नाटकें मला तरी द्या म्हटलें; पण त्याचा तुम्ही पैशाकरितां उपयोग करणार, करितां आपण देऊं इच्छीत नाहीं, असें भटजीमहाराज म्हणाले. तेव्हां निरुपाय होऊन अण्णासाहेब शेवटीं म्हणाले, मला संगीत नाटकें करण्याची येथें स्फूर्ति झाली आहे, तुमच्या हातचा प्रसाद तरी द्या! तेव्हां भटजीमहाराजांनीं मोठ्या आनंदानें श्रीरामासमोर उभें राहून श्रीरामाकडे व मारुतिरायाकडे त्यांच्या मनोरथपूर्ततेसाठीं गाऱ्हाणें घालून त्यांच्या पदरांत नारळ व पुष्पमालेचा प्रसाद घातला! (त्यानंतर इंग्रजांचें तेथील १२ वर्षांचें कंत्राट संपल्यावर, अण्णासाहेबांनीं देशावर येऊन संगीत नाटकें सुरू केलीं व अडीच नाटकांवर सहस्रावधि रुपये मिळविले हें प्रसिद्धच आहे. किर्लोस्कर नाटकाची ही पूर्वपीठिका महाराष्ट्रास विदित असो वा नसो, पण गोमांतकांत सर्वप्रसिद्ध आहे.)

तात्पर्य, असे नाट्याचार्य ज्यांच्या कवितेला इतके मोहून गेले, तेथें इतरांचा काय पाड? भटजीमहाराजांना गायनाचें व साहित्याचें उत्तम ज्ञान असल्यामुळें शृंगारादि नवरसांत ज्या रसाला जो राग अथवा रागिणी पाहिजे त्याच रागरागिणीवर ते सुंदर कविता रचीत. त्यामुळें त्यांचीं कीर्तनें मोठीं श्रवणीय वाटत व श्रोत्यांचीं मनें लाचावून जात. "**रागज्ञानी तालज्ञानी। सकळ कळा ब्रह्मज्ञानी। निरभिमानें वर्ते जनीं। तरी हेहि अपूर्वता॥**" (दा. बो.) ही अपूर्वता भटजीमहाराजांच्या ठिकाणीं होती. " "**रागरंग तालसुरंगें। अंतर संगीत रागें। रत्नपरीक्षा रत्नामागें। धांवती लोक॥**" असें झाल्यास काय नवल आहे? माझे

शहापूर-बेळगांवचे विद्वान् मित्र श्रीयुत नागेशराव गुणाजी, कै. वामनराव कानविंदे, श्री. काका कालेलकर व त्यांचे बंधु वगैरेंनाही मी हा संतसंगतीचा लाभ लुटण्यासाठीं मागाहून आणून भेटविलें ! तेही मजसारखेच त्यांच्या कवितांनीं व कीर्तनांनीं वेडावून गेले ! त्यांपैकीं कित्येकांनीं तर दरवर्षी रामनवमीच्या उत्सवास डोंगरीला येण्याचा नियम धरला. '**गुरुमुखें श्रवण। संतमुखें दृढीकरण।**' म्हणतात, त्याचप्रमाणें माझ्या गुरुदेवांच्या वचनांचा प्रकाश भटजीमहाराजांच्या संगतींत होऊं लागला. पण यांचा वियोगही थोड्याच काळांत झाला !

त्यानंतर हुबळीचे सुब्राव गोपाळ उभयकर या महानुभावांची पुस्तकसंशोधनाच्या निमित्तानें अकस्मात् भेट झाली. (त्या वेळीं मी बेळगांवच्या सुप्रसिद्ध श्रीरामतत्त्वप्रकाश छापखान्यांत म्यानेजरच्या जागीं होतों. कांहीं कारणानें ती नोकरी मला नंतर सोडावी लागली.) हे महानुभाव निर्गुणसाक्षात्कारी व सगुणप्रेमी असल्यामुळें त्यांचा सहवास माझ्या परमार्थवृत्तीस फारच पोषक झाला. त्यांनीं मला हुबळीस आपल्या घरीं ठेवून घेऊन श्रीरमावल्लभदासकृत 'कृष्णजयंतीव्रतोत्सवभजन' व 'गीता–चमत्कारी टीका' ह्या ग्रंथांच्या संशोधनाचें काम करून घेतलें. तें काम चालू असतां त्यांच्याच कांहीं कामाकरितां हुबळीहून मी मुंबईस आलों. तेथून माझ्या गुरुदेवाच्या पुण्यतिथीचा (ज्येष्ठ कृ. ३) श्रीगुरुचरित्राचा सप्ताह श्रीक्षेत्र काशीस जाऊन वाचण्याची प्रेरणा झाली व मी काशीस आलों. काशीस एकदोन आठवडे राहून परत जावें अशी इच्छा होती ; पण ईश्वरी संकेत निराळा होता.

परमपूज्य परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद् ब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांनीं काशी येथील शृंगेरी मठांत 'ब्रह्मसत्र' नामक एक मोठा 'वाग्यज्ञ' सुरू करण्याची योजना करून हस्तपत्रकें वांटलीं. त्यांतील एक हस्तपत्रक माझ्या हातांत आलें. सकाळीं ७ ते १० (फक्त ब्राह्मण पुरुषवर्गाकरितां) आचार्यांचें गीताभाष्य, दशोपनिषद्भाष्य व ब्रह्मसूत्र – शारीरभाष्य याप्रमाणें 'प्रस्थानत्रयभाष्य'; आणि दुपारीं २ ते ५ (ब्राह्मण व ब्राह्मणेतर स्त्रीपुरुषांकरितां) वाल्मीकिरामायण, देवीभागवत व महाभारत हे तीन पुराणेतिहास ग्रंथ ; याप्रमाणें एका वर्षांत वाचून संपवावयाचे असा संकल्प त्यांत प्रसिद्ध केला होता. हा अपूर्व लाभ माझ्या सगळ्या आयुष्यांत मला लाभणार नाहीं, हजारों रुपये खर्चून अशीं प्रचंड सत्कृत्यें पुण्यपुरुष करीत असतात, त्याचा लाभ सहज घेतां आला तर कां सोडावा, असें मनांत येऊन मीं वर्षभर काशींत राहण्याचा निश्चय केला. प्रथम १।२ महिने मी बिंदुमाधव घाटावर श्रीनंदीबुवा नांवाचे एक साधुपुरुष राहात होते त्यांच्या आश्रयास राहिलों. तेथून क्षेमेश्वरघाटावरील शृंगेरी मठ दोन मैल लांब.

जाण्यायेण्यास त्रास पडतो असें वाटून वरील स्वामीमहाराजांनीं मला शृंगेरी मठांत आपल्या संनिधानांतच मोठ्या प्रेमानें ठेवून घेतलें. सकाळचे तीन व संध्याकाळचे तीन महाग्रंथांवर निरूपण करण्यास स्वामींनीं त्या त्या विषयांत पारंगत असे सहा निरनिराळे पंडित नेमलेले होते. एक एक तास आपलें काम करून ते जात. येथील देशभाषा हिंदी असल्यामुळें सर्वांचें निरूपण हिंदी भाषेंत चाले. हें सर्व ठीक होतें. पण सकाळच्या वेळीं प्रस्थानत्रयभाष्यांतील मुख्य ग्रंथ शारीरभाष्य, यामधील 'चतुःसूत्री' सुरू झाली, तेव्हां मी अगदीं मुग्ध होऊन गेलों! निरूपणकर्ते पंडित प्रवीण असल्यामुळें उत्तम रीतीनें निरूपण करीत; परंतु विषय फार गहन असल्या-मुळें मला ग्रहण होण्यास फार कठीण जाऊं लागला! दोन अडीच तपांचा माझा वेदान्तव्यासंग! मी मोठा वेदांती असें लोक समजत व मलाही थोडेंसें तसें वाटे. पण तो माझा अभिमान पार वितळून गेला! वेदान्तशास्त्राच्या शाळेंत पहिल्या यत्तेंत बसण्यासही मी नालायक असें मला वाटूं लागलें. नुसते दासबोध, ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथ वाचून 'वेदान्तशास्त्र' हाताला चढत नाहीं अशी खात्री झाली! वेदान्तशास्त्र किती गंभीर आहे त्याची कल्पना आली. आतां, मुमुक्षूंना कृतार्थ होण्यास इतका शास्त्रा-भ्यास पाहिजेच असें नाहीं; कृतार्थतेला फक्त हरिगुरुप्रसादच पुरे, ही गोष्ट निराळी. पण 'वेदान्तशास्त्र' म्हणून समजून घ्यावयाचें असेल, तर यथायोग्य रीतीनें ते ते शास्त्रग्रंथच तज्ज्ञांच्या मुखानें श्रवण केले पाहिजेत. आपल्या मतानेंच ते वाचून शहाणा होईन म्हटल्यास चालणार नाहीं. कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं प्रोफेसराच्या तोंडू-नच व्याख्यानें श्रवण केलीं पाहिजेत. प्रोफेसर देखील पुस्तकांतलेंच सांगतात. पण नुसतीं पुस्तकें आपल्या मतानेंच वाचून कोणी बी. ए. होऊं शकत नाहीं. ( याबद्दलचें विवेचन पुढील पृ. ३७० वर वाचून पाहावें. ) तात्पर्य, होतां होतां विद्वत्संगतीनें तें शास्त्र थोडथोडें अवगत होऊं लागलें व आनंद वाटूं लागला. स्वामीमहाराजांच्या कृपेनें प्रस्थानत्रयभाष्य व वरील तीन महापुराणग्रंथ कानांत पडले व त्याबद्दल श्रीस्वामीमहाराजांचे व परमेश्वराचे मोठे उपकार वाटले! ( हें ब्रह्मसत्र शके १८३९ चे आषाढापासून १८४० चे ज्येष्ठापर्यंत चाललेलं होतें. )

त्यानंतर घरीं ( गोव्यास ) परत येऊन हुबळीस चमत्कारीगीतासंशोधनाचें काम पुरें करण्याकरितां गेलों. तेथें त्या वेळचे सुप्रसिद्ध सत्पुरुष श्रीसिद्धारूढस्वामी यांच्या मठांत शारीरभाष्यच चाललेलें आढळलं. स्वामीमहाराजांच्या तोंडून त्यावर चाललेल्या निरूपणाकडे लक्ष वेधलें. तें इतकें कीं, काशीस राहून प्रस्थानत्रय श्रवण केलेल्याचें श्रेय येथेंच पदरांत पडणार, असें वाटून मनाला मोठा आनंद झाला!

महाराजांच्या मुखांतून निघालेले स्वानुभवाचे अमोलिक बोल मी हृदयांत सांठवून घेऊं लागलों. पांडित्याची वाणी आणि संतांची स्वानुभवाची वाणी यांत किती फरक असतो हें कळून आलें. पण हें तारतम्य ओळखण्यास मी कसा पात्र झालों? तर काशींत राहून पंडितांच्या मुखांतून प्रथम तें ऐकलें म्हणून. ह्या स्वानुभवी संतवाणीचा लाभ योग्य रीतीनें पदरांत पडण्याकरितांच जणूं परमेश्वरानें मला एक वर्ष काशीवास घडविला असेंही वाटलें. लहानपणीं श्रीगुरुदेवाच्या मुखांतून ऐकलेल्या साऱ्यापुऱ्या वचनांचा प्रकाश मला हुबळीस झाला. पुस्तकें वाचण्याचा नाद लहानपणापासून पुष्कळ; त्यामुळें डोक्यांत तर्कवितर्कांचें जंगल फार माजलेलें होतें. तें श्रीसिद्धारूढांच्या सहवासांत मोकळें होऊन, विचारांची बैठक बसून गेली. महाशय सु. गो. उभयकर यांनींही श्रीसिद्धारूढांपासून पंचदशी उत्तम प्रकारें श्रवण केली असल्यामुळें घरांत आल्याबरोबर त्यांच्या सहज बोलण्याचालण्यांत वेदान्तसिद्धांतच ऐकावयास मिळत. आवडीच्या ग्रंथसंशोधनकार्यांतही त्यांचा अखंड सहवास असल्यामुळें वृत्तीला त्या सिद्धांताचींच पुटें मिळून, ती त्यांतच रमण्यास संधि मिळूं लागली. मला बोलण्याची व वाचण्याची फार संवय असे. त्यामुळें माझे हे वृद्ध मित्र उभयकर मला "**नानुध्यायाद्बहून् शब्दान् वाचो विग्लापनं हि तत्**" असें वरचेवर सांगत. तात्पर्य, 'किती वानूं मी या संतांचे उपकार' बरें!

> "**संतसंगतीवेगळें जाण। तत्काळ पावावया माझें स्थान।**
> **आणीक नाहींच साधन। सत्य जाण उद्धवा॥**
> **धरलिया सत्संगति। निंद्य तेही वंद्य होती।**
> **उद्धवा तूं निष्पाप निश्चितीं। तरी सत्संगति करावी॥**"
>
> —एकनाथी भागवत, अ. १२

हा सत्संग मला परमेश्वरकृपेनें सहजच घडत गेला. पहिल्या भागाच्या पुस्तकांत '**संत, गुरु** व **सद्गुरु**' हा विषय मीं लिहिला आहे, (आवृत्ति ५ वी, पृ. ७४) त्यांत गुरु केलेल्यांनींही संतांना कसें भजावें हें विशद करून सांगितलें आहे. सारांश, हें पुस्तक म्हणजे माझ्या संतसंगतीचें फळ आहे. तें मजसारख्या वेड्या लोकांनाच गोड लागेल अशी माझी समजूत आहे. शहाण्या (विद्वान) लोकांकरितां हें नाहींच आहे. तेव्हां त्यांच्याबद्दलचें मत मी काय सांगूं?

*　　*　　*　　*

## महद्भाग्याचा पुनश्च काशीवास

सांगण्यास मोठा संतोष वाटतो कीं, ही प्रस्तावना अथवा 'लेखकाचें हृद्गत' श्रीक्षेत्र काशींत बसून लिहिण्याचा योग आला आहे, ही त्या विश्वेश्वराची – विश्व-चालकाची मोठी कृपाच होय असें मी समजतों. त्याच्या कृपेनें सुमारें १८ वर्षांनीं मी येथें दुसऱ्यांदा आलों. परमपूज्य महानुभाव श्रीब्रह्मानंदसरस्वती ऊर्फ 'लीलादत्त'[1] गुरुमहाराज यांनीं थोड्या दिवसांपूर्वी आपण आजारी असल्या वेळीं, मीं येऊन भेटावें अशी पत्रद्वारें इच्छा दर्शविली व ती एक महान् अनुग्रहाचीच आज्ञा समजून मी येथें आलों. महाराजांच्या संगतींत जसजसे दिवस जातील तसतशी त्यांची खोली अधिकच वाटत आहे. त्यांच्या योग्यतेचें वर्णन करण्यास मी समर्थ नाहीं! येथें श्रीकृपेनें इतर कांहीं संतमहात्म्यांचीही भेट झाली. सुप्रसिद्ध 'स्वानंदसाम्राज्य-' ग्रंथकर्ते श्रीमंत रामराव कृष्ण जटार, ममताजुद्दौला बहादूर यांचें सुंदर प्रवचन ऐकावयास मिळालें. काशींत त्यांचें लक्ष्मीनारायणमंदिर व 'जटार घाट' प्रसिद्ध आहे. आमचें नामजपाचें पुस्तक पाहून त्यांनीं मोठा संतोष प्रगट केला. 'नामयोग-रहस्य' प्रकरणामधील 'श्वासांत नामस्मरण' हा लेख वाचून त्यांनीं आपल्या मदालसातुल्य मातोश्रींचे रामनामजपाचे अनुभव सांगितले. अयोध्येंतही यांचें राममंदिर आहे. तेथें राहून त्या पहाटे ३ वाजतां शरयूचें स्नान करून दुपारीं ३ वाजेपर्यंत तसा जप करीत बसत व ३ वाजतां पुनः घरीं स्नान करून किंचित् फलाहार करून रात्रौ ९ वाजेपर्यंत पुनः जपास बसत, वगैरे गोष्टी सांगितल्या. समान वायूंत जप कसा करावा हें प्रत्यक्ष करून दाखविलें. मानसपूजेच्या व त्यापासून झालेल्या साक्षात्काराच्या गोष्टी व इतरही कांही गोष्टी सांगितल्या. त्या इतक्या उद्बोधक होत्या कीं, त्यांचें तोंडानें किंवा लेखणीनें वर्णन करणें शक्य नाहीं. संत 'मायबाप' किती 'कृपावंत' असतात त्याचा अनुभव आला!

त्यानंतर पंडित अनंतशास्त्री फडके या भागवतोत्तमाची भेट झाली. यांना 'व्याकरणाचार्य' व 'मीमांसातीर्थ' अशा पदव्या असून हे बनारस येथील

---

१ परमपूज्य योगिवर्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज हे ह्या स्वामींची योगचर्या व श्रीदत्तभक्ति वगैरे पाहून यांना प्रेमानें 'लीलादत्त' या नांवानें संबोधीत असत. त्यांनीं आपल्या अंतकाळीं आपल्या कांहीं शिष्यांना 'हीं माझीं लेकरें आतां तुम्ही सांभाळा' असें सांगून यांच्या स्वाधीन केलें. त्या वेळेपासून ते लोक या स्वामी-महाराजांना श्रीवासुदेवानंदांच्या स्वरूपानें भजतात; यावरून यांची खरी योग्यता वाचकांनीं लक्षांत घ्यावी.

गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेजमध्यें पुराण व इतिहास यांचे प्रोफेसर आहेत. शास्त्री व पंडित पुष्कळ असतात, पण भगवद्भक्तीनें द्रवलेल्या सात्त्विक अंतःकरणाचे लोक या पंडितवर्गांत तरी थोडे आढळतात. घरच्या वेळेंत अनेक लहान मोठ्या विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण देण्यांत हे सहासहा तास घालवितात ! काशींतील तारकमठांत यांचें पुराण चालत असतें. त्यांची ती रसाळ वाणी ऐकून आमचें नामजपाचें पुस्तक यांना वाचण्यास द्यावें असें वाटलें व नम्रतेनें देऊन, यावर कांहीं सूचना कराव्याशा वाटतील तर कराव्या, अशी विनंति केली. त्यांनीं तें समग्र वाचून मोठ्या प्रेमानें सांगितलें कीं, शास्त्रसिद्धांताला कोठेंही बाध न आणतां पुस्तक फारच चांगलें लिहिलें आहे, मीं तें फक्त वाचलें इतकेंच नव्हे, तर त्यांतील सूचनेप्रमाणें करून अनुभवही घेतला, इत्यादि. हे त्यांचे शब्द ऐकून मला माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटून परम धन्याताही वाटली. यांनीं परमहंस प. ब्रा. रघुनाथेंद्रयतिसंकलित '**भगवन्नाममाहात्म्यसंग्रह**' या ग्रंथावर 'सुधा' नांवाची टीका केलेली असून हें पुस्तक 'प्रिन्सेस ऑफ वेल्स सरस्वतीभवन' ग्रंथमालेंतून 'गव्हर्नमेंट संस्कृत लायब्ररी, बनारस' या संस्थेनें सुंदर रीतीनें छापलेलें आहे. नाममाहात्म्यावर संस्कृतांत पं. लक्ष्मीधरकृत 'भगवन्नामकौमुदी', 'भगवन्नामकौमुदीप्रकाशनाम्नी टीका', 'श्रीवैष्णवकण्ठाभरणम्', 'भक्तिप्रकरणम् ( अनन्तदेवकृतम् )', 'शाण्डिल्यसूत्र', भक्त्यधिकरणमाला-नारायण-तीर्थकृत', इत्यादि पुस्तकें असल्याचें त्यांच्याकडून मला समजून मोठा आनंद झाला[1]. त्यानंतर या शास्त्रीमहाशयांच्या द्वारें महामहोपाध्याय आचार्य श्रीगोपीनाथ कविराज, एम्. ए., प्रिन्सिपाल गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेज बनारस, या थोर विद्वान पुरुषाची भेट झाली. 'कल्याण' च्या प्रसिद्ध योगांकामध्यें 'योगका विषयपरिचय' व 'सूर्यविज्ञान' नांवाचे दोन फार मोठे लेख यांनीं लिहिलेले प्रसिद्ध झाले आहेत. ते वाचले असतां यांच्या अगाध विद्वत्तेची, ज्ञानाची, शोधकतेची व योग्यतेची थोडीशी कल्पना येईल. या महापुरुषाच्या तोंडून सहज भेटींत नामस्मरणाची मीमांसा ऐकण्यांत आली, ती इतकी महत्त्वाची होती कीं आजपर्यंत मीं अनेक परिश्रम करून संपादन केलेल्या महाराष्ट्र वाङ्मयांत मला तशी आढळली नाहीं, हें प्रामाणिकपणानें सांगण्यास मला मोठा आनंद वाटतो. नामरूप परमात्म्याची आजपर्यंत मीं जी थोडीबहुत सेवा केली आहे, त्यायोगें प्रसन्न होऊन त्या प्रभूनें मला आपलें स्वरूप व महिमा, 'यावान् यश्चास्मि तत्त्वतः' या वचनाप्रमाणें किती थोर व अगाध आहे, याची कृपेनें थोडीशी चुणुक यांच्या भेटीच्या द्वारें दाखविली असेंच मला वाटलें व

१ संस्कृत-ग्रंथाभिमानी लोकांनीं हीं पुस्तकें हवीं तर वाचून पाहावीं.

मी अगदीं विरघळून गेलों. अहाहा ! हें नामसाधन सोपें पण किती मोठें फल देणारें आहे, ‘ कोटीयज्ञांपरीस तुका म्हणे हें सार ’ कसें आहे, ह्या शास्त्रावर ( नामयोगावर ) आपल्यामध्यें प्राचीन व अर्वाचीन वाङ्मय केवढें मोठें आहे, या शास्त्रावर विचार केलेले व अनुभव घेतलेले व घेणारे केवढे मोठे लोक आहेत, हें बिलकुल न पाहातां, ‘ ज्याला यज्ञाचा अधिकार नाहीं अशा शूद्रादिकांनीं हें साधन करावें ’ असें कांहीं यज्ञाभिमानी विद्वान लोक म्हणतात, त्यांच्या बुद्धीची कींव करावी तेवढी थोडी वाटते. ब्राह्मणांना व क्षत्रियांना यज्ञ करण्याचा अधिकार, भक्ति ही शूद्रादि अनधिकाऱ्यांकरितां आहे, असेंही भरसभेंत सांगतात व ‘ किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ’ या भगवद्वचनाला विसरतात ! न्यूट्झेसारख्या पाश्चात्य विद्वानांचे मोठमोठे ग्रंथ वाचावे, त्यांचीं भाषांतरेंही प्रसिद्ध करावीं, आणि आपल्यांतील ह्या शास्त्रावर कोणीं काय लिहिलें आहे याचा नुसता विचारही करण्याची त्यांना कल्पना येऊं नये ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे ! परमेश्वर त्यांच्या प्रमादाची क्षमा करो व त्यांना सत्पथाकडे नेवो असें मी मागतों ! असो.

*   *   *   *

येथपर्यंत मला ज्यांच्या ज्यांच्यापासून लाभ झाला, त्यांचा त्यांचा मीं कर्तव्यबुद्धीनें कृतज्ञतापूर्वक नामनिर्देश केला. याशिवाय आणखी सांगावयाचें म्हणजे श्री**ज्ञा**नेश्वर – **ए**कनाथ – **तु**काराम – **स**मर्थ, इत्यादि संतश्रेष्ठांच्या ग्रंथांचाही मजवर कमी परिणाम झाला नाहीं. आधुनिक हयात संतांच्या कीर्तन-प्रवचनादिकांपासूनही बराच लाभ झाला. सातारचे श्री**दा**दामहाराज व ‘ स्वयंज्योति ’ श्री**मु**ळेमहाराज यांजकडून नामस्मरणावरील सुंदर प्रवचनें ऐकावयास मिळालीं. या सर्वांचा मी ऋणी आहें. या उभयतां संतवर्यांना मी त्यांचे नामस्मरणाचे अनुभव लिहून देण्यास विनंति केली, ती त्यांनीं प्रेमानें मान्य केली आहे. त्यांजकडून ते मिळाल्यास तिसऱ्या भागांत त्यांचा समावेश करण्याची इच्छा आहे. प्रिय अनुज **दि**गंबरदास यांच्या अनन्य उपासनानिष्ठेचाही माझ्या चित्तावर बराच परिणाम झाला हें मला येथें प्रेमानें सांगितल्याशिवाय रहावत नाहीं. शिवाय प्रस्तुत पुस्तकांतही त्यांनीं आपल्या विचाराचें बरेंच साहाय्य दिलेलें आहे; याबद्दल त्यांना मी अत्यंत धन्यवाद देतों. याशिवाय अनेक मित्रांनीं लेखांतील विधानांच्या पुष्ट्यर्थ पाहिजे असलेल्या प्रमाणांकरितां हवीं असलेलीं पुस्तकें देऊन साहाय्य केलें आहे. त्या सर्वांचे मोठे उपकार आहेत. माझे स्वात्मानुभवी प्रिय मित्र श्रीयुत **बाळकृष्ण भाऊ जो**शी, या पुस्तकाचे मुद्रक, यांनीं हें पुस्तक इतरांपेक्षां सवलतीच्या दरानें छापून दिलें आहे, एवढेंच नव्हे, तर प्रुफें

तपासण्याची दगदगही स्वतःच प्रेमानें सोसली, याबद्दल त्यांचा मी फार फार ऋणी आहें. पुस्तक छापण्यास सुरू झाल्यापासून आज ( ३ वर्षें ) पर्यंत माझ्या शरीरावर दोनतीन भयंकर दुखण्याचे प्रसंग आले. त्यांतून निभावून ही सेवा पुरी करून घेतल्याबद्दल व मुद्रकप्रकाशकादिकांनाही तनमनधनानें सुखी ठेवल्याबद्दल जगज्जीवन परमात्म्याचा तर मी किती ऋणी आहें म्हणून सांगावें, हें मनवाणीसही समजत नाहीं ! असो.

श्रीगुलाबराव महाराज वगैरे अनेक संतविभूतींच्या ग्रंथांतील उतारे मीं या पुस्तकांत घेतले आहेत, त्यांचा तर ऋणी आहेंच. संत हे जगाचे मायबाप आहेत. देहास जन्म देणारे आईबाप संसारबंधनांत घालणारे, पण संत मायबाप हे जन्ममरणरूप संसार-बंधनांतून सोडविणारे असल्यामुळें जीवांचे तेच खरे मायबाप होत. आईबापांच्या मालमत्तेवर मुलांचा हक्क असतोच. त्याप्रमाणें ती मालमत्ता मीं अगदीं हक्कानें, आत्मीय भावनेनें खूप वापरली आहे ! हिंदी ‘ धर्मकल्पद्रुमा- ’ च्या मुळांत हा ‘ चिंतामणि जन्मास आला, आणि ‘ संप्रदाय-सुरतरू- ’ च्या सुमधुर पुष्पफलांनीं भरलेल्या शाखांवर तो विहार करूं लागला. चिंतामणि हा जड रत्न नसून चिद्रत्न आहे. त्याची सेवा-संगति करणाऱ्याचें चिंतित तो पूर्ण करूं शकतो आणि ‘ **ना**मचिंतामणि ’ तर ‘ चैतन्यरसविग्रह ’ असा साक्षात् ‘ कृष्ण ’ भगवानच आहे.

**“ नामचिंतामणिः कृष्णश्चैतन्यरसविग्रहः ।**
**पूर्णः शुद्धो नित्यमुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः ॥ ”**

असा हा चिंतामणि चिंतिलेलें पूर्ण करूं शकेलच; पण चिंतनेच्या बाहेरची ‘ अचिंत्य ’ वस्तुही देऊं शकेल, असा शास्त्राचा सिद्धांत व संतांचा अनुभव आहे. प्रेमळ वाचकांनीं तो घेऊन पाहावा एवढीच सप्रेम विनंति.

सकल पापक्षयपूर्वक सकलार्थसिद्धि करून देणारें असें परमात्म्याचें कोणतें अवतारस्वरूप असेल, तर तें सर्वांनीं सुसेव्य असें ‘ नामस्वरूप ’ च होय. त्यास मी अष्टांगांनीं नव्हे, सर्वांगानें प्रणाम करून प्रार्थना करतों कीं हे दीनदयाळ नामस्वरूप परमात्मन् ! आपलें सर्वशास्त्रसंमत व संतसंमत तत्त्व वाचकांच्या हृदयांत ( लेखकही एक वाचक आहेच ) पूर्णपणें भरवून त्यांचें परम कल्याण कर ! क्षमा करून कृपा कर व सेवा घेऊन कल्याण कर ! कल्याण कर ! कल्याण कर !

"नमोऽस्तु नामरूपाय, नमो नामप्रकाशिने ।
नमोऽस्तु नामसाध्याय, नमस्ते नामयोगिने ॥
नमोऽस्तु नामभाग्याय, नमस्ते नाममंत्रिणे ।
नमोऽस्तु नामधन्याय, नमस्ते नामशांतये ॥
नमोऽस्तु नामभोग्याय, नमो नामप्रतापिने ।
नमोऽस्तु नामसेव्याय, नमो नामविभाविने ॥"

ह. मु. श्रीक्षेत्र काशी,
श्रीपंचगंगेश्वर मठ,
विजयादशमी,
शके १८५७

संतसज्जनकृपाभिलाषी –
रामचंद्र कृष्ण कामत चंदगडकर
श्रीदुर्गादत्तमंदिर, माशेल – गोवा

## नामापाशींच देव राहात असतो

"नामापाशीं तिष्ठे देव । नामापाशीं वसे भाव ।
नामापाशीं मुक्तिगौरव । अहर्निशीं वसतसे ॥ १ ॥
नामापाशीं ऋद्धीसिद्धी । नामापाशीं ते समाधी ।
नामें तुटती उपाधी । जन्मोजन्मींच्या ॥ २ ॥
नामापाशीं भुक्ति मुक्ती । नामापाशीं ते विरक्ती ।
नामें पातकें नासतीं । बहुजन्मांचीं ॥ ३ ॥
एका जनार्दनीं नाम । गातां निरसे भवभ्रम ।
साधन उत्तम । कलियुगामाझारीं ॥ ४ ॥



# नामचिंतामणि — विषयानुक्रमणिका

ॐतत्सत् — श्रीः ।

## महाभागवत यमधर्म आपल्या दूतांना नामाचा महिमा सांगून ताकीद देतो

" यम सांगे दूतां । तुम्हां नाहीं तेथें सत्ता ।
जेथें होय कथा । सदा घोष नामाचा ॥ १ ॥
नका जाऊं तया गांवा । नामधारकांच्या शिवा ।
( कारण ) सुदर्शनयावा । घरटी फिरे भोंवती ॥ २ ॥
चक्र गदा घेउनी हरी । उभा असे त्यांच्या द्वारीं ।
लक्ष्मी कामारी । ऋद्धीसिद्धींसहित ॥ ३ ॥
ते हे बळिया-शिरोमणी । हरिभक्त ये मेदिनीं ।
तुका म्हणे कानीं । यम सांगे दूतांच्या ॥ ४ ॥ "



*PEACE & BLISS AT ONCE*

**प्रापंचिक व पारमार्थिक सौख्याचा मार्ग**

**दाखविणारा सुंदर ग्रंथ**

# नामचिंतामणि

**याचें नुसतें वर्णन व सज्जनांचे अभिप्राय वाचणें देखील आपणांस आनंदकारक व पुण्यप्रद वाटल्यावांचून राहणार नाहीं. करितां एकदा लक्षपूर्वक वाचून पाहा.**

या पुस्तकांत — **आद्यमंत्र** ' ॐकार ' व इतर **' बीजमंत्र '** यांची उत्पत्ति केव्हां व कशी झाली ; **मंत्रांची** उत्पत्ति व त्यांची **सिद्धि** ; **मंत्रांत** असाधारण शक्ति केव्हां व कशानें येते ; **मंत्रजपानें ' भावसमाधि '** ; **मंत्रयोगाचीं** सोळा अंगें ; **गायत्री**-मंत्रास शाप ; **बारा** प्रकारचे गुरु ; **साधकांच्या** अडचणी व कांहीं सूचना ; **थोडासा** वेदान्त ( वेदान्ताचें अतीव सुंदर रहस्य ) ; **भक्ति** व **भाव,** तसेंच **उपासना** व **भक्ति** यांचें तारतम्य ; **प्रारब्ध** व **प्रयत्न** यांचा बलाबलविचार ; **स्त्रीसाधकांस विशिष्ट सूचना** ; कांहीं साधक स्त्रियांचे व पुरुषांचे **पारमार्थिक अनुभव,** शेवटीं **' नामयोगरहस्य '** — यांत नामानें नामीचें अनुसंधान करण्याचे चार प्रकार [ १ **निर्गुणध्यान,** २ **सगुणध्यान** ( यांत पुनः रूपचिंतन, गुणचिंतन, लीलाचिंतन, वाक्यचिंतन, विजातीय भेदनिरसन इ. प्रकार ), ३ **नामनामी** — अभेदचिंतन व ४ **नामध्वनिचिंतन** ] ; तसेंच **' नामोच्चारण '** व **' नामस्मरण '** यांतील भेद ; **परा-पश्यंती-मध्यमा-वैखरी** वाणींचें नामस्मरण ; **वाचिक-उपांशु-ध्वान-मानस-ध्यान-अनन्य** या जपांचे **प्रकार** ; **श्वासांत** नामस्मरण इत्यादि इत्यादि अश्रुतपूर्व सुंदर विषय आले आहेत ! शिवाय सर्वत्र व्यावहारिक अनुभवसिद्ध उदाहरणें दिलीं असल्यामुळें, **परमार्थविषयावरील ग्रंथही कादंबरीसारखा वाचण्यास मनोरंजक, सुलभ व मधुर** झाला आहे ! बारीक टाईप, ग्लेज कागद, सुमारें ४६० पृष्ठांची किंमत ३॥ रु. ठेवली आहे, यावरून ग्रंथप्रकाशनाचा शुद्ध लोकोप-योगाचा हेतु सहृदय वाचकांना न सांगतांच लक्षांत येईल. तरी हा **चिंतामणि मागवून** नामचिंतामणि जोडून, रसिकांनीं व भाविकांनीं आपलें इहपरलोकींचें हित म्हणजे प्रापंचिक भाग्य व पारमार्थिक मोक्ष साधून घ्यावा !

# थोर थोर पुरुषांचे अभिप्राय

**( १ ) मुमुक्षुकर्ते ह. भ. प. लक्ष्मणराव पांगारकर लिहितात—** " **यांत** मला यापूर्वी न कळलेल्या नवीन गोष्टी किती तरी कळल्या ! आरंभींची **मंत्रयोगाची** माहिती अगदीं नवीन आहे. **मला** वाटतें कीं, **२५ वर्षांत मी मुमुक्षूच्या द्वारें जें कार्य करूं शकलों नाहीं, तें आपण या एका ' नामचिंतामणी ' नें करूं शकाल !** नांवाप्रमाणें ग्रंथ खरोखरीचा **परमार्थ**चिंतामणि आहे ! आपले उपकार किती मानावेत तें सांगतां येत नाहीं. नामाभ्यासकांस हा अमोल ठेवा वाटेल. नवीनांचेंही शंकासमाधान आपण युक्तीनें व उदाहरणांनीं उत्तम केलें आहे. रा. **रेगे** ( प्रकाशक ) यांची प्रस्तावनाही मोठी उद्बोधक आहे. आपली धन्य आहे. आपण आपल्या जन्माचें सार्थक केलें आहे. ह्या ग्रंथावर लोकांच्या उड्या पडतील व अनेक मुमुक्षु सभाग्य जीव मार्गाला लागतील " इत्यादि.

**( २ ) श्रीरमणमहर्षि शिष्य श्रीगुरु-देवानंदस्वामी लिहितात** — " आपला ' नामचिंतामणि ' खरोखरच सत्साधकाला व तीव्र मुमुक्षूला ' चिंतामणि 'च वाटेल ! आपणासारख्या अनुभविक व प्रेमळ लेखकांच्या कृति अशा परिणामकारक न निपजल्या तरच आश्चर्य ; त्या **चंद्रार्कापर्यंत टिकून राहतील व जगाला सत्पथारूढ राहण्यास स्फूर्ति देतील** " इत्यादि.

**( ३ ) श्री दिगंबरदास कामत लिहितात—केवल प्रयत्नानें सर्व साध्य झालें असतें,** तर जगांत एकही व्यक्ति व राष्ट्र दुःखी व दरिद्री राहिलें नसतें. आज ज्या कोणास कमीजास्त सुख व ऐश्वर्य प्राप्त झालेलें दिसतें, तें ज्याच्या त्याच्या पूर्व तपाचें फळ आहे. तपेंही पुष्कळ प्रकारचीं आहेत. त्यांत नामस्मरणासारखें सुलभ व सामर्थ्यवंत तप दुसरें नाहीं. **नाममंत्र हें ईश्वरी कृपेच्या आकर्षणाचें यंत्र आहे.** लौकिक प्रयत्नास भगवत्कृपेच्या अधिष्ठानावांचून यश येणें शक्य नाहीं. हें **' भगवंताचें अधिष्ठान '** ' Spiritual help in Material affairs ' ) कसें मिळवावें हें या पुस्तकावरून उत्तम रीतीनें समजून येईल.

मंत्रही पुष्कळ प्रकारचे आहेत. मंत्रांत मोठी शक्ति आहे. पण हें ' मंत्रशास्त्र, ' किती गहन आहे हें आरंभीं ( पृ. ४७ पर्यंत ) दिलेल्या माहितीवरून समजून येईल. इतर मंत्रांपेक्षां **भगवन्नाममंत्राचें अनुष्ठान अत्यंत सुलभ** व **बिनधोक्याचें** आणि महत्फलदायक आहे. एकाच नामाच्या **संततधारा-जपानें** साधकास Centripetal व Centrifugal forces म्हणजे **संकर्षण** व **अनिरुद्ध** शक्ति

प्राप्त होतात, असें पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनींही सप्रमाण सिद्ध करून दाखविलें आहे. त्या नामयोगाचें रहस्य व साधकांना अत्यंत उपयुक्त अशी इतर माहिती त्यांत दिली आहे. ती लक्षपूर्वक वाचून लाभ करून घ्यावा.

(४) **'धर्मवीर' कर्ते**—[ **विनायक महादेव जोशी**, बी. ए. (मुंबई) एम्. ए. (ऑक्सफोर्ड)] हे आपल्या दोन कॉलमच्या अभिप्रायांत लिहितात (अंक ता. २१।२।३६)—" नाममाहात्म्यावर रा. कामत यांनीं लिहिलेलीं पुस्तकें केवळ प्रमाणभूत झालेलीं आहेत. **ग्रंथ सर्वच इतक्या भरीव मजकुरानें भरलेला आहे कीं, ज्यांत गंभीर व खोल विचार नाहींत व कांहीं तरी उत्तम तत्त्व नाहीं असें जवळ जवळ एक पानही नाहीं म्हटलें तरी चालेल** ... भित्र्या माणसाला धीट करण्याला एकच उपाय आहे आणि तो 'धारणाभ्यास' व त्यामुळें येणारी ईश्वरी सामर्थ्याची प्रतीति हाच. ... **नामधारणेपेक्षां जास्त सुलभ आणि वाटेल त्या माणसाला वाटेल त्या परिस्थितींत करितां येईल अशी कोणतीच धारणा नाहीं.** हें जाणूनच सर्व भारतीय संतांनीं आपल्या एकमेव अनुभवानें या साधनाची अपरिमित स्तुति केली आहे. **सर्व ग्रंथ इतका साधार लिहिला आहे कीं, कोठें मतभेदास जागाच नाहीं.... 'खास** साधक स्त्रियांकरितां' लिहिलेलें प्रकरण तर फारच रमणीय आहे. त्यांतील 'तथा पतिव्रता न स्यात् केवलं योनिरक्षणात्' ही सूचना व सती, **पति**-प्रेमिका, साध्वी, पतिव्रता **या स्त्रीसौभाग्याच्या चढत्या वाढत्या पायऱ्या अलीकडील सुशिक्षित स्त्रियांनींही लक्षांत घेण्याजोग्या आहेत.** असा हा ग्रंथ सर्वतोपरी आदरणीय आहे ...'**सा**धकासाठीं सूचना' पुष्कळच देऊन ठेवल्या आहेत त्या फार उपयुक्त आहेत. एकंदरींत असें म्हणतां येईल कीं, उच्च कोटींतील साधकांनाच म्हणजे जे खरेच साधनमार्गास लागले आहेत त्यांनाच या पुस्तकाचा खरा उपयोग आहे. ... श्री. कामत यांची लेखनपद्धति व विवेचन इतकें सुबोध आहे कीं, फणस सोलतांना यत्किंचितही त्रास होत नाहीं. ... किंमत देखील माफकच आहे." इत्यादि. इत्यादि.

(५) **'हंस' कर्ते**—(श्री. **द. ग. वे**लणकर, वाङ्मयविशारद व श्री **रा. वि. बहुलेकर**, वाङ्मयविशारद, **सातारा,** अंक ता. २।४।३६) "**एका सुंदर पुस्तकाचा परिचय**—नामचिंतामणीचा परिचय आमच्या प्रिय वाचकांना करून देण्यासाठीं तो वाचतांना श्रेष्ठ सुखानंदाचा लाभ झाला. वाचनाचा आणि त्याच्या अनुषंगानें घडलेल्या चिंतनाचा काळ सत्कारणीं लागला. अशींच सारीं पुस्तकें परीक्षणार्थ लाभतील तर तें सद्भाग्य! लेखकाच्या **स्व**भावसौंदर्यानें आणि प्रकाशकाच्या **उदार**तेनें '**नाम**चिंतामणि' हें बहुमोल रत्न सांप्रत काळीं इतक्या अल्प किंमतीस मिळणें सुलभ झालें आहे.

नामचिंतामणि हा साधकाचा सोबती आहे. ज्याच्या हृदयाकाशांत बद्धतेची काळोखी रात्र संपून मुमुक्षेची पहाट झाली आहे त्याला हा चिंतामणि महाफलदायी होईल. निरनिराळ्या मंत्रांसंबंधाची आणि एकंदर मंत्रशास्त्राची दुर्मिळ माहिती निरनिराळ्या ग्रंथांतून संपादन करून आरंभींच्या प्रकरणांतून समाविष्ट करून ती सामान्य साधकाला सुलभ करून सोडली आहे. साधकाच्या मार्गांत कोणकोणत्या अडचणी येतात व त्या कशा दूर कराव्यात याचा विचार आत्मीयत्वानें केला आहे. '**प्रारब्ध व प्रयत्न**' यांत प्रयत्नच कसा श्रेष्ठ आहे हें संतमुखानें वर्णिलें आहे. '**थोडासा वेदान्त, ज्ञान व भक्ति, साधकांसाठीं खास सूचना, खास स्त्री**साधकवर्गासाठीं **सूचना**' हीं प्रकरणें वाचीत असतां आस्था व तळमळ आणि चढता वाढता भक्तिप्रेमा अंतःकरणांत उदित होतो, आणि शेवटच्या '**नामयोगरहस्य**' या प्रकरणांत तो शिगेला लागतो. अथपासून इतिपर्यंत सर्व पुस्तक लिहीत असतां साधकाची करुण व अधीर मूर्ति लेखकाच्या डोळ्यांसमोर सतत उभी असून ती त्याला (लेखकाला) आपलें काम आस्थेनें करण्यास भाग पाडीत आहे असें वाचकांना वाटतें. हें पुस्तक वाचीत असतां आलेल्या एका अनुभवाचा गोपनस्फोट आमच्या प्रिय वाचकांजवळ करून हें गोड काम पुरें करितों" असें लिहून त्यांनीं आपला दिव्य अनुभव मोठ्या कळकळीनें त्या अंकांत प्रसिद्ध केला आहे. तो विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. पण त्यामुळें आमच्या श्रमाचें साफल्य झालें, असें ग्रंथलेखक व प्रकाशक यांना वाटल्यास आश्चर्य नाहीं. परमात्मा या ग्रंथाच्या सर्व वाचकांस असाच अनुभव देवो अशी आम्ही त्याच्या चरणाजवळ प्रार्थना करितों.

(६) **म० शंकर श्रीकृष्ण देव, चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा धुळें,** आपल्या '**रामदास** आणि **रामदासी**' मासिकांत लिहितात—"नामस्मरणाचें महत्त्व वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न रा. कामत यांनीं आज कैक वर्षांपासून चालविला आहे हें आम्हांस ठाऊक आहे. त्या प्रयत्नांतील त्यांचें पहिलेंच पुस्तक लहान होतें खरें, पण मार्मिक आणि उद्बोधक होतें. प्रस्तुतच्या पुस्तकानें त्या प्रयत्नाची अंतिम सीमा गांठली असें दिसतें. ग्रंथ प्रेमळ आहेच, पण प्रकाशकाची प्रस्तावना त्याहून आम्हांस प्रेमळ वाटली. भक्तिप्रेमावांचून असली प्रस्तावना लेखणींतून उतरणें शक्य नाहीं. प्रकाशकांनीं केलेल्या शिफारसीप्रमाणें आम्हीं प्रथम '**प्रारब्ध व प्रयत्न**' हें प्रकरण वाचलें, नंतर '**थोडासा वेदान्त**' पाहिला, नंतर '**नामयोगरहस्य**' समजून घेतलें, आणि नंतर इतर प्रकरणें क्रमशः वाचलीं आणि शेवटीं '**लेखकाच्या हृद्गता**' कडे वळलों. ग्रंथ वाचून झालेला ग्रह एका वाक्यांत सांगावयाचा

तर आम्हांस असें म्हणतां येईल कीं, हा ग्रंथ म्हणजे पांगारकरांचा जसा भक्तिमार्गप्रदीप, तसा गुरुमार्गाला लागलेल्या साधकांचा हा 'गुरुमार्गप्रदीप' होय." इ०

याशिवाय म. **बाळकृष्ण भाऊ जोशी**—पुणें ज्ञानविलास छा० चे मालक व उत्कृष्ट ग्रंथकार, **सांगलीचे** प्रसिद्ध विद्वान ग्रंथकार व मोठे राजकामदार पुरुष कै. **यशवंतराव कोल्हटकर**, बी., ए. एलएल. बी., जगप्रसिद्ध गोभक्तचूडामणि म. श्रीचौंडेमहाराज (हे तर रा. कामत यांच्या नामजपाच्या पुस्तकामुळेंच तेरा तेरा कोटि सामुदायिक जपयज्ञ करण्याची आपणास स्फूर्ति मिळाली असें उघड बोलतात.) इत्यादि **अनेक संतसज्जनांचे दिव्य प्रेमाचे अभिप्राय आहेत.** यावरून या पुस्तकाची योग्यता वाचकांच्या लक्षांत येईल व ताबडतोब पुस्तकांची मागणी करून ते आपल्या ग्रंथसंग्रहालयास शोभा आणतील आणि त्याच्या वाचनानें, अनुष्ठानानें व प्रसारानें आपलें अदृश्य पुण्यसंग्रहालय भरभक्कम करतील अशी आम्ही आशा करितों.



## शा स्त्री य मी मां सा यु क्त

# नामजपाचें महत्त्व – भाग पहिला

(यांत श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीप्रेरित '**मोठा यज्ञ व साक्षात्कार** अथवा '**साधनराजाची सर्वैभव ओळख**' हें पुस्तक अनेक सुधारणा करून सामील केलें आहे.)

या पुस्तकांत—**सुखदुःखाचे** नियम व नामसाधनाचें **सौलभ्य** आणि **सार्वभौमत्व**, **सकाम** नामस्मरणाचा विधि, **निष्काम** जपसिद्धीचा प्रकार, **संख्यायुक्त** जपाचें महत्त्व, **एकेका** कोटि जपानें जन्मकुंडलींतील द्वादशस्थानांपैकीं एकेका स्थानाची शुद्धि, **संख्यायुक्त** जपाबद्दल **श्रीसमर्थांचा** व **श्रीअक्कलकोटस्वामींचा** पुरावा, **पंचमहाभूतांवर सत्ता**, **निष्काम** जपांतही संख्येची काय गरज, **वेदाहूनही** नाम वरिष्ठ कसें, **वेदबाह्य** लोकांनाही नाम तारक आहे, **श्रद्धेवांचूनही** नाम फळतें, **नामच** ब्रह्म (भगवन्नामें हीं भगवंताचे ध्वनिरूप अवतार), **पुराणोक्त** नामस्मरणास प्रथमच गुरूची अनवश्यकता, **संत – गुरु – सद्गुरु**, **नामस्मरणानेंच** हरिगुरुकृपा होते, **नामास** कर्म साद्गुण्य नाहीं, **नाम** अशुचिकाळींही घ्यावें, **नामनिष्ठांचे** प्रत्यक्ष अनुभव इ. इ. अनेक महत्त्वाचे विषय आहेत ! पृष्ठें १२८, सुधारून वाढविलेली आ. ५ वी, किं. १४ आणे.

**केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, गिरगांव, मुंबई ४**

# श्रीगुरुचरित्रभक्तांस अपूर्व लाभ !

## श्रीगुरुचरित्रांतर्गत गुरुगीता

ही श्रीक्षेत्र गाणगापुरांतील सायंदेवी ('कडगंची') गुरुचरित्राच्या पोथींत असलेली, सुप्रसिद्ध '**नामचिंतामणि**' पुस्तकाचे कर्ते ह. भ. प. **रामचंद्र कृष्ण कामत** यांनीं महत्प्रयासानें संपादन करून व गुरुगीतेच्या इतर अनेक प्रतींच्या आधारें शुद्ध करून तसेंच पाठभेद वगैरेंच्या टीपा देऊन सुंदर रीतीनें तयार केलेली आहे. यांत आरंभीं व अखेरीस उपक्रम-उपसंहारादाखल गुरुचरित्रकार **सरस्वती-गंगाधराच्या** थोड्याशा प्राकृत ओव्या असून, मध्यें न्यासध्यानादिकांसह गुरुगीतेचे संस्कृत श्लोक आहेत. श्लोकांवरची **रंगनाथस्वामीकृत प्रा. समओंवी टीकाही** पुढें जोडली असून हल्लीं सर्वत्र प्रचलित असलेल्या **गुरुचरित्रामधील ढोबळ ढोबळ चुकांचें शुद्धिपत्रही** (सुमारें ८ पृष्ठांचें) दिलें आहे. प्रस्तावनेंत – हा गुरुगीतेचा अध्याय कसा सांपडला व **गुरुगीता ही सप्तशतीप्रमाणें 'मंत्रमय'** कशी आहे इत्यादि सांगून, **सायंदेवाच्या** घराण्याची माहिती, **सरस्वती – गंगाधराची** पूर्वपरंपरा, गुरुचरित्र ग्रंथ '**सिद्धमंत्ररूप**' कसा व तो वेदतुल्य अथवा वेदाधिकमान्य कसा झाला, वगैरे अत्यंत महत्त्वाची व हृदय हालवून सोडणारी माहिती दिली आहे. यांतील प्रस्तावना व शुद्धिपत्र वाचून, इतरत्र छापलेल्या गुरुचरित्रांतील शुद्धाशुद्धतेची कल्पना स्पष्टपणें येऊन मनाला फारच आनंद वाटेल. जाड पुठ्याचें व रेशमी पट्टीचें सुंदर बाइंडिंग. **किंमत अवघी १२ आणे.**



## श्री. कामत यांनीं केलेलें अतुलनीय ग्रंथसंशोधन

# श्रीगुरुचरित्राची शुद्ध प्रत

" भुक्ति मुक्ति परमार्थ । जें जें वांछिजे मनांत ।
तें तें साध्य होय त्वरित । गुरुचरित्र ऐकतां ॥
धनार्थीयासी अक्षय धन । पुत्रपौत्रादि गोधन ।
कथा ऐकतां होय जाण । ज्ञानसिद्धि तत्काळ ॥ "

कलियुगांत **चिंतामणि, कामधेनु** किंवा **कल्पतरु**प्रमाणें मानला जाणारा हा महाप्रासादिक वेदतुल्य ग्रंथ श्रीक्षेत्र **नृसिंहवाडी, औदुंबर, गाणगापूर** व **कुरवपुर**, इत्यादि श्रीदत्तक्षेत्रांतील, तसेंच श्रीचिदंबरक्षेत्र **मुरगोड-केंगेरी** येथील व इतर अनेक गांवांतील फार फार जुन्या हस्तलिखित प्रति मिळवून ह. भ. प. **रामचंद्र कृष्ण कामत** यांनीं अत्यंत परिश्रमानें शुद्ध करण्याचें काम सुमारें १८ वर्षें लागून केलें आहे. याबद्दलचा साग्र इतिहास त्यांनीं आपल्या '**श्रीगुरुचरित्रांतर्गत गुरुगीता**' या **पुस्तकाच्या** प्रस्तावनेंतही दिला आहे. तो ज्यांनीं वाचला असेल व इतरत्र छापलेल्या ग्रंथांत असलेल्या '**ढोबळ ढोबळ चुकांचें शुद्धिपत्र**' जे पाहतील, त्यांना या नूतन **अमोलिक संशोधित गुरुचरित्रप्रतीचें** महत्त्व कळून येईल.

भाविक भक्तांच्या भावनेप्रमाणें भगवान फळ देत असतात ही गोष्ट निराळी, तथापि असले पारायणाचे प्रासादिक ग्रंथ शक्य तितके शुद्ध असलेलेच वाचणें अधिक श्रेयस्कर हें कोणालाही सांगण्याचें कारण नाहीं.

सुंदर मोठें अक्षर, जाड ग्लेज कागद, प्रत्येक पानाच्या बाजूच्या नक्षीमध्यें घातलेला '**दिगंबरा दिगंबरा श्रीपाद-वल्लभ दिगंबरा**' हा श्रीमद्वासुदेवानंदांचा आवडीचा दत्तमंत्र, आजपर्यंत बहुधा कुठल्याही ग्रंथांत न दिसणारीं अशीं, त्या त्या अध्यायांतील कथाप्रसंगाचीं प्रख्यात चित्रकाराकडून मुद्दाम काढविलेलीं सुंदर चित्रें व समजुतीच्या भरपूर टीपा, इत्यादि सर्व दृष्टीनें हा ग्रंथ अगदीं अपूर्व झाला आहे. इतकेंच नव्हे तर आजपर्यंत **गुरुचरित्र**-ग्रंथ म्हणजे नुसता अंधश्रद्धेचा, सकाम भक्तांचा व दत्तउपासकांचाच आहे असें मानलें जात असे. आतां त्यांतील टीपा वगैरेवरून हा ग्रंथ आपण पूर्वी मानीत होतों तसा नसून **धार्मिकांचा तो एक ज्ञानकोश आहे** असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. **आवृत्ति तिसरी, मूल्य ६ रुपये.**



## ‘ नामचिंतामणी ’ वरील थोर पुरुषांचे अभिप्राय

**श्रीमंत रामराव कृष्ण जठार, ममताजुद्दौलाबहादर, ‘ स्वानंद-साम्राज्य - ’ ग्रंथकर्ते** लिहितात—

“ परम रसाळ व परम प्रेमळ भगवद्भक्त श्रीयुत **रामचंद्र कृष्ण कामत** यांची माझी काशीक्षेत्रीं **तारकमठांत** श्रावण ३० बुधवार, शके १८५७, ता. २८ ऑगस्ट १९३५ रोजीं श्रीगुरुस्वामींच्या निर्याणोत्सवांत अकस्मात् भेट होऊन त्यांनीं मला **‘ गीताधर्म** म्हणजे **विश्वधर्म ’** व **‘ नामजपाचें महत्त्व ’** हीं दोन लहान पण गूढतत्त्व भरलेलीं पुस्तकें दिलीं. तीं मीं पूर्ण वाचलीं. **‘ नामचिंतामणि ’** हा दुसरा भागही थोडा पाहिला. त्यांत नामामृतरसानें तृप्ति पावलेल्या अशा अनेक प्राचीन कालापासून आधुनिक कालापर्यंत झालेल्या महर्षि – सिद्धपुरुष – साधुसंत महात्म्यांची नामानुष्ठानपद्धति, सिद्धीचे अनुभव, भगवत्प्राप्तीचा आनंद, इत्यादींचीं वर्णनें उदाहरणांसहित दिलीं असल्यामुळें ग्रंथ फार रमणीय व साधकांना अनुकरणीय असा केलेला आहे, तो पाहून मला फार आनंद झाला.

इतर युगांत ध्यान, तप, मख, इत्यादि अनेक साधनें भगवत्प्राप्तीकरितां होतीं व आहेत. पण या घोर कलिकालांत तीं सर्व दुःसाध्य व खडतर अशीं झालीं आहेत. **अति सुलभ, सुखसाध्य आणि गोड असें साधन कोणतें असेल तर तें केवल भगवन्नामस्मरण हेंच आहे.** यापुढें इतर सर्व गौण आहेत. श्रीगोस्वामी तुलसीदासांनीं रामायणांत “ राम न सकहिं नामगुण गाई ” म्हणजे ‘ राम स्वतः आपल्या नामाचा महिमा सांगूं शकत नाहीं, ’ असें वर्णन केलें आहे... जो भक्त खरा रामनामांकित होतो, त्याच्या अंकित स्वतः राम होतो ! हा अनादि सिद्धांत आहे. तो परमभक्त श्री **कामत** यांनीं येथें सोपपत्तिक, सोदाहरण, सिद्धांच्या अनुभवसिद्धीसह सांगोपांग वर्णन केला आहे. त्यांत कांहीं न्यून असतें, तर सुचवितां आलें असतें. साधनांची व सिद्धीची वाण केव्हांही नसते. वाण असते ती साधकांची. तशी जिज्ञासा जागृत होण्यास कामतांचा ग्रंथ वाचकांस कारणीभूत होईल अशी मी आशा करितों. ”

**रा. कृ. जठार**



## पं. अनंतशास्त्री फडके

### व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ, वेदान्तकेसरी, पुराण व इतिहासाचे प्रोफेसर

गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेज, बनारस, ह्यांचा अभिप्राय.

" **श्रीयुतै**र्हरिभक्तिपरायणैर्विद्वद्वर्यैः **काम**तेत्युपाह्वै **राम**चंद्रशर्मभिर्महाराष्ट्रभाषया रचितं '**नामजपाचें महत्त्व**', '**नामचिन्तामणि**' संज्ञकं ग्रंथद्वयं मया सम्यक्तयाऽनेकवारं सम्पूर्णमालोचितम् । गैर्वाण्यां वाण्यामस्मिन् विषये संत्येवानेकविधा ग्रन्थाः । बहुभिः श्रेष्ठैर्महात्मभिस्तत्रानेकेऽनुभवा निबद्धाः । परन्तु ते सर्वेऽप्यतीव प्राचीना इत्यतस्तान्प्रमाणतया स्वीकर्तुं संशेत इव नश्चेतः । अत्र तु संप्रति विद्यमानानां भक्तानां नामजपतत्पराणामनुभवानामस्मिन् शतक एव प्रादुर्भूतानां भक्तश्रेष्ठानां वचननिचयस्य चैकत्रस्थाने प्रदर्शनमतीवोपकृत्य धार्मिकान्बलादिव प्रवर्तयत्य-धार्मिकांश्चात्र कार्ये ।

अत्र मन्त्रजपसाधनभूतमालाविचारतः कठिनमपि मन्त्रप्रादुर्भावादिकं सर्वमपि सिद्धान्तजातं सुमनोहारिण्या युक्त्या ग्रन्थकारमहोदयैर्विचारितमत **एतन्नामविषयकं शास्त्र**मेवेत्यहं मन्ये ।

नामापराधेषु च 'वेदनिंदा नाम्नि वादः पापेच्छा नामसाहसात्' इत्युक्तम् । एतत्सर्वमपि सूक्ष्मैषिकया विचार्य श्रीयुतरैण्णासाहेब**का**मतमहोदयैः साधूपकृतं जनेषु नामविषयकं नूतनग्रन्थरत्नं निर्माय महाराष्ट्रभाषायां च । ग्रंथरचनाचातुर्यं, विषय-प्रतिपादनशैलीं, विलक्षणपाण्डित्यं, मधुकरवृत्त्योपलब्धवचनरसबिन्दुसंग्रहपाटवं, नूतनया भौतिकशास्त्रयुक्त्या स्वीयाभिप्रेतस्य विवेचनं, प्रतिपदं प्रकटीभूतां सनातनधर्मश्रद्धां, ईश्वरविषयकं नितान्तं विश्वासं, स्वकीयनिरभिमानतां चावलोकयता मया निश्चितं संभाव्यते सनातनधर्मस्य भक्तानां धार्मिकाणां चोपरि महानुपकारोऽनेन ग्रन्थरत्नेन संजायेतेति । **मया चानेकवारमस्य ग्रंथस्य पारायणं ग्रंथस्थसिद्धान्तस्य च साक्षात्कारः कृत इत्यप्यवश्यं निवेदनीयम्** । एतादृशग्रन्थरत्ननिर्माण-पराननुगृह्णत्वायुरारोग्यप्रदानेन काशीपुरीपालको महारवो भैरव इति प्रार्थयते ।

आश्विन शु. ६ गुरुवासरे १८५७.

ता. ३।१०।३५ काश्याम् । "



# ठळक चुकांचें शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | ११ | यमननपूर्वक | मननपूर्वक |
| १८ | २९ | असतो व | असतो तो |
| ” | ३० | पुनः– तो | पुनः |
| १९ | १ | श्रवणं कीर्तनं ( च्या पुढें ) | अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनं |
| ” | ६ | साधा काला | साधकाला |
| २० | ५ | परमाशांति | परमशांति |
| ” | ८ | उमजे | उपजे |
| २१ | २० | विषयीचा | विषयांचा |
| ” | १३ | हातात | होतात |
| २९ | ८ | कतु | कर्तुं |
| ३३ | ८ | तर्पणत्तत्वेन | तर्पणत्वेन |
| ” | १५ | जय दुग | जय दुर्गे |
| ” | २६ | महतंत्रीं | मेरुतंत्रीं |
| ४८ | २० | अभ्रांत | अभ्रान्त |
| ५५ | २२ | अपरिच्छिन्न असून ज्ञान० | अपरिच्छिन्न ज्ञानसंपन्न |
| ६० | ५ | मोक्ष | मोक्षाचा |
| ६५ | ६ | केलेलें सर्व कर्म | केलेलें कर्म |
| ७४ | २ | शास्त्राप्रमाणें | शास्त्रप्रमाणें |
| ७६ | १५ | दहीं | गृहीं |
| ८५ | २२ | ९८ – १०३ | ७१ – ७४ |
| ९२ | १ | पाण्यांन | पाण्यांत |
| ९९ | २५ | तर ते | तरच ते |
| १०३ | २ | ज्ञानाची | ज्ञानाच्या ज्ञानाची |
| १०८ | २८ | याचा | याची |
| १२२ | २३ | मृसागी | मृगासी |
| १२६ | २८ | प | पैं |
| १४४ | १७ | स्वरूपासा | स्वरूपांसी |
| १४६ | १८ | समाविधान | समाधिवान |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १८० | १० | आत्मा पहाया | आत्मा पहावा |
| २०४ | १८ | पृष्ठ ९३ । ९४ | पृष्ठ १५६ |
| २२४ | २ | युक्तना व मचितना | युक्तता व मचितता |
| ” | १६ | भावी | भावो |
| २३७ | ५ | कर्मांचा बोध | कर्मांचा बाध |
| २५४ | १८ | सघष्टणें | संघष्टणें |
| २६१ | ५ | ते जीव | जे जीव |
| २७२ | १० | पुढें तरी | कुठें तरी |
| ” | २६ | अधिकारप्रमाणें | अधिकाराप्रमाणें |
| ” | २७ | हेंच इष्ट आहे | हेंच आहे |
| २७४ | २१ | फळफळावर | फळफळावळ |
| २८८ | १८ | हृदयबुद्धि | हृदयशुद्धि |
| २९८ | ११ | वरून | करून |
| ३२२ | ७ | तोडून | तोंडून |
| ३२६ | ७ | जीं | जो |
| ३३० | १९ | वेश्यागमयांनीं | वेश्यागमनीयांनीं |
| ३३४ | ३० | सांभाळणें | सांभाळलें |
| ३४४ | २२ | १७ | १० |
| ३६८ | १४ | नेतात | येतात |
| ३७५ | १७ | मानानेंच | मनानेंच |
| ३७७ | १९ | असें साधन | असें ध्यान साधन |
| ” | ” | ३५८-६० | ३५९ |
| ३८२ | २८ | चतन्य | चैतन्य |
| ३८५ | १ | संघातान | संघातानें |
| ३८९ | १० | उच्चारण | उच्चारणें |
| ३९० | २९ | ध्यानः | ध्वानः |
| ३९४ | १२ | तपयामि...माजन | तर्पयामि...मार्जन |
| ” | १३ | तपणाच्या | तर्पणाच्या |



ॐ तत्सत् – श्रीसद्गुरु प्रसन्न

# नामचिंतामणि

## [ नामजपाचें महत्त्व, भाग दुसरा ]



### ' संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें '

माझे कांहीं मित्र व इतर प्रेमळ मंडळी मला विचारतात, कीं नामजपासंबंधाची इतकी माहिती तुम्हीं कोठून संपादन केली? ठिकठिकाणीं दिलेलीं संतांचीं प्रमाणवचनें कोठून मिळविलीं? इत्यादि. त्यांस मी काय उत्तर देऊं? एका तत्त्ववेत्त्यानें म्हटलें आहे, ज्या सत्तेनें सूर्यचंद्रादिकांचे उदयास्त होतात, ज्या सत्तेनें समुद्रास भरती-ओहोटी येते, ज्या सत्तेनें नक्षत्रादि गोल अंतरालांत भ्रमण पावतात, त्याच सत्तेनें आपण एखाद्या पुस्तकाचें पान उघडलें असतां, आपणांस पाहिजे असलेलाच मजकूर अवचित सांपडतो; त्याच सत्तेनें शकुन-अपशकुन म्ह० कार्याकार्याविषयींच्या निसर्ग-देवतेकडून सूचना होतात; त्याच सत्तेनें शुभाशुभसूचक सव्यवामांगादि स्फुरण होतें. प्रायः अशा सूचना – निसर्गदेवतेचें असें साहाय्य – हरएक मनुष्यास होत असतात; त्या त्यानें लक्ष देऊन पाहिल्या मात्र पाहिजेत. हा लेख लिहीत असतांना मला तर तसा अनुभव पुष्कळ वेळां आला असून त्या त्या वेळेस देवाचे मोठे आभार वाटले आहेत. त्याचें वर्णन कोठवर करावें? तीं तीं पुस्तकें त्या त्या वेळेस अवचित मिळालीं आहेत, जवळ असलेल्या पुस्तकांतील तीं तीं पानें सहज उघडलीं जाऊन, त्या त्या प्रसंगास उचित अशीं संतांचीं अमृतमय वचनें मिळालीं आहेत; केव्हां केव्हां कोणीं अकल्पित प्रश्न विचारले असतां त्यांच्या समाधानाचीं उत्तरें अकल्पित स्फुरलीं आहेत. ही सर्व त्या जगन्नियंत्या परमेश्वराचीच प्रेरणा आहे, याशिवाय दुसरें समाधान कोणतेंच मला सांगतां येणार नाहीं. कारण, मी कांहीं जाडा विद्वान् नाहीं, किंवा व्याख्यानाच्या अथवा कीर्तनाच्या सोयीसाठीं टिपणें काढून ठेवून तीं पाठ केलेला हरिदास पुराणिक नाहीं; मी एक संतांचा चरणरज, मंद नामधारक आहें. मजकडून ही '**यज्ञपुच्छा**' ची सेवा परमेश्वर अथवा संत करून घेत आहेत.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

ती कां करून घेताहेत व कोणासाठीं, हें त्यांचें त्यांसच माहीत. '**संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें**' एवढेंच खरें. पोपटाला अथवा बालकाला त्याचा धनी अथवा पिता शब्द बोलण्यास शिकवितो व त्याचे ते शब्द ऐकून धनी अथवा पिता आनंदित होतो, तसें माझ्या बोबड्या शब्दांचें कौतुक संतमहंत करीत आहेत. ह. भ. प. महाशय पांगारकर यांनीं गेल्या अंकांतील[1] माझा '**संत, गुरु व सद्गुरु**' हा लेख[2] वाचून व तो प्रसिद्ध करून मला खासगी पत्रांतून लिहून कळविलें कीं, " वरील लेख फार सुंदर आहे, मला फार आवडला ; पुढील अंकांतील लेख तावडतोबीनें पाठवावा. " इत्यादि. हे त्यांचे शब्द वाचून माझा शिणभाग गेला. महाराष्ट्रांतील एक लाख लोकांनीं तो वाचून मला शिफारसपत्रें पाठविली असें वाटलें व पुनः तो लेख माझा मलाच वाचावासा वाटला व मी तो वाचला. तात्पर्य, यांत माझें कांहीं नाहीं.

पुढील लेख लिहिला आहे तो श्रीक्षेत्रकाशी येथील 'भारतधर्ममहामंडला'नें प्रसिद्ध केलेल्या हिंदी '**धर्मकल्पद्रुम**' नामक अपूर्व ग्रंथाच्या आधारें. ह्या ग्रंथांत 'मंत्रयोग' हा विषय फारच गंभीरपणें लिहिला असून तो अवचितच पाहण्यांत आला. त्याचा सारांश आपल्या 'यज्ञपुच्छां'त घेणें सुप्रासंगिक वाटल्यावरून घेतला आहे.

दुसरी एक निसर्गदेवतेच्या कृपाश्चर्याची गोष्ट येथें नमूद करणें योग्य वाटल्यावरून करीत आहें. ती ही कीं, **हृषीकेशनिवासी परमहंस श्रीगोविंदानंदस्वामी** फिरतफिरत इकडे[3] अवचित आले. हे श्रीसिद्धारूढस्वामींच्या अत्यंत प्रेमांतील एक सत्पुरुष आहेत. आरूढमठांतील माझी यांची ओळख. यांना मीं आतां बोलावलें नव्हतें, किंवा या वेळीं ते मजकडे येतील अशी कल्पनाही नव्हती. परंतु वरील हिंदी ग्रंथ वाचीत असतां क्वचित स्थळीं अडल्यासारखें झालें व मी संकटांत पडलों. तों दयाळू परमेश्वरानें यांना अकस्मात् पाठवून दिलें! हा काय चमत्कार बरें? त्यांची स्वभाषा हिंदी असल्यामुळें व ते स्वात्मानुभवी वेदान्तपारंगत पुरुष असल्या-

१ '**मुमुक्षु**' मासिकांतून '**मोठा यज्ञ व साक्षात्कार**'० ही लेखमाला संपूर्ण झाल्यानंतर त्या विषयाच्या पुष्टीकरणार्थ '**यज्ञपुच्छ अथवा मोठा यज्ञ व साक्षात्कार० लेखाची पुरवणी**' या सदराखालीं त्याच मासिकामधून लेखमाला सुरू केली, तींतील ('मुमुक्षू'च्या आषाढ-श्रावण शक १८४४ च्या जोड अंकांत प्रसिद्ध झालेला) हा पहिला लेख होय.

२ हा लेख '**नामजपाचें महत्त्व**' भाग पहिला यांत प्रसिद्ध झाला आहे.

३ हल्लीं मुक्काम बेळगांव, आषाढ मास १८४४.

मुळें, माझी या वेळची अडचण पार दूर होऊन मला किती आनंद झाला, हें काय सांगावें? यांनीं ओंकाराचे पट व कांहीं वेदान्तपुस्तकें संस्कृत, हिंदी, मराठी छापलीं असून तीं ते साधु लोकांस फुकट वांटतात. अशाच कांहीं कामासाठीं माझा शोध करीत ते इकडे आले होते. त्यांनींही ॐकारासंबंधानें, त्यांच्या ध्यानाचिंतना-संबंधानें कांहीं सांगितलें. तें अपूर्व असून त्याचा समावेश मुमुक्षु वाचकांकरितां यज्ञपुच्छामध्यें करण्याची योजना करून ठेविली आहे. असो.

प्रस्तुत शब्दसृष्टींतील प्रथम जो शब्द 'ॐ'कार व जो परमेश्वराचें प्रथम नाम, तो केव्हां झाला, कसा झाला, इतर बीजमंत्र कसे झाले, याची उपपत्ति कळणें व या नामजपाच्या लेखांत ती नमूद असणें योग्य वाटल्यामुळें, वर उल्लेखिलेल्या ग्रंथाच्या आधारें लिहिण्यास सुरुवात करितों. वाचकांनीं ती पुढील पानांमध्यें यमननपूर्वक वाचावी.



## आद्य मंत्र ‘ॐकार’ व इतर बीजमंत्र यांची उत्पत्ति केव्हां व कशी झाली?

हा सर्व प्रपंच नामरूपमय असल्यामुळें अविद्याग्रस्त जीव, नाम व रूप यांच्या द्वारेंच बंधनास प्राप्त झाला आहे. यासाठीं, जीवाची मुक्ति ही ‘ दिव्य नाम ’ व ‘ दिव्य रूप ’ यांच्या साहाय्यानेंच होणारी असते.

**जन्म कर्म च मे दिव्यं एवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥**

असें भगवंतांनीं गीतेंत ४ थ्या अध्यायांत सांगितलें आहे. भगवंतांचीं जन्मकर्में **‘दिव्य’** आहेत व जीवांचीं **‘मलिन’** आहेत. दिव्य जन्मकर्मांच्या यथार्थ ज्ञानानें मलिन जन्मकर्मांचा नाश होतो व तो जीव पुन्हा जन्ममरणाच्या फेऱ्यांत न सांपडतां परमात्मस्वरूपालाच पावतो, असा भगवद्वाणीचा सिद्धान्त आहे. इतर पदार्थांचीं नामें व भगवंताचीं नामें यांतही असाच फरक आहे. भगवंताचीं नामेंही दिव्य व रूपेंही दिव्यच आहेत. अवतारमूर्ति अथवा त्याच्या प्रतिमा हीं त्याचीं दिव्य रूपें आहेत. ह्या दिव्य रूपांच्या प्रतिमांच्या साहाय्यानें म्हणजे अर्चनध्यानादिकानें भावसमाधिद्वारा साधक उच्च अधिकारास प्राप्त होऊन मोक्षभागी होऊं शकतो, याचप्रमाणें दिव्यनामाच्या साहाय्यानेंही तो मोक्षाधिकारी होतो.

शास्त्रांत मंत्रांना **‘दिव्यनामें’** म्हटलीं आहेत. मूलप्रकृतीच्या **दिव्य**भावानुसार बनलेली मूर्ति ही **‘दिव्यरूप’** म्हटली जाते, त्याचप्रमाणें मंत्र हे त्या प्रकृतीच्या दिव्य राज्यांतील स्पंदनजनित शब्द असल्यामुळें **‘दिव्यनामें’** संज्ञा पावतात. सर्वांत आद्य मंत्र जो **ॐकार** त्यासहित इतर सर्व मंत्र हे प्रकृतिस्पंदनद्वाराच उत्पन्न झाले आहेत. योगशास्त्रांत सांगितलें आहे—

**कार्यं यत्र विभाव्यते किमपि तत्स्पंदेन सव्यापकम्।**
**स्पंदश्चापि तथा जगत्सुविदितः शब्दान्वयी सर्वदा॥**
**सृष्टिश्चापि तथादि प्राकृतिविशेषत्वादभूत्स्पंदिनी।**
**शब्दश्चोदभवत्तदा प्रणव इत्योंकाररूपः शिवः॥**
**साम्यस्थप्रकृतैर्यथैव विदितः शब्दो महानोमिति।**
**ब्रह्मादित्रितयात्मकस्य परमं रूपं शिवं ब्रह्मणः॥**
**वैषम्ये प्रकृतेस्तथैव बहुधा शब्दाः श्रुताः कालतः।**
**ते मंत्राः समुपासनार्थमभवन् बीजानि नाम्ना तथा॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

जेथें कार्य म्हणून कांही आहे, तेथें कंपन हें अवश्य असलेंच पाहिजे व जेथें कंपन आहे तेथें शब्द हा असलाच पाहिजे. सृष्टिक्रिया ही एक प्रकारचें कार्य आहे. यासाठीं सृष्टिकार्याच्या वेळी प्रकृतिप्रथमस्पंदनानें जो शब्द उत्पन्न होतो, तोच हा मंगलमय ॐकाररूप '**प्रणव**' होय. सत्त्वरजतम या तिन्ही गुणांच्या साम्यावस्थेपासून वैषम्यावस्था होण्यास सुरुवात झाली. तेव्हां प्रथम जो धक्का बसला अथवा जें कंपन झालें, त्याच वेळीं तिन्ही गुणांत एकसमयावच्छेदेंकरून चलन झालें. तेव्हां जो ध्वनि झाला, तोच ॐकार होय. ज्याप्रमाणें साम्यावस्थेशीं संबंध ठेवणाऱ्या प्रकृतीचा शब्द ब्रह्मविष्णुशिवात्मक ॐकार आहे, त्याप्रमाणें वैषम्यावस्थापन्न प्रकृतीचे नाना शब्द आहेत व हेच नाना शब्द नाना उपासनांचे बीजमंत्र आहेत.

वेदामध्यें ॐकाराला 'उद्गीथ' म्हटलें आहे. छांदोग्य उपनिषदांत त्याविषयीं पुष्कळ सांगितलें आहे. भगवान् पतंजलीनें ॐकार हा ईश्वराचा वाचक म्हटलें आहे.

**तस्य वाचकः प्रणवः । तज्जपस्तदर्थभावनम् ।**
**ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ।**

**भावार्थ :** ॐकार ईश्वराचा वाचक आहे; ॐकाराचा जप व त्याच्या अर्थाची भावना यांच्याद्वारें आत्मप्राप्ति व विघ्ननाश होतो, इत्यादि.

यालाच अनुसरून भगवान् श्रीशंकराचार्यांनीं म्हटलें आहे—

**तस्मिन् हि प्रयुज्यमाने स प्रसीदति प्रियनामग्रहणेनेव लोकाः ।**

ज्याप्रमाणें आवडत्या नांवानें हांक मारली असतां लोक प्रसन्न होऊन उत्तर देतात, त्याचप्रमाणें भगवंताचें प्रिय नाम जो ॐकार त्याचा उच्चार करून त्याला बोलाविलें असतां भगवंतही प्रसन्न होऊन दर्शन देतो. ॐकार ईश्वराचा मंत्र आहे याबद्दल गीतेंतही म्हटलें आहे—

**ॐ मित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥**

**भावार्थ :** एकाक्षर-ब्रह्ममंत्र जो ॐकार त्याचा उच्चार करून व भगवंताचें स्मरण करून जो साधक प्राणत्याग करितो, त्याला परमधाम प्राप्त होतें, इत्यादि. तसेंच—

**प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।**

ॐकार धनुष्य, जीवात्मा शर, व ब्रह्म त्याचें लक्ष्य आहे.

**आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ।**

— कैवल्योपनिषत्

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

'जीवात्म्यास पूर्वारणि व ॐकारास उत्तरारणि करून मथन करण्यानें ब्रह्माग्नीची उत्पत्ति होते,' इत्यादि श्रुतिमंत्रांच्या द्वारें ॐकाराला ईश्वराचा मंत्र म्हटलें आहे, त्याचा जप केल्यानें ईश्वर प्रसन्न होत असतो. तात्पर्य असें कीं, शब्दसृष्टीमध्यें ॐकाराबरोबर ईश्वराचा व अन्यमंत्रांबरोबर अन्यदेवतांचा 'अधिदैवसंबंध' आहे; व याच कारणामुळें ॐकाराच्या जपानें ईश्वर व अन्यमंत्रांच्या जपानें तत्तन्मंत्राधिष्ठित देवता प्रसन्न होत असतात. प्रलयकाळाच्या वेळीं समस्त जीवांचे संस्कार प्रकृतीमध्यें व प्रकृति ईश्वरामध्यें लय पावते (आश्रयानें असते), ही गोष्ट वेदसंमत आहे. (ईश्वर व प्रकृति यांचा 'आधाराधेयभावसंबंध' आहे व प्रकृति आणि प्रपंच यांचा 'कारणकार्यसंबंध' आहे. म्हणून प्रलयाच्या वेळीं कार्यात्मक प्रपंच आपलें उपादानकारण जी प्रकृति तिच्यांत लय पावतो; आणि प्रकृति ही स्वयंसिद्ध परमेश्वराच्या आधारानें राहते.) पुनः प्रलयलीन जीवांचे समष्टिसंस्कार फलोन्मुख झाले म्हणजे ईश्वरामध्यें 'मी एकांतून अनेकरूप होईन व संस्कारानुसार, कर्मानुसार सृष्टि करीन' अशी इच्छा उत्पन्न होते. त्या वेळीं ईश्वरांत सृष्टीचा संकल्प उदय पावल्याबरोबर त्याच्या अद्वैतसत्तेंत त्रिगुणसमावेशानुसार ब्रह्माविष्णुमहेश्वररूपी त्रिभावसत्ता परिस्फुट होऊं लागते व त्याच्या संकल्पानें उत्पन्न झालेल्या प्राणशक्तींच्या प्रेरणेनें ब्रह्मांडप्रकृतीमध्यें – जेथें अजून सत्त्वरजस्तमोगुणांची समता होती तेथें – त्रिगुणांचें वैषम्य सुरू होतें. त्रिगुणात्मक प्रकृतीचें **गुणसाम्य हें प्रलयदशेचें लक्षण आहे व वैषम्य हें सृष्टिअवस्थेचें लक्षण आहे.** अर्थात् त्या वेळीं परमात्म्याच्या संकल्पाच्याबरोबर मूळप्रकृतींत कंपन सुरू होतें. योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें, **'जेथें कार्य आहे, तेथें कंपन आहे व कंपन आहे तेथें शब्द आहे.'** ह्या सिद्धान्तानुसार मूलप्रकृतीमध्यें सृष्टिकार्याची प्रेरणा झाल्याबरोबर त्रिगुणांत कंपन होतें व ज्याप्रमाणें एका मोठ्या भांड्यांत पाणी भरून ठेवून त्या भांड्यास धक्का देतांच त्याच्यांतील सर्व पाण्यास एकदम धक्का पोंचतो व नंतर पाण्याच्या भिन्नभिन्न प्रदेशांत कंपन सुरू होऊन भिन्नभिन्न तरंग उठूं लागतात, त्याचप्रमाणें **सृष्टीची प्रेरणा होतांक्षणीं अखिल ब्रह्मांडाच्या मूलप्रकृतीस एकदम धक्का पोंचल्यामुळें कंपनजनित प्रथम शब्द होतो, त्याचेंच नांव 'ॐकार' होय.** त्यामुळेंच, प्रथमच्या अधिदैव सृष्टीमधील ॐ हा शब्द असल्यामुळेंच ॐकाराबरोबर ईश्वराचा वाच्यवाचक संबंध घडला. वर सांगितल्याप्रमाणें सृष्टिक्रम असा निश्चित झाला आहे कीं, प्रथम परमात्म्याच्या अंतःकरणांत सिसृक्षा (सृष्टीची इच्छा), नंतर त्रिगुणसमतायुक्त प्रकृतीमध्यें वैषम्यजनित गुणस्पंदन व तेणेंकरून

ॐकारध्वनीची प्रकटना आणि म्हणूनच ॐकाराबरोबर परमात्म्याचा साक्षात् अधिदैवसंबंध आहे; नव्हे, ॐ हें त्याचें नांवच आहे, असें समजावें. कारण कीं, गुणातीत–साम्यावस्थाप्रकृतियुक्त निष्क्रिय ब्रह्मभावामध्यें ज्या वेळीं सृष्टिसंकल्प उत्पन्न झाला, त्या वेळीं तो भावच 'सगुणब्रह्म' अथवा 'ईश्वरभाव' म्हणवूं लागला. त्या भावाबरोबर साक्षात् त्याचें तें प्रथम नाम झालें. याचप्रमाणें, 'वैषम्यावस्थापन्न' प्रकृतीच्या प्रधान भागांबरोबर ज्या ज्या शब्दांचा संबंध आहे, ते ते **'बीजमंत्र'** झाले. ॐकाराच्या अकार – उकार – मकारांबरोबर ब्रह्माविष्णुमहेश्वरांचा व इतर मंत्रांबरोबर इतर देवतांचा संबंध होण्याचें हेंच ( वर लिहिलेलें ) कारण होय.

जेव्हां प्रकृति सृष्टयभिमुख होते, तेव्हा त्रिगुणांत पुन्हा स्पंदन होतें; कारण त्रिगुणविकारांच्या द्वारेंच सर्व सृष्टि होत असते. यामुळें 'आधिभौतिक' सृष्टीमध्यें गुणस्पंदनद्वारें पंचतत्त्वादिकांच्या क्रमविकासाबरोबर जडचेतनात्मक जगताची उत्पत्ति होते व शब्दसृष्टीमध्यें प्रकृतीच्या नाना प्रकारच्या स्पंदनाच्या द्वारें नाना प्रकारच्या शब्दांची उत्पत्ति होते. हेच सर्व शब्द प्रथम अवस्थेंत नाना बीजमंत्र व त्यानंतर परिणामावस्थेंत देवनागरी वर्णमाला ( स्वरव्यंजनात्मक अक्षरें ) व नंतर संस्कृतप्राकृत भाषांचे नानाविध शब्द होत. प्रकृतीच्या प्रथम स्पंदनाच्या द्वारें ॐ बीज उत्पन्न झालें व त्यानंतर दुसऱ्या स्पंदनामध्यें अष्टविध प्रकृति-अनुसार अष्टबीज मंत्रांची उत्पत्ति झाली.

गीतेंत सांगितलें आहे—

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥**

'भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार याप्रमाणें परमात्म्याची मायाशक्ति आठ भागांत विभागली आहे.' त्याप्रमाणें प्रकृतीच्या अष्ट स्पंदनानुसार अष्टबीजमंत्र आहेत; व त्यानंतर प्रकृतीच्या भिन्न भिन्न अंगांत अनेक स्पंदनें व तदनुसार अनेक मंत्र होतात आणि यावरून हीही गोष्ट सहज सिद्ध होऊन जाते कीं, **समस्त ब्रह्मांडप्रकृतिस्पंदनजनित शब्द जो ॐकार,** त्याच्याबरोबर ब्रह्मांडनायक ईश्वराचा अधिदैव संबंध झाल्यामुळें, ॐकार हा जसा त्याचा मंत्र आहे, त्याप्रमाणेंच प्रकृतीच्या ज्या भागाच्या कंपनानें जे मंत्र उत्पन्न होतात, त्या विभागाचे अधिष्ठाते देव अथवा देवी यांचा त्या मंत्रांशीं अधिदैव संबंध असल्यामुळें ते देव अथवा देवी यांच्या साधनांचे ते ते मंत्र होत, असें समजावें. **महर्षिवर्यांनीं प्रकृतीच्या भिन्न भिन्न भागांवर 'संयम' करून त्या त्या भागांवरील अधिष्ठात्री**

**देवता शोधून काढली आहे. त्याचप्रमाणें प्रकृतीच्या त्या त्या भागांच्या स्पंदनद्वारा उत्पन्न झालेले ते ते शब्दही संयमद्वारें श्रवण करून त्या त्या देवतांच्या मंत्ररूपानें त्या त्या शब्दांचें विधान त्यांनीं करून ठेविलें आहे.**

प्रकृतीच्या प्रथम स्पंदनानें व्यापक प्रकृतींत जो महान् शब्द उत्पन्न केला, त्याच्याच परिणामरूपानें अनेक शब्द उत्पन्न होतात, हा सिद्धान्त उपरिनिर्दिष्ट शब्दोत्पत्ति-विज्ञानाच्या द्वारें स्पष्ट झाला. यावरून प्रथमचा महान शब्द जो ॐकार, त्यांतूनच इतर समस्त मंत्रांची उत्पत्ति झाली व सृष्टींत जितके शब्द व वर्णमालेचे वर्ण आहेत ते सर्व ओंकाररूपी महाशब्दाच्या विकारानेंच उत्पन्न झाले आहेत, असे मानण्यास हरकत नाहीं, नव्हे, तें शास्त्रसंमतच आहे असें समजावें. केवल संस्कृत वर्णमालेचे ककारादि शब्द प्रकृतीच्या साक्षात् स्पंदनाबरोबर 'प्राकृतिक' संबंध ठेवीत असल्या-मुळें व बीजमंत्राच्या ते निकट असल्यामुळें सर्व बीजरूप आहेत व संस्कृत भाषा ही सर्व भाषांची जननी आहे. त्याप्रमाणें इतर भाषांतील शब्दांबरोबर प्रकृतीचा दूर परिणामसंबंध असल्यामुळें, तसेच साक्षात् संबंधाचा अभाव असल्यामुळें ते शब्द प्रकृतिस्पंदन न होतां 'विकृतिस्पंदनरूप' होत आणि म्हणूनच ते बीजमंत्र होऊं शकत नाहींत. शास्त्रांत—

**मंत्राणां प्रणवः सेतुः**

म्हणजे 'प्रणव हा मंत्रांचा सेतु' असे सांगितलें आहे. अर्थात् ज्याप्रमाणे सेतूच्या आश्रयानें मनुष्य नदीपार होऊन जातात, त्याप्रमाणें प्रत्येक मंत्राच्या बरोबर ॐकार जोडून उच्चार केला असतां, मंत्र आपल्या व्यापक शक्तीस संपादन करूं शकतो. ॐकारांत सर्व मंत्रांना सिद्धिप्रदान करण्याची शक्ति असल्यामुळेंच ॐकार हा परम मंगलकारक आहे असे स्मृतींत सांगितलें आहे. ॐकाराचें वर्णन मांडूक्योपनिषद्, लिंगपुराण, वगैरे अनेकानेक ग्रंथांत सांगितलें आहे. त्याचा विस्तार येथें करणें शक्य नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ॐकारापासून सर्व वर्णांची उत्पत्ति आर्यशास्त्रांत सांगितली असून हे सर्व वर्ण विराट-पुरुषाच्या भिन्न भिन्न अंगांपासून उत्पन्न झाले असल्यानें, प्रकृतिस्पंदनजनित मंत्र आहेत व या मंत्रांशीं त्या त्या प्रकृतीच्या देवतांचा अधिदैव-संबंध आहे. यासाठीं, ज्याप्रमाणें समष्टि-प्रकृतीच्या स्पदनानें उत्पन्न झालेला ॐकारशब्द परमेश्वराचें वाचक नाम आहे व त्याच्या जपाच्या व अर्थभावनेच्या द्वारें ज्याप्रमाणें परमेश्वर प्रसन्न होतो ('अनंतं विभुं सर्वयोनिं निरीहं, शिवं संगहीनं **यदोंकारगम्यं**' असे श्रीआचार्य म्हणतात), त्याप्रमाणें भिन्न भिन्न भागांच्या स्पंदनानें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

उत्पन्न झालेले शब्दही त्या त्या प्रकृतीच्या देवतांची वाचक नामें आहेत व त्यांच्या जपाच्या व अर्थभावनेच्या द्वारें त्या त्या देवता प्रसन्न होतात व दर्शन देतात. योगशास्त्रांत —

**स्वाध्यायादिष्टदेवतासंप्रयोगः**

असें सांगितलें आहे. याचा अर्थ असा आहे कीं, स्वाध्यायाच्या द्वारें इष्ट देवता प्रसन्न होते. येथें 'स्वाध्याया' चा अर्थ श्रीभगवान् वेदव्यासकृत योगदर्शनभाष्यामध्यें '**मंत्रजप**' असा केला आहे.

**तात्पर्य, देवतेच्या प्रसन्नतेला त्या देवतेच्या मंत्राचा जप हेंच अत्युत्कृष्ट साधन आहे, हें वाचकांच्या लक्षांत आलें म्हणजे पुरे.**



## मंत्रांची उत्पत्ति व त्यांची सिद्धि

समष्टिप्रकृतीच्या बरोबर व्यष्टिप्रकृतीचा एकत्वसंबंध असल्यामुळें समष्टिप्रकृति-स्पंदनजनित सर्व शब्दांचा आविर्भाव व्यष्टिप्रकृतीच्याही द्वारा होऊन त्यांचा अनुभव येत असतो. अर्थात् ॐकार धरून सर्व शब्दांचें व मंत्रांचें उच्चारण जीवशरीराच्या भिन्न-भिन्न अंगद्वारें होत असतें. ज्याप्रमाणें समष्टिप्रकृतीचें प्रथम स्पंदन जो ॐकार, तो प्रकृतीच्या गर्भापासून उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें व्यष्टिशरीरांतही प्रकृतीचें स्थान मूलाधारचक्रस्थित[१] कुंडलिनीनाडीमध्यें असल्यामुळें आदिनादप्रणवाची उत्पत्ति त्या कुंडलिनींतूनच होत असते व तदितर सर्व नाद तिकडूनच निघून इडा, पिंगला व सुषुम्नारूपी त्रिविध योगनाडीच्या द्वारा भिन्न भिन्न मार्गांनीं प्रवाहित होऊन मंत्र व वर्णरूपांनीं हृदय, तालु, कंठ, जिव्हा, ओष्ठ, दंत, इत्यादि स्थानांमधून प्रगट होत असतात. **शारदातिलका**मध्यें सांगितलें आहे —

**भिद्यमानात्पराद्बिन्दोरव्यक्तात्मा रवोऽभवत् ।**
**तत्प्राप्य कुंडलिनीरूपं प्राणिनां देहमध्यमम् ।**
**वर्णात्मनाविर्भवति गद्यपद्यादिभेदतः ॥ (३०)**

१. मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्धि व आज्ञाचक्र यांचीं शरीरांतील स्थाने अनुक्रमें गुद, लिंगमूल, नाभि, हृदय, कंठ व भ्रूमध्य अशीं आहेत. या चक्रांना 'कमलें' असेंही म्हणतात.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

कुंडलिनींमधून प्रकाशित होणाऱ्या '**परा**' नांवाच्या अक्षय्य वाणींतून शब्दाची उत्पत्ति होते. तीच जीवशरीरांत अनेक प्रकारें चक्रावृत्तीला प्राप्त होऊन गद्यपद्यादि-भेदानें विविध वर्णांत ( अक्षरांत ) प्रगट होते. त्याचप्रमाणें—

> **स्वात्मेच्छाशक्तिघातेन प्राणवायुस्वरूपतः ।**
> **मूलाधारे समुत्पन्नः पराख्यो नाद उत्तमः ॥**
> **स एव चोर्ध्वतां नीतः स्वाधिष्ठानविजृंभितः ।**
> **पश्यंत्याख्यामवाप्नोति तथैवोर्ध्वं शनैः शनैः ॥ ( ३० )**

**भावार्थ** : परमात्म्याची इच्छाशक्तिरूप 'मूलाधार' कमलस्थित जो कुंडलिनी, तिच्या शक्तीनेंच उक्त कमलामध्यें प्रथमतः '**परा**' नादाची उत्पत्ति होते. त्यानंतर तो नाद '**स्वाधिष्ठान**' कमलामध्यें ( हें लिंगमूलस्थानीं असतें ) उठून '**पश्यती**' नामाला प्राप्त होतो. तदनंतर हळू हळू तो वरती चढून 'अनाहत' कमलामध्यें ( हें हृदयस्थानीं असतें ) बुद्धितत्त्वाबरोबर मिळून '**मध्यमा**' नामाला प्राप्त होतो. त्याच्यावर कंठस्थानीं असलेल्या 'विशुद्ध' चक्रांत (कमलांत) तो नाद गेला म्हणजे त्याला '**वैखरी**' म्हणतात. ( कोणी परेचें स्थान नाभि, पश्यंतीचें हृदय, मध्यमेचें कंठ व वैखरीचें मुख असें म्हणतात. याच्याबद्दलचा विचार पुढें एखाद्या स्वतंत्र लेखांत करण्याचा मानस आहे. ) वर सांगितलेला शब्दनिष्पन्न वैखरीनाद हा कंठ, मस्तक, तालु, ओष्ठ, दंत, जिव्हामूल, जिव्हाग्र, जिव्हापृष्ठ, तसेंच नासाग्र या द्वारें क्रमशः पुढें येऊन कंठतालु, ओष्ठकंठ, कंठौष्ठद्वय द्वारा प्रकाशित होतो व 'अ' कारापासून 'क्ष' कारापर्यंत वर्णमालेचा विकास करितो.

जीवशरीरांत कुंडलिनी ही प्राणशक्तिरूप आहे. हिच्याशींच इडा, पिंगला व सुषुम्ना यांचा संबंध आहे ; व या तीन नाडींच्या द्वारानेंच प्राण, अपान, व्यान, उदान, समान, तसेंच नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय या दशविध वायूंचा प्रवाह होऊन सर्व शरीराला व्यापतो. प्राणशक्तीच्या द्वारें प्राणापानादि वायु संचालित होऊन सर्व शब्दांना प्रकाशित करितात. वर लिहिलेल्या तिन्ही नाडींबरोबर सर्व वायूंचा संबंध असल्यामुळें प्रकृति-स्पंदनजनित अकार ते क्षकारपर्यंत सर्व वर्णमालेची उत्पत्ति या तीन नाडींच्या द्वारेंच होत असते. जसें – **अ** ते **अः** पर्यंतची सर्व वर्णमाला 'इडा' नाडीमधून प्रवाहित होते. **क** ते **म** पर्यंतची सर्व वर्णमाला 'पिंगला' नाडीमधून प्रवाहित होते, व **य** ते **क्ष** पर्यंतची सर्व वर्णमाला 'सुषुम्ने' मधून प्रवाहित होते. याप्रमाणें ॐ धरून सर्व मंत्रांची उत्पत्ति समष्टि प्रकृत्यनुसार व्यष्टिप्रकृतीमधूनही होते. इतकेंच केवळ नव्हे, तर व्यष्टिप्रकृति ही समष्टिप्रकृतीची प्रतिकृति अथवा प्रतिबिंब असल्यामुळें समष्टिप्रकृतीच्या

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

प्रत्येक स्पंदनाचा आघात व्यष्टिप्रकृतीमध्यें व व्यष्टिप्रकृतीच्या प्रत्येक स्पंदनाचा आघात समष्टिप्रकृतीमध्यें होत असतो. तसेंच व्यष्टिप्रकृतीच्या प्रत्येक लहरीचा समसंबंध समष्टिप्रकृतीच्या तशाच जातीच्या लहरीशीं असतो. यामुळें हिच्या नादाचें प्रतिबिंब तिच्यांत व तिच्या नादाचें प्रतिबिंब हिच्यांत येऊन पडतें. यासाठीं साधक आपल्या व्यष्टिप्रकृतीच्या ज्या ज्या लहरीवर चित्ताचा संयम करितो, त्या त्या जातीच्या समष्टिप्रकृतीच्या लहरीचा नाद त्याला ऐकूं येतो. उदाहरणार्थ असें समजावें कीं—

साम्यावस्था-प्रकृतीचा प्रथम शब्द प्रणव ( ॐकार-ध्वनि ) असल्यामुळें, ज्या वेळीं साधक आपल्या व्यष्टिप्रकृतीला अभ्यासबलानें साम्यावस्थेस पोंचवील, त्याच वेळीं आपल्या प्रकृतीमध्येंही समष्टिप्रकृतीचा प्रथम नाद जो ॐकारध्वनि तो ऐकूं शकेल.

हाच नाद मूलाधारचक्रस्थित जी कुंडलिनी तिच्यामधून निघून 'सहस्रदल' कमलामध्यें ( शिखास्थानीं ) लय पावेल. ह्याचप्रमाणें आपल्या व्यष्टिप्रकृतीच्या पूर्ण साम्यावस्थेहून भिन्न अशा ज्या ज्या लहरीवर योगी संयम करील, त्या त्या लहरी-बरोबर समष्टिप्रकृतीच्या ज्या लहरीचा समसंबंध असेल, त्या लहरीच्या नादाचें प्रतिबिंब आपल्या प्रकृतींत तो अनुभवील. याच रीतीनें महर्षि लोक आपल्या प्रकृतींत समष्टिप्रकृतीचा नाद श्रवण करितात. त्या नादाच्या अनुसारेंच श्रीभगवान् व त्यांच्या शक्तिरूप भिन्न भिन्न देवतांच्या साधनार्थ मंत्रसमूह व संस्कृत वर्णमालेचा आविष्कार ( प्रकाश ) त्या अतींद्रियदर्शी महर्षींच्या द्वारेंच जगांत झालेला आहे. समष्टिप्रकृतीच्या प्रथमस्पंदनद्वारें झालेल्या प्रणवमंत्राच्या उत्पत्तीनंतर द्वितीय स्पंदना-मध्यें गीतोक्त अष्टधा प्रकृतीचें कंपन झालें आहे व यामधूनच प्रधान अष्टबीजांची उत्पत्ति झाली आहे. यांचीं नांवें मंत्रशास्त्रांत खालीं दिल्याप्रमाणें सांगितलीं आहेत—

**बीजमंत्रास्त्रयः पूर्वे ततोऽष्टौ परिकीर्तिताः ।**
**गुरुबीजं शक्तिबीजं रमाबीजं ततो भवेत् ॥**
**कामबीजं योगबीजं तेजोबीजमथापरम् ।**
**शांतिबीजं च रक्षा च प्रोक्ता चैषां प्रधानता**

**भावार्थ :** बीजमंत्र प्रथमचे तीन व नंतरचे आठ आहेत. जसें—**गुरुबीज, शक्तिबीज, रमाबीज, कामबीज, योगबीज, तेजबीज, शांतिबीज** व **रक्षाबीज.**

क, ल, ई व मकार मिळून ‘ कामबीज ’ ( क्लीं ) होतें ; क, र, ई व मकार मिळून ‘ योगबीज ’ होतें ; आ, ए व मकार मिळून ‘ गुरुबीज ’ होतें ; हकार, रकार, ईकार व मकार मिळून ‘ शक्तिबीज ’ होतें ; शकार, रकार, ईकार व मकार मिळून ‘ रमाबीज ’ होतें ; टकार, रकार, ईकार व मकार मिळून ‘ तेजोबीज ’ होतें ; सकार, तकार, रकार, ईकार व मकार मिळून ‘ शांतिबीज ’ होतें ; तसेंच हकार, लकार, ईकार व मकार मिळून ‘ रक्षाबीज ’ होत असतें. योगशास्त्रांत सांगितलें आहे—

**अष्टौ प्रकृतयः प्रोक्ताः कारणब्रह्मणो यथा ।**
**याभिराविर्भवदिदं कार्यब्रह्म सनातनम् ॥**
**तथा प्रधानभूतानि बीजान्यष्टौ मनीषिभिः ।**
**अष्टौ प्रकृतयः प्रोक्ताः कार्यरूपस्य ब्रह्मणः ॥**

ज्याप्रमाणें कारण ब्रह्माची अष्टधा प्रकृति आहे, ( जिच्यामुळेंच कार्यब्रह्म उत्पन्न झालें आहे ), त्याचप्रमाणें शब्दब्रह्माचीही आठ बीजें म्हणजे अष्टधाप्रकृति आहे. यांनाच प्रधानबीजें म्हणतात. ही सर्व प्रकारच्या उपासनांमध्यें कल्याणकारी होत. शास्त्रांतरांत यांची नांवें निरनिराळीं सांगितलीं आहेत. याच्यानंतर प्रकृतिविस्तार होत गेला, तसतसे अनेक मंत्र निर्माण केले गेले ; व ते भिन्नभिन्न देवतांच्या प्रीत्यर्थ निर्दिष्ट आहेत.



## मंत्रांची सिद्धि

शास्त्रामध्यें मंत्रांची असाधारण शक्ति सांगितली आहे ; त्या शक्तीच्या योगानें भगवान् प्रसन्न होतो ; देवता वशीभूत होतात व अनेक प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात.

योगशास्त्रांत सांगितलें आहे—

**मंत्रयोगी मंत्रसिद्ध्या तपःसिद्ध्या हठान्वितः ।**
**ऐशीं विभूतिमाप्नोति लययोगी च संयमैः ॥**
**मंत्रसाधनतो देवा देव्यः संयांति वश्यताम् ।**
**विभवाश्चैव जगतो यांति तस्योपयोग्यताम् ॥**

**भावार्थ :** मंत्रयोगी मंत्रसिद्धिद्वारा, हठयोगी तपःसिद्धिद्वारा व लययोगी संयमसिद्धिद्वारा ईश्वरी विभूतींचा लाभ करून घेतो. **मंत्रसाधनद्वारानेंच देव व देवी वशीभूत होतात ; मंत्रयोगसिद्धि प्राप्त झालेल्या योग्याला संसारांतील समस्त वैभवांचा उपभोग घडतो.**

भगवान् पतंजलीनें आपल्या योगदर्शनामध्यें **मंत्राच्या द्वारें सिद्धि प्राप्त होतात** असें लिहिलें आहे.

**जन्मौषधिमंत्रतपःसमाधिजाः सिद्धयः ।**

**भावार्थ :** पूर्वकर्मांच्या तीव्रसंवेगानें केव्हां केव्हां कोणास जन्मतःच सिद्धि प्राप्त झालेली असते, तसेंच **औषधींच्या** व **मंत्राच्या द्वारें सिद्धि प्राप्त होते.** त्याचप्रमाणें **तप** व **समाधीच्या** द्वारेंही सिद्धि प्राप्त होतात.

प्रकृति ही परमात्म्याची शक्तिस्वरूपिणी असल्यामुळें तिच्यांत अनंत शक्ति भरलेली आहे. त्या शक्तीचा विकास सूक्ष्मापासून स्थूलापर्यंत समस्त प्राकृतिक पदार्थांत झालेला दिसत आहे. प्रत्येक वस्तूची शक्ति, ती वस्तु स्थूलापेक्षां सूक्ष्मभावाला जेवढी प्राप्त झालेली असते, तेवढी तेवढी अधिक विकासाप्रत पावत असते. उदाहरणार्थ असें समजावें कीं, अंतःकरणाच्या विकासरूप स्थूलदेहामध्यें जेवढी शक्ति आहे, तिच्या अनंतपट शक्ति सूक्ष्मदेहांत आहे. **स्थूल शरीर तीन वर्षेपर्यंत जिकडे जाऊन पोचूं शकणार नाहीं, तिकडे मन हें शरीरापेक्षां सूक्ष्म असल्यामुळें एका पळांत जाऊं शकतें.** इतकी शक्ति त्याच्यांत सांठविली आहे. याप्रमाणेंच इतर सूक्ष्म वस्तूंमध्येंही समजून घ्यावें. पाण्यांत जी शक्ति आहे, तीपेक्षां पाण्याचे सूक्ष्म परमाणुरूप जी वाफ तिच्यांत व बाष्पपुंजरूप मेघांत अनेकपटींनीं अधिक शक्ति आहे. हीच शक्ति विजेच्या रूपानें मेघमंडळांत विलास करिते. प्रकृतीच्या विविध विकारांच्या द्वारें उत्पन्न झालेल्या ' लौकिक ' शब्दांमध्यें इतकी शक्ति असते कीं, तिच्यायोगें मनुष्यें वशीभूत होतात, इतकेंच नव्हे, तर, रागरागिणींच्यायोगें तो प्रयोग केला असतां क्रूर सर्प व मदोन्मत्त हत्तीही वश होऊन जातात ! असें जर आहे, तर मग प्रकृतीच्या विशेष स्पंदनाच्याद्वारें उत्पन्न झालेल्या ' दिव्य ' शब्दांमध्यें ती अनंतपटींनीं असली पाहिजे यांत काय संशय आहे? कारण कीं, प्रकृतिस्पंदनजनित मंत्रसमूह प्रकृतीच्या सूक्ष्म सृष्टीचा परिणाम आहे, आणि म्हणूनच सूक्ष्म दिव्यनामरूपी मंत्रांमध्यें अनंतशक्तिरूपिणी प्रकृतिमातेची अनंतशक्ति भरलेली आहे.

ज्याप्रमाणें समस्त सूक्ष्म ब्रह्मांड-प्रकृतीच्या कंपनानें प्रणवनादाची उत्पत्ति झाली असल्यामुळें, त्यांत ( प्रणवांत ) समस्त ब्रह्मांड-प्रकृतीची अनंत शक्ति भरलेली आहे, त्याचप्रमाणें अन्य जे मंत्र प्रकृतीच्या ज्या विभागाला कंपन देऊन उत्पन्न झालेले आहेत अथवा होत आहेत, त्या मंत्रांमध्यें प्रकृतीच्या त्या त्या विभागाची

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

शक्ति सांठवून राहिलेली आहे, असें खास समजावें. प्रत्येक सूक्ष्म सृष्टीच्या विभागांची जी अधिष्ठात्री देवता आहे, तीच त्या सृष्टिसंबंधीय शक्तीची अधिपति होय. कारण कीं, दैवी संबंधावांचून शक्तीचा प्रयोग होऊं शकत नाहीं. मागें ('धर्मकल्प-द्रुमा'च्या पहिल्या अध्यायांत) सिद्ध केलेंच आहे कीं, जडकर्माचा चालक देवतागण असतो, दैवी सहायतेनेंच शक्ति उत्पन्न होऊन कर्मांची उत्पत्ति व कर्मफलाची प्राप्ति होत असते. असो.

मंत्रांशीं जर दैवी शक्तीचा साक्षात् संबंध आहे, तर मंत्रांच्या साहाय्यानें यथावत् शक्तीचा प्रकाश होणें स्वतःसिद्ध आहे; व हाच मंत्राच्या शक्तीच्या आविर्भावाचा अनुभव होय. ज्या अक्षरांच्या परस्पर समन्वयानें (जोडणीनें) मंत्र बनत असतो, तीं अक्षरें अशा तऱ्हेनें जोडलीं जात असतात कीं, धातु व रासायनिक द्रव्यें अमुक तऱ्हेनें (युक्तीनें) मिळविलीं असतां त्यांमधून वीज व तिची शक्ति ही प्रकाशित झालीच पाहिजे, हें जसें आहे, तसेंच त्या त्या शक्तिमान् अक्षरसमूहाचा सूक्ष्म विचारपूर्वक मिलाफ केला असतां त्या द्वारें त्यांत (त्या मंत्रांत) ती ती अद्भुत दैवी शक्ति उत्पन्न होत असते. (गोरखनाथांनीं असेच कांहीं नवीन दिव्यमंत्र निर्माण केले व शिष्यवर्गांना त्यांचा उपदेश केला. परंतु त्यांच्या अनधिकारित्वामुळें त्या मंत्रांचा त्यांजकडून दुरुपयोग होऊं लागला. तेव्हां मंत्रनिर्माणकर्त्या गोरखनाथांनीं त्या मंत्रांस शाप देऊन ठेवला.) आपल्या इच्छेनुसार अधिकारी पुरुषांनीं नवीन मंत्र निर्माण करावे व त्यांस शापही देऊन ठेवावे, असें मंत्रशास्त्रांत सांगितलें आहे. गायत्रीमंत्रास सुद्धां विश्वामित्रवशिष्ठादिकांचा शाप आहे. हा शापोद्धार केल्याशिवाय त्या मंत्राचें पुरश्चरण करितां येत नाही, ही गोष्ट शास्त्रज्ञांस माहीत आहेच.



## मंत्रांत असाधारण शक्ति कशानें व केव्हां उत्पन्न होते ?

"धातु व रासायनिक द्रव्यें यांचा विचारपूर्वक मिलाफ केला असतां त्यांतून विद्युत्शक्ति प्रगट होते, त्याप्रमाणें शक्तिमान् अक्षरसमूहाचा सूक्ष्म विचारपूर्वक मिलाफ केला असतां त्यांतून कांहीं तरी अद्भुत दैवी शक्ति प्रगट होते," असें मागच्या लेखांत सांगितलें आहे. आतां त्या मंत्रामध्यें आणखी अधिक शक्तिसंचार होण्यास दुसऱ्या कशाची आवश्यकता आहे तें सांगतों. बाण, चंद्रज्योति, गर्नाल किंवा बंदुकीची दारू हीं गंधक, सोरमीठ, कोळसा, इत्यादि द्रव्यांच्या निरनिराळ्या प्रमाणशीर

मिश्रणानें तयार होतात; पण ते ते अग्निचमत्कार दृष्टीस पडण्यास तीं दारू भरण्याचीं पात्रें अथवा यंत्रें निरनिराळ्या आकारांचीं बनवावीं लागतात, त्याचप्रमाणें मंत्रांमधून विविध इष्ट शक्ति उत्पन्न करण्यास निरनिराळे विधि योजावे लागतात. हे विधि म्हणजे एक प्रकारचीं 'अभौतिक यंत्रेंच' होत, असें मागील पुस्तकांत[1] सांगितलेंच आहे. सप्तशतीचें अनुष्ठान करणाऱ्यांस हें माहीतच आहे कीं, नानाप्रकारच्या कामनांकरितां सप्तशतीतील प्रत्येक मंत्रास निरनिराळे 'पल्लव' लावावे लागतात. हे 'पल्लव' म्हणजे एक प्रकारचे विधिच होत. या विधींशिवायही मंत्रानुष्ठान करणाऱ्याची मानसशक्ति व पावित्र्य ह्यांवरही **मंत्रशक्तीची प्रगटता** अवलंबून आहे. ज्याप्रमाणें एखाद्या सभेमध्यें वक्त्याच्या म्हणजे शब्दप्रयोक्त्याच्या प्राणशक्तीच्या व अंतःकरण-शक्तीच्या द्वारा शब्दामध्यें अशी एक अपूर्व शक्ति उत्पन्न होते कीं, जिच्यामुळें श्रोत्यांच्या अंतःकरणावर विलक्षण परिणाम होतो; त्याचप्रमाणें मंत्रसाधकाच्या अंतःकरणाची शुद्ध शक्ति, भावशक्ति, प्राणशक्ति व संयमशक्ति यांच्या द्वारा मंत्राचा प्रयोग झाला असतां त्याच्यामध्यें **असाधारण शक्ति** उत्पन्न होते. त्याचा पाहिजे तिकडे उपयोग केला असतां, तो मंत्र ईप्सित फलप्रदान केल्यावांचून राहणारच नाहीं. परंतु, शब्दांमध्यें स्वाभाविक वस्तुशक्ति असली तरी, दुष्ट ( अशुद्ध ) उच्चारा-मुळें, तसेंच प्राणशक्तिहीन व हृदयहीन मनुष्याच्या द्वारा उच्चारला गेल्यामुळेंही इच्छित फल देण्यास तो मंत्र समर्थ होत नाहीं. याकरितां वर सांगितलेला कोणताही दोष नसेल व अंतःकरणाच्या पूर्ण शक्तीबरोबर साध्य वस्तूला लक्ष्य करून त्या मंत्राचा प्रयोग झाला असतां, तो मंत्र अवश्य ईप्सित फल देणारा होईल यांत मुळींच संदेह नाहीं. सांप्रत काळीं अनेक ठिकाणीं—

## मंत्राचें यथोक्त फल मिळत नाहीं, याचें कारण

वर सांगितलेले दोषच होत असें पक्कें समजावें. ज्या साधकानें पुरश्चरणादि प्रक्रियेच्या द्वारें मंत्र चैतन्ययुक्त करून बिनचूक साधन केलें आहे, तो त्या मंत्रशक्तीला आपल्यास अनुकूल करून घेऊन जगांत असाधारण दैवी शक्तीला प्राप्त करून घेईल, यांत तिळमात्र संदेह नाहीं. तो आपल्या प्राणशक्तीबरोबर मंत्रशक्तीचा प्रयोग करून जें पाहिजे तें करूं शकेल. शास्त्रांत सांगितलेल्या सर्व सिद्धि अशा प्रकारें प्राप्त करून घेतां येतात. मंत्रशक्तीच्या बळानें देवताचक्रावर प्रभाव पाडून, प्रकृतीच्या त्या त्या अधिनायक देवतांना वर सांगितल्याप्रमाणें वश करून घेतां येतें. तसेंच आसुरी प्रकृतीवर विराजमान असलेल्या पिशाच, दैत्य, भूत, प्रेत, डाकिनी, शाकिनी,

---

१ भाग पहिला, पृ. ५४, 'श्रद्धा व विधि यांची शक्ति' या लेखांत.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

इत्यादि तामसी शक्तींना देखील याप्रमाणेंच मंत्रशक्तिद्वारा साधक वश करून घेऊं शकतो. याचप्रमाणें, आर्यांच्या शास्त्रांत वर्णिलेल्या नानाप्रकारच्या अस्त्रसिद्धिही याप्रकारेंच मंत्रशक्तिद्वारा प्राप्त करून घेतां येतात. रामायण-महाभारतामध्यें आग्नेयास्त्र, पर्जन्यास्त्र, वायव्यास्त्र, पर्वतास्त्र, वज्रास्त्र, ब्रह्मास्त्र, पाशुपतास्त्र, नारायणास्त्र, वगैरे दिव्यास्त्र-प्रयोगांचें प्रमाण मिळत आहे, तीं याच प्रकारें मंत्रशक्तीच्या द्वारा सिद्ध केलेलीं अस्त्रें आहेत असें समजावें. त्या मंत्रसमूहांना चैतन्ययुक्त करून आपल्या प्राणशक्तीच्या साहाय्यानें शत्रूवर प्रयोग केला असतां, प्राणशक्ति व मंत्रशक्ति यांनीं भरलेला अस्त्रसमूह लक्ष्यस्थलावर जाऊन ईप्सित फल अवश्य उत्पन्न करील, यांत मुळींच संदेह नाहीं.

कोणी अर्वाचीन पुरुष या अस्त्रसिद्धीवर असा आक्षेप घेतात कीं, मंत्रामध्यें जर अशी शक्ति आहे, तर उच्चारण करणाऱ्याची जिव्हा कां नाहीं जळून जात? अशा बालिश प्रलापांची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे! बंदुकीच्या गोळींत शत्रूची छाती फोडून टाकण्याची जर शक्ति आहे, तर त्या गोळीनें ती बंदूक व ती धरणाऱ्याचा हात कां नाहीं फुटून जात, असें म्हणण्यासारखेंच हें आहे! दुसऱ्या सामान्य दृष्टान्तानेंही समजून येईल कीं, सूर्यकिरणांत दग्ध करण्याची शक्ति असली तरी, ती जिकडे तिकडे व ज्यास त्यास दग्ध करूं शकत नाहीं; परंतु, स्थूलदर्शक भिंगाच्या ( मॅग्निफाइंग ग्लास ) द्वारें त्या किरणांचें केंद्रीभवन ( फोकस ) होऊन, तीं बिंदुधारेनें ज्या वस्तूवर पडतात त्या वस्तूलाच तीं जाळूं शकतात. याचप्रमाणें मंत्रांत शक्ति असली तरी ती मंत्रांमध्यें सामान्यपणानें व्यापून असते, परंतु ज्या वस्तूवर ‘ लक्ष्य ’ धरून, अंतःकरणाची एकाग्रता व प्राणशक्ति यांच्या द्वारा त्या मंत्राचा अस्त्राच्या साहाय्यानें प्रयोग केला जातो, तेथें ती शक्ति जाळणें, मार देणें, मुग्ध करून सोडणें, इत्यादि अद्भुत क्रिया प्रगट करिते. सारांश, **प्रत्येक मंत्राची सिद्धि भावशक्तिद्वारा अंतःकरणाच्या एकाग्रतेवर, शुद्धतेवर व प्राणशक्तीच्या केंद्रीकरणावर अवलंबून असते,** नुसत्या मंत्रोच्चारानें ती हवी तेव्हां प्रगट होत नसते. ज्या साधकाच्या अंतःकरणांत भावशक्ति व प्राणशक्ति यांची जितकी प्रबलता असेल त्या मानानें त्याच्यामध्यें मंत्रद्वारा अस्त्रप्रयोग करणें, मंत्रसाधनद्वारा आसुरी शक्ति व देवता यांचें वशीकरण करणें, इतकेंच नव्हे, तर भगवंताला प्रसन्न करून घेण्याची पात्रताही त्याच्यामध्यें तितकीच राहील. ‘**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्** ’ अथवा ‘ भाव तसा देव ’ हें प्रसिद्धच आहे. असो.



## मंत्रजपानें भावसमाधि

मंत्रयोगामध्यें ज्या नामरूपांच्या द्वारें साधनाचा विधि सांगितला आहे, त्या दिव्य नामाच्या म्ह० मंत्राच्या द्वारा वर सांगितलेल्या उपायानें इष्टदेवतेचें साधन साधतां येतें. इष्टदेवाला 'लक्ष्य' करून त्या इष्टदेवाच्या मंत्राचा '**जप**' व त्याची '**अर्थभावना**' करतां करतां तो साधक, प्रकृतीच्या ज्या भागाबरोबर इष्टदेवाचा व मंत्राचा संबंध आहे, त्या प्रकृतिभागामध्यें आपली चित्तवृत्ति लीन करूं शकतो. ज्याप्रमाणें रूपाच्या अवलंबनानें भावामध्यें व भावद्वारा भावग्राह्य भगवंतामध्यें आत्मा विलीन होतो, त्याचप्रमाणें मंत्रसाधनद्वारा मंत्रजननशीला प्रकृति व त्या प्रकृतीचा अधिनायक इष्टदेव यांच्यामध्येंही आत्मा विलीन होतो. याप्रमाणें व्यापक प्रकृतीबरोबर मंत्राच्या द्वारें आपल्या आत्म्याची जितकी, 'एकतानता' होते, तितकी, व्यापक प्रकृतीची शक्ति तो साधक प्राप्त करून घेऊं शकतो; व अखेरीस मंत्र व देवता यांतील भेदभाव विसरून, दैवी प्रकृतीमध्यें विराजमान असलेल्या इष्टदेवाच्या स्वरूपामध्यें साधकाचा आत्मा लीन होऊन **भावसमाधि** प्राप्त करून घेतो. ज्या नामरूपाच्या अवलंबनानें जीव संसारांत बद्ध होऊन गेला होता, त्याच नामरूपाच्या 'दिव्य' भावाचा आश्रय करून तो या प्रकारें, 'नामरूपनिर्मुक्त' अशा ब्रह्मपदाला येऊन मिळतो. नामरूपमय मंत्रयोगाच्या साधनद्वारेंच अखेरीस सविकल्प समाधिरूप महाभावसमाधीस पोंचून साधक हा चिन्मय, निराकार व निर्गुण ब्रह्माच्या राजयोगोक्त साधनाच्या अधिकाराचा लाभ करून घेतो. या मंत्रयोगाचीं गुरुमार्गप्रदर्शित षोडश अंगें आहेत. या षोडशांगसाधनाच्या अनुष्ठानाच्या द्वारें शेवटीं साधक निर्विकल्प समाधीची पदवी प्राप्त करून घेतो व **हेंच सर्व साधनांचें अंतिम फल आहे.**



## मंत्रयोगाचीं सोळा अंगें

मंत्रयोगांत सांगितलेल्या नामरूपाच्या आश्रयानें मायाबद्ध जीव कशा प्रकारें मायानिर्मुक्त होऊं शकतो हें वर सांगितलें आहे. आतां नामरूपमय मंत्रयोगाची साधनप्रणाली किती अंगांमध्यें विभागली आहे, हें कांहींशा विस्तारानें सांगावें म्हणतों. वेदोक्त मन्त्रांचें अनुष्ठान करणारे आस्तिक लोक आज सहस्रशः आहेत, त्यांपैकीं अनेकांना यासंबंधाची माहिती बिलकुल नसून 'गतानुगतिको लोकः' या

वचनाप्रमाणें ते वागत असतात; व उद्दिष्ट कार्यांची अंगेंउपांगें माहीत नसल्यामुळें, शास्त्रीय कर्मांच्या शास्त्रोक्त फलास ते आंचवतात! तर असें न व्हावें व शास्त्रोक्त फल अंशतः तरी पदरांत पाडून घेण्याचें सामर्थ्य त्यांना यावें, या हेतूनें मंत्रयोगांतील १६ अंगांची माहिती खालीं देत आहें. रसिक व चिकित्सक बुद्धीच्या मनुष्यांना तसेंच भाविक जिज्ञासूंनाही त्याचा उपयोग बराच होईल, अशी मला आशा आहे.

**मंत्रयोग, हठयोग, लययोग** व **राजयोग** असे चार योग आहेत: पैकीं मंत्रयोगाचीं १६ अंगें योगशास्त्रात सांगितलीं आहेत, तीं अशीं

**भवन्ति मंत्रयोगस्य षोडशाङ्गानि निश्चितम्।**
**यथा सुधांशोर्जायन्ते कलाः षोडश शोभनाः॥**
**भक्तिः शुद्धिश्चासनं च पञ्चाङ्गस्यापि सेवनम्।**
**आचारधारणे दिव्यदेशसेवनमित्यपि॥**
**प्राणक्रिया तथा मुद्रा तर्पणं हवनं बलिः।**
**यागो जपस्तथा ध्यानं समाधिश्चेति षोडश॥**

**भावार्थ :** चंद्राच्या सोळा कलांप्रमाणें मंत्रयोगही सोळा अंगांनीं पूर्ण होतो. तीं सोळा अंगें अशीं आहेत :— **भक्ति, शुद्धि, आसन, पंचांगसेवन, आचार, धारणा, दिव्यदेशसेवन प्राणक्रिया, मुद्रा, तर्पण, हवन, बलि, याग, जप, ध्यान** व **समाधि.**

खालीं, संक्षेपतः प्रत्येक अंगाचें रहस्य वर्णिलें जात आहे.

### (१) पहिलें अंग 'भक्ति'

भक्तीचे **वैधी, रागात्मिका** व **परा** असे तीन भेद आहेत. खरोखर पाहिलें असतां ती दोनच भेदांत विभागली जाते. दैवीमीमांसादर्शनांत म्हटलें आहे – '**सा द्विधा गौणी परा च**" म्ह. गौणी भक्ति व परा भक्ति असे भक्तीचे दोन भेद आहेत. साधनदशागत भक्ति ही 'गौणी' व सिद्धिदशागत भक्ति ही 'परा' म्हटली जाते. गौणी भक्तींत पुनः 'वैधी' व 'रागात्मिका' असे दोन भेद 'आहेत. साधनद्वारा प्राप्त अशी जी भक्ति ती 'गौणी' भक्ति होय; यांपैकीं —

[ अ ] "**विधिसाध्यमाना वैधी सोपानरूपा**" म्ह० 'विधींच्या' द्वारा जिचें साधन होतें व उन्नत भक्तीच्या भूमिकेला जी सोपानभूत म्हणजे पायरी-सारखी होते, ती 'वैधी' भक्ति होय. गुरूपदेशानुसार विधिनिषेधाच्या वरीवर्ती होतसाता वैधी भक्तीच्या विविध अंगांचें नियमित अनुष्ठान करून, सत्साधक असतो व भक्तीच्या उन्नत राज्यांत प्रवेश करण्याला अधिकारी होतो. ही वैधी भक्ति पुनः – तो

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**

अशा नऊ अंगांत विभागली जाते. या नऊ प्रकारांचें किंवा यांतील कांहीं प्रकारांचें साधन, भक्तियोगाच्या साधक शिष्याला श्रीगुरुदेव प्रथम उपदेशितात व त्याच्या विशेष साधनांचा अभ्यास करवितात. याच कारणामुळें या प्रकारच्या भक्तीला 'वैधी' असें म्हणतात. ह्या प्रकारें साधन करून भगवत्कृपा प्राप्त झाल्यानंतर साधकाला कोणती सिद्धि प्राप्त होते तें सांगतात —

[ **आ** ] वैधी भक्तीच्या पूर्ण साधनानें भगवत्कृपा प्राप्त होते व निशिदिनीं इष्टदेव-पदध्याननिमग्न अशा भक्ताचें हृदयकमळ विकसित होऊन भगवंताकडे त्याचा ज्या वेळीं तैलधारेप्रमाणें निरवच्छिन्न, अविश्रांत व अपूर्व अमृतमयी प्रेमधारेचा प्रवाह वाहूं लागतो, त्या वेळीं त्या प्रेमधारेच्या मधुर आस्वादनानें परितृप्त होऊन भगवान् भक्ताच्या हृदयकमलामध्यें विराजमान होत्साता भक्ताच्या हृदयांत निरंतर आत्मरति आनंद व शांतीचा उदय करून देत असतो. ह्याच अविश्रांत वाहणाऱ्या भगवत्प्रेमाचें नांव '**रागात्मिका**' भक्ति असें आहे. दैवीमीमांसेंत म्हटलें आहे —

**रसानुभाविकाऽऽनन्दशांतिदा रागात्मिका ।**

भक्तीच्या ज्या भावामुळें श्रीभगवतांसंबंधीं अपूर्व रसाचा म्हणजे प्रेमाचा अनुभव येतो व भक्ताच्या हृदयांत आनंदाचा व शांतीचा उदय होतो, त्याचेंच नांव '**रागात्मिका**' भक्ति होय. भक्तीच्या या भावांत भगवंताकडे साधकाची प्रीति निरंतर लागून राहते. ज्याप्रमाणें नवीन कुलवधू आपल्या पतीच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होण्यासाठीं प्रथम त्याच्या सेवेचे अनेक विधि आचरीत असते; परंतु ज्या वेळीं त्या पतिव्रतेचें प्रेम पतीच्या ठिकाणीं उत्कट व दृढ असें होतें, त्या वेळीं ती साध्वी आपण होऊन त्या प्रेमांत रात्रंदिवस मग्न होऊन राहते व विधीवांचूनही सर्व कर्तव्यें पालन करीत असते. ह्याचप्रमाणें, भक्तीच्या 'वैधी' दशेमध्यें भगवत्प्रेमाच्या अभ्यासासाठीं श्रवणकीर्तनादि अनेक विधीची आवश्यकता असली तरी, भक्तीच्या 'रागात्मिका' दशेमध्यें पतिप्राणा सतीच्याप्रमाणें भगवंताच्या ठिकाणीं भक्ताचें अविरत प्रेम उत्पन्न झालें म्हणजे विधीच्या अभ्यासाची आवश्यकता राहत नाहीं. तो भक्त भगवंताच्या पवित्र प्रेमानें बद्ध होत्साता त्याच्याच चरणकमलांच्या मधुर ध्यानामध्यें रात्रंदिवस निमग्न राहतो; त्यायोगानें त्याच्या चित्तांत दुःखलेशहीन आनंदाची व शांतीची दिव्य ज्योत्स्ना सर्वकाळ प्रफुल्लित राहते. भागवतांत म्हटलें आहे —

**भक्तिं हरौ भगवति प्रवहन्नजस्त्र मानन्दबाष्पकलया मुहुरर्द्यमानः ।**
**विक्लिद्यमानहृदयः पुलकांचितांगो नात्मानमस्मरदसाविति मुक्तलिङ्गः ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

भगवंताच्या ठिकाणीं मधुर प्रेमभाव उत्पन्न झाला असतां भक्ताचें हृदय द्रवीभूत होऊन जातें. आनंदानें त्याचें सर्वांग पुलकित होऊं लागतें, त्याचा कंठ भरून येतो, डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागतात, मुक्त पुरुषाप्रमाणें तो अहंभाव विसरतो. ह्याप्रमाणें इष्टदेवपदध्याननिमग्न भक्ताला प्रपंचाच्या ठिकाणीं वैराग्य प्राप्त होऊन भगवद्भावाची प्राप्ति होते. त्यायोगें भक्ताच्या हृदयांत परमशांति चिरकाल वास करते.

> आवडीं हरिकथा ऐकतां । नाना चरित्रें श्रवण करितां ।
> माझी आत्मचर्चा हृदयीं धरितां । पालटू चित्ता तेणें होय ॥
> तेणेंचि[1] उमजे माझी भक्ति । माझ्या भजनाच्या अति प्रीतीं ।
> आवडीं माझीं नामें गाती । रंगीं नाचती सद्भावें ॥
> पोटांतूनिया उल्हासता । रंगीं गातां पैं नाचतां ।
> अंतरीं द्रवो झाला चित्ता । ते अवस्था बाह्य दिसे ॥
> अंतरीं सुखाची झाली जोडी । बाह्य रोमांचीं उभविली गुढी ।
> त्या स्वानुभवसुखाची गोडी । नयनीं रोकडी प्रवाहे ॥
> माझे भक्तीचिया आवडीं । अहं-सोहं दोन्ही कुडीं ।
> तुटली अभिमानाची बेडी । विषयगोडी निमाली ॥
> ते काळींचें हेंचि चिन्ह । रोमपुलकांकित देहो जाण ।
> नयनीं आनंदजीवन । हृदयीं परिपूर्ण स्वानंदु ॥
> पुंजाळले दोन्ही नयन । सदा सर्वदा सुप्रसन्न ।
> स्फुरेना देहाचें भान । भगवंतीं मन रंगलें ॥

— एकनाथी भागवत, अ. १४

भक्तीच्या ' रागात्मिका ' दशेमध्यें साधकाची बहिश्चेष्टा कशी असते, ह्याबद्दल दैवीमीमांसाशास्त्रामध्यें सांगितलें आहे —

" यज्ज्ञानान्मत्तस्तब्धात्मरामत्वम् " इत्यादि

ह्या भक्ताला लोकलज्जा, लोकभय आदिकरून कांहीं राहत नाहीं. श्रीनारदभक्तिसूत्रामध्येंही ह्याविषयीं पुष्कळ प्रमाणें आहेत. त्यांचा ह्या स्थळीं उल्लेख केला असतां विस्तार फार होईल, म्हणून करीत नाहीं. बाकी ' भक्ति ' हा विषयच स्वतंत्र आहे. त्याविषयीं लिहावें तितकें थोडेंच आहे. सहस्रमुखांचा शेषही भक्तीचा महिमा वर्णन करतांना थकून जाईल ! तेथें इतरांची काय कथा ? तात्पर्य, ' भक्ति ' हा सर्व साधनांचा पाया आहे हें लक्षांत धरून चाललें म्हणजे पुरे. याप्रमाणें ' वैधी ' व ' रागात्मिका ' भक्तीचें लक्षण सांगितलें ; आतां —

---

१ वैधी भक्तीनें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

[३] '**परा**' नांवाचा जो तिसरा भेद, त्याचें थोडक्यांत लक्षण सांगून मंत्रयोगाच्या १६ अंगांपैकीं पहिल्या अंगाचा विचार आटोपतों. भावमय दृश्य संसार हा चतुर्दश प्रकारांनीं विभक्त असल्यामुळें भावमूलक भक्तिरसही चतुर्दश प्रकारांत विभागला जातो. प्रकृतीची स्वाभाविक विचित्रता चतुर्दश प्रकारांतूनच प्रगट होते. ह्यासाठीं भक्तिराज्यांतील जीवामध्यें स्वभावतःच चतुर्दश प्रकारचे भक्तिभाव दिसून येतात. दैवीमीमांसाशास्त्रांत सांगितलें आहे —

**'रसज्ञानामपि चतुर्दशधा, तत्र सप्तमुख्याः सप्तगौणाः ।'**

**"हास्याद्यो गौणाः, दास्यासक्ति – सख्यासक्ति – कान्तासक्ति – वात्सल्यासक्ति – आत्मनिवेदनासक्ति – गुणकीर्तनासक्ति – तन्मयासक्तयश्च मुख्याः ।"**

भगवंताच्या ठिकाणीं असलेल्या प्रीतिमूलक रसाचा बोध चतुर्दश प्रकारांनीं होतो. त्यांत सप्त रस गौण आहेत व सप्त मुख्य आहेत. **हास्य, वीर, करुणा, अद्भुत, भयानक, बीभत्स** व **रौद्र** हे गौणरसाचे सात भाव आहेत ; त्याचप्रमाणें, **दास्यासक्ति, सख्यासक्ति, कान्तासक्ति**, वात्सल्यासक्ति, **आत्मनिवेदनासक्ति, गुणकीर्तनासक्ति, तन्मयासक्ति** हे सप्त रस मुख्य आहेत. दास्यादि ' मुख्य ' रसांच्या द्वारेंच ' परा ' भक्तीचा लाभ होत असतो. परंतु भक्तीच्या उन्नतीस गौण व मुख्य हे सर्वही रस कारण आहेत. श्रीभगवान् रसरूप असल्यामुळें, त्याच्याच सत्तेनें लाभलेल्या मुख्य व गौण रसाच्या मध्यें त्याची ' आनन्दसत्ता ' विद्यमान असते. यासाठीं सर्वच रसांच्या द्वारें उन्नतिलाभ होतो. पण दोहोंत भेद इतकाच कीं, हास्य, बीभत्स, इत्यादि गौणरसांबरोबर बाह्य विषयींचा संबंध असल्यामुळें, तसेंच त्यांच्या आधारें ' मलिन शृंगारमय ' अंतःकरण झाल्यामुळें, गौणरसांच्या द्वारें **अद्वैतभावमय निर्विकल्प समाधिप्रद जो पराभक्ति** तिचा लाभ होत नसतो. त्यांच्या द्वारें भक्तिराज्यांत, फक्त उन्नति व अन्तीं ' सालोक्य ' मुक्ति प्राप्त होते. परंतु दास्यासक्ति, सख्यासक्ति कान्तासक्ति, इ० सप्त ' मुख्य ' रसांचे फळ तसें नाहीं ; कारण कीं, ह्यांच्या आधारें अंतःकरण ' शुद्ध-शृंगारमय ' बनत असल्यामुळें, तसेंच त्याच्याबरोबर बाह्यविषयांचा संबंध राहत नसल्यामुळें त्या ( मुख्य ) रसांच्या द्वारें साक्षात् **पराभक्तीचा लाभ** होतो. ' मलिन-शृंगार ' म्हणजे काय, ' शुद्ध-शृंगार ' म्हणजे काय, सात गौण व सात मुख्य रसांचीं पुराणांतील उदाहरणें कोणतीं, हा विषय फार खोल व मनोरंजक आहे. त्याचा स्वतंत्र लेखांतच विचार करणें योग्य आहे. येथें पराभक्तीबद्दल आमच्या महाराष्ट्रीय संतांच्या मताचें दिग्दर्शन करून हा विषय आटोपतों.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

भगवद्गीतेंत आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे चार प्रकारचे भक्त सांगितले आहेत. पैकीं पहिले तीन अविद्यायुक्त व चौथा अविद्यारहित असा ज्ञानी. ज्ञानयुक्त भक्ति हीच ‘ परा ’ भक्ति होय. स्थूल – सूक्ष्म – कारण – महाकारण ह्या चारी देहांचें तादात्म्य सोडून ह्या सर्वांचा प्रकाशक जो आत्मा तो मी, ह्या प्रकारें ‘ अहमात्मा ’ भावना करणारा तो ‘ ज्ञानी. ’ हा प्रत्यगात्माच हरि व हरिच प्रत्यगात्मा जाणून मीपणा निखालस विसरणारा तो ‘ ज्ञानी भक्त. ’ अशा भक्ताला भगवान् आपला आत्मा असें म्हणून गौरव करितात. श्रीनाथभागवतांत म्हटलें आहे —

येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । जे जे भक्तीतें आदरिती ।
ते ‘ अविद्यायुक्त ’ निश्चितीं । चौथी भक्ति मुख्यत्वें माझी ॥
जे भक्तीमाजीं कांहीं । अविद्येचा विटाळ नाहीं ।
भजन तरी ठायींच्या ठायीं । अनायासें पाहीं होतसे ॥
ते माझी आवडती भक्ति । उद्धवा जाण निश्चितीं ।
जीसि अविद्या असे धाकती । सर्व धर्म कांपती सर्वदा ॥
ते भक्तीची देखोनि गुढी । अविद्या धाकेंचि प्राण सांडी ।
सर्व धर्मांची आवडी । घायेंवीण बापुडी निमाली ॥
मी स्वरूपीं सच्चिदानंद । जगदादि आनंदकंद ।
नित्यसिद्ध परम विबुध । माझें स्वरूप शुद्ध जाणती ॥
देशकाळ वर्तमान । सर्वीं सर्वदा अनवच्छिन्न ।
सर्वात्मा सच्चिदानंदघन । भेदशून्य मी एक ॥
सत्य ज्ञान अनंत । परब्रह्म मी निश्चित ।
ऐसें जाणूनि मज भजत । ‘ उत्तम भक्त ’ ते जाण. ”
सहज माझी जे ‘ प्रकाशस्थिति ’ । ते ‘ भक्ति ’ बोलिजे भागवतीं ।
‘ संवित्ति ’ बोलती जे वेदांतीं । शैवीं ‘ शक्ति ’ बोलिजे ॥ *
बौद्ध जीनेश नेमिनाथा । जोगी म्हणती आदिनाथा ।
भैरव खंडेराव गाणपत्या । अव्यक्त म्हणती एक पैं ॥
एक म्हणती हे आदिमाता । सौर म्हणती तोहि सविता ।
असो नांवांची बहुकथा । उपासकता-विभागें ॥

---

* “ ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परम भक्ति । आपली म्हणों ॥ ”
—ज्ञानेश्वरी, अ० १८।११३३.

ऐशी जे कां 'प्रकाशस्थिति'। त्या नांव बोलिजे 'भक्ति'।
जेणें प्रकाशे त्रिजगती। उत्पत्तिस्थितिलय भासे॥
माझ्या नाना अवतारमाळा। येणें प्रकाशें प्रकाशती सोज्वळा।
देवो देवी सकळा। येणें प्रकाशमाळा भासती॥
माझ्या अवतारांची उत्पत्ति। येणें प्रकाशें असे होती।
नाना चरित्रें अंतीं। प्रवेशती ते प्रकाशीं॥
ऐशिया प्रकाशाची (शुद्ध चैतन्याची) जे प्राप्ति।
ते जाण सनातन माझी भक्ति (हीच परा भक्ति)॥
उद्धवा म्यां हे तुजप्रति। यथानिगुती सांगितली॥
"शुद्ध झालिया स्वरूपप्राप्ति। म्हणसी भजन कैशा रीतीं।
देवभक्त तेचि ते होती। मी होऊन भजती मजमाजीं॥
वामसव्य दोनी भाग। दों नांवीं एकचि अंग।
तेवीं देवभक्तविभाग। मद्रूपीं सांग भासती॥...
तैसे मी होऊनि माझे भक्त। अनन्यभावें मजसि भजत।
तें माझें ऐश्वर्य समस्त। प्रतिबिंबत तयांमाजीं॥
हो कां तरंगु जैसा सागरीं। त्यासि जळचि तळींवरी।
तसा माझा भक्त मजमाझारीं। सबाह्याभ्यंतरीं मद्रूप॥
जैसा सुवर्णाचा नरहरी। सुवर्ण-हिरण्यकशिपूतें विदारी।
सुवर्ण-प्रल्हाद पोटीसीं धरी। तैशापरी मद्भजना॥
तेथें सगुण आणि निर्गुण। उभयरूपें मीचि जाण।
जैसें सुवर्ण आणि कंकण। तैसें अभिन्न जाण मद्रूपें॥
तेथ जें जें दृश्य देखे दृष्टी। तें तें मद्रूपेंसि पडे मिठी।
दृश्य-द्रष्टा लोपूनि त्रिपुटी। उठाउठी मज न मिळे॥
ऐसें जाणूनियां मज भजत। ते जाण पां 'उत्तम भक्त'॥

— एकनाथी भागवत, अ. ११

श्रीमच्छंकराचार्य आपल्या 'विवेकचूडामणि' ग्रंथांत भक्तीचें लक्षण असेंच सांगतात —

मोक्षसाधनसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी।
स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते॥

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

असो. पण निर्गुण ज्ञानी व भक्त ह्यांत भेद काय ? तर निर्गुणोपासक हे हा विश्वाकार म्हणजे मायेचा भास अतएव त्याज्य मानतात, आणि भक्तोत्तमास जग सर्व जगन्निवासच दिसतें. '**जगदेव हरिर्हरिरेव जगत्**' अशी त्यांची दृष्टि होते.

**श्री**वामनपंडित म्हणतात —

**आत्मा सर्व जडप्रकाशक असें लोकीं बहू जाणती ।**
**जाणोनी श्रुतकीर्तनादि सगुण प्रेमा मनीं नेणती ॥**
**कोणी ते सगुणींच निष्ठ परि हा आत्मप्रिय श्रीहरि ।**
**ऐसें भक्तिरहस्य नेणति, न हे सद्भक्ति दोहींपरी ॥**
**अद्वैतभावें कथा श्रवण । अद्वैतभावें गावे गुण ।**
**सर्व भूतीं वसे आपण । वासुदेव ऐसा स्मरावा ॥**
**अंत नाहीं तो अनंत । कधीं च्यवेना तो अच्युत ।**
**इत्यादि भावें निश्चित । हाचि आत्मा आपुला ॥**
**कोणे एके प्रकारें । कोणे एके विचारें ।**
**सर्वही ब्रह्म या संस्कारें । करावें भजन ॥**
**ईश्वर तेव्हां सगुण । महिमा त्याचा निर्गुण ।**
**ऐसें जाणोनि निपुण । सर्वात्मभावें भजती ॥**
**एक स्वयें झाला अनेक । हेंचि महत्त्वाचें कौतुक ।**
**जड-चैतन्य करितां विवेक । पाहता दोनी तोचि कीं ॥**

— निगमसार

असा विवेक अथवा अशी भक्ति प्राप्त होण्याचें साधन म्हणजे एक सत्संगति होय. सत्संगतीवांचून हें प्राप्त होणें शक्य नाहीं.

**उद्धवा, हे ऐशी माझी भक्ति । कैसेनि होय मजसि प्राप्ति ।**
**भावें धरिलिया सत्संगति । माझी भक्ति उद्बोधे ॥**
**मुख्यत्वें संतांची सेवा । हेंचि साधन आवडे देवा ।**
**संतवचनें निजभावा । देतसे तेव्हां निजभक्ति ॥**

— एकनाथी भागवत, अ. ११

**श्री**पद्मनाभयतींद्र या चौथ्या भक्तीसंबंधानें म्हणतात —

**देव आपणचि आहे । परी फिटेना संदेह ॥ १ ॥**
**म्हणुनी सर्व खटाटोप । योगयाग जपतप ॥ २ ॥**
**तीर्थ-भ्रमण पूजन । धूम्रपान आणि नेम ॥ ३ ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**इतुकें संदेहाच्या पोटीं । येणें नाहे देवभेटी ॥ ४ ॥**
**एक संदेह फिटतां । देव आपण तत्त्वतां ॥ ५ ॥**
**पद्मनाभ सांगे तूतें । गुरुवाण तो न फिटे ॥ ६ ॥**

गुरुरूपानें परमेश्वर कृपा करील, तव्हांच ही भक्ति हातास चढावयाची. आपल्या बुद्धिबळानें किंवा ग्रंथावलोकनानें ही गोष्ट साध्य होणारी नव्हे. ईश्वरी कृपा-आकर्षणाचीं जीं नानाविध साधनें आहेत, त्यांपैकीं 'मंत्रयोग' हें एक सुलभ साधन आहे. त्याचें सांप्रत वर्णन चाललें असून, त्या मंत्रयोगाचीं जीं सोळा अंगें सांगितलीं, त्यांपैकीं 'भक्ति' हें पहिलें अंग म्हणजे सर्वांचा पाया आहे असें समजावें. 'रागात्मिका' किंवा 'परा' भक्तीपर्यंत पोंचलेल्या साधकास इतर अंगांची गरज नाहीं; पण त्याच्या खालच्या अधिकारी लोकांस आहे.

त्रिगुणभेदानें भक्तही त्रिविध आहेत. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी; पैकीं **ज्ञानी हा त्रिगुणातीत** आहे. ज्ञानी भक्त व पराभक्तीचा अधिकारी होऊं शकतो. त्रिगुणभेदानें उपासक तीन प्रकारचे होतात. ब्रह्मोपासक सर्वांत श्रेष्ठ आहे. ब्रह्मबुद्धीनें सगुणोपासना ( अखिल विश्व ब्रह्मरूपानें पाहणें ) व ब्रह्मबुद्धीनें अवतारोपासना करणारे ह्याच श्रेणींत येतात. सकाम बुद्धीनें ऋषि, देवता व पितर ह्यांची उपासना करणारे हे दुसऱ्या श्रेणींत ( वर्गांत ) मोडतात; व क्षुद्र शक्तींची ( देवतांची ) उपासना करणारे लोक तिसऱ्या श्रेणींतील असतात. उपदेवता, भूतप्रेतपिशाचादिकांची उपासना करणारे हे त्याच्याहिपेक्षां खालच्या वर्गांतील होत.

## ( २ ) दुसरें अंग 'शुद्धि'

मंत्रयोगाचें दुसरें अंग 'शुद्धि' हें होय. ह्या शुद्धीचे शरीर, मन, दिक् व स्थान असे चार भेद आहेत. ह्यांनाच **स्था**नशुद्धि, **दिक्**शुद्धि, **वाक्**शुद्धि व **आभ्यंतर** शुद्धि असें म्हणतात.

**[ अ ] दिक्शुद्धि**—पूर्वमुख अथवा उत्तरमुख बसून नित्य यथाविधि जप करावा; व रात्रीच्या वेळीं उत्तरमुख बसून देवकार्य नेहमीं करावें. दिक्शुद्धिद्वारा साधकाला साधनामध्यें सिद्धीची प्राप्ति होते व साधकाचें मन वशीभूत होतें; ह्यासाठीं दिक्शुद्धीचा विचार अवश्य राखला पाहिजे, असें योगसंहितेंत सांगितलें आहे.

**[ आ ] कायशुद्धि**—साधनक्रियेच्यासाठीं मनुष्याला सर्वांच्या आधीं स्नान-कार्य केलें पाहिजे. शास्त्रांत **स्नानें सात प्रकारचीं** सांगितलीं आहेत. ( योगसंहितेंत )

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**मांत्रं भौमं तथाग्नेयं वायव्यं दिव्यमेव च ।**
**वारुणं मानसं चैव सप्तस्नानं प्रकीर्तितम् ॥**
**आपोहिष्ठादिभिर्मांत्रं भौमं देहप्रमार्जनं ।**
**आग्नेयं भस्मना स्नानं वायव्यं गोरजः स्मृतम् ॥**
**यत्तदातपवर्षेण स्नानं दिव्यमिहोच्यते ।**
**वारुणं चावगाहः स्यान्मानसं विष्णुचिंतनम् ॥**

**मांत्र, भौम,** आग्नेय, **वायव्य, दिव्य, वारुण** व **मानस** ह्याप्रमाणें स्नानाचे ७ भेद आहेत. ‘ आपोहिष्ठा० ’ आदि मंत्रानें जलप्रोक्षण करून घेणें हे ‘ मंत्रस्नान ’ होय. ओल्या वस्त्रानें शरीर उत्तम प्रकारें पुसून घेणें ह्यास ‘ भौमस्नान ’ म्हणतात ; भस्म धारण केल्यानें ‘ आग्नेय स्नान ’ होतें ; गोधूलीचा शरीरावर लेप अथवा त्याचा स्पर्श हें ‘ वायव्य स्नान ’ होय ; पाऊस लागत असतां सूर्याचें उन्हही पडतें, त्या वेळीं त्या वृष्टिजलांत स्नान करणें, ह्यास ‘ दिव्यस्नान ’ म्हणतात ; पाण्यांत बुडून स्नान करणें ह्यास ‘ वारुण स्नान ’ म्हणतात ; व अनंत सूर्यासारख्या प्रभेनें युक्त. चतुर्भुज, कमलपत्राक्ष, सत्त्वगुणमय भगवंताच्या रूपाचें ध्यान करणें, हें ‘ मानस स्नान ’ होय. ह्याप्रमाणें बाह्यशुद्धीच्या द्वारें आत्मप्रसाद व इष्टदेवाची कृपा उपलब्ध होते.

[ इ ] **स्थानशुद्धि** — योगसंहितेंत सांगितलें आहे —

**गोमयेन यथा स्थानं कायो गंगोदकेन च ।**
**पंचशाखायुतो देशस्तथा सिद्धिप्रदायकः ॥**
**गोशाला वै गुरोर्गेहं देवायतनकाननम् ।**
**पुण्यक्षेत्रं नदीतीरं सदा पूतं प्रकीर्तितम् ॥**

ज्याप्रमाणें गंगाजलानें शरीराची शुद्धि होते व गोमयानें भूमीची शुद्धि होते, त्याप्रमाणें पंचशाखायुक्त स्थान, अर्थात् अश्वत्थ - वट - बिल्व - आमलकी ( आवळा ). अशोक ह्या पंचवृक्षांनीं युक्त, त्या वृक्षांखालील स्थान सिद्धि प्राप्त करून देणारें आहे. गोशाला, गुरुगृह, देवमंदिर, वनस्थान, तीर्थादि पुण्यक्षेत्रें व नदीतीर हीं स्थानें सर्व काळ पवित्र समजलीं जातात. स्थानशुद्धीच्या द्वारें पवित्रता व पुण्यवृद्धि प्राप्त होते.

[ ई ] **अन्तःशुद्धि** — अभय, सत्त्वसंशुद्धि, ज्ञानयोगनिष्ठा, दान, दम, यज्ञ स्वाध्याय, तप, सरलता, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांति, इत्यादि गीतेमध्यें जीं दैवीसंपत्तीचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांच्या अवलंबनानें अंतःशुद्धि म्हणजे अंतःकरणाची निर्मलता प्राप्त होते. गीतोक्त आसुरी संपत्तीचा त्याग करून दैवी

************************************************

संपत्तीचा स्वीकार करणें हीच 'आत्मशुद्धि' होय. हिच्या द्वारें इष्ट देवाचें दर्शन व समाधीची प्राप्ति होते.

## (३) तिसरें अंग 'आसन'

मंत्रयोगांत हितप्रद असल्यामुळें मुख्यतः **स्वस्तिकासन** व **पद्मासन** हीं दोन आसनें घेतलीं आहेत. आसनभेद, आसनशुद्धि व आसनक्रिया ह्या तिन्हींच्या द्वारें आसनसिद्धि होत असते. सकाम-निष्काम विचार, उपासनापद्धति व कामनांचें तारतम्य इहींकरून आसनभेद निर्णीत झाला आहे. पटवस्त्र, कांबळ, कुशासन, सिंहचर्म व मृगचर्म ह्यांचें आसन अतिशुद्ध म्हटलें आहे व हीं सर्व आसनें सिद्धिफल देणारीं आहेत. काम्य कर्मासाटीं कंबलासन श्रेष्ठ आहे, परंतु रक्तकंबलासनच सर्वांत उत्तम समजलें जातें. कृष्णाजिन म्हणजे काळ्या हरणाच्या कातड्याचें आसन, ह्यानें ज्ञानसिद्धि, व्याघ्रचर्मानें मोक्षसिद्धि, दर्भासनानें आयुष्यवृद्धि व चैल म्हणजे रेशमाच्या आसनानें व्याधिनाश सांगितला आहे. प्रथम चैल, त्याखालीं अजिन व सर्वांखालीं कुशासन ह्याप्रमाणें गीतोक्त "**चैलाजिनकुशोत्तरम्**" ह्या क्रमानें आसन तयार केल्यानें योगसाधनांत सिद्धि प्राप्त होत असते. मृत्तिकेच्या आसनानें दुःखाची प्राप्ति, काष्ठासनानें दुर्भाग्याचा उदय, वंशनिर्मित म्हणजे वेळवाच्या आसनानें दरिद्रता, पाषाणाच्या आसनानें व्याधींची उत्पत्ति, तृणाच्या आसनानें यशाची हानि, पल्लवाच्या आसनानें चित्तविभ्रम व वस्त्रनिर्मित आसनानें जप, ध्यान व तप ह्यांची हानि होत असते. सिंहचर्म, व्याघ्रचर्म व कृष्णाजिन ह्या आसनांवर गुरुदीक्षाविहीन गृहस्थाश्रमीयांनी बसणें उचित नाहीं; अशा आसनांवर गृहस्थाश्रमी लोक केवळ गुरुआज्ञा मिळाल्यानंतरच बसूं शकतात; परंतु स्नातक ब्रह्मचारी ह्यांनीं ह्या आसनावर उदासीनाप्रमाणें बसावें. असो. उचित आसनावर बसून 'पृथ्वि त्वया धृता लोका०' ह्या मंत्रानें ऋषिनामउच्चारणपूर्वक मेरुपृष्ठ इत्यादि क्रमानें छंद वगैरेंचा उच्चार करून 'आसने विनियोगः' द्वारें आसनशुद्धि करून सुखानें जपपूजादि कर्में केलीं असता सिद्धि प्राप्त होते. तसें न केल्यास साधनकार्य निष्फल होतें. ह्या सर्व विषयांचें प्रमाण योगशास्त्रांत पाहून घ्यावें.

## (४) चौथें अंग 'पञ्चाङ्गसेवन'

योगशास्त्रांत सांगितलें आहे —

**गीतासहस्रनामानि स्तवः कवचमेव च ।**
**हृदयं चेति पञ्चैते पञ्चांग प्रोच्यते बुधैः ॥**

**गीता, सहस्रनाम, स्तव, कवच व हृदय** ह्यांस ज्ञाते लोक पंच-अंगें म्हणतात. आपापल्या उपासनासंप्रदायानुसार गीता व आपापल्या पद्धतीप्रमाणें उपास्य देवतेचें सहस्रनाम, स्तवराज, कवच व हृदय ह्यांचा नियमपाठ केल्यानें योगी कल्मषरहित होत्साता योगसिद्धि प्राप्त करून घेणारा होतो. पंचोपासनानुसार पांच गीता – भगवद्गीता, गणेशगीता, भगवती गीता, सूर्यगीता व शिवगीता – ह्या प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें आपापल्या पद्धतीप्रमाणें स्वस्वउपासनामूलक स्तव, कवच व हृदय हींही अनेक आहेत. तीं साधकानें गुरूपदेशद्वारा प्राप्त करून घेणें योग्य आहे. सर्व गीतांमध्यें जगज्जन्मादिकारणविचारानें एक अद्वितीय ब्रह्माच्या विचित्र भावमय विज्ञानाचेंच वर्णन केलेलें आहे. कारण कीं, पंचोपासना ही ब्रह्मोपासनाच आहे.

## (५) पांचवें अंग ' आचार '

योगशास्त्रांत **दिव्य, दक्षिण व वाम** असे तीन प्रकारचे आचार सांगितले असून, साधकाचे अधिकार **दीक्षा, महादीक्षा, पुरश्चरण, महापुरश्चरण, अभिषेक, महाभिषेक व तद्भाव** असे सात प्रकारचे सांगितले आहेत. प्रत्येक उपासनेंत दिव्य, दक्षिण व वाम असे तीन प्रकार आहेत; पैकीं वामाचार हा गलिच्छ दिसणारा पण शीघ्रफलदायी आहे असें म्हणतात. शक्ति-उपासनेंतील वामाचार लोकविश्रुत आहेच. ह्या वामाचारांत मद्य-मांसादिकांचें सेवन शास्त्रांतच सांगितलें आहे, तरी तें अनधिकाऱ्यांची अनीति वाढविणारें असल्यामुळें निंद्य मानलें जातें. श्रीतुकाराम महाराजांनीं ह्या वामाचाराची निंदा केलेली प्रसिद्धच आहे. हा वामाचार कांहीं विशिष्ट व्यक्तीच्याच उन्नतीला कारण होतो; सामान्य लोकांस तो उपयोगी नाहीं. ' दक्षिण ' व ' दिव्य ' आचार हे सर्ववंद्य आहेत. ह्याचा विस्तार करण्याचें हें स्थळ नसल्यामुळें हा विचार एवढ्यावरच थांबवून साधकाच्या **सात अधिकारांची माहिती** सांगतों. जेव्हां गुरुदेव कृपा करून शिष्याला देवता व मंत्र ह्यांचा उपदेश देतात, तेव्हां त्या साधकाच्या अधिकारास ' दीक्षा ' असें म्हणतात. पुढें त्या साधकाचा अधिकार वाढला असतां गुरुदेव जेव्हां साधनाबरोबर गुरुलक्ष्ययुक्त योगक्रियेचा उपदेश देण्यास प्रारंभ करितात व शिष्यास प्रतिज्ञाबद्ध करून सोडतात, तेव्हां त्या उन्नत अधिकारास ' महादीक्षा ' म्हणतात. मग त्या गुरुलक्ष्ययुक्त साधनाच्या द्वारें साधक हा क्रमानें मंत्रसिद्धीला प्राप्त करून घेतो, त्यास ' पुरश्चरण ' म्हणतात. ग्रहणादि पर्वकाळांत जें साधारण रीतीनें मंत्रपुरश्चरण केलें जातें, त्या क्रियेस पुरश्चरण असें नाम आहे; परंतु विशेष क्रियासाध्य, कालसाध्य व उपदेशसाध्य जें पुरश्चरण होतें, त्यास ' महापुरश्चरण ' म्हणतात. पुरश्चरणद्वारा सिद्धिलाभ झाल्यानंतर

साधक उन्नत अधिकारास प्राप्त होत असतो. त्यानंतर जेव्हां श्रीगुरु शिष्याला साधनसंबंधीं गुप्त रहस्याचा उपदेश करण्यास पात्र समजतात व संस्कारप्रदानद्वारा शिष्यास गुप्त रहस्याचा भेद दाखवून आनंदराज्याचा अधिकारी करितात, तेव्हां त्या विधीला 'अभिषेक' असे म्हणतात. पंचदेवात्मक पंचसंप्रदायांमध्यें ह्या अभिषेकाला निरनिराळीं नांवें ऐकूं येतात. जेव्हां श्रीगुरुनाथ अत्यंत उन्नत अशा संस्काराच्या द्वारें साधकाला आपल्यासमान करून आपणांत मिळवून घेतात, तेव्हां त्या संस्कारास 'महाभिषेक' असें म्हणतात. कोणी त्याला 'पूर्णाभिषेक' हि म्हणतात. अशा पूर्णाभिषिक्त साधु पुरुषांत 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तु' सामर्थ्य असतें. अशा महात्म्यांना कोणावरही अनुग्रह करून त्यांना आत्मतुल्य बनविता येतें. (कर्नाटक प्रांतांत एका ब्राह्मण साधु पुरुषानें एका मुसलमानास तसे केलेलें ऐकिवांत आहे ; तसेच श्रीगोरक्षनाथांनी गोमांतक प्रांतात एका महाराला गायत्रीमंत्राचा उपदेश करून त्याला त्रिकालज्ञानी करून सोडले होतें. ह्या गोष्टी वाचकांकरितां पुढें सवडीनुसार देण्याचा विचार आहे ) असो. आता शेवटचा अधिकार सांगतों. आध्यात्मिक उन्नतीच्या द्वारें उपासक जेव्हां सर्वोच्च अवस्था प्राप्त करून घेऊन नामरूपाची ऐक्यता पदरांत पाडून घेण्यास समर्थ होऊं लागतो, तेव्हां त्या सर्वोत्तम अधिकारास 'तद्भाव' असें म्हणतात. ह्या भावाच्या द्वारें साधकाची आपल्या इष्टदेवतेशीं एकता स्थापन होऊं लागते व ह्याच अवस्थेनें 'महाभावाची' प्राप्ति होत असते. ह्या सर्वांचे प्रमाण योगशास्त्रांत जिज्ञासूंनीं पहावें.

## (६) सहावें अंग 'धारणा'

'बाह्य' व 'आभ्यन्तर' भेदानें धारणा दोन प्रकारची होते. मंत्रयोगांत धारणा परम साहाय्यक असते. बाह्यपदार्थांमध्यें मनाचा योग केला असतां 'बहिर्धारणे'चें साधन व सूक्ष्मातिसूक्ष्म अन्तर्जगांतील विषयांमध्यें मनाचा योग केला असतां 'अंतर्धारणे'चें साधन होतें. धारणेची सिद्धि श्रद्धामूलक व योगमूलक आहे.

योगशास्त्रांत सांगितलेलें आहे —

> **भक्तिर्जपस्य संसिद्धिराचारः प्राणसंयमः ।**
> **साक्षात्कारो देवताया दिव्यदेशेषु नित्यशः ॥**
> **देवशक्तिविकाशो वै इष्टदर्शनमेव च ।**
> **लभ्यन्ते धारणासिध्या सर्वाणीति विनिश्चयः ।**

धारणेची सिद्धि प्राप्त करून घेतलेल्या योग्याला मंत्रसिद्धि, भक्ति, आचार, प्राणसंयम, देवतासान्निध्य, दिव्य देशांत दैवीशक्तीचा आविर्भाव व इष्टरूपदर्शन हीं

सर्व प्राप्त होतात. मंत्रामध्यें सिद्धि मिळविण्याकरितां मंत्राला संस्कार व चैतन्य द्यावें लागतें. हें कार्य खालीं लिहिलेल्या दहा प्रकारांनी होऊं शकतें. सरस्वतीतंत्रांत सांगितलें आहे —

**मंत्रार्थं मंत्रचैतन्यं योनिमुद्रां न वेत्ति यः ।**
**शतकोटिजपेनापि तस्य विद्या न सिद्ध्यति ॥**

मंत्रार्थ, मंत्रचैतन्य व योनिमुद्रा न जाणल्यामुळें चैतन्यविहीन व संस्कारविहीन मंत्राचा शतकोटि जप केला तरी सिद्धि प्राप्त होणार नाहीं. याकरितां मंत्राचा संस्कार अवश्य केला पाहिजे. **जनन, जीवन, ताडन, बोधन, अभिषेक, विमलीकरण, आप्यायन, तर्पण, दीपन** व **गुप्ति** असे मंत्राचे दहा संस्कार आहेत. मंत्राला हे संस्कार केले असतां सिद्धि प्राप्त होत असते. अनेक लोक गुरूपासून मंत्र घेऊन जप करीत असतात. परंतु त्यांना सिद्धि प्राप्त होत नाहीं. ह्याचें कारण वरील संस्काराचें व षोडश अंगांचें त्यांना ज्ञान नसतें. गुरु म्हणविणाऱ्या किती तरी लोकांना तें नसतें, मग शिष्यांना कोठून असणार ? योगशास्त्रोक्त मातृकायंत्राचे द्वारा मंत्रवर्णांचा उद्धार करणें ह्यास '**जनन**' म्हणतात. उद्धृत वर्णांच्या पंक्तिक्रमानें लिहून प्रत्येक वर्ण प्रणवानें संपुटित करून एकेकाचा शंभर वेळां अथवा निदान दहा वेळां जप करावयाचा, ह्या जपक्रियेस '**जीवन**' म्हणतात. मंत्राचे वर्ण पृथक् पृथक् लिहून 'वं' मंत्रद्वारा चंदनोदकानें दहा अथवा शंभर वेळां ताडन करणें ह्यास मुनिलोक '**ताडन**' क्रिया म्हणतात. मंत्राचे वर्ण पृथक् पृथक् रीतीनें लिहून मंत्रवर्णांच्या संख्येनुसार रक्तकरवीर पुष्पांनीं 'रं' ह्या मंत्रानें त्या मंत्रवर्णांचें हवन करणें ह्या क्रियेचें नांव '**बोधन**' असें आहे. मंत्रवर्ण लिहून मंत्रावर संख्येनुसार रक्तकरवीर पुष्पांच्या द्वारा 'रं' ह्या मंत्रानें एकेक वेळ वर्णाला (अक्षराला) अभिमंत्रित करून त्या मंत्राच्या विधानानुसार अश्वत्थपल्लवद्वारा मंत्रवर्णांच्या संख्येनुसार अभिषिंचन करणें ह्यास '**विमलीकरण**' असें म्हणतात. स्त्रियांपासून उत्पन्न होणाऱ्या मलास 'मायिक', पुरुषांपासून उत्पन्न होणाऱ्या मलास 'कर्म्मण' व दोघांपासून उत्पन्न होणाऱ्या मलास 'आनव्व' म्हणतात. हें मलत्रय साधनास बाधक आहे. 'तार' म्हणजे ॐ, 'व्योम' म्ह. ह, 'अग्नि' = र, 'मष्ट' = औ व 'दण्डी' = म् ह्या सर्वांच्या मिलाफानें "ॐ ह्रौं" तयार होतें, त्याला 'ज्योतिर्मंत्र' म्हणतात. मंत्रवर्णांना सुवर्णाच्या जलांत, दर्भाच्या जलांत किंवा पुष्पजलांत वर लिहिलेल्या मंत्रानें म्ह. ज्योतिर्मंत्रानें विधिपूर्वक आप्यायन करण्यास '**आप्यायन**' म्हणतात. पूर्वकथित ज्योतिर्मंत्रद्वारा जलानें मंत्रावर तर्पण करण्यास '**तर्पण**'

म्हणतात. शक्तिमंत्राला मद्यानें, विष्णुमंत्रास कर्पूरमिश्रित जलानें व शिवमंत्रास दुग्धानें तर्पण करावें, असा विधि शास्त्रांत सांगितला आहे. 'तार'=ॐ, 'माया'=ह्रीं, व 'रमा'= श्री, ह्यांच्या द्वारें अर्थात् "ॐ ह्रीं श्रीं" ह्या मंत्रानें मंत्रास दीपन करणें ह्याला '**दीपन**' क्रिया म्हणतात; व ज्या मंत्राचा जप केला जातो तो अति गुप्त राखणें यास '**गुप्ति**' क्रिया म्हणतात. मंत्राचे दशसंस्कार ते हेच. यांच्या द्वारें मंत्राला 'संस्कृत' व 'चैतन्ययुक्त' करून जप केल्यानें साधक इच्छित फल प्राप्त करून घेऊ शकतो.

## (७) सातवें अंग 'दिव्यदेशसेवन'

योगशास्त्रांत सांगितलें आहे—

> **यथा गवां सर्वशरीरजं पयः**
> **पयोधरान्निःसरतीह केवलम् ।**
> **तथा परात्माऽखिलगोऽपि शाश्वतो**
> **विकाशमाप्नोति स दिव्यदेशकैः ॥**

ज्याप्रमाणें, गायीच्या सर्व शरीरांत दुग्ध व्यापून असलें तरी केवळ स्तनांच्या द्वारेंच तें बाहेर निघत असतें, त्याप्रमाणें परमात्म्याची शक्ति सर्वव्यापक असली तरी तिचा विकास दिव्यदेशांच्या द्वारेंच होतो. तंत्रशास्त्रांत सोळा प्रकारचे दिव्य देश सांगितले आहेत.

> **तन्त्रेषु दिव्यदेशाः षोडश प्रोक्ता यथाऽत्र कथ्यन्ते ।**
> **अग्न्यंबु-लिंगवेद्यो भित्तौ रेखा तथा च चित्रं च ॥**
> **मंडलविशिखौ नित्यं यंत्रं पीठं च भावयंत्रं च ।**
> **मूर्तिर्विभूतिर्नाभी हृदयं मूर्धा च षोडशैते स्युः ॥**

वन्हि, अंबु, लिङ्ग, स्थंडिल, कुड्य (भिंत), पट, मंडल, विशिख, नित्ययंत्र, भावयंत्र, पीठ, मूर्ति, विभूति, नाभि, हृदय व मूर्धा हेच ते सोळा दिव्य देश आहेत. (या दिव्यदेशांमध्यें भगवत्शक्तीचा विकास कसा होतो, याची उपपत्ति आणखी कधीं तरी सांगूं. तूर्त चालू विषय लांबत चालला आहे तो आटोपता घेऊं). साधकाच्या अधिकारानुसार या दिव्य देशांमध्यें उपासना करण्याचा उपदेश गुरुकडून मिळत असतो. योगसिद्धि प्राप्त करून घेण्यास हें सर्व परम हितकारक आहे. 'धारणे' च्या साहाय्यानें दिव्यदेशामध्यें इष्टदेवतेचा आविर्भाव होतो. मृण्मयादि मूर्तींमध्यें प्रथम देवतेचें आवाहन करून पूजारंभ करणें उचित असतें;

परंतु शालिग्राम, प्रतिष्ठित देवांच्या मूर्ति, संस्कृत अग्नि अथवा जल यांच्यामध्यें आवाहनविसर्जनाची आवश्यकता नसते.

## (८) आठवें अंग 'प्राणक्रिया'

मन, प्राण व वायु यांचा एकमेकांशीं संबंध आहे. वायु व प्राण हे कार्य व कारणरूप आहेत. यासाठीं प्राणायामक्रियेबरोबर न्यासक्रियेचा एकत्व-संबंध येतो. प्राणायामाचे सविस्तर भेद हठयोगाच्या आचार्यांनीं आपापल्या ग्रंथात सांगितले आहेत. मंत्रयोगामध्यें 'सहित' प्राणायाम ग्रहण केला असून, 'सहज' प्राणायामाचाही उपदेश कोणी कोणी आचार्य करितात. न्यासाचेही कित्येक भेद आहेत, त्यापैकी सात मुख्य आहेत. ते यथाधिकार गुरुकडूनच समजावून घेतले पाहिजेत. साधारण उपासनेंत करन्यास व अंगन्यास उपयोगी आहेत. विशिष्ट उपासनेंत ऋष्यदिन्यास व मातृकान्यास अवश्य असतात. या सर्वांचें प्रमाण व विस्तृत वर्णन योगशास्त्रात पहावें.

## (९) नववें अंग 'मुद्रा'

योगशास्त्रांत सांगितलें आहे—

**मोदनात्सर्वदेवानां द्रावणात्पापसंततेः ।**
**तस्मान्मुद्रेति विख्याता मुनिभिस्तंत्रवेदिभिः ॥**

मुद्रांच्या द्वारा देवतांना आनंद होतो व साधकाच्या पापसमूहाचाही नाश होतो; यामुळें तंत्रवेत्त्या मुनींनीं याला मुद्रा हें नांव दिलें आहे. पूजा, जप, ध्यान, आवाहन, इत्यादि कार्यांमध्यें त्या त्या कार्याच्या लक्षणानुसार त्या त्या मुद्रांचें प्रदर्शन करणें उचित असतें. आवाहनादि नऊ प्रकारच्या मुद्रा सर्वसाधारण मानल्या जातात; तसेच षडंग मुद्राही सर्व कर्मांकरितां प्रशस्त आहेत. शंख, चक्र, पद्म, वेणु, श्रीवत्स, कौस्तुभ, वनमाला, ज्ञान, बिल्व, गरुड, नारसिंही, वाराही, हयग्रीवी, धनुष्य, बाण, परशु, जगन्मोहनिका व काम्यनामिका या एकोणीस मुद्रांच्या द्वारें श्रीविष्णु भगवान आनंद पावतात. लिंग, योनि, त्रिशूल, माला, वर, अभय, मृग, खट्वांग, कपाल व डमरु या दहा मुद्रा श्रीमहादेवाला आनंदित करणाऱ्या आहेत. श्रीसूर्यउपासनेसाठीं एक पद्ममुद्रा मात्र सांगितलेली आहे. श्रीगणेशपूजेसाठीं दन्त, पाश, अंकुश, विघ्न, परशु, लड्डूक, व बीजपूर ह्याप्रमाणें सात मुद्रा सांगितल्या आहेत. त्याचप्रमाणें पाश, अंकुश, वर, अभय, खड्ग, चर्म, धनु, शर व मुसल याप्रमाणें नऊ मुद्रा दुर्गादेवीला अति प्रिय आहेत. या पंचोपासनाविहित मुद्रांच्या शिवाय अन्य

देवदेवींप्रीत्यर्थही अनेक मुद्रांचें वर्णन शास्त्रांत सांगितलें आहे; तें विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. ज्ञानमुद्रा, भक्तिमुद्रा, तपोमुद्रा, कर्ममुद्रा, दानमुद्रा ह्या मुद्रांनीं ऋषिगण प्रसन्न होतात. वरमुद्रा व अभयमुद्रा इत्यादींनीं त्रिलोकवासी ऋषि व देव सर्व प्रसन्न होतात. याबद्दलचें प्रमाण योगशास्त्रांत पाहावें.

## (१०) दहावें अंग 'तर्पण'

योगशास्त्रांत वर्णिलें आहे—

**तर्पणाद्देवताप्रीतिस्त्वरितं जायते यतः ।**
**अतस्तत्तर्पणं प्रोक्तं तर्पणत्तत्वेन योगिभिः ॥**

देवतागण तर्पणाच्या द्वारें शीघ्र प्रसन्न होतो. म्हणून यास 'तर्पण' म्हणतात. तर्पण हें निष्काम व सकामभेदानें दोन प्रकारचें होतें. कामनेनुसार तर्पणाचें द्रव्य (पदार्थ) निरनिराळें होत असतें. तर्पण हें मंत्रयोगाचें एक प्रधान अंग आहे. इष्टदेवतर्पणानंतर ऋषितर्पण, अन्यदेवतर्पण व पितृतर्पण करण्याचाही विधि आहे. तर्पणाची विशेषता ही आहे कीं विधिपूर्वक तर्पण झालें असतां, देवयज्ञ, भूतयज्ञ व पितृयज्ञ करण्याची आवश्यकताच राहात नाहीं. आपलें इष्ट दैवत शीघ्र प्रसन्न करून घेण्याची कोणास इच्छा असेल तर त्यानें दररोज विधिपूर्वक तर्पण करीत असावें. मधूनें तर्पण केल्यानें सकल अभीष्ट पूर्ण होतें, मंत्राची सिद्धि होते व संपूर्ण महापातक नष्ट होऊन जातें. घृतानें तर्पण केल्यानें आयुष्याची वृद्धि होते. आरोग्यप्राप्तीसाठीं दुग्धानें तर्पण केलें पाहिजे. नारिकेलजलयुक्त जलानें तर्पण केलें असतां निखिल अभीष्टांची सिद्धि होते; वगैरे भिन्न भिन्न प्रकारच्या तर्पणांचें फल आर्यशास्त्रांत सांगितलें आहे.

## (११) अकरावें अंग 'हवन'

योगशास्त्रांत हवनाचा विधि खालीलप्रमाणें सांगितला आहे —

**अर्घ्योदकेन संप्रोक्ष्य तिस्रो रेखाः समालिखेत् ।**
**विधिवदग्निमानीय क्रव्यादेभ्यो नमस्तथा ॥**
**मूलमंत्रं समुच्चार्य कुण्डे वा स्थंडिलेऽपि वा ।**
**भूमौ वा संस्तरेद् वन्हिं व्याहृतित्रितयेन च ॥**
**स्वाहान्तेन त्रिधा हुत्वा षडंगहवनं चरेत् ।**
**ततो देवीं समावाह्य मूलेन षोडशाहुतीः ॥**

अर्ध्योदकानें भूमीवर प्रोक्षण करून तीन रेखा काढाव्या; व विधिपूर्वक अग्नि आणून '**क्रव्यादेभ्यो नमः**' या मंत्राचा व मूलमंत्राचा उच्चार करून कुंडांत, स्थंडिलांत अथवा भूमीवर तीन व्याहृतींनीं अग्नि स्थापन करावा. स्वाहान्त मंत्रानें तीन वेळ हवन करून षडंग हवन करावें; त्यानंतर आपापल्या संप्रदायानुसार इष्टदेवाचें आवाहन करून मूलमंत्रानें षोडश आहुति द्याव्या. याप्रकारें हवन करून स्तुति करावी व इंदुमंडळांत त्याचें विसर्जन करावें. नित्य होमाच्या द्वारें इष्टदेव प्रसन्न होतो, सर्व देवांची तृप्ति होते व अभीष्ट सिद्ध होतें. वैष्णव, शाक्त, शैव, आदिकरून सर्व संप्रदायांच्या साधकांनीं याप्रमाणें नित्य हवन करणें उचित आहे. प्रथम आपल्या इष्टदेवाप्रीत्यर्थ आहुति देऊन, अन्य देवदेवतांना आपल्या इष्टदेवतेचें अंगीभूत समजून त्यांच्या संवर्धनार्थ, संतोषार्थही आहुतिप्रदान करणें योग्य आहे.

## (१२) बारावें अंग 'बलि'

इष्ट उपासनेमध्यें विघ्नाच्या शांतीवांचून सफलता होत नाहीं. ह्या विघ्नशांती-करितांच बलिदान केलें पाहिजे असतें. बलीच्या साधनामध्यें **आत्मबलि हाच सर्वांत श्रेष्ठ आहे.** आत्मबलीच्या द्वारें अहंकाराचा नाश होऊन साधक कृतकृत्य होतो. (किंबहुना **अहंकारनाश हाच आत्मबलि होय.**) बलीच्या साधनांत कामक्रोधादिक रिपूंचा बलि द्वितीय स्थानीं आहे. हा विषय अंतर्यागसाधनाचा म्हणजे अंतरंग साधनाचा आहे. पूजेच्या नंतर अवशिष्ट द्रव्यद्वारा जो बलि दिला जातो, तो इष्टदेवतेच्या प्रसन्नतेसाठीं उत्तम फलाचा दिला जातो. कांहीं संप्रदायांत यज्ञपशूचा बलि देण्याचा विधि प्रचलित आहे. हे सर्व बलीचे भेद त्रिगुणाचे भेदा-नुसार आहेत. प्रथम विधिपूर्वक आपल्या इष्टदेवाला बलि समर्पण करून नंतर अन्य देवतांना बलि द्यावे; व भक्तियुक्त साधकानें त्यानंतर पितरांप्रीत्यर्थ बलिदान करावें; पुनः भूतमात्राच्या तृप्तीसाठीं श्वान, चांडाल व काक आदि पक्ष्यांना घराबाहेर भूमीवर अन्न टाकावें. हा वैश्वदेवविधि प्रातःकाळीं व संध्याकाळीं नित्यशः करणें उचित आहे. प्रमाण योगशास्त्रांत पाहावें.

## (१३) तेरावें अंग 'याग'

'अंतर्याग' व 'बहिर्याग' असे दोन प्रकारचे याग आहेत. अंतर्यागाचा महिमा सर्वांत श्रेष्ठ आहे. **मानसयाग, मानसजप व मानसकर्म ह्यांकरितां काल-शुद्धि, देशशुद्धि व शरीरशुद्धीची मुळींच अपेक्षा नाहीं.** हीं सर्वकाळीं

समान होऊं शकतात. षोडश दिव्य देशांमधून कोणत्या तरी देशाचें अवलंबन करून यागसाधन करणें उचित आहे. स्थूल देशापेक्षां सूक्ष्म देश कोटिगुण फलप्रद आहे. योगसिद्धीनंतर जपसिद्धीबरोबरच ध्यानसिद्धि होते व ध्यानसिद्धीनें समाधि प्राप्त होते. योगसिद्धीच्या द्वारें देवतासाक्षात्कार व दिव्यदेशामध्यें इष्ट देवाचा आविर्भावही होतो.

बाह्य पूजेमध्यें प्रथम मूलमंत्राचा उच्चार करून पुनः देय वस्तूचा उच्चार करावा. नंतर संप्रदानाचा म्हणजे ज्याला वस्तु समर्पण करावयाची त्याचा उच्चार करून, समर्पणार्थक पदाचा उच्चार करावा. ह्याप्रमाणें सर्व उपचार देवाला अर्पण केले पाहिजेत. उपचारसंख्येमध्यें एकविंशति, षोडश, दश व पंच असे चार प्रकारचे भेद योगतत्त्वज्ञ महर्षींनीं केलेले आहेत. आवाहन, स्वागत, आसन, स्थापन, पाद्य, अर्घ्य, स्नान, वस्त्र, उपवीत, भूषण, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, आचमन, तांबूल, माल्य, आरति, नमस्कार व विसर्जन हे **एकविंशति ( २१ ) उपचार होत.** आवाहन, स्थापन, पाद्य, अर्घ्य, स्नान, वस्त्र, भूषण, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, आचमन, तांबूल, आरति व प्रणाम हे **षोडशोपचार** आहेत. ( देशभेदानें व संप्रदायभेदानें ह्या उपचारांत क्वचित् ठिकाणीं फेरफार होतो. ) पाद्य, अर्घ्य, स्नान, मधुपर्क, आचमन, गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य ही **दशोपचार**-सामग्री होय. आणि गंध, पुष्प, धूप, दीप व नैवेद्य हे **पंचोपचार** होत. प्रमाण योगशास्त्रांत पाहावें.

## ( १४ ) चौदावें अंग ' जप '

योगशास्त्रांत म्हटलें आहे —

**मननात् त्रायते यस्मात् तस्मान्मंत्रः प्रकीर्तितः ।**
**जपात्सिद्धिर्जपात् सिद्धिर्जपात् सिद्धिर्न संशयः ॥**

" मननामुळें त्राण म्ह० रक्षण करितो, म्हणून त्यास **मंत्र** असें म्हणतात. जपानेंच सिद्धि, जपानेंच सिद्धि, जपानेंच सिद्धि यांत संशय नाहीं ! " असा वरील श्लोकाचा अर्थ आहे व तो अनुभव पाहण्याचाच आहे. आतां जप कसा करावयाचा तें सांगतात. प्रापंचिक विषयांपासून मनाला हटवून मंत्राच्या अर्थाचें मनन करीत करीत व उच्चारणामध्यें फार त्वरा किंवा फार सावकाशपणा न करितां मध्यम-वृत्तीनें जप करावा. मंत्राचें वारंवार आवर्तन करणें ह्यास ' जप ' म्हणतात. हा जप तीन प्रकारचा असतो. **मानस, उपांशु व वाचिक.** ज्या मंत्राचा ध्वनि जप करणाराही

************************************************

ऐकूं शकत नाहीं, तो ' मानसिक ' जप होय; जो जप करणाऱ्याला मात्र ऐकूं येतो तो ' उपांशु ' होय; व जो मंत्र वाणीनें उच्चारला जातो व दुसऱ्यासही ऐकूं येतो तो ' वाचिक ' जप होय. वाचिक जपापेक्षां उपांशु जप श्रेष्ठ व उपांशु जपापेक्षां मानस जप श्रेष्ठ होय. ह्याचें आणखी एका ठिकाणीं पुढें लिहिल्याप्रमाणें लक्षण सांगितलें आहे —

**नोच्चैर्जपं च संकुर्यात् रहःकुर्यादतंद्रितः ।**
**समाहितमनास्तूष्णीं मनसा वाऽपि चिंतयेत् ॥**
**विधियज्ञाज्जपयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः ।**
**उपांशुः स्याच्छतगुणः साहस्रो मानसः स्मृतः ॥**
**शनैरुच्चारयेन्मंत्रं मंदमोष्ठौ प्रचालयेत् ।**
**अपरैरश्रुतः किंचित् स ' उपांशु- ' जपः स्मृतः ॥**

भावार्थ :— " जप मोठ्यानें करूं नये. एकान्तांत, निरलसपणानें, स्वस्थ चित्तानें, मुकाट्यानें म्ह० ओंठ झांकून अथवा मनानेंच चिंतन करावा. नाना प्रकारच्या स्थूल विधियज्ञांपेक्षां जपयज्ञ दसपटीनें श्रेष्ठ आहे. त्यांतही उपांशुजप शतपटीनें व मानस जप सहस्रपटीनें श्रेष्ठ आहे. उपांशु जप म्हणजे दोन्ही ओंठ हळू हळू हलवीत, मंत्राचा हलक्या स्वरानें म्हणजे दुसऱ्यास ऐकूं न जाईल अशा स्वरानें ओंठांतल्या ओंठांत जप करणें. "

वाचिक व मानसिक जपाचें लक्षण उघडच आहे. प्रथम वाचिक, नंतर उपांशु व नंतर मानसिक असा हळू हळू अभ्यास करावा. दुसरें, अतित्वरेनें जप करण्यानें धनक्षय व अति सावकाश जप करण्यानें रोग होतो; ह्याकरितां परस्परांस लागून असलेल्या पण विरल राहणाऱ्या मोत्यांच्या हाराप्रमाणें जप करावा. तिसरें, जो साधक जप करते वेळीं आपल्या मनाचा शिव, शक्ति किंवा वायु ह्यांवर संयम करूं शकणार नाहीं, तो पाहिजे तितके कल्पपर्यंत जप करीना कां, त्यास सिद्धि दुर्लभ आहे. चौथें, उपासकाला हेंही आवश्यक आहे कीं, देवमंदिरांत किंवा साधनोपयोगी एकान्ताच्या घरांत बसून जपसाधन करावें. साधनस्थान गोमय, गंगाजल, वगैरेंनीं शुद्ध केलेलें असावें. तसेंच उत्तम भावपूर्ण चित्रांनीं तें सुशोभित केलेलें असावें, कीं ज्यायोगानें चित्तांत पवित्रता उत्पन्न होईल. साधनगृहांत म्हणजे आपल्या त्या ध्यानमंदिरांत तामसिक व राजसिक कार्यें, तसेंच दुष्ट मनुष्याचा प्रवेश होतां कामा नये. मोक्षाभिलाषी साधकानें तर गंगातीर, पंचवटी, अरण्य, स्मशान, तीर्थ आदिकरून

प्रदेशांचें आपापल्या संप्रदायानुसार सेवन करून साधन करावें. विशेष सिद्धिलाभ करून घेण्याची इच्छा असेल, तर भूमीमध्यें खळगा खणून – भूयार करून – तेथें योगगुहा बनवून निरुपद्रव होत्साता साधन करावें.

विशेष प्रकारच्या पुरश्चरणादिकानें जर मंत्रसिद्धि न होईल, तर पुनः पूर्ववतच करावें. त्यानेंही न होईल तर पुनः तिसऱ्यांदा करावें. त्यानेंही जर न होईल तर शिवोक्त **प्रमाण**, **रोधन**, **वशीकरण**, **पीडन**, **शोधन**, **पोषण**, **दाहन** ह्या सात प्रकारच्या उपायांचें क्रमशः अवलंबन करावें. हे सर्व उपाय गुरुमुखानेंच जाणण्याला योग्य आहेत.

**आपली**, **स्थानाची**, **मंत्राची**, **पूजासामग्रीची** व **देवतांची** शुद्धि जोंपर्यंत साधक करणार नाहीं, तोंपर्यंत पूजा करणें व्यर्थ आहे. पंचशुद्धिविरहित पूजा अभिचारमात्र आहे. स्नान, भूतशुद्धि, प्राणायाम व सकल षडंगन्यासानें '**आत्मशुद्धि**' होत असते. संमार्जन, लेपन, विज्ञान, धूप, दीप, पुष्प, माला, इत्यादिकांनीं शोभित व विविध रंगांनीं भूषित करणें ह्यांनीं **स्थान**शुद्धि होते. मूल मंत्राच्या अक्षरांना मातृका-वर्णांशीं म्हणजे अ-आ पासून क्ष पर्यंत संयुक्त करून क्रम व उत्क्रमानें म्हणजे सुलट उलट पाठ करण्यानें '**मंत्र**शुद्धि' होते. पूजापदार्थ पाण्यानें धुऊन व मूलमंत्रानें विधिपूर्वक अभिमंत्रित करून धेनुमुद्रा दाखविल्यानें '**द्रव्य**शुद्धि' होते. साधकानें मूलमंत्रानें पीठदेवतेचें प्रतिष्ठापन करून पुनः पुष्पमाल्य-धूपादि समर्पण करावें व जलानें तीन वार प्रोक्षण करावें, म्हणजे '**देव**शुद्धि' होते. ह्याप्रमाणें पंचशुद्धिविधान करून पूजा करणें उचित आहे.

उपासनाभेदानें बीजमंत्र निरनिराळे आहेत. जसें – **कृष्ण**बीज, **राम**बीज, **शिव**बीज, **गण**पतिबीज, इत्यादि. हे सर्व आठ प्रकारच्या मूळ बीजांहून निराळे आहेत. पुनः बीजांबरोबर मूलबीज मिळविलें असतां किंवा एका बीजाचा दुसऱ्या बीजाशीं संयोग केला असतां मंत्राच्या शक्तींत वैचित्र्य उत्पन्न होतें; तसेंच तो मंत्र शाखापल्लवांशीं संयुक्त झाला असतां अन्यभाव धारण करितो. विशिष्ट मंत्रांमध्यें बीज, शाखा व पल्लव तिन्ही असतात. शांति हें पुष्प आहे, इष्टसाक्षात्कार हें फळ आहे, शाखा व पल्लव केवळ भावमय आहेत व शक्ति ही बीजामध्यें सांठविलेली असते. उदाहरणार्थ "ॐ क्लीं कृष्णाय नमः" ह्या मंत्रांत ॐ हा प्रणवरूप सेतु आहे. 'क्लीं' बीज आहे, 'कृष्णाय' शब्द शाखा व 'नमः' हा पल्लव आहे. जपापासून प्राप्त होणारी चित्त-वृत्तीची शांति ही साधकाला पुष्परूप आहे व श्रीकृष्णरूप इष्टदेवाचा साक्षात्कार हा

फलस्वरूप आहे. हेंच **मंत्रज्ञानाचें गूढ रहस्य आहे**. कांहीं मंत्र बीजरहित व शाखापल्लवयुक्त असतात. त्यांस '**भाव**प्रधान' मंत्र म्हणतात. साधकाची **प्रकृति**, प्रवृत्ति, उपासनाधिकार व चित्तसंवेग ह्यांची परीक्षा करून मंत्रोपदेश दिला असतां साधकाला पूर्ण फलाची प्राप्ति होत असते. उपनिषद् व मंत्रशास्त्र जाणणारा योगीच मंत्रविस्ताराचें ज्ञान करून देण्यास व यथाधिकार उपदेश देण्यास समर्थ होतो. **प्र**णव, **प्र**धानबीज, **उ**पासनाबीज, **शा**खापल्लवसंयुक्त बीज व **बी**जरहित शाखापल्लव-युक्त मंत्र असे मंत्राचे पांच भेद आहेत. साधकाची प्रकृति, प्रवृत्ति व अधिकार ह्यांची परीक्षा करून यथावत् मंत्रोपदेश केला जातो. प्रमाण योगशास्त्रांत पाहावें.

पुनः मंत्रांत **सिद्ध, साध्य, सुसिद्ध** व **अरि** असे चार प्रकार आहेत. 'सिद्ध' मंत्र कालेंकरून सिद्धि देतो. 'साध्य' मंत्र जपहोमानें लवकर सिद्ध होतो. 'सुसिद्ध' मंत्र गुरूकडून मिळण्याची फुरसत, तात्काळ सिद्ध होतो; व 'अरि' मंत्र साधकाचा नाश करितो. साधकाचीं नामाक्षरें व मंत्राचे वर्ण इत्यादींवरून त्याची परीक्षा करावयाची असते. मंत्रशास्त्रज्ञ गुरु ह्या सर्वांचा विचार करून साधकास मंत्र देत असतात. विस्तार मंत्रमहोदधि ग्रंथांत पाहावा.

## (१५) पंधरावें अंग 'ध्यान'

**अ**ध्यात्मभावनेनेंच मंत्रयोगांतील ध्यानाची प्रगटता झाली आहे. मंत्रशास्त्रानुसार योगिजनांनीं **विष्णु**पूजेच्या संबंधांत मुख्यतः सात प्रकारचीं ध्यानें सांगितलीं आहेत. **भ**गवतीच्या पूजेमध्यें मुख्यतः चोवीस प्रकारच्या रूपांची व ध्यानांची कल्पना आहे. **म**हादेवाच्या उपासनेमध्यें मुख्यतः पांच प्रकारचीं ध्यानें मानलीं आहेत. तसेंच **सूर्य** व **गणे**शाच्या पूजेंत मुख्यतः दोन प्रकारचीं ध्यानें मानिलीं आहेत. आपापल्या इष्टदेवाच्या रूपाला मनानें जाणणें ह्यास '**ध्यान**' म्हणतात. ध्यानच मनुष्याच्या बंधनाला व मोक्षाला कारण आहे. जसजसा मनुष्य आत्मध्यान करील, तसतशी त्याला समाधीची प्राप्ति होईल. **आत्मा केवळ ध्यानाचेच द्वारा वशीभूत होतो.** ह्या प्रकारें करून ज्या मनुष्याचें मन जेथें प्रसक्त होतें, तेथें त्याला समाधि प्राप्त होते. नदीचें पाणी ज्याप्रमाणें समुद्रांत गेलें असतां समुद्रजलाशीं अभिन्न होऊन जातें, त्याप्रमाणेंच मनुष्याचा आत्मा ध्यानाच्या परिणामानें 'तद्भाव' प्राप्त करून घेऊन परमात्म्याशीं अभिन्न होऊन जातो.

## (१६) सोळावें अंग 'समाधि'

ज्याप्रमाणें लययोगाच्या समाधीला '**म**हालय' व हठयोगाच्या समाधीला '**म**हाबोध' म्हणतात; त्याचप्रमाणें मंत्रयोगाच्या समाधीला '**म**हाभाव' म्हणतात.

जोंपर्यंत त्रिपुटी ( ध्याता, ध्येय, ध्यान ही भावना ) राहाते, तोंपर्यंतच ध्यानाधिकार राहातो. त्रिपुटीचा लय झाल्यानंतर महाभावाचा उदय होतो. मंत्रसिद्धीबरोबर तात्काळ देवतेमध्यें मनाचा लय होऊन त्रिपुटीचा नाश झाला असतां योग्याला समाधीची प्राप्ति होत असते. प्रथम मन, मंत्र व देवता ह्यांचा स्वतंत्र बोध असतो. परंतु हे तिन्ही बोध म्हणजे तिघांची पृथक् जाणीव, एक दुसऱ्यामध्यें लय पावली असतां– ध्याता, ध्यान, ध्येय-रूपी त्रिपुटीही लय पावते. ह्याच अवस्थेमध्यें आनंदाश्रु व रोमांचादि लक्षणांचा विकास होतो व क्रमानें मनाचा लय होऊन समाधीचा उदय होतो. समाधिप्राप्तीनें साधक कृतकृत्य होऊन जातो. **' महाभाव '-प्राप्ति हेंच मंत्रयोगाचें अंतिम ध्येय होय.** ॐ तत्सत् ।

**" कोणाकारणें हें जालेंसें निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥**
**तुका म्हणे मी या अभिमानावेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥**



## गायत्रीमंत्रास शाप

मागील लेखांत ' मंत्रयोगाचीं सोळा अंगें ' सांगितलीं. त्या लेखावरून, मंत्रयोगाची गंभीरता किती आहे हें जिज्ञासूंच्या ध्यानांत येईल; त्याबरोबरच त्याचें काठिण्यही मनांत येऊन कलिकाळबद्धजीवांना जवळजवळ निराशाच वाटूं लागेल. आतां ह्या लेखांतील शिरोलेख वाचून तर कित्येकांस मोठें आश्चर्यही वाटेल; पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. प्रत्येक विषयाच्या दोन्ही बाजू माहीत असणें अवश्य आहे. गायत्रीमंत्राचें श्रेष्ठत्व सर्व द्विजांना कबूल आहे ; परंतु त्या श्रेष्ठत्वाचा आपणास कसा लाभ करून घेतां येईल, हें समजल्याशिवाय नुसत्या श्रेष्ठत्वाच्या ज्ञानानें काय मिळणार आहे ? व्रतबंधाच्या वेळीं पित्याकडून कानांत गायत्रीमंत्राचा उपदेश झाला व गळ्यांत यज्ञोपवीत धारण केलें म्हणजे तेवढ्यानें तो ब्राह्मण होत नाहीं; तसेंच संध्येच्या वेळीं नुसत्या गायत्रीमंत्राच्या दहा-पांच किंवा अष्टोत्तरान्त जपानें गायत्री-मंत्राची सिद्धि मिळणार नाहीं. सिद्धि मिळण्यास त्या मंत्राचें ' विध्युक्त अनुष्ठानच ' केलें पाहिजे, त्या मंत्राचीं पुरश्चरणें केलीं पाहिजेत. गायत्रीमंत्राचीं पुरश्चरणें करणारे अथवा केलेले लोक आज फार थोडे सापडतील. ज्यांनीं तें पुरश्चरण केलें असेल, त्यांना त्यांच्या संवेगशक्तीप्रमाणें व कर्मशुद्धीप्रमाणें त्याचें अंशतः फळही अनुभवास आलें असेल. ( श्रीसमर्थांनीं तीन गायत्रीपुरश्चरणें केलीं होतीं, हें त्यांच्या चरित्रांत

प्रसिद्ध आहे. ) पुरश्चरणाचा विधि तज्ज्ञ पुरुषांकडून समजून घेऊन त्या विधीप्रमाणें जो अनुष्ठान करील, त्या प्रत्येक अधिकारी पुरुषास त्याचें फळ आल्यावांचून राहणार नाहीं.

**शं**करांनीं सप्त कोटि महामंत्रांस शाप दिला आहे. **सा**वित्रीनेंही दिलेला आहे. कांहीं **राम**मंत्रांस स्वतः रामांनीं शाप दिले आहेत. गायत्रीमंत्रास **व**शिष्ठाचा, **विश्वा**मित्राचा, **ब्रह्म**देवाचा व **वरु**णाचा शाप आहे. शाप देण्यास तशीं कारणें झालेलीं आहेत. **स्थळ**संकोचामुळें त्यांचा विस्तार करतां येत नाहीं. मंत्राचें अनुष्ठान करतांना मंत्राचें **शापविमोचन** केलें पाहिजे.

" वेदात्मनाय विद्महे, हिरण्यगर्भाय धीमहि । तन्नो ब्रह्मा प्रचोदयात् ॥ ॐ देवि भगवति गायत्रि त्वं **ब्रह्मशापाद्विमुक्ता भव** ॥ " ह्याचसारख्या निरनिराळ्या मंत्रांचा उच्चार करून, " **त्वं वशिष्ठशापा**द्विमुक्ता भव, **विश्वामित्रशापा**द्वि-मुक्ताभव, **वरुणशापा**द्विमुक्ता भव " इत्यादि म्हणावयाचें; व " शापयुक्ता तु या संध्या न फला तु कदाचन । शापादुत्तारिता संध्या भुक्तिमुक्तिफलप्रदा " असें पुढें बोलून मानसोपचारपूजा करावी, वगैरे विधि 'गायत्रीपुरश्चरण' नामक छोट्या ग्रंथांत सांगितला आहे.

**दशप्रणवगायत्री जपेत्सव्यापसव्यकम् ।**
**शापादि नाशमाप्नोति शिवस्य वचनं यथा ॥**

असें ' रुद्रयामल ' ग्रंथांत सांगितलें आहे.

गायत्रीशिवाय इतर मंत्रांस —

**नामस्मरणमात्रेण शापमुक्तो भविष्यति ।**

असें देवीभागवतांत सांगितलें आहे. ज्यांनीं त्या मंत्रास शाप दिले आहेत, त्यांचें नामोच्चारण करून नमस्कार करावा, म्हणजे शापमोचन होतें.

" **व**शिष्ठाय नमः ; **विश्वा**मित्राय नमः ; **ब्रह्म**णे नमः ; **व**रुणाय नमः "

असें म्हटल्यानें गायत्रीमंत्राचें शापमोचन होतें ; असाही एक संक्षिप्त विधि सांगितला आहे. कोणी व्याहृतित्रयाच्या उच्चारानंतर प्रणवोच्चार करून गायत्रीमंत्र म्हटला म्हणजे गायत्रीचें शापविमोचन होतें असें म्हणतात.

( १ ) **शाप**मोचन, ( २ ) उत्कीलन व ( ३ ) **सं**जीवन केल्यानंतरच तो मंत्र फळ देण्यास समर्थ होतो. ' शापमोचन ' करणें म्हणजे मंत्रशुद्धि करणें ; ' उत्कीलन ' म्हणजे पूर्वी मंत्र मलिन असतात त्यांस बीजाक्षरांनीं जागृत करणें म्हणजे बाहेर

*********************************************

काढणें; व 'संजीवन' म्हणजे प्रथम मंत्र शापामुळें मृतप्राय असतात, त्यांस सजीव करणें, त्यांत चैतन्य भरणें. प्रथम शापोद्धार करून उत्कीलन व संजीवन करावयाचें व नंतर जप करावयाचा, असा विधि आहे.

शापमोचनाचा विधि वर सांगितला. उत्कीलनविधि म्हणजे वाग्बीज, भुवनेश्वरी-बीज व लक्ष्मीबीज ( ऐं ह्रीं श्रीं ) यांचा उलट-सुलट जप करून त्याबरोबर तो ( इष्ट ) मंत्र एक हजार वेळ जपावा; व संजीवनविधींत 'ह्रीं श्रीं ऐं क्लीं सौः' मंत्राचा सहस्त्र जप करावा असें सांगितलें आहे. हा तंत्रमार्ग होय. वैदिक मंत्रानें संजीवन करणें झाल्यास 'त्र्यंबकं यजामहे॰' ह्या मंत्रानें तो इष्ट मंत्र संपुटित करावा, म्हणजे संजीवन होतें, असेंही अन्यत्र सांगितलें आहे.

संकर्षण, गदाधर, संतानगोपाल, गोपाळसुंदरी ह्या मंत्रांस शाप आहेत. कांहीं राममंत्रांस स्वतः रामांनीं शाप दिले आहेत, हें वर सांगितलेंच आहे. **राम तारक मंत्रास शाप नाहीं.** गायत्री, नवार्णव, दक्षिणामूर्ति, वगैरे मंत्रांस संजीवन केलें पाहिजे, त्याशिवाय ते फलदायक होत नाहींत. परंतु **सिद्धमंत्रास संजीवनादिकांची गरज नाहीं** असेंही म्हणतात.

[ सिद्ध मंत्रांचें लिस्ट ( यादी ) शारदातिलकांत असल्याचें समजतें ]

**नृसिंहरामविष्णुश्च शंकरश्चांबिका तथा।**
**गजाननो गुरुश्चैव सप्तैते सिद्धमंत्रदाः॥**

असेंही प्रमाण सापडतें. असो.

वरील गोष्टींचा विचार करून जपानुष्ठान करावें, म्हणजे बहुधा व्यंग पडणार नाहीं. संकल्पित संख्येचा जप झाल्यानंतर जपसंख्येच्या दशांशानें होम, त्याच्या दशांशानें तर्पण, त्याच्या दशांशानें मार्जन व त्याच्या दशांशानें ब्राह्मणभोजन घालावें, म्हणजे तो मंत्र सिद्ध होतो, इष्टफल देणारा होतो.

'**विश्वामित्रकल्पांत**' जपानुष्ठाननियम सांगितले आहेत. तांत्रिक मार्गांत दुप्पट संख्या सांगितली आहे.

| वैदिक मार्ग | | | तांत्रिक मार्ग |
|---|---|---|---|
| १००००० | जप ... | ... | १००००० |
| १०००० | होम ... | ... | २०००० |
| १००० | तर्पण ... | ... | २००० |
| १०० | मार्जन ... | ... | २०० |
| १० | ब्राह्मणभोजन | ... | २० |

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

असो. वैदिक मंत्रास **शापमोचन, उत्कीलन, संजीवन**, वगैरे करावें लागतें, नंतरच मंत्र इष्टफलदायी होतात, असें ' संक्षेपतः ' वर सांगितलें. हें नुसतें **दिक्-दर्शन** समजावें. तीव्र जिज्ञासूंनीं तज्ज्ञ गुरूची गांठ घेऊन त्यांजकडून सविस्तर माहिती अथवा विध्युक्त दीक्षा घेऊनच अनुष्ठानास आरंभ करणें योग्य आहे. आपल्या मतें पुस्तकें धुंडाळून हें काम भागण्यासारखें नाहीं. पुढील लेखांतील विचारही ध्यानांत घ्यावे.



# सिद्धारि-चक्र-शोधन

**मंत्र** घेतांना कल्याणेच्छु पुरुषानें चांगल्या मंत्रविद् (मंत्रज्ञ) पुरुषाकडून विध्युक्त रीतीनें घेतला पाहिजे. निरनिराळ्या कामनासिद्धीचे निरनिराळे मंत्र असतात; निरनिराळ्या देवता असतात. किंबहुना एकाच देवतेचे, कामनाभेदाप्रमाणें मंत्रही भिन्न भिन्न असूं शकतात. तसेंच आपल्या जन्मनक्षत्राचा अथवा नांवाचाही, मंत्र ग्रहण करतांना विचार करावा लागतो. कारण मंत्रामध्यें —

**सिद्ध, साध्य, सुसिद्ध व अरि**

असे चार प्रकार असतात. 'सिद्ध' मंत्र कालांतरानें फलसिद्धि करून देणारा, 'साध्य'–मंत्र त्यापेक्षां लवकर व थोड्या श्रमानें फळणारा, 'सुसिद्ध' मंत्र त्वरित फल देणारा व 'अरि' मंत्र जापकाचा नाश करणारा होतो. (मागें १४ व्या अंगांत ह्याचा थोडासा उल्लेख आलेला आहेच.) जपावयाचा मंत्र हा वर सांगितलेल्या चार कोटींपैकीं कोणत्या कोटींत येतो, ह्याचा विचार मंत्र देणाऱ्यानें करून तो दिला पाहिजे. उगीच 'अजमास–पंचक्याचें' हें काम नव्हे. वरील चारांच्या मिश्रणानें —

**सिद्ध-अरि, साध्य-अरि, सुसिद्ध-अरि** व **अरि-अरि,** इत्यादि पुनः सूक्ष्म भेद होतात. ह्या सर्व गोष्टींचा विचार जाणणारा गुरु पाहिजे. ह्या सिद्धारि चक्राप्रमाणेंच —

**ऋण-धन-चक्राचें शोधन –**

ही करावें लागतें. मंत्र ऋणी असावा व जापक धनी असावा. असें नसतां जापक ऋणी व मंत्र धनी असेल तर जन्मभर त्या मंत्राचा जप करूनही कांहीं फल मिळावयाचें नाहीं. कदाचित् ह्या जन्मीं त्या मंत्राचा जप करून करून हें धन त्या मंत्रदेवतेच्या पेढीवर (बँकेंत) जमा (सेव्हिंग) करून ठेवलें म्हणजे पुढच्या जन्मीं तो मंत्र ऋणी व जापक धनी होतो; व असें झालें म्हणजे मग त्या मंत्राच्या जपानें इष्टसिद्धि लवकर होते.

**मोक्ष मिळेपर्यंत जन्मांतरें होत राहणार**

हा शास्त्राचा अबाधित सिद्धान्त, नव्हे, निसर्गाचा अटळ कायदा आहे. मागच्या जन्मांतील कर्म कसें ओळखावें हेंही आमच्या अतीन्द्रियद्रष्ट्या शास्त्रकारांनीं लिहून

************************************************

ठेविलें आहे. ज्योतिषशास्त्र हा त्यापैकीं एक भाग आहे. चेहरा किंवा सामुद्रिक हा दुसरा भाग आहे. फक्त योग्यांनाच दिसणारें 'तेजोवलय' हा तिसरा भाग आहे. सूक्ष्मदृष्टीचे पुरुष वरीलसारख्या अनेक साधनांनीं जीवाचें मागील कर्म ओळखून, त्याला पुढील श्रेयोमार्ग दाखवीत असतात. असे दिव्य दृष्टीचे योगी अथवा ज्ञानी पुरुष ( Occultist & Mystic ) आपल्या भरतखंडांत अनेक आहेत. दृष्टिगोचर जनतेमध्येंही ते उघड आहेत, पण जनतेची दृष्टि उघडी नाहीं, त्यामुळें ते तशा रूपानें जनतेला दिसत नाहींत. पूर्वपुण्यपरिपाकानें ज्यांची दृष्टि उघडलेली असते, त्यांना ते तशा यथार्थरूपानें दिसत असतात. तशी दृष्टि नसेल त्यांना तशा पुरुषांच्या ठिकाणीं विपरीत भाव उत्पन्न होतो ! दुसरें असेंही आढळून येतें कीं, पहिल्या भागांत 'नियतगुरु' व 'अनियतगुरु' यासंबंधानें जे विचार सांगितले आहेत, त्या दृष्टीनेंही कोणा एखाद्या महापुरुषाच्या ठिकाणीं एखाद्याची श्रद्धा बसते, एखाद्याची बसत नाहीं. हे सर्व 'पूर्वऋणानुबंध'च म्हटले पाहिजेत. आतां, साधूबरोबर भोंदू गुरूही जगांत वावरतातच! अस्सल तिकडे नक्कल असावयाचीच. त्यास उपाय नाहीं. अस्सल शोधून काढण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. नसल्यास हृदयस्थ परमात्म्यास शरण जाऊन त्याच्याकडे योग्य मार्ग अथवा मार्गदर्शक दाखविण्याबद्दल याचना केली पाहिजे. त्याच्या कृपेशिवाय आपण आपल्या बुद्धीनें साधुसंतांची परीक्षा करूं, हें केव्हांही शक्य नाहीं. ह्यासंबंधाचा विचार पहिल्या भागांत '**संत, गुरु व सद्गुरु**' ह्या प्रकरणांत केला आहे, तो वाचकांनीं पुनः वाचून पाहून आपली विचारसरणी विशुद्ध करून घ्यावी. असो.

जनतेंत 'उघडपणें' वसणाऱ्या ह्या योगी पुरुषांशिवाय 'गुप्तपणें' संचार करणारे गोरक्ष-गहिनीनाथांसारखे सिद्ध पुरुष आपल्या देशांत आहेत. ते चिरंजीव आहेत. श्रीनिवृत्तिनाथ व त्यांच्यानंतर सुमारें चारशें वर्षांनीं झालेले श्रीसोहिरोबानाथ ह्यांना श्रीगहिनीनाथांचें दर्शन झालेली गोष्ट प्रसिद्ध आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें दर्शन सुमारें ३०० वर्षांनीं श्रीएकनाथमहाराजांना झालें. त्यानंतर सुद्धां हल्लीं श्रीहैबतरावबाबा व श्रीगुलाबरावमहाराज ह्यांनाही श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा दर्शनसाक्षात्कार होऊन अनुग्रह झाल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. अस्तु.

'मंत्रमहोदधि' नांवाच्या ग्रंथांत सिद्धारिचक्र व ऋणधनचक्रशोधनाची माहिती, कोष्टकें वगैरे देऊन सविस्तर सांगितलेली आहे.( मुंबई वेंकटेश्वर छापखान्याच्या यादींत मंत्रशास्त्रावरील लहानमोठ्या ग्रंथांचीं ७०।७५ नांवें आहेत ! ) शिवाय 'परशुराम-

*****************************************

कल्पसूत्र ' नांवाच्या ग्रंथांत मंत्रशास्त्राची सांगोपांग माहिती आहे. ( हा ग्रंथ बडोद्यास छापला आहे. ) ह्यांत मंत्राबरोबर तंत्राचीही माहिती आहे.

( १ ) वेदव्यासांनीं – ' ब्रह्मसूत्रें ' केलेलीं आहेत ; त्याप्रमाणें

( २ ) जैमिनीनें – ' कर्मसूत्रें '

( ३ ) नारदांनीं – ' भक्तिसूत्रें, '

( ४ ) पतंजलींनीं – ' योगसूत्रे, ' व

( ५ ) परशुरामांनीं – ' तंत्रसूत्रें ' केलेलीं आहेत. ( तंत्रशास्त्राचें रहस्य ह्या सूत्रांनीं अगदीं व्यवस्थित मांडलें आहे असें कळतें. )

**सांप्रदायविश्वासाभ्यां सर्वसिद्धिः ।** सांप्रदायः = गुरुपरंपराचारानुसरणं । विश्वासः = मंत्रेषु फलसाधनत्वविषयको निश्चयः । आभ्यां सहितेन मंत्रेण सर्वसिद्धिर्भवतीति शेषः । " ह्याचा अर्थ :– संप्रदाय व विश्वास ह्यांनींच सर्व प्रकारची सिद्धि प्राप्त होते. ' संप्रदाय ' म्हणजे गुरुपरंपरेच्या आचाराला अनुसरून वागणें, व ' विश्वास ' म्हणजे मंत्रामध्यें फलसाधनत्वाचा निश्चय असणें. ह्या दोहोंच्या योगानेंच सर्व प्रकारची सिद्धि प्राप्त होते असें तात्पर्य.

केव्हां केव्हां गुरु हे **सिद्धारिचक्रादिकाचा तंटा चुकविण्याकरितां** आत्मतेजानें शिष्याचें ' दीक्षानांव ' निराळें ठेवतात. असें झालें म्हणजे मग तो त्याचा नवीन जन्म होतो. चतुर्थाश्रमांत दीक्षानांवें अथवा आश्रमनांवें अगदीं निराळीं असतात हें प्रसिद्धच आहे. भारती, तीर्थ, आश्रम, सरस्वती, आनंद, आनंदसरस्वती, इत्यादि संप्रदायाचे दर्शक शब्द पुढें लावून त्याच्यामागें एखादें नवीनच नांव लावतात. श्रीसच्चिदानंद शिवाभिनव नृसिंहभारती, श्रीवासुदेवानंदसरस्वती, श्रीब्रह्मानंदसरस्वती, श्रीइंदिराकान्ततीर्थ, श्रीसहजानंद, श्रीपांडुरंगाश्रम, श्रीविवेकानंद, श्रीरामतीर्थ, इत्यादि नांवें हीं चतुर्थाश्रमाची दीक्षा घेतल्यानंतर गुरूंनीं दिलेलीं आश्रमसंप्रदायदर्शक भिन्न नांवें होत.

चतुर्थाश्रमांत दीक्षानांवें अथवा आश्रमनांवें निराळीं असतात हें प्रसिद्धच आहे. पण गृहस्थाश्रमी शिष्यांना देखील गुरूकडून केव्हां केव्हां निराळीं नांवें मिळत असतात. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगोंदवलेकरमहाराज ह्यांचें मूळ नांव नारायण होतें. गुर्वनुग्रह झाल्यानंतर त्यांना ' **श्रीब्रह्मचैतन्य** ' हें नांव मिळालें. ह्या श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांनीं हुबळीचे प्रसिद्ध वे. शा. सं. तम्मणशास्त्री पुराणिक

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

नवलगुंदकर ह्यांना '**सच्चिदानंद**' हें दीक्षानांव दिलें. हे हल्लीं ( शके १८५७ ) हुबळींत सच्चिदानंदमहाराज ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. ( ह्यांची शिष्यशाखा तेथें मोठी असून दरवर्षी हे त्रयोदशाक्षरी मंत्राचा तेरा कोटि जप सामुदायिक रीतीनें करवीत असतात. ह्याबद्दल पहिल्या भागांत उल्लेख आलाच आहे. ) बेलधडीचे **ब्रह्मानंद**स्वामी, ह्याचप्रमाणें हुबळीचे जगप्रसिद्ध '**सिद्धारूढ**' स्वामी, इत्यादि हीं नांवें दीक्षानांवें होत. ह्यांपैकीं कांहीं नांवें सहज व कांहीं बुद्धिपुरःसर दिलेलीं असतात. वऱ्हाडचे प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगुलाबरावमहाराज ह्या अंतर्ज्ञानी व दिव्यचक्षु महापुरुषांनीं आपल्या एका शिष्याचें पहिलें नांव दत्तू हें सोडवून त्यास दुसरें नांव 'ज्ञानेश्वर' हें ठेवलें व त्याचा अपमृत्यु टाळला हें मला प्रत्यक्ष माहीत आहे व ही गोष्ट श्रीगुलाबरावमहाराजांच्या चरित्रांत नमूदही आहे. असो.

राम, नृसिंह, नवार्णव ( चंडी ), गणपति, गोपाळकृष्ण, शिवपंचाक्षरी, गायत्री, इत्यादि कांहीं मंत्रांला सिद्धारिचक्र व ऋणधन शोधूं नये, ( सिद्धारिं नैव शोधयेत् ) असें सांगितलें आहे. तसेंच गायत्रीमंत्राप्रमाणें त्रिपाद असलेल्या मंत्रासही सिद्धारि शोधूं नये, उदाहरणार्थ – "श्रीराम, जयराम, जयजयराम" ( हा समर्थांचा मंत्र ); "श्रीगुरु, जयगुरु, जयजयगुरु" ( माणिक-संप्रदायांतील मंत्र ) ; "श्रीदुर्गे, जयदुर्ग, जयजयदुर्गे" ( श्रीशिवाजीमहाराजांना समर्थांनीं दिलेला मंत्र ) ह्यास सिद्धारि शोधूं नये असें सांगतात. कारण हे सिद्ध मंत्र आहेत. ह्या नाममंत्रांस इतर मंत्रांप्रमाणें न्यासादिकांचेंही कारण नाहीं म्हणतात.

श्रीगुलाबरावमहाराज आपल्या 'संप्रदाय-सुरतरु' ग्रंथांत ( अ. २२ ) गुरुशिष्यधर्म वर्णन करीत असतांना सांगतात —

**" गुरु नेणती गुरुधर्मातें । शिष्य नेणती गुरुभक्तीतें ।**
**म्हणोनि मंत्र कवणातें । सिद्ध न होय ॥**
**त्यांतही-सिद्ध-साध्य-सुसिध्य अरि । न पाहोनि मंत्र घेतां तरी ।**
**दुःखप्रद होय भारी । संशय नाहीं ॥**
**म्हणोनि तो मंत्रत्याग आधीं करावा । मग प्रत्यंगिराश्रय धरावा ।**
**मरुतंत्रीं विधि बरवा । चतुर्दश प्रकारीं बोलिला हा ॥ ...**
**जे शाक्तसंप्रदायी असती । तींहीं करावी ऐशी रीति ।**
**आगमोक्त शिवनारायणविद्येप्रती । सिद्धारिचक्र न लागेचि ॥**

**गायत्रीस सिद्धारि पहातां । तरी मोडावी लागेल व्रतबंधव्यवस्था ।**
**एवं शिवकृष्णादिमंत्रां तत्त्वतां । सिद्धारि सर्वथा असेना ॥**
**शिवमंत्रासी शिवपुराणीं । सिद्धारि नाहीं हे बोलिली वाणी ।**
**कृष्णमंत्रासि पद्मपुराणीं । सिद्धारि नाहीं हें बोलिलें ॥** ......
**जे मंत्र देती क्षुद्र फळें । तयां चक्र पहाणें लागे वेळे ।**
**जे मंत्र देती मोक्षफळें । तयां चक्रप्रयोजन नाहीं ॥**
**स्वप्नमंत्रासि** ( स्वप्नांत मिळालेल्या मंत्रास ) **सिद्धारि नसती ।**
**ऐशी ही मंत्रशास्त्राची उक्ति ।** " इत्यादि.

तात्पर्य, मंत्र घेणाऱ्यांनीं घेतांना व देणाऱ्यांनीं देतांना चांगला विचार केला पाहिजे. मंत्र घेणाऱ्यांनीं योग्य गुरूचा शोध करूनच मंत्रग्रहण केलें पाहिजे.

" **पानी पीना छानके, और गुरु करना जानके ।** "( पाणी गाळून प्यावें व गुरु ओळखून करावा. )



# बारा प्रकारचे गुरु

## व भारतांतील गुरुसंस्था

पहिल्या भागाच्या पुस्तकांत '**नामस्मरणानेंच हरिगुरुकृपा होते**' ह्या सदराखालीं जो लेख लिहिला (चौथी आवृत्ति, पृ. ८६) त्यांत ओघानें १२ प्रकारच्या गुरूंचीं नांवें सांगून संक्षिप्त वर्णन दिलें आहे व दुसऱ्या भागांत त्याचा विस्तार करूं असें म्हटलें आहे, त्याप्रमाणें तो येथें करण्याचें योजिलें आहे.

हा विस्तार अथवा बारा प्रकारच्या गुरूंचा खुलासा करण्यापूर्वी आर्यधर्मातील '**गुरु व दीक्षा**' ह्याची थोडीशी चर्चा करणें इष्ट वाटतें. मागील 'सिद्धारिचक्र-शोधन' प्रकरणांत 'योग्य गुरूचा शोध करून मंत्रग्रहण केलें पाहिजे' असें सांगितलें आहेच. पहिल्या भागाच्या पुस्तकांत (पृ. ७४) '**संत, गुरु व सद्गुरु** ह्या लेखामध्येंही ह्या विषयाची थोडीशी चर्चा केलेली आहे, ती वाचकांच्या ध्यानांत असेलच. त्याचें अनुसंधान ठेवून पुढील विचार ध्यानांत घ्यावे.

"जगांत जितके म्हणून धर्मसंप्रदाय आहेत, त्या सर्वांत गुरुदीक्षेची रीत थोड्याफार प्रमाणांत दिसून येतेच. मग तो महंमदी धर्मातील शरीअत, तरीकत, मारिफत व हकीकत अधिकाराचा प्रकार असो; किंवा खिस्ती धर्मामधील रोमन-क्याथलिक, ग्रीक चर्च व प्रॉटेस्टंट संप्रदाय असो; अथवा जैनधर्मांतर्गत श्वेतांबरी व दिगंबरी, इत्यादि मतभेद असो अगर बुद्धधर्मातील उत्तर व दक्षिण आम्नाय असोत; ह्या सर्व धर्मसंप्रदायांत गुरुदीक्षाग्रहणाची रीत कमीअधिक प्रमाणांत प्रचलित आहेच. जगांतील सर्व धर्म अगदीं एकमतानें गुरुदीक्षाग्रहण करण्यांत आज्ञा देत आहेत. परंतु भेद इतकाच कीं, आपल्या अभ्रांत (भ्रमप्रमादरहित) वेदप्रकाशित सनातन धर्मांत ज्याप्रमाणें गुरूची महिमा व आध्यात्मिक उन्नति साधण्याकरितां गुरुदीक्षेची आवश्यकता विस्तृत व गंभीर रीतीनें सांगितली आहे, त्याप्रमाणें वैज्ञानिक (सायंटिफिक) भावपूर्ण वर्णन दुसरीकडे कोठेंही पाहण्यांत येत नाहीं. वेदाचा हाच आशय आहे कीं, जीव आपल्या कर्मानुसार पुनरावृत्तीच्या चक्रांत सत् असत् फलभोग भोगीत असतो, परंतु कर्म स्वतः जड असल्यामुळें तें फलोत्पत्ति करूं शकत नाहीं. तर जगत्कर्ता जगत्पिता सर्व शक्तिमान् परमेश्वरच आपल्या महाशक्तीच्या द्वारें जीवाच्या कर्मानुसार सत्-असत् फलप्रदान करीत असतो. जरी फलप्राप्तीमध्यें आपलें कर्मच कारणरूप असतें, तथापि ईश्वरशक्ती-

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

वांचून कर्मसमूह आपलें फल आपण उत्पन्न करूं शकत नाहीं. ह्याच रीतीला अनुसरून, आध्यात्मिक उन्नति करून घेण्याच्या वेळींही मनुष्याला ईश्वरी शक्तीची सहायता संपादणें अवश्य आहे. परंतु ईश्वर कांहीं स्वतः मूर्तिमंत होऊन जीवाला फल देत नसतो. जगत्पिता परमात्मा ज्या नियमानुसार जगताचीं सर्व कार्यें चालवीत राहिला आहे, त्याच नियमानुसार तो आपल्या जीवरूप अनंत केंद्रांमधील कोणातरी श्रेष्ठ पुरुषाच्या केंद्रस्थित होऊन गुरुरूपानें जिज्ञासूला साहाय्य करून आध्यात्मिक भूमीच्या खालच्या पायरीवरून वरच्या पायरीवर नेत असतो. ह्या महाकार्यांत, ह्या जीवहितकारी प्रधान कर्मांत, ईश्वर हा कारणभूमि व श्रीगुरु कार्यभूमि होय असें जाणावें; आणि ह्याच कारणामुळें गुरु व गुरुदीक्षा ह्यांची एवढी महिमा आर्यशास्त्रांत गाइली आहे.

गुरुदीक्षेची रीत प्राचीन भारतांत पुष्कळच प्रचलित होती व आतांही ह्या पवित्र भूमीवर कोठें कोठें गुरुदीक्षेची यथार्थ रीत अल्पस्वल्प प्रमाणांत प्रचलित आहेच. परंतु विशेषतः ही रीत लुप्तप्राय होऊन गेली आहे म्हणण्यास हरकत नाहीं. कोठें कोठें तर ही पवित्र रीत स्वार्थांत मिसळून गेल्यामुळें तिला विकृत स्वरूप प्राप्त झालें आहे. ” —हिंदी धर्मकल्पद्रुम, चतुर्थखंड

गुरुमार्ग म्हणजे एक प्रकारची ‘ गुरुबाजी ’ होऊन बसली आहे. अंगांत खरें गुरुपण नसतां भपक्यानें लोकांस फसवून पैसे कमावण्याचा तो एक धंदाच कित्येक दांभिकांनीं आरंभिलेला दृष्टीस पडत आहे. आपल्या गुरुपणाच्या जाळ्यांत बऱ्या बऱ्या लोकांना अडकविण्याकरितां कित्येक गुरूंनीं एजंटही नेमलेले दिसून येतात! शिष्याच्या भाविकपणाचा फायदा घेऊन आपली तुंबडी भरणारे व विषयवासना शमविणारे अथवा वाढविणारे लोकही समाजांत गुरुपणाच्या पेशांत वावरत असतात !!

“ कलियुगीं भयंकर । गुरु भेटती चोर जार ।
करोनियां वेडेचार । भोळे साचार भोंदिती ॥
सुंदर स्त्रीतें पाहून । पूर्वजन्मींची स्त्री म्हणोन ।
उद्वाहसंस्कारावीण । रतिदान देती ते ॥
एक पूर्वजन्मींचे सांगोनि भाऊ । जन्मभर घेती जेवूं ।
एवं फसविती नाना उपावू । करोनियां ॥...

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

... गुरुशिष्यांचे न्याय । चावडीवरी जाती स्वयें ।
भांडण करिती आचार्य । मग ते तोडिती न्यायाधीश ॥
एवं कलीची विचित्र गति । तेथ न लागे कांहींच साधु-उक्ति ।
पैजारपूजा विंचवाप्रतीं । देतां निश्चितीं वदों नये ॥ " इत्यादि

—संप्रदायसुरतरु, अ. २२

पूर्वीचे साधुसंत ज्या पेशानें अथवा ज्या 'बालोन्मत्तपिशाच'-वृत्तीनें वागले तो पेशा व ती वृत्ति दाखवून हे शिष्यवर्गास मोहित करितात. शिष्य बिचारे गुरूला तन-मन-धन अर्पण करणें हें शास्त्रविहित आहे, गुरूचे गुणदोष पाहणें पाप आहे, अशा भावनेनें फसून जातात ! असे गुरु हे समाजाचे व पवित्र गुरुमार्गाचे भयंकर शत्रु होत !

**श्रीसमर्थ** म्हणतात —

" शिष्यास न लाविती साधन । न करविती इंद्रियदमन ।
ऐसे गुरु अडक्याचे तीन । मिळाले तरी त्यजावे ॥
एक द्रव्याचे विकिले । एक शिष्याचे अंकिले ।
अति दुराशेनें केले । दीनरूप ॥
जें जें रुचे शिष्या मनीं । तैसीच करी मनधरणी ।
ऐसी कामना पापिणी । पडली गळां ॥
जो गुरु भीडसारु । तो अधमाहूनि अधम थोरु ।
चोरटा मैंद पामरु । द्रव्यभोंदु ॥
जैसा वैद्य दुराचारी । केली सर्वस्वें बोहरी ।
आणि शेखीं भीड करी । घातघेणा ॥
देखणें दाखविती आदरें । मंत्र फुंकिती कर्णद्वारें ।
इतुकेंच ज्ञान, ते पामरें । अंतरलीं भगवंता ॥

—दासबोध, दशक ५, समास २

**श्रीएकनाथ**महाराज म्हणतात —

" जे का अपेक्षूनियां वित्त । चतुर्वर्णां उपदेशित ।
ते घनलोभें लोलुप येथ । नाहीं घेइजेत गुरुत्वें ॥

********************************************

**जेथ गुरूसीच सलोभता । तेथ शिष्याची बुडे विरक्तता ।**
**ऐशियाचा विरक्तीं उपदेश घेतां । परमार्थता अपघातु ॥ "**

—एकनाथी भागवत अ. २९

अशा दांभिकांच्या वर्तनामुळें खऱ्या सत्पुरुषाच्या वर्तनालाही लोक दोषदृष्टीनें पाहूं लागतात व त्यांच्या सत्समागमास मुकतात !

**गुरवो बहवः सन्ति शिष्यवित्तापहारकाः ।**
**दुर्लभः सद्गुरुर्देवि शिष्यहृत्तापहारकः ॥**

"कलियुगांत शिष्याचें धन हरण करणारे गुरु पुष्कळ आहेत, पण शिष्याचा हृत्ताप हरण करणारे सद्गुरु दुर्लभ होत," असें गुरुगीतेंत शंकर भवानीला सांगतात. ह्याकरितां असें केलें पाहिजे कीं, शिष्यानें म्हणजे मुमुक्षूनें – जिज्ञासूनें प्रथम आपली योग्यता वाढविली पाहिजे. स्वधर्माचरणानें चित्तशुद्धि होऊन, आपल्या त्रिविध-तापांचा नाश व्हावा अशी प्रबळ इच्छा झाली व नंतर त्यानें सद्गुरूचा शोध केला, तर ईश्वरानें व्यापलेल्या ह्या जगांत त्याला योग्य गुरूचें दर्शन झाल्यावांचून राहणार नाहीं हें पक्कें समजावें.

* * *

"गुरूचें प्रयोजन काय आहे ? दुसरें, आध्यात्मिक मार्गांत अग्रेसर होण्याकरितां गुरूवांचून साधक कसा कृतकार्य होऊं शकत नाहीं ? तिसरें, गुरूचें प्रयोजन साधकाला कोठपर्यंत असतें ?" ह्या प्रश्नांचें उत्तर 'गुरु' शब्दाच्या व्युत्पत्तीचा विचार केला असतां जिज्ञासूला उत्तम प्रकारें कळून येईल. गुरुशब्दाची व्युत्पत्ति खालीं लिहिल्याप्रमाणें गुरुगीता व पुराणादि शास्त्रांमध्यें दर्शविली आहे —

**'गु' शब्दस्त्वन्धकारः स्याद् 'रु' शब्दस्तन्निरोधकः ।**
**अन्धकारनिरोधित्वाद् गुरुरित्यभिधीयते ॥**
**गुकारः प्रथमो वर्णो मायादिगुणभासकः ।**
**रुकारो द्वितीयो ब्रह्म मायाभ्रान्तिविमोचकः ॥**
**गकारः सिद्धिदः प्रोक्तो रेफः पापस्य दाहकः ।**
**उकारः शंभुरित्युक्तस्त्रितयात्मा गुरुः स्मृतः ॥**

**भावार्थ**—'गु' शब्दाचा अर्थ अंधकार व 'रु' शब्दाचा अर्थ तमाचा नाश करणारा असा आहे; ह्यामुळें जो अज्ञानाचा नाश करितो, तोच गुरुशब्दवाच्य आहे. गुरुशब्दांतील पहिल्या 'गु' ह्या वर्णानें मायादि गुण प्रकाशित होतात व दुसऱ्या

********************************************

'रु' ह्या वर्णानें मायाजनित भ्रांतीचा नाश करणारें अद्वितीय ब्रह्म बोधलें जातें ह्यामुळें 'गु' शब्द सगुणाचा व 'रु' शब्द निर्गुण अवस्थेचा प्रतिपादक होऊन 'गुरु' शब्द बनला आहे. 'ग'काराचा अर्थ सिद्धिदाता, 'र'काराचा अर्थ पापहर्ता व उकाराचा अर्थ शिव आहे; अर्थात् सिद्धिदाता शिव व पापहर्ता शिव असा अर्थ ग्+उ व र्+उ ह्या शब्दानें बोधित होतो असें समजावें.

तात्पर्य हें सिद्ध होतें कीं, ज्या महापुरुषाच्या कृपेनें अज्ञानांध जीवाचा ज्ञाननेत्र उघडला जाऊन जन्ममरणचक्रांतून जीवाची मुक्तता होते तोच गुरु होय. 'अघटित घटनापटीयसी' मायेच्या भुलवणीनें मुग्ध जीव अनित्य वस्तूच्या ठिकाणीं नित्यता अशुचीमध्यें शुचिता, दुःखमय कामिनीकांचनांत सुखिता व अनात्म्यामध्यें आत्मता मानून अनादिकालापासून संसारचक्रांत (जन्ममरणाच्या फेऱ्यांत) रहाटगाडग्या प्रमाणें परिभ्रमण करीत आहे. त्याला विराम नाहीं, विश्राम नाहीं, शांति नाहीं सुख नाहीं, मृग-मृगजलप्रमाणें सुखाच्या लालसेनें धाव धाव करून अंती दुःखांतच पडतो! आधि-व्याधि-जरा हीं भयंकर वाघिणीप्रमाणें निरंतर गिळून टाकण्याकरितां तयार होऊन राहिलीं आहेत; पुत्रकलत्रादिकांच्या द्वारें अत्यंत पीडित होत असूनही मुग्धमन व दुर्बलचित्त जीवाला संसार सोडण्याची शक्ति नसते भगवच्चरणचिंतनाची इच्छा हृदयगुहेंत होऊनही चित्तनदीची पापवाहिनी धारा सर्व शुभेच्छेला वाहून नेते; मलिनपंकपरिपूर्ण सरोवरांत पडलेल्या वृद्ध हत्तीप्रमाणें संसार पंकांत (संसाररूप चिखलाच्या डबक्यांत) जीव रात्रंदिवस डुबलेला असतो; त्यांतून वर निघण्याची इच्छा आहे, परंतु अंगांत साहस व शक्ति कमी आहे; ह्या प्रकारच्या घोर अशांति व दुःखमय समयीं जर श्रीभगवंताची महाशक्ति कोणा योग्य केंद्राच्या द्वारें प्रकाशित होऊन, मायामुग्ध व संसारपंकनिमग्न जीवाला हात धरून उठवील व त्याच्यासमोर संसाराचें यथार्थ चित्र उभें करून त्याचें दुःखमय संसारांतून रक्षण करील, अविद्यातमसावृत्त चित्तांत ज्ञानसूर्याचा उदय करून नित्यानंदमय सुखदुःखरहित ब्रह्मस्वरूपांत जीवाला चिरकाल प्रस्थापित करील, तर 'गुरु' रूप भगवच्छक्तीच्या विकासकेंद्राचें काय प्रयोजन आहे, असा प्रश्नच हृदयांत उठणार नाहीं. दुःखदावानल दग्ध संसारी जीवाच्या चित्तांत शांति व आनंदाची अमृतधारा सिंचन करणाऱ्या गुरूची ह्याप्रमाणें आवश्यकता आहे.

आतां ह्याप्रमाणें प्रयोजन सिद्ध करून घ्यावयाला जीवाचा स्वकृत पुरुषार्थच पुरे आहे, कीं दुसऱ्या कोणाच्या साहाय्याची आवश्यकता असते, ह्या प्रकारच्या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, रोगग्रस्त मनुष्य आपली चिकित्सा आपण करूं शकत नाहीं

ह्याचें कारण रोग्याला आपला रोग काय आहे ह्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं; दुसरा निरोगी मनुष्यच त्याच्या रोगाचें निदान करूं शकेल. ह्याप्रमाणें जर शारीरिक सामान्य रोगासाठीं आपणाहून भिन्न अशा दुसऱ्या कोणा वैद्याच्या चिकित्सेची आवश्यकता असते, तर मग अनादि कालापासून जीवाच्या 'कारण,' 'सूक्ष्म' (लिंग) व 'स्थूल' शरीराच्या मज्जेमज्जेमध्यें व्यापून राहिलेला जो भवरोग त्याची चिकित्सा, अविद्याग्रस्त विपरीत ज्ञानसंपन्न जीव हा कोणा विकाररहित ज्ञानी महापुरुषाच्या साहाय्यावांचून स्वतः करूं शकेल, अशी कल्पना सर्वथैव युक्तिहीन व मिथ्या आहे. ह्याकरितां अनादि अभ्यासानें उत्पन्न होऊन राहिलेल्या भवरोगाच्या आत्यंतिक निवृत्तीसाठीं भवरोगवैद्य अशा श्रीगुरुदेवाची आवश्यकता असतेच.

**मुण्डकोपनिषदांत —**

**"तद्विज्ञानार्थं गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्"**

**श्वेताश्वतरोपनिषदांतही —**

**"यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनाम्॥"**

**गीतेंत** देखील — **"तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥"**

"ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठीं हातांत समिधा घेऊन श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरूजवळ जावें. ज्याला देवासारखीच गुरूच्या ठिकाणींही उत्कट भक्ति असते, त्यालाच गुरूनें सांगितलेल्या अर्थाचा प्रकाश होत असतो. गुरुभक्तीवांचून ज्ञान प्राप्त होत नाहीं. प्रणिपात, प्रश्न व सेवा ह्यांहींकरून तत्त्वदर्शी संतांकडून ज्ञान प्राप्त करून घेतलें पाहिजे," असें सांगितलें आहे.

ह्यासाठींच श्रीगुरूच्या स्तुतीमध्यें त्यांना 'भवरोगवैद्य' म्हटलें आहे.

**आनंदमानंदकरं प्रसन्नं, ज्ञानस्वरूपं निजबोधरूपं।**
**योगीन्द्रमीड्यं भवरोगवैद्यं, श्रीमद्गुरुं नित्यमहं नमामि॥**

"(स्वतः) आनंदरूप, (दुसऱ्यास) आनंदकारी, अध्यात्मप्रसादयुक्त, ज्ञानस्वरूप, निजबोधरूप, योगेश्वर, पूजार्ह व भवरोगवैद्य अशा श्रीगुरुदेवाला मी प्रणाम करतों." (असा त्या श्लोकाचा अर्थ आहे.) असो.

****************************************

## गुरुवांचूनही ज्ञानसिद्धीचा अधिकार

आतां, साधनाच्या कोणत्या उन्नत अवस्थेंत, भगवच्छक्तिआधाररूप कोणा **मानवीय केन्द्राला गुरु न मानतांहि** साधक आध्यात्मिक राज्यांत **पूर्णाधिकार प्राप्त करून घेऊं शकतो** हें सांगतों. गुरुभक्त शिष्याच्या आध्यात्मिक उन्नतीसाठीं ज्ञानवान् गुरूचें हें कर्तव्य आहे कीं, त्रिविध शुद्धिसाधक असा कर्म, उपासना व ज्ञानाधिकार नीट जाणून शिष्याला योग्य साधन दाखवावें, कीं जेणेंकरून साधक आपल्या प्रकृतीस अनुकूल असा कर्मयोग, उपासनायोग वा ज्ञानयोग ह्याच्या अभ्यासानें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक पूर्णता मिळवून मुक्त होऊन जाईल. जोंपर्यंत साधक ह्या तीन योगमार्गांचा योग्य निर्णय करूं शकणार नाहीं, तोंपर्यंत पूर्ण ज्ञानसंपन्न अशा शरीरधारी गुरूची त्याला जरूर आवश्यकता आहे. परंतु साधनाच्या पराकाष्ठेला पोंचून ज्या वेळीं तो योगिराज साधक, समष्टि व व्यष्टि प्रकृतीमध्यें विराट् भगवंताचें इंगित जाणूं शकतो व तदनुसार आपल्या व्यष्टिसत्तेला समष्टिप्रकृतीच्या कर्मधारेमध्यें मिळवून विश्वजीवनाबरोबर आपलें जीवन एकीभूत करून सोडतो, त्या वेळीं त्या तत्त्वज्ञानी महापुरुषाचा अधिकार असा होतो कीं, शरीरधारी गुरूकडून कर्मयोगाचा निर्देश न घेतां, परमगुरु भगवंताकडूनच प्रत्यक्षपणें कर्मयोगाची तो आज्ञा मिळवितो. ह्याचप्रमाणें राजयोगाच्या पूर्णदशेमध्यें ईश्वरभाव व ब्रह्मभावाबरोबर आपली चित्तवृत्ति विलीन करून, जेव्हां तो सिद्धयोगी आपल्या उपासना व ज्ञानाधिकाराचा निर्णय समष्टि अधिदैव व अध्यात्म-सत्तेच्या साक्षात् इंगितानें ठरवूं शकतो, तेव्हां त्याला शरीरधारी गुरूच्या उपदेशावांचूनच परमगुरु परमात्म्याच्या प्रत्यक्ष प्रेरणेनें परमपदाचें स्वरूप विदित होत असतें. ह्याप्रमाणें कर्म, उपासना व ज्ञानमार्गामध्यें योगिराजाचा अधिकार पूर्णपणें जमून गेला म्हणजे त्याला कोणा मानवीय-केंद्रद्वारा परोक्ष (अप्रत्यक्ष) रूपानें विकसित झालेल्या भगवच्छक्तीच्या साहाय्याची आवश्यकता राहात नाहीं. तो प्रत्यक्षपणें परमगुरु परमात्माच्या द्वाराच साहाय्य व पूर्णताप्राप्तीचा उपाय मिळवूं शकतो व असे पूर्ण ज्ञानी जीवन्मुक्त योगिराजच 'जगद्गुरु' म्हटले जातात. परंतु हा अधिकार फारच मोठा आहे, जो प्राप्त करून घेण्याकरितां पुष्कळ काळपर्यंत शरीरधारी गुरूचीच आराधना व आज्ञापालन करणें भाग असतें. नसलेस साधनमार्गांत पाऊल घसरणें अपरिहार्य आहे.

शास्त्रांत गुरूची स्तुति करतेवेळीं त्याचें परमात्मस्वरूपांतच वर्णन केलें जातें. उदाहरणार्थ :—

**ज्ञानानंदं[1] भवभयहरं[2] केवलं ज्ञानमूर्तिं**
**द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।**
**एकं नित्यं विमलमचलं सर्वदा[3] साक्षिभूतं**
**भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥**

**भावार्थ :** "ज्यांचा आनंद ज्ञानांतच आहे, जे संसारभयाला दूर करणारे व केवळ ज्ञानमूर्ति आहेत, द्वंद्वाहून निराळे, आकाशासारखे निर्लिप्त व विभु ( व्यापक ), तत्त्वमस्यादि महावाक्याचे लक्षीभूत, अद्वितीय, नित्य, अविद्यादि-मलदोषरहित, परिणामरहित, जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ति अवस्थांचे सर्वदा साक्षिरूप, भावातीत व गुणरहित अशा सद्‌गुरूला मी प्रणाम करितों." ह्या स्तुतींतील सर्व विशेषणें परमात्म्याचीं वाचक आहेत. आतां गुरूला परमात्मस्वरूपांत वर्णितात ह्याचें रहस्य काय आहे ह्याचें थोडें दिग्दर्शन करितों.

अविद्याच ज्या अर्थी जीवाला बंधनकारण आहे व ज्ञानसत्तेच्या द्वारें अविद्यानाश होऊन जीवाला मुक्ति व स्वरूपस्थिति प्राप्त होते, त्या अर्थी असें निश्चित होतें कीं, गुरुभावाबरोबर ज्ञानसत्तेचा समवाय-संबंध आहे. **'गुरु' हें रक्त-मांस अथवा स्थूल शरीराचें नांव नव्हे,** तर **गुरु ज्ञानाधिकरणाचें नांव आहे.** जर ज्ञानाधिकरणाचें नांव गुरु आहे, तर अपरिच्छिन्न ज्ञान हेंच ज्याचें स्वरूप आहे, तोच आदिगुरु व सर्वांचा गुरु होऊं शकेल. अपरिच्छिन्न व संशयदोषरहित नित्य ज्ञानाची स्थिति ईश्वरांतच असते, दुसऱ्यांत असूं शकणार नाहीं. कारण कीं, ईश्वर-व्यतिरिक्त सर्ववस्तु परिणामिनी प्रकृतीच्या अंतर्गत असल्यामुळें परिच्छिन्न ज्ञानयुक्त आहेत व ईश्वर हा अविद्यादि पंचक्लेश, कर्म, कर्मफल व संस्कार यांविरहित असल्यामुळें, प्रकृतीच्या पलीकडे असून प्रकृत्यंतर्गत अवस्थात्रयाचा केवल साक्षि व अपरिच्छिन्न असून ज्ञानसंपन्न आहे. ह्यामुळें —

**ईश्वरच सर्वांचा गुरु व आदिगुरु होय.**

ह्यांत संदेह नाहीं. ह्यामुळेंच महर्षि पतंजलीनें योगदर्शनांत —

**तत्र निरतिशयं सर्वज्ञबीजम्**
**स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्**

---

१ ( **पाठभेद** ) 'ब्रह्मानंदं.' २ 'परमसुखदं'. ३ 'सर्वधी.'

असें म्हटलें आहे. ह्याचा अर्थ – ईश्वरांत सर्वज्ञतेचें बीज आहे व तो कालानें अनवच्छिन्न असल्यामुळें समस्त ऋषि-महर्षि व ब्रह्मादि देवांचाही गुरु आहे. कारण ईश्वराव्यतिरिक्त हे सर्व लोक कालानें परिच्छिन्न आहेत. भगवद्गीतेंतही म्हटलें आहे —

**पितासि लोकस्य चराचरस्य,**
**त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ॥**

" परमात्मा सर्व चराचर विश्वाचा पिता, पूज्य, गुरु व गुरूंचाही गुरु आहे. " महाभारतांत अनुगीतेमध्यें म्हटलें आहे —

**अहं गुरुर्महाबाहो मनः शिष्यं च विद्धि मे ।**
**त्वत्प्रीत्या गुह्यमेतच्च कथितं ते धनंजय ॥**

" क्षेत्रज्ञ असा मी ( परमात्माच ) गुरु असून मन हें माझ्या द्वारें बोधनीय असल्यामुळें माझें शिष्य आहे. हेंच गुरुशिष्यांचें गूढ रहस्य आहे. " श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे --

**आचार्यं मां विजानीयान्नावमन्येत कर्हिचित् ।**
**न मर्त्यबुद्ध्याऽसूयेत सर्वदेवमयो गुरुः ॥**

" जगांत गुरु हें माझें स्वरूप आहे असें जाणून केव्हांही गुरूचा अपमान करूं नये ; मनुष्यभावनेनें केव्हांही त्याची असूया करूं नये. कारण गुरु सर्वदेवमय आहे. " रुद्रयामलांत म्हटलें आहे —

**अहं गुरुरहं देवो मंत्रार्थोऽहं न संशयः ।**
**भेदका नरकं यान्ति नानाशास्त्रार्थवर्जिताः ॥**

" मी ( परमात्मा ) च गुरु, मीच देवता व मीच मंत्रार्थ आहें, ह्यांत संशय नको. परमात्मा, गुरु व मंत्र ह्यांमध्यें भेद मानणारे शास्त्रमर्म-ज्ञानहीन मनुष्य नरकास जातात. "

गुरुगीतेंत —

**यादृगस्तीह संबंधो ब्रह्माण्डस्येश्वरेण वै ।**
**तथा क्रियाख्ययोगस्य संबंधो गुरुणा सह ॥**
**दीक्षाविधावीश्वरो वै कारणस्थलमुच्यते ।**
**गुरुः कार्यस्थलं चातो गुरुर्ब्रह्म प्रगीयते ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

" ईश्वराबरोबर ब्रह्मांडाचा जसा संबंध आहे, क्रियायोगाबरोबर गुरूचाही तसाच संबंध आहे. दीक्षाविधानामध्यें ईश्वर कारणस्थल व गुरु कार्यस्थल असल्यामुळें गुरु ब्रह्मरूप आहे."

ह्याप्रमाणें अनेक प्रमाणें शास्त्रामध्यें मिळतात, त्यायोगें असें सिद्ध होतें कीं, ज्ञानस्वरूप परमात्माच गुरुपदवाच्य आहे. परमात्म्याची ही ज्ञानशक्ति 'अधिकारानुसार' सर्व जगांत व्यापून असल्यामुळें लघु-गुरु (लहान-मोठेपणाचें) तारतम्य असणें साहजिक आहे. ह्याकरितां ज्या केंद्राच्या द्वारें परमात्म्याची ज्ञानमयी गुरुशक्ति प्रकट होऊन लघुशक्तियुक्त शिष्याला आकर्षून त्याचा उद्धार करिते, तोच केंद्र मानवजगतामध्यें 'गुरु' नामानें ओळखला जातो. आणि ज्या अर्थीं भगवंताचीच शक्ति गुरुद्वारा प्रगट होऊन शिष्याचा उद्धार करिते, त्या अर्थीं गुरु व भगवंत ह्यांमध्यें कांहींच भेद नाहीं असें समजलें पाहिजे.

श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे —

**'एष वै भगवान् साक्षात् प्रधानपुरुषेश्वरः ।**
**योगेश्वरैर्विमृग्यांघ्रिर्लोको यं मन्यते नरम् ॥**

प्रसंगवशात् '**आचार्य**' व '**गुरु**' शब्दांतील भेद सांगणें अवश्य आहे. शास्त्रांत म्हटलें आहे —

**'आचार्यगुरुशब्दौ द्वौ सदा पर्यायवाचकौ ।**
**कश्चिदर्थगतो भेदो भवत्येव तयोः क्वचित् ॥**
**औपपत्तिकमंशं तु धर्मशास्त्रस्य पंडितः ।**
**व्याचष्टे धर्ममिच्छूनां स आचार्यः प्रकीर्तितः ॥**
**सर्वदर्शी तु यः साधुर्मुमुक्षूणां हिताय वै ।**
**व्याख्याय धर्मशास्त्रांशं क्रियासिद्धिप्रबोधकम् ॥**
**उपासनाविधेः सम्यगीश्वरस्य परात्मनः ।**
**भेदान् प्रशास्ति धर्मज्ञः स गुरुः समुदाहृतः ॥**

"आचार्य व गुरु हे दोन शब्द पर्यायवाचक असले तरी त्यांत कधीं कधीं अर्थगत भेद दिसून येतो. जो विद्वान पुरुष धर्मजिज्ञासूला शास्त्रांतील औपपत्तिक अंश दाखवून देतो त्याला 'आचार्य' ही संज्ञा प्राप्त होते; आणि जो सर्वदर्शी ज्ञानी पुरुष मुमुक्षूच्या हिताकरितां शास्त्रांतील क्रियासिद्धीचें रहस्य दाखवून देतो व

***********************************************
अधिकारभेदानुसार परमात्म्याच्या उपासनाभेदांचा प्रकाश करितो त्याला ' गुरु ' ही संज्ञा प्राप्त होते."

**मनु**संहितेंत म्हटलें आहे —

**उपनीय तु यः शिष्यं वेदमाध्यापयेद्द्विजः ।**
**सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ॥**

"जो ब्राह्मण शिष्याला उपनयनसंस्कार करून यज्ञविद्या व उपनिषदांबरोबर वेदाचें अध्ययन करवितो, त्यास ' आचार्य ' म्हणतात."

त्याच श्रुतींत –" आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः" म्हणजे, आचार्याला यथेप्सित धन दक्षिणारूपानें देऊन समावर्तनसंस्कारानंतर गार्हस्थ धर्माचें अवलंबन करून प्रजोत्पादन करावें, असें सांगितलें आहे. येथें आचार्य शब्द मनुसंहितोक्त आचार्यलक्षणानुसार आहे. परंतु केव्हां केव्हां ' आचार्य ' शब्दाचा उपयोग ' गुरु ' शब्दाच्या तात्पर्यानुसार केला जातो. उदाहरणार्थ श्रुति —

"**आचार्यवान् पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्ये**" **भागवतांत** –"**आचार्यं मां विजानीयात्**" ह्यांमधील आचार्य शब्द ' गुरु ' अर्थाचा बोधक आहे. **आपस्तंब** महर्षि म्हणतात – "**यस्माद्धर्ममाचिनोति स आचार्यः**" ज्याच्या द्वारें धर्मसंग्रह केला जातो तो आचार्य होय.

**या**ज्ञवल्क्यसंहितेंत —

**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम्**

"योगबलानें परमात्म्याचा साक्षात्कार करून घेणें हाच **परमधर्म** होय." तसेंच "**त्रयो धर्मस्कंधाः यज्ञोऽध्ययनं दानमिति**" इत्यादि श्रुतीमध्यें धर्माचा दुसरा भाव अथवा भाग दर्शविला आहे. **यज्ञ, अध्ययन** व **दान** अशा धर्माच्या तीन शाखा आहेत, असा ह्याचा अर्थ आहे. ह्याप्रमाणें ' आचार्य ' व ' गुरु ' शब्द पर्यायवाचक रूपानेंही कोठें कोठें घातलेले आहेत. हेंच आचार्य व गुरु ह्या दोन शब्दांचा व्यवहारभेद व व्यवहारऐक्य ह्यांचें रहस्य आहे.

शास्त्रामध्यें श्रीगुरुदेवाच्या महिमेसंबंधानें अनेकानेक प्रमाणें मिळतात. **मनुसंहितेंत** म्हटलें आहे –" **मातृ**भक्तिद्वारा **भूलोक, पितृ**भक्तिद्वारा **अंतरिक्ष-लोक** व **गुरु**भक्तिद्वारा **ब्रह्मलोक** प्राप्त होत असतो. जो या तिघांचा आदर करितो, त्यास सर्व धर्मांचा आदर केल्याचें श्रेय मिळतें व जो ह्यांचा अनादर करितो, त्याचें

सर्व धर्म निष्फळ होऊन जातात. जो भक्त यावज्जीव गुरुसेवा करूं शकतो, त्याला शाश्वत असें ब्रह्मधाम प्राप्त होतें " इत्यादि.

**महाभारतांत** म्हटलें आहे –" आचार्यांच्या दसपटीनें उपाध्याय, उपाध्यायाच्या दसपटीनें पिता व पित्याच्या अथवा सर्व पृथ्वीच्या दसपटीनें माता पूज्य होय. कारण मातेसमान जगांत कोणीही पूज्य नाहीं. परंतु मातापित्यांहूनही श्रीगुरुदेव अधिक पूज्य आहेत. ह्याचें कारण असें कीं, मातापित्यांच्या द्वारें केवळ नाशवंत असें स्थूल शरीर मिळत असतें; पण श्रीगुरूच्या द्वारें अजर व अमर असें आध्यात्मिक शरीर प्राप्त होतें. पित्याला प्रीतिकर असें कार्य केलें असतां प्रजापति संतुष्ट होतो; मातेला प्रिय अशा कार्यानें पृथ्वीची पूजा होते व गुरूचें प्रिय केल्यानें ब्रह्माची पूजा केल्यासारखी होते. ह्याकरितां मातापिता वगैरे सर्वांहून गुरु पूज्य आहेत. तात्पर्य, श्रीगुरुदेव हे जगांत पूज्यतम होत."

**रुद्रयामल**मध्यें म्हटलें आहे –" गुरूच सर्व जगाचें मूळ व श्रेष्ठ तपाचेंही मूळ आहे. जितेंद्रिय साधक गुरूच्या केवळ प्रसादानेंच मोक्ष मिळवूं शकतो. भक्तिशास्त्रांत गुरुभक्तीची महिमा सर्वांत अधिक आहे. गुरुपूजेवांचून कोटिपुण्येंही व्यर्थ आहेत."

**गुरुगीतेंत** सांगितलें आहे –" अपार संसारसमुद्राच्या पार जाण्यासाठीं श्रीगुरु-चरणकमल ही एकच नौका आहे, तिचा आश्रय केला पाहिजे. गुरु व ब्रह्म ह्यांत किंचितही भेद नाहीं, ह्यांत भेदकल्पना करणें निरर्थक आहे. गुरु हा शिष्याला ज्ञानदान करून सच्चिदानंदसागरांत बुचकळून काढणारा आहे. त्रितापसंतप्त जीवांचा रक्षणकर्ता गुरुदेवच आहे. गुरु सच्चिदानंद ब्रह्मरूप आहे ह्यांत संशय नाहीं. माता-पिता हे जन्म देणारे असल्यामुळें पूज्य आहेत, पण धर्म व अधर्म ह्यांचें ज्ञान करून देणारा गुरूच असल्यामुळें विशेषरूपानें पूज्य आहे. गुरूच पिता, गुरूच माता, गुरूच देव व गुरूच परमगति होय. भगवंत रुष्ट झाला असतां गुरूच रक्षण करूं शकतो, पण गुरु रुष्ट झाला असतां कोणीही रक्षण करूं शकणार नाहीं " इत्यादि.

**तंत्रशास्त्रांत** गुरुमहिमेच्या विषयांत अनेक प्रकारचें वर्णन सांपडतें तें असें – " गुरूच अद्वितीय ब्रह्म, सर्वार्थसाधक, श्रेष्ठतत्त्व होय. सर्व जगत् गुरुमयच आहे. 'गुरु' हा द्व्यक्षरी शब्द ज्याच्या जिव्हाग्रावर राहतो, त्याला कसला मोह व वेदपाठाची तरी त्याला काय आवश्यकता आहे ? गुरूची मूर्तीच ध्यानाचें मूळ, गुरुचरणच पूजेचें मूळ, गुरुवाक्य मंत्राचें मूळ व गुरुकृपा ही सर्व सिद्धीचें मूळ आहे. गुरूच ब्रह्मा, गुरूच विष्णु व गुरूच महेश्वर होय. गुरूच अग्नि व सूर्य असून, गुरूच

समस्त तीर्थ, यज्ञ, दान व तपोरूप आहे. हें सर्व जग गुरुमय आहे. ज्यानें श्रीगुरुचरणाचें पूजन केलें, त्याला सर्व जगाचें पूजन घडलें ; त्याला दानाची, तपाची व अन्य तीर्थसेवनाची काय गरज आहे ? समस्त ब्रह्मांडामध्यें जितकीं म्हणून तीर्थें आहेत, तीं सर्व गुरुचरणाच्या ठिकाणीं वास करितात. जो शिष्य नित्य गुरुपादोदक प्राशन करितो, तो धर्मार्थकाममोक्ष अधिप होतो. गुरुदेवाचा प्रसाद सेवन करण्यानें कोटिजन्मांचें पाप नाहींसें होतें " इत्यादि.

**मनु** भगवान म्हणतात –" ज्याप्रमाणें कुदळीनें खणलें असतां पाणी लागतें, त्याप्रमाणें गुरुगत विद्या गुरुसेवेनें प्राप्त होते."

**गीते**मध्यें भगवान् –" तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । "... " श्रद्धया लभते ज्ञानम् " असेंच सांगतात.

**भागवतांत** सांगितलें आहे –" विषयाचा संकल्प त्यागून **काम जिंकावा,** कामाच्या त्यागानें **क्रोध जिंकावा,** अर्थामध्यें अनर्थाचें मूळ पाहून **लोभ जिंकावा,** तत्त्वविचार करून **भय जिंकावें,** आन्वीक्षिकी विद्येनें ( आत्मानात्म-विचारानें ) **शोक** व **मोह जिंकावे,** महापुरुषाच्या सेवेनें **दंभ जिंकावा,** मौन-धारणानें **योगाचे अंतराय** ( विघ्नसमुदाय ) **जिंकावे,** कामादिकांच्या अनिच्छेनें **हिंसा जिंकावी,** कृपेच्या द्वारें **भूतजन्य दुःख जिंकावें,** समाधीच्या द्वारें **दैवोपसर्गजन्य दुःख जिंकावें,** योगबलानें **देहज-दुःख जिंकावें,** सात्त्विक पदार्थांच्या सेवनानें **निद्रा जिंकावी,** सत्त्वगुणाच्या द्वारें **रजतम जिंकावे** व उपशमाच्या द्वारें **सत्त्वगुण जिंकावा.** परंतु साधकाच्या ठिकाणीं गुरुभक्तीचा उत्कर्ष होईल, तर त्या **केवळ गुरुभक्तीच्या द्वारें** वर सांगितलेल्या **कामक्रोधादि सर्व वृत्ति व दुःखें शीघ्र जिंकतां येतात.** " ह्याप्रकारें गुरुभक्तीची सर्वजयकरी महिमा आर्यशास्त्रांत सांगितली आहे.

**रुद्रयामलांत** पुनः असें सांगितलें आहे कीं –" गुरुभक्तिविवर्जित होऊन सर्वस्वाचें दान केलें, तरी त्याला नरकप्राप्तीच व्हावयाची ; कारण गुरुभक्तिद्वाराच दानफल प्राप्त होत असतें. गुरुभक्तिद्वारा शक्रत्व ( इंद्रत्व ) व अभक्तिद्वारा शूकरत्व ( डुकराची योनि ) प्राप्त होते. भक्तिशास्त्रामध्यें गुरुभक्तीपेक्षां उत्तम कांहींच नाहीं असें सांगितलें आहे. गुरुपूजेवांचून कोटिपुण्येंही वृथा होतात " इत्यादि.

**गुरुगीतेंत** म्हटलें आहे —" गुरुसेवापराङ्मुख असतां देव–गंधर्व–पितर–यक्ष–किन्नर–ऋषि–सिद्धगण कोणीही मुक्त होऊं शकत नाहीं. जे श्रुति व स्मृति आदि

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

शास्त्रें न पढतां गुरुसेवेंत रत असतात, तेही संन्यासी म्हटले जातात ; पण संन्यासाश्रम घेऊन जे गुरुसेवा करीत नाहींत ते केवल वेषधारीच समजावे. केवल गुरुकृपा-प्रसादानें आत्मारामपद प्राप्त होतें. गुरुमार्गाच्या अवलंबनानें आत्मज्ञानाचा उदय होतो. गुरुचरणसेवेच्या द्वारें जीव सकल पापांपासून मुक्त होतो व त्याला सर्व तीर्थ-स्नानाचें फल लाभतें. कोटिकोटि जन्मांमध्यें जप–व्रत–तप व सत्कर्में केल्याचें श्रेय फक्त गुरुदेवाला संतोष केल्यानें प्राप्त होत असतें. ('ज्ञानदेव तु कैवल्यं' असें सांगितलें आहे तरी) **गुरुभक्तीच्या योगें ज्ञानावांचूनही मोक्षपद प्राप्त होऊं शकतें.** गुरूच्या पलीकडे आणखी कांहीं नाहीं. यासाठीं गुरुमार्गावलंबी साधकानें गुरुदेवाचें ध्यान करीत असावें " इत्यादि.

* * *

ह्याप्रकारें सर्व शास्त्रांत गुरुसेवा व गुरुभक्तीचें अपूर्व फल वर्णन केलें आहे. आतां, एतादृश परमेश्वरस्वरूप गुरूजवळ **शिष्याचें वर्तन व कर्तव्यपालन कसें असावें** हें खालीं दिलें आहे.

**भागवतांत** सांगितलें आहे—" साक्षात् भगवद्रूप व ज्ञानदीपप्रदान करणाऱ्या गुरूच्या ठिकाणीं मनुष्यबुद्धि केली असतां त्याची सर्व विद्या 'कुंजरशौचवत्' म्हणजे हत्तीच्या स्नानाप्रमाणें व्यर्थ होते."

**दैवीमीमांसादर्शनमध्यें** म्हटलें आहे—" देवाची प्रतिमा, गुरु व प्रसाद ह्यांमध्यें अनुक्रमें लौकिक, भौतिक व भोगबुद्धि केल्यानें पतन होतें. "

**गुरुगीतेंत** सांगितलें आहे—" गुरूच्या ठिकाणीं मनुष्यबुद्धि, मंत्रामध्यें अक्षरबुद्धि व प्रतिमेंत शिलाबुद्धि करणारा नरकास जातो. "

ह्यासाठीं गुरूपाशीं कर्तव्यनिष्ठेचें आचरण करण्यापूर्वी शिष्याच्या चित्तांत प्रथमतः गुरूच्या ठिकाणीं ईश्वरबुद्धि झाली पाहिजे. आतां आचरणविषयासंबंधानें **मन्वादि** शास्त्रप्रमाण खालीं देतों—

" शिष्यानें गुरूच्या समोर उभें राहावें व अनुज्ञा मिळाल्यानंतर निराळ्या आसनावर बसावें. त्यांच्यासमोर आपलें शरीर वस्त्रानें आच्छादित करून विनयानें व भययुक्त होऊन राहावें. गुरु उभे राहिले असतां शिष्यानें तात्काळ उठावें व गुरूची आज्ञा घेऊन बसावें. ते निजले असतां त्यांची पादसेवा करावी व चालूं लागले असतां त्यांचे मागून चालावें. शरीर, वाचा, बुद्धि, चक्षु आदि इंद्रियें व मन ह्यांचा

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

संयम करून श्रीगुरुदेवाच्या मुखारविंदाकडे पाहात हात जोडून उभें राहावें. सदाचार-संपन्न होऊन शिष्यानें शरीरइंद्रियादिकांचा संयम करून हात जोडून उभें राहावें व गुरूंनीं बसावयास सांगितल्यानंतर बसावें. गुरुसमोर शिष्यानें त्यांच्यापेक्षां वरिष्ठ प्रकारचें अन्न व वरिष्ठ वस्त्र सेवन करूं नये. गुरूच्या पूर्वी शय्येवरून उठावें व ते निजल्यानंतर निजावें. गुरूसमोर गुरूपेक्षां उच्च शय्येवर शिष्यानें निजूं नये व उच्च आसनावर बसूं नये व गुरूसन्मुख प्रतिष्ठित आसन घालून ( मांडीवर मांडी ठेवून वगैरे ) बसूं नये. शिष्यानें गुरूसमोर चपलता, स्त्रीविषयक गोष्टी व अहंकार यांचा त्याग करावा. त्यांनीं विचारल्याशिवाय कांहीं सांगूं नये व ते कांहीं सांगत असतां निषेधूं नये. गुरुमूर्तीचें ध्यान, गुरुनामाचा जप व गुरुआज्ञेचें पालन नित्य करावें, गुरूशिवाय अन्य कोणाचें चिंतन करूं नये. गुरुमुखस्थित परब्रह्मतत्त्व गुरुप्रसादानेंच प्राप्त होत असतें, ह्यासाठीं आपला आश्रम, विद्या, जाति, द्रव्य व कीर्ति ह्यांचा अभिमान टाकून गुरूला शरण असावें. केवल गुरुभक्तिद्वाराच गुरुमुखस्थित विद्या प्राप्त होत असते, ह्याकरितां हरप्रयत्नेंकरून गुरुदेवाची आराधना करणेंच इष्ट आहे. विद्येचें अंग, आसन, मुद्रा, मंत्र, इत्यादि गुरुमुखापासून प्राप्त झाल्यावरच सफल होत असतात. गुरूच्या मागेंही गुरूचें नाम मोठ्यानें उच्चारूं नये. तसेंच त्यांचें बोलणें चालणें व इतर काम करणें यांची अनुकरणचेष्टा करूं नये. जेथें गुरूचें प्रत्यक्ष अथवा पर्यायानें दोषवर्णन अथवा निंदा होईल, तेथें शिष्यानें कानावर हात ठेवावे अथवा तेथून उठून दुसरीकडे जावें. परिवाद म्हणजे प्रत्यक्ष दोषवर्णनानें खरयोनि व निंदेनें कुक्कुटयोनि प्राप्त होते. अन्यायानें गुरुधनभोग केला असतां शिष्याला कृमियोनि व द्वेषानें कीटयोनि प्राप्त होते. गुरूची शय्या, आसन, यान, काष्टपादुका, चर्मपादुका, पीठ, स्नानोदक व छाया हीं शिष्यानें ओलांडूं नयेत. गुरूच्या समोर दुसऱ्याची पूजा व उद्धटपणा, तसेंच उपदेश देणें, शास्त्रव्याख्यान करणें व प्रभुत्व मिरविणें वर्ज्य करावें. जो शिष्य गुरूची पूजा न करितां इष्टदेवाची पूजा करितो, त्याच्या मंत्राचें तेज भैरव हरण करितो. गुरूच्या एकासनावर बसूं नये, गुर्वाज्ञेचें उल्लंघन करूं नये, त्यांना उत्तरास प्रत्युत्तर करूं नये, रात्रंदिवस दासाप्रमाणें त्यांचें आज्ञापालन करावें...गुरूच्या पादुका, वस्त्र, शय्या, भूषण, वगैरे पाहून नमस्कार करावा, त्या वस्तूंचा उपयोग आपण करूं नये. एकाच ग्रामांत वास असतां त्रिकाळ जाऊन गुरूला प्रणाम करावा, एकत्र वास असतां जातां येतां प्रणाम करावा, सात योजनावर गुरु असतां महिन्यांतून एकदा जाऊन प्रणाम करावा, यापेक्षां अधिक दूर गुरु राहिले असतां, ज्या दिशेला ते राहतात त्या दिशेला ( त्यांच्या स्थळाला ) लक्ष्य करून काया-वाचा-मनानें नमस्कार

करावा, गुरूच्या ठिकाणीं कधीं मनुष्यभावना करूं नये. कारण तसें केल्यानें **मंत्र** अथवा पूजेच्या द्वारें कोणतीच सिद्धि प्राप्त होणार नाहीं ... यासाठीं सर्वकर्मनियामक अशा श्रीगुरुदेवाचाच आश्रय करावा (त्याच्या चरणीं शरण राहावें) कारण, **गुरूच सर्व भावांमध्यें अद्वितीय भाव आहे.**" ...

"परम करुणामय, संसारसिंधुतरणीरूप श्रीगुरुदेवाकडे शिष्यानें वागण्याचे हेच (वरील) नियम आहेत. ह्या प्रकारें कर्तव्यसमूहाचें नियमितपणें अनुष्ठान केलें असतां सच्छिष्य लवकरच गुरुकृपापात्र होऊन अनायासानें संसारसमुद्र पार तरून जातो, यांत अणुमात्र संशय नाहीं."

*    *    *

आतां **गुरु व शिष्याचें लक्षण** सांगतों. गुरुगीता व इतर अनेक शास्त्र-पुराणांत सद्‌गुरु–असद्‌गुरु, सत्‌शिष्य–असत्‌शिष्य ह्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांतील थोडींशीं येथें देतों. पैकीं **सद्‌गुरूचें लक्षण** येणेंप्रमाणें :—

**सर्वशास्त्रपरो दक्षः सर्वशास्त्रार्थवित्सदा।**
**सुवचाः सुंदरः स्वंगः कुलीनः शुभदर्शनः॥**
**जितेंद्रियः सत्यवादी ब्राह्मणः शांतमानसः।**
**पितृमातृहिते युक्तः सर्वकर्मपरायणः॥**
**आश्रमी देशवासी च गुरुरेवं विधीयते।**
**पंचतत्त्वविभेदज्ञः पंचभेदां विशेषतः॥**
**सगुणोपासनां यस्तु सम्यग् जानाति कोविदः।**
**चतुष्टयेन भेदेन ब्रह्मणः समुपासनाम्॥**
**गभीरार्थां विजानीते बुधो निर्मलमानसः।**
**सर्वकार्येषु निपुणो जीवन्मुक्तस्त्रितापहृत्।**
**करोति जीवकल्याणं गुरुः श्रेष्ठः स कथ्यते॥**

"सर्व शास्त्रांत पारंगत, चतुर, तत्त्ववेत्ता, मधुर भाषण करणारा, सर्व अंगें सुंदर (अव्यंग) असणारा, सत्कुलोत्पन्न, ज्याला पाहतांच मनाला संतोष वाटेल असा, जितेंद्रिय, सत्यवादी, ब्राह्मण, शांत मनाचा, मातापित्यासमान हित करणारा, आश्रमकर्में पाळणारा, चारी आश्रमांपैकीं कोणत्या तरी एका आश्रमांत असणारा असा व स्वदेशनिवासी (भारतवर्षांतील) गुरु असावा. ह्याप्रमाणें पंचतत्त्वाच्या अनुसारें विष्णु, सूर्य, शक्ति, गणेश व शिव ह्यांची उपासनारूप सगुणोपासनेचें पूर्ण रहस्य जाणणारा,

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तसेंच मंत्रयोग, हठयोग, लययोग व राजयोग ह्या चारी योगांच्या द्वारें निर्गुणोपासना जाणणारा असा ज्ञानी, निर्मलमानस, सर्वकार्यनिपुण, त्रितापहरण करून जीवांचें कल्याण करणारा असा जीवन्मुक्त महात्माच श्रेष्ठ गुरु समजला जातो. "

**सत्-शिष्याचें लक्षण —**

**अलुब्धः स्थिरगात्रश्च आज्ञाकारी जितेंद्रियः ।**
**आस्तिको दृढभक्तश्च गुरौ मंत्रे च दैवते ॥**
**एवंविधो भवेच्छिष्य इतरो दुःखकृद्गुरोः ।**

" लोभरहित, स्थिरगात्र ( म्हणजे ज्याचे अवयव चंचल नसतील असा ), आज्ञाधारक, जितेंद्रिय, आस्तिक व गुरु, देवता आणि मंत्र ह्यांमध्यें दृढभक्ति असणारा अशा प्रकारचा शिष्य दीक्षेचा अधिकारी होय. ह्या गुणांहून विरुद्ध गुणांचा शिष्य गुरूला दुःख देणारा समजावा. "

**निंद्य गुरुलक्षण —**

**श्वित्री चैव गलत्कुष्ठी नेत्ररोगी च वामनः ।**
**कुनखः श्यामदन्तश्च स्त्रीजितो ह्यधिकाङ्गकः ॥**
**हीनाङ्गः कपटी रोगी बह्वाशी बहुजल्पकः ।**
**एतैर्दोषैर्विमुक्तो यः स गुरुः शिष्यसंमतः ॥**

" श्वित्ररोगी ( पांढऱ्या कोडाचा ), गलितकुष्ठ असणारा, नेत्ररोगी, वामन ( खुजा ), नखांत रोग असलेला, काळ्या दांताचा, स्त्रीजित असणारा, कोणतेंही अंग ( अवयव ) जास्त असलेला किंवा कमी असलेला, कपटी स्वभावाचा, रोगी, पुष्कळ खाणारा, अतिशय वाचाळ ह्या दोषांनीं रहित असलेला गुरु हा शिष्याला योग्य होय. "

उपरोक्त लक्षणांनीं युक्त सद्‌गुरु प्राप्त होतांच क्षणाचाही विलंब न करितां शिष्यानें गुरुदीक्षा ग्रहण करावी. कारण कीं, **दीक्षाग्रहणावांचून साधकाचें साधन निष्फळ होतें.** शास्त्रांत सांगितलें आहे —

**दीक्षामूलो जपः सर्वो दीक्षामूलं परंतपः ।**
**सद्गुरोराहिता दीक्षा सर्वकर्माणि साधयेत् ॥**
**अदीक्षिता ये कुर्वन्ति जपपूजादिकाः क्रियाः ।**
**न फलन्ति ध्रुवं तेषां शिलायामुप्तबीजवत् ॥**

**इह दीक्षाविहीनस्य न सिद्धिर्नच सद्गतिः ।**
**तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरुणा दीक्षितो भवेत् ॥**

" दीक्षा ही संपूर्ण जपाची मूळ आहे, तपश्चर्येचें मूळही दीक्षाच आहे ; सद्गुरूपासून मिळविलेली दीक्षा सर्व कर्माला सिद्ध करून देणारी आहे. जो मनुष्य दीक्षा घेतल्यावांचून जपपूजादि कर्में करितो, त्याचीं सर्व कर्में खडकावर पेरलेल्या बीजांप्रमाणें निर्फळ होतात. दीक्षाहीन मनुष्यानें केलेलें सर्व कर्म सिद्धीस जात नाहीं व त्यास सद्गति होत नाहीं. ह्याकरितां हरप्रयत्नेंकरून गुरुपासून दीक्षा घेणेंच योग्य आहे. "
—**हिंदी धर्मकल्पद्रुम** – चतुर्थ खंड.

ह्यानंतर गुरुनें शिष्यास दीक्षा देण्यापूर्वी त्याची परीक्षा कशी करावी, शिष्य, दीक्षेस पात्र ठरल्यानंतर त्यास ' निद्रामंत्र ' देऊन त्याला पडलेल्या स्वप्नावरून सिद्धि कशी काय होईल व किती दिवसांत होईल हें कसें जाणावें, दीक्षा कोण वारीं, कोणत्या मासीं, कोणत्या पक्षीं, कोणत्या तिथीला, कोणत्या नक्षत्रावर, कोणत्या लग्नीं व कोणत्या स्थळीं द्यावी, ह्याचा विचार ह्या हिंदी ' धर्मकल्पद्रुम ' ग्रंथांत विस्तृतपणें केलेला आहे, तो जिज्ञासूंनीं त्या ग्रंथांतच पाहून घ्यावा. विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं.

* * *

सत् व असत् गुरूचीं लक्षणें, सच्छिष्य व असच्छिष्य ह्यांचीं लक्षणें, गुरुसेवेचें माहात्म्य, इत्यादि विषय आमच्या महाराष्ट्रीय संतांच्या ग्रंथांतही पहावयास सांपडतो.* पण त्या सर्वापेक्षां श्रीगुलाबराव महाराजांच्या ' **संप्रदाय–सुरतरु** ' नामक ग्रंथांत फारच विस्तृत व पद्धतशीरपणें दिलेला आहे. हरीचे अवतार व हरिनाम हीं ब्रह्माचीं ' **अनध्यस्तविवर्त** ' रूपें होत. त्याचप्रमाणें गुरुही ब्रह्माचें अनध्यस्तविवर्तरूप होय

* महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विद्वान् व परमगुरुभक्त महाशय **रा. द. रानडे**, एम्. ए., ह्यांनीं ' **अध्यात्मग्रंथमाला** ' नामक पुस्तकसमुदायांत – श्रीज्ञानेश्वरवचनामृत, संतवचनामृत, एकनाथवचनामृत व रामदासवचनामृत अशीं, समुद्रमंथन करून काढलेल्या अमूल्य रत्नांप्रमाणें चार पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत, त्यात हीं गुरुशिष्यलक्षणें – सत्गुरु, असत्गुरु, सत्शिष्य असत्शिष्य ह्यांचीं वर्णनें – संतांच्या अमोघ वाणीची एकत्र करून दिलेलीं सांपडतील. तीं वाचकांनीं अवश्य वाचून पहावीं. त्यांतील इतर अध्यात्मविषयसुद्धा, संतांचे ते ते मूळ ग्रंथ वाचूनही, जे पदरीं पडणार नाहींत, ते या सारभूत ग्रंथांमधून सहज पदरीं व वचनीं पडतील अशी ह्याची सुंदर रचना आहे. मुमुक्षूंनीं हीं पुस्तकें अवश्य वाचावीं अशी आम्ही शिफारस करितों.

अर्से प्रतिपादन करून, श्रीगुरु–आविर्भवन–प्रक्रियानिरूपण केलें आहे. श्रीगुरूच्या ठिकाणीं विकाराभास दिसतो त्याचें सदृष्टांत कारण सांगून, 'दोषव्यावृत्तिपूर्वक ब्रह्म-दृष्टि' करण्याची युक्ति सांगितली आहे. भक्ति ही देवाची असो किंवा गुरूची असो, तींत **लालन, वात्सल्य व माधुर्य** ह्या तीन प्रकारच्या संबंधांपैकीं आपल्या अधिका-रानुसार कोणती तरी एक 'संबंधभावना' धरून भक्ति करावी; मात्र स्त्रियांनीं 'माधुर्य' भक्ति गुरूच्या ठिकाणीं करूं नये, असें निक्षून सांगितलें आहे. 'माधुर्य-भक्ति' म्हणजे राधा-रुक्मिणी इत्यादिकांची श्रीकृष्णाचे ठिकाणी कान्तकान्ता भाव-नेची भक्ति होती ती. अर्थात् महद्भाग्यानें जिला विवाहित पतीच श्रीगुरुस्थानीं लाभला असेल, तिनें खुशाल 'गुरुमाधुर्य' करावें, अशी गोड सूचना महाराजांनी देऊन ठेविली आहे. ती स्त्रियांनीं लक्षांत ठेवावी.

**ज्ञानहीन गुरूचा त्याग** शास्त्रांत सांगितला आहे, जनकादिकांनीं तसें केल्याचें उदाहरणही आहे. 'गुरोरप्यवलिप्तस्य०' ह्या स्कंदपुराणांतील वचनाप्रमाणें उत्पथ-गामी गुरूचा त्याग करणें योग्य आहे, ज्ञानलुब्ध शिष्यांनीं अल्पज्ञ गुरूचा त्याग करावा असें रुद्रयामलकुलार्णवांत वचन आहे, वगैरे शंका उद्धृत करून त्याचें महा-राजांनीं विस्तारवाणीनें समाधान केलें आहे, तें मनन करण्यासारखें असल्यामुळें सारांशानें येथें देतों :—

**" याज्ञवल्क्यें गुरु त्यागिला । परी वेद ओकोनि दीधला ।**
**मग एका शिष्यें गिळिला । 'तैत्तरीय' उपजला तेथोनि ॥**
**हें *'आधिकारिकांसी' च शोभलें । तैसें सामर्थ्य जया आलें ।**
**तयासीचि गुरु त्यागणें बोलिलें । येर ते पडती महानरकीं ॥**
**विश्वामित्राची कथा ऐकोन । जैसे शुद्र होऊं पहाती ब्राह्मण ।**
**परी विश्वामित्राचें अनुष्ठान । नेणती कामिनीपूजक हे ॥**

* 'यावदधिकारमवस्थितिराधिकारिकाणाम्' (ब्र. सू. ३।३।३२) ह्या सूत्रा-प्रमाणें 'आधिकारिक' कोटींतील जीवन्मुक्त निराळे व साधे जीवन्मुक्त निराळे. साध्या जीवन्मुक्तांना पुनर्जन्म नसतो, पण आ० कोटींतील जीवन्मुक्तांना विशिष्ट सृष्टिकार्य साधण्याकरितां ईश्वर-आज्ञेनें पुनः पुनः जन्म घ्यावे लागतात. धर्मसंस्थापनेसाठीं ईश्वराचे अवतार होतात, त्याप्रमाणें आ० जीवन्मुक्तांचे जन्म, अवतारतुल्य म्हणजे 'दिव्य' असल्यामुळें ते त्यांना बाधक होत नाहींत. सरकारी कामदार व राज्यांतील इतर लोक हे सरकारची प्रजाच; पण सामान्य प्रजेपेक्षां त्यांचा दर्जा मोठा असतो.

तैसीच येथली रीति । कलींत पशुजन स्वतंत्र वागूं इच्छिती ।
धर्मासचि भार मानिती । त्यासी गुरुमूर्ति रुचेल केवीं ॥
पुनर्विवाहिता कामिनी । तियेसी भेटली जारिणी ।
मग पतिपूजेचा मिळोनी । चालविला निषेधु ॥
तैसे संसारीं आसक्त । परस्पर मिसळती काकवत ।
मग गुरुदोष पाहती अखंडित । तयांचें वचन प्रमाण कैसें ॥
आपण दुसरिया फसविती । गुरूनें फसविलें म्हणोनि रडती ।
ऐसियासाठीं श्रीपति । ढोंगी गुरूस निर्मितो ॥
जेणें दैत्यांस मोहाया निर्मिली सुरा । जो बाईल होऊनि गेला विरोचनाच्या घरा ।
तो या लौकिका ठकां अचतुरां । ठकवाया महाठक ॥
सच्छिष्यही फसेल म्हणोन । लोभी गुरूंचें दोषदर्शन ।
एरव्हीं फसला (म्ह. भोळेपणानें फसला तर) तयाकारण । श्रद्धा फलदात्री ॥
लोकफसव्यासी फसवावया । फसव्या गुरूची उत्तम चर्या ।
ते तंव प्रशंसा करावया । पात्रचि आहे ॥
जैसा वेश्यांच्या गृहीं । ठेका ठेविती नानकशाही ।
तैसा फसव्या जनावरी लवलाही । फसव्या गुरूंचा ठेका न चुके ॥
सुरा पिणाऱ्या शिष्यासी वेळे । सुरापी गुरूचा शापही फळे ।
उत्तम शिष्यासी न फळे । अधम गुरुशाप ॥
गुरुशिष्यसमवर्तनी । तेथ गुरुचि श्रेष्ठ शास्त्रवाणी ।
स्वमाता भोगावी वेश्यापुत्रांनीं । हें शास्त्रसंमत नाहीं कीं ॥
म्हणोनि मूर्ख जनभीड न धरावी । योग्य सत्क्रिया करावी ।
धर्म स्थापितां आदरावी । उत्तम दिशा । ” इत्यादि.

वरील ओव्यांमधील महाराजांची विनोदयुक्त निःस्पृहता लक्षांत घेण्यासारखी आहे. ‘ ढोंगी गुरूंची साथ ’ हल्लींच म्हणण्यापेक्षां पूर्वीपासूनचीच आहे. श्रीतुकारामादिकांचे त्यावर कडक शेरे सांपडतात. आद्यशंकराचार्यांच्या वेळींही ती होतीच. पण गुरुमार्गांतच हा ढोंगीपणा आहे अशी ओरड कां करावी हें समजत नाहीं. ढोंगीपणा नाहीं कोणांत—कोणत्या मार्गांत व कोणत्या वर्गात ? वकील, डॉक्टर, व्यापारी, शेतकरी, गवई, हवई, जमीनदार, कारखानदार, हुजूर, मजूर, देवार्चक, देशा-

र्चक, इत्यादि सर्व वर्गांमध्यें ढोंगी व्यक्ति आढळतातच ! स्वतः शीलभ्रष्ट असून समाजांत प्रतिष्ठितपणें वावरण्याबद्दल यांचा हातखंडा असतो. दुसऱ्याच्या अज्ञानाचा अथवा भोळेपणाचा फायदा घेऊन त्यांना फसवून आपला तळीराम गार करण्याचा यांचा प्रयत्न नेहमीं चाललेला असतोच. वर उल्लेखिलेल्या वर्गांतील लोकांशीं प्रसंग येतो, तेव्हां त्यांतही सज्जन व प्रामाणिक व्यक्तींशीं गांठ पडणें, हें आपल्या पुण्याईचें किंवा ईश्वरकृपेचें फळ असतें. उगाच गुरुमार्गावर तोंडसुख घेण्यांत कसला पुरुषार्थ ? श्रद्धा व विश्वास ठेवल्याशिवाय सामान्य व्यवहारही होऊं शकत नाहीं, मग परमार्थ कसा होईल ? कोणत्याही वकीलाकडे खटला सोंपवायचा झाल्यास तो हा खटला जिंकेल अशी श्रद्धा ठेवावी लागते ; कोणत्याही डॉक्टरचें औषध घ्यावयाचें अथवा द्यावयाचें झाल्यास ह्यापासून रोग बरा होईल अशी श्रद्धा प्रथम ठेवावी लागते ; कोणत्याही धन्याचीं नोकरी करावयाची झाल्यास अथवा धन्यानें आपल्या कामावर नोकर ठेवावयाचा झाल्यास हा आपल्यास दगा देणार नाहीं अशी श्रद्धा बाळगावी लागते ; त्याचप्रमाणें शेतकऱ्यांनीं शेतांत म्हणजे मातींत खंडोगणती धान्य पेरतांना ह्यापासून आपणास शतपटीनें पीक येईल ( एका दाण्यास शंभर दाणे उगवतील ) असा विश्वास बाळगला पाहिजेच. मग आपल्या प्रारब्धाप्रमाणें पुढं अनुभव कसाही येवो, पण प्रथम श्रद्धा व विश्वास धरल्याशिवाय गत्यंतर नाहीं. थोड्याशा विनोदानें मला असेंही म्हणावेंसे वाटतें कीं, जे लोक ईश्वरप्राप्तीच्या उद्देशानें गुरूला भजण्यास अर्थात् दुसऱ्याचें गुरुत्व ( पूज्यत्व ) आपल्या डोकीवर घेण्यास तयार नसतात, त्यांना बड्या साहेबाचें, जुलमी अधिकाऱ्याचें किंवा खाष्ट बायकोचें गुरुत्व ( वजन ) डोकीवर घेऊन, त्या भारानें प्रपंचांत मान वांकवावी लागते. निसर्गदेवतेचा हा एक प्रकारचा त्यांना शापच लागतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याकरितां निसर्गाधीश्वर परमेश्वराच्या प्राप्तीच्या उद्देशानें जे परमेश्वरस्वरूप श्रीगुरूच्या चरणीं शरण जातील म्हणजे मान वांकवितील, त्यांना क्षुद्र मानवांच्या चरणीं मान वांकविणेचा प्रसंग येणार नाहीं. पण ही शरणागति शास्त्रोक्त व त्रिकरणपुरःसर झाली पाहिजे. ह्या शरणागतीचा भार परमेश्वरावर पडतो व तो दयाघन प्रभु त्या भक्ताला सर्व बाजूनें सांभाळून उन्नतीस पोचवितो. असो.

* * *

**चिकित्सक व संशयखोर बुद्धीचा मनुष्य आपल्यास अनुकूल अशीं संतांचीं वचनें हुडकून काढून गुरुमार्गावर टीका करीत असतो.**

**********************************************

**(१) " मेघवृष्टीनें करावा उपदेश । परी गुरूनें न करावा शिष्य ।**
**(कारण) वांटा लाभे त्यास । केल्या अर्ध कर्माचा ॥ "**

**(२) " गुरुशिष्यपण । हें तों अधम लक्षण ॥**
**भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दूसरा ॥ "**

**(३) " शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखे ॥**
**त्याचा फळे उपदेश । इतरां दोष उफराटे ॥ "**

**(४) " घालूनि मध्यवर्ती (मध्यस्थी) दाटूनि उपदेश देती ॥**
**ऐसे पोटभरे संत । तया कैंचा भगवंत ॥ "**

**(५) " गुरुमार्गामुळें भ्रष्ट सर्वकाळ । नाहीं यातिकूळ परब्रह्मीं ॥ ...**
**इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥**
**नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥**
**तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण**
**जाणती संत ॥ "**

अशीं हीं श्रीतुकारामादिकांचीं वचनें श्रीगुरुमार्गावरील केर झाडून टाकणारीं आहेत हें न जाणतां, हीं वचनें गुरुमार्ग बुजवून टाकणारीं आहेत असें समजतात व आपणच आपल्या पायावर दगड घालून घेतात ! वरील वचनें गुरूला ' गुरुधर्म ' शिकविणारीं आहेत, तीं शिष्यांनीं घेतां कामा नये. तसें केलें असतां ' धर्म-व्यभिचार ' होतो. ' पत्नीनें पतीची आज्ञा पाळावी, अवज्ञा कधींही करूं नये, ' हा पत्नीचा धर्म पत्नीनें उपासिला पाहिजे व ' पतीनें पत्नीचें अन्नवस्त्रादि देऊन लालनपालन केलें पाहिजे, तिला गृहलक्ष्मी समजून योग्य मान दिला पाहिजे, ' हा ' पतिधर्म ' पतीनें उपासिला पाहिजे, तरच व्यवहार सरळ चालून त्या घरांत आनंद नांदेल. तसें न करितां आपण कसाही वागलों तरी पत्नीनें ' ब्र ' काढतां कामा नये असें पति म्हणूं लागला ( अर्थात् ' पत्नीधर्म ' पति आपल्या चित्तांत वागवूं लागला ) ; व मला पाहिजे तसलें तुम्ही लुगडें आणून देत नाहीं, अमुक दागिना अजून देत नाहीं तर कशाला बाशिंगाचे गोंडे हालविले होते असें पत्नी म्हणूं लागली ( अर्थात् ' पतिधर्म ' पत्नी आपल्या चित्तांत वागवूं लागली ) म्हणजे आला तंटा ! ह्यालाच ' धर्मव्यभिचार ' म्हणतात ! पिता-पुत्र, स्वामी-सेवक, राजा-प्रजा ह्यांच्यामध्येंही असाच धर्मव्यभिचार चालून, एकमेकांमध्यें घर्षण ( Friction ) सुरू होतें, अशांति माजते व सुखाचा ऱ्हास होतो. ह्याकरितां असें न होऊं देण्याबद्दल काळजी घेतली पाहिजे. **प्रत्येकानें आपला धर्म आपण पाळण्याबद्दल जपलें पाहिजे.** तसें न

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

केल्यास निसर्ग त्याला तो पाळवयास लावील. प्रस्तुत प्रसंगीं एवढेंच सांगावयाचें कीं, वरील श्रीतुकाराम महाराजांचे अभंग वाचून गुरुसंप्रदाय म्हणजे ' गुरुबाजी ' असें म्हणून त्या आधारानें जो गुरुसंस्थेची निंदा करूं लागेल, तो देवद्रोही, शास्त्रद्रोही व संतद्रोही होऊन नरकाचा अधिकारी होईल. श्रीगुलाबरावमहाराजांनीं वरील अभंग वादीच्या मुखें उच्चारून, त्याचें विस्तृत विवेचन करून उत्तम समाधान दिलें आहे, ( तें जिज्ञासूंनीं त्याच ग्रंथांत पाहून घ्यावें, विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. ) त्यानंतर " सद्‌गुरूवांचूनी सांपडेना सोय० "...

**" आधीं पूजा सद्गुरुनाथा । चाले देवावरी सत्ता ॥**
**तुका गर्जतो पवाडे । पहातां गुरुभक्त थोडे ॥ "...**
**" सकळ देवाचें दैवत । सद्गुरुनाथ एकला ॥**
**राम केला ब्रह्मज्ञानी । वशिष्ठ मुनी तारक ॥**
**कृष्णगुरु संदीपन । ब्रह्म पूर्ण दाविलें ॥**
**तुका म्हणे सद्गुरुसेवा । सकळ देवा वरिष्ठ ॥ "**

असें त्याच तुकोबांनीं म्हटलेलें पुढें दिलें आहे.

भोंदू अथवा अयोग्य गुरु आपणास न मिळतां योग्य गुरु कसा मिळेल याविषयींची एक प्रक्रिया ( साधन ) आपल्या ग्रंथांत सांगून, गुरूचे ' प्रारब्धदोष ' अथवा ' लीलाविहार ' सच्छिष्याला सेवेंत प्रतिबंध आणीत नाहींत असें प्रतिपादन केलें आहे.

**" नवल असच्छिष्य रीति । सप्रेमें पूजी जडमूर्ति ।**
**जडत्वदोषाची व्यावृत्ति । करूनियां ॥**
**आणि श्रीगुरु सचेतन । दोषव्यावर्तनें न घडे तद्भजन ।**
**जे विश्वासाचें निधान । न केलें म्हणोनि ॥......**
**जेवीं तारक विष्णुबुद्धि । शालिग्राम शिला न निरोधी ।**
**तेवीं अपरोक्ष संबोधक श्रीगुरुबुद्धि । बाह्य दोषाभासादि निरोधीना ॥** " इत्यादि. — संप्रदाय-सुरतरु, अ. ३

कोणीही गुरु होतो ह्याविषयीं आगमादि प्रमाणें देऊन विरोधी वचनांची व्यवस्था लाविली आहे. सद्गुरुवचनावरील श्रद्धेचा महिमा, मृदुविश्वास व तीव्रविश्वासाचें फळ, गुरुलक्षणें व शिष्यलक्षणें (" सदेह **शुद्ध**सत्त्वावच्छिन्न । निर्गुण चेतन ' गुरु ' लक्षण। सदेह **मिश्र**सत्त्वावच्छिन्न। चेतन ' शिष्य ' बोलिजे ॥ " इ० — ( सं. सु., अ. १० ) विस्तारानें सांगून, गुरूनें शिष्याची परीक्षा कशी करावी

त्याचा अधिकार जाणून घेऊन त्यास कोणत्या मंत्राची दीक्षा द्यावी, त्याची उपास्य-देवता, जन्मांतरची इष्टदेवता कशी ओळखावी, शिष्याचा ओढा एका देवतेकडे व गुरूनें दुसऱ्याच देवतेचा मंत्र दिला तर कसें करावें, ( या गोष्टीचा विचार मात्र पुढें 'नामयोगरहस्य' प्रकरणांत विस्तारानें दिला जाईल ), गुरु हे शुद्धसत्त्वगुणी व गुणातीत आणि लक्षणातीतही असतात, गुरूची देहवृत्ति ही 'दैवानुसारिणी' व 'लीलानुसारिणी' ही असते; शिष्याचा उत्तम, मध्यम व कनिष्ठ अधिकार ओळखून त्यास त्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें कसें बोधावें, वगैरे विस्तारपूर्वक सांगितलें आहे. निर्लोभ गुरूच्या अभावीं सच्छिष्याकरितां भैरवविधि सांगितला आहे, ( हा विधि गौण असला तरी या विधीनें मंत्रग्रहण श्रेयस्कर आहे ), ईश्वर हा 'परोक्ष' व गुरु हा 'अपरोक्ष' असून, **सर्वज्ञ गुरूपेक्षां अल्पज्ञ गुरूच श्रेष्ठ** आहे असें वर्णिलें आहे:—

**" एका मूर्खांचिये मनीं । गुरु सर्वज्ञ असावा म्हणुनी ।**
**परी मिथ्या जगतीं कोणीं । सर्वज्ञता मिरवावी ॥**
**गुरु जितुका अल्पज्ञ असेल । तितुका तो अधिक शोभेल ।**
**कारण जयाच्या ज्ञाना अल्प बोल । तोचि 'उत्तम' अधिकारी ॥ "**

कारण —

**" श्लोकेन च तदर्धेन श्लोकपादेन वा यदि ।**
**ब्रह्मज्ञानं भवेद्यस्य क्षीणं तस्य प्रयोजनम् "**

— बृहदारण्यवार्तिक

याप्रमाणें गुरु अल्पज्ञ असला तरी चालेल, पण मूर्ख नसावा व भोंदूही नसावा; गुरूनें शिष्याचे अपराध सहन करूं नयेत; गुरु घरीं चालत आला पाहिजे व आपण होऊन बोध केला पाहिजे, त्यांतील पटेल तेवढें आम्ही घेऊं, बाकीचें सोडून देऊं असें म्हणणाऱ्या शिष्याच्या घरीं गुरूनें जाऊं नये; तसेंच शिष्यानें ज्ञानहीन गुरु करूं नये, चुकून मिळाला तरी त्यागावा, कारण —

**" ज्ञानीच गुरु बोलिला निश्चितीं । इतर गुरुचि न होती ।**
**तरी ते त्यागितां दोष काय ॥......**
**यद्यपि अल्पवाक्यें ज्ञान जया । तो म्हणिजे उत्तम अधिकारिया ।**
**येणें अनुमानें श्रीगुरुराया । अल्पज्ञत्व भूषणचि ॥**
**तथापि सिद्धान्तप्रक्रिया पाहिजे निश्चित । सानुभवागमपर चित्त ।**
**आणि सच्छिष्यातें प्रतीत । होआवी ज्ञानाची ॥**

*************************************************

**मग तर्किकाचें समाधान । हो न हो नाहीं प्रयोजन । " इ०**

तसेंच चमत्कार किंवा करामती दाखविणें हें गुरूचें लक्षण नसून ' शिष्याचें बुद्धिवर्धन करणें ' हेंच मुख्य लक्षण आहे :—

**" चमत्कार दाखविणें । तरी ते घडे मायागुणें ।**
**माया तुच्छ या शब्दाविणें । आन उपाय नसे मोक्षा ॥**
**म्हणोनि नाना उपायेंकरून । ' शरण आलियाचें बुद्धिवर्धन ।**
**हेंचि मुख्य श्रीगुरुलक्षण ' । सर्वज्ञात्माचार्य सांगती ॥ —**
**' एतदेवहि दयालुलक्षणं यद्विनेयजनबुद्धिवर्धनम् '**

— संक्षेपशारीरक, अ. ४, श्लो. ३ उत्तरार्ध

**चमत्कार दाखविणें । एथ दुसरियासी न्यून पाहणें ।**
**बुद्धि वाढविलियाविणें । आपणाऐसें करणें न घडे ॥**
**म्हणोनि सद्गुरु तोचि आधीं । जो वाढवी शिष्याची बुद्धि ।**
**जयाचा तयासि आत्मनिधि । देतां त्रिशुद्धि काय गर्व ॥...**
**गुरु गर्वें देहाभिमानी झाला । आणि शिष्य गर्वें काय मोक्षा गेला ।**
**यालागीं गर्व अवघियाला । नाशचि करी ॥**
**तथापि गुरुगर्वाचे ठायीं । ज्ञान असतां बाध नाहीं ।**
**शिष्य साधक म्हणुनि तया कांहीं । गर्व लवलाही नसावा ॥ "...**
**" एरव्हीं कलीची रीति । शिष्य आपण उत्पथी ।**
**तया निग्रहितां गुरुमूर्ती । मूर्ख इच्छिती त्याग करूं ॥**
**प्रऱ्हादाचें उदाहरण । उत्पथग (मनसोक्त वागणारे) पुत्र देती आपण । ( आणि ) धर्मव्याधाचें उदाहरण । बाप देती सकळांतें ॥**
**पति स्त्रियेकारण । देती अरुंधतीचें उदाहरण ।**
**स्त्रियाही पतिकारण । गोपींचें उदाहरण देती ॥**
**गुरु उत्तंकाचें उदाहरण देती । शिष्य याज्ञवल्क्याचें उदाहरण घेती । "**

असें पुष्कळ मतलबी शिष्य व गुरु करीत असतात. ( यालाच मागें सांगितल्याप्रमाणें ' धर्मव्यभिचार ' म्हणतात. ) हें आपलें आपल्यालाच फसविणें आहे. यापासून खरें कल्याण साधणार नाहीं.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

केव्हां केव्हां गुरूलाही शिष्य लफंगे, मूर्ख व नादान मिळतात ; आणि हा अनुभव अगदीं प्राचीन काळापासून आहे ; हें श्रीतुकाराममहाराजांच्या खालील अभंगांवरून समजून येईल.

**" भाग्यासाठीं गुरु केला । नाहीं आम्हांसी फळला ॥ १ ॥**
**याचा मंत्र पडतां कानीं । आमच्या पेवांत गेलें पाणी ॥ २ ॥**
**गुरु केला घरवासी । आमच्या चुकल्या गाई म्हशी ॥ ३ ॥**
**स्वामी आपुली बुटबुट[1] घ्यावी । आमुची प्रताप[2] टाकून द्यावी ॥४॥ तुका म्हणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥५॥"**
**" आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप द्यावी ॥ १ ॥**
**आपला मंत्र नव्हे बरा । माझा बैल चुकला मोरा ॥ २ ॥**
**तुका म्हणे ऐशा नरा । परिस[3] न झोंबे खापरा ॥ ३ ॥**

अशा शिष्यांचा श्रीसमर्थांनाही अनुभव आलेला त्यांच्या चरित्रांत नमूद आहे. श्रीएकनाथमहाराजही रजोगुणी शिष्याविषयीं सांगतांना म्हणतात :—

**" मंत्र घ्यावा अभिलाखें । जेणें सन्मान होय लौकिकें ॥**
**ज्याचा सुगरावा थोर देखे । त्याचा मंत्र आवश्यकें आदरी ॥ "**

—ए. भागवत, अ. १३

नवऱ्याला चांगली बायको मिळणें व बायकोला चांगला नवरा मिळणें, तसेंच बापाला चांगला मुलगा व मुलाला चांगला बाप, किंवा धन्याला चांगला नोकर व नोकराला चांगला धनी लाभणें हें जसें त्याच्या त्याच्या पूर्व पुण्याईवर अवलंबून असतें, तसेंच गुरूलाही चांगला शिष्य व शिष्याला चांगला गुरु मिळणें हें त्यांच्या त्यांच्या पुण्याईवरच अवलंबून असतें. आतां असेंही आढळून येतें कीं, प्रारब्धानें चांगला गुरु मिळाला तरी त्याच्या ठिकाणीं शिष्याचा चांगला भाव उत्पन्न होत नाहीं. 'भाव' ही एक अजब चीज आहे. रानांतील वेळू कसा तरी वाढत जातो ; पण त्यास पालखीचा दांडा बनवायाचा असल्यास त्या विशिष्ट वळणाचीं नळकांडीं तयार करून त्यांतून त्या वेळूस युक्तीनें वाढवितात, मग तो देवाच्या डोकीवर बसणारा पालखीचा दांडा तयार होतो ; त्याप्रमाणें पितृभाव, पतिभाव, गुरुभाव, या भावांस

---

१ गुरूनें दिलेला मंत्र. २ गुरूस दिलेली दक्षिणा. ३ परिसापासून लोखंडाचें सोनें होतें, खापराचें सोनें होत नाहीं.

****************************** ****************

शास्त्रांनीं विशिष्ट वळणें लावून पराकाष्ठेचें उत्कृष्ट रूप देऊन ठेविलें आहे. (याविषयींचें स्पष्टीकरण मागें मन्वादि शास्त्रप्रमाणें देऊन केलेलें आहे व पुढें 'भाव आणि भक्ति' या प्रकरणांत थोडेंसें केलें जाईल.) तूर्त एवढेंच सांगावयाचें कीं, सद्गुरूचें शास्त्रोक्त स्वरूप जाणून घेऊन शास्त्रोक्त रीत्या त्याचें भजन करावें, म्हणजे त्याचें शास्त्रोक्त फळ मिळाल्यावांचून राहाणार नाहीं.

**" केवळ चैतन्यघन । तें सद्गुरुस्वरूप जाण ।**
**त्याचें करावें निजध्यान । अनुसंधान नित्यनिष्ठा ॥**
**पंचभूत देहाची मूस । तेथ वोतिला ब्रह्मरस ।**
**गुरुस्वरूप तें सविलास । ध्यान रात्रंदिवस करावें त्याचें ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. १३

**" जे गुरुचरणींचे अंकिले । जे गुरुवाक्या जीवें विकिले ।**
**सद्गुरूलागीं वहिले । सर्वस्व आपुलें ओंवाळिती ॥**
**जो सद्गुरूच्या बोलावरी । जीविताची कुरवंडी करी ।**
**जो गुरुआज्ञेबाहेरी । तिळभरी हों न शके ॥**
**सद्गुरूतें मनुष्यबुद्धीं । पाहोंचि नेणे जो त्रिशुद्धीं ।**
**सेवेलागीं निरवधि । हर्षानंदीं तत्पर ॥**
**उंच अथवा नीच काम । म्हणों नेणे मनोधर्म ।**
**गौण करोनि नित्यकर्म । मानी उत्तमोत्तम गुरुसेवा ॥ "**
**" माझ्या इंद्रियवृत्ति चाळिता । सद्गुरु निजात्मा मज आंतौता ।**
**बाह्यसेवेलागीं सर्वथा । ब्रह्ममूर्ति तत्त्वता सद्गुरु मानी ॥ "**

—ए. भा., अ. ३

याशिवाय नाम जपाचें महत्त्व भाग १ मधील **'संत गुरु व सद्गुरु'** प्रकरणांतील शेवटच्या दोन पृष्ठांवरील गुरुस्वरूप व **'गुरुसेवेची अभिनव खूण'** पुनः वाचून पाहण्याबद्दल वाचकांना प्रेमाचा इषारा देऊन व जिज्ञासूंना गुरुस्वरूपाची ओळखण देण्याबद्दल परमेश्वराचीच प्रार्थना करून, कल्पनेबाहेर लांबलेला हा विषय येथेंच आटपतों व पूर्वप्रतिज्ञात पुढील विषय लिहिण्यास आरंभ करितों.

*     *     *     *

## मुख्यतः बारा प्रकारचे गुरु.

अनेक ग्रंथांत गुरूचे अनेक प्रकार सांगितले आहेत. 'गुरु' शब्द कोणकोणास लावतात हेंही अनेक ठिकाणीं अनेक प्रकारें सांगितलें आहे. उदाहरणार्थ - माता, पिता, अन्नदाता, उपनयनकर्ता, भयहर्ता, विद्यादाता, वगैरे यांस 'गुरु' च म्हणतात. **याज्ञवल्क्यस्मृति, मनुस्मृति** यांमध्यें 'गुरु' शब्दाची व्याख्या अथवा विनियोग अनेक प्रकारांनीं दाखविले आहेत. देवलानें तर —

**" उपाध्यायः, पिता, ज्येष्ठो-भ्राता, चैव महीपतिः ।**
**मातुलः, श्वशुरस्त्राता ; मातामह-पितामहौ ॥**
**वर्णज्येष्ठः, पितृव्यश्च पुंस्येते गुरवः स्मृताः ।**
**माता, मातामही, गुर्वी, पितुर्मातुश्च सोदराः ॥**
**श्वश्रूः पितामही ज्येष्ठा धात्री च गुरवः स्त्रियः ।**
**इत्युक्तो गुरुवर्गोऽयं मातृतः पितृतो द्विधा ॥ "** इ०

याप्रमाणें २० प्रकारचे गुरु सांगितले आहेत. यांना गुरूचे प्रकार म्हणण्यापेक्षां 'गुरु' शब्दाच्या योजनेचे प्रकार म्हणणेंच अधिक शोभेल. **श्रीसमर्थांनींही** दासबोधांत (द. ५, स. २) **मंत्रगुरु, तंत्रगुरु, विद्यागुरु, मातागुरु, पितागुरु** इ० १७ प्रकारचे गुरु सांगून म्हटलें आहे —

**" असो ऐसे उदंड गुरु । नाना मतांचा विचारु ।**
**परी जो मोक्षदाता ' सद्गुरु ' । वेगळाचि असे ॥ "**

असें सांगून,

**" मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान ।**
**निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिति ॥**
**याहीवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदास केवळ ।**
**विशेष आचारें निर्मळ । स्वधर्मविषयीं ॥**
**याहीवरी अध्यात्मश्रवण । हरिकथानिरूपण ।**
**जेथें परमार्थविवरण । निरंतर ॥......**
**म्हणोनि नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठिलें साधन ।**
**हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं ओळखावें ॥**

******************************************

अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन ।
तेथें बहु भक्त जन । विश्रांति पावती ॥
जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान । आणि स्थूल क्रियेचें साधन ।
तोचि सद्गुरु निधान । दाखवी डोळां ॥ ”

याप्रमाणें सद्‌गुरूचें ढोबळ लक्षण सांगितलें आहे.

श्रीएकनाथमहाराजांनींहि सद्गुरुलक्षणें सांगतांना —

“ एक वेदाध्ययन गुरु । एक व्याख्यानदानी उदारु ।
एक ज्योतिषज्ञानी गंभीरु । परी ते ‘ सद्गुरु ’ न म्हणती ज्ञाते ॥
एवं गुरुपणाची वदंती । असे बहुपणें नांदती ।
जो करी आपरोक्षप्राप्ति । त्यातें म्हणती ‘ सद्गुरुस्वामी ’ ॥
ज्याचेनि वाक्यें असंतता । निःशेष मावळे तत्वतां ।
त्यासीच गा ‘ सद्गुरुता ’ । वेदशास्त्रार्थी तत्त्वता प्रतिपाद्य ॥...
तो विषय भोगी ना स्वयें त्यागी । तो अदृष्टाच्या निजविभागीं ।
लावूनियां देहाच्या अंगीं । परब्रह्मयोगीं विचरत ॥...
देहीं असोनि नाहीं अहंकृति । दहीं असोनि नाहीं गृहासक्ति ।
शेखीं लोकांमाजीं लौकिकस्थिती । सुखें वर्तती लोकांसरिसे ॥
त्यासी स्त्री म्हणे माझा भर्ता । पुत्र म्हणे माझा पिता ।
शिष्य म्हणती गुरु तत्त्वता । तो त्यांहूनि परता । त्यांमाजीं वर्ते ॥
ऐशिया पूर्ण प्रतीति । आचरोनि दावी भक्ति ।
हरी भजावा सर्वांभूतीं । हेंच शिष्याप्रती उपदेशी ॥ ”

असें सांगून त्यांना ओळखावें कसें, याबद्दल सांगतांना त्यांनीं अगदीं स्वानुभवानें म्हटलें आहे कीं, —

“ हीं सद्गुरूचीं निजलक्षणें । पंडितां न कळती ज्ञातेपणें ।
पूर्णानुभवी जाणती खुणे । इतराचें जाणणें पांगुळें तेथ ॥ ”

हे उद्गार पंडितंमन्य लोकांनीं लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. याचें कारण असें कीं, पंडित किंवा वेदशास्त्रादि अपरा विद्येनें संपन्न असे मोठे विद्वान झाले तरी, ते प्राकृत लोकसृष्टींतच वावरणारे असतात, आणि सद्गुरु हे अलोकसृष्टींत विहार करणारे असतात. सृष्टींतील गूढ, महागूढ, तत्त्वांचा शोध लावणारे झाले तरी ते

शोधबुद्धीच्या टप्प्यांतील असतात, आणि सद्गुरु ज्या 'परम' तत्त्वाचा शोध लावतात व त्याशीं समरसून जातात, आणि शिष्यासही समरसवितात, तें तत्त्व बुद्धीच्या पलीकडील असतें. '**यो बुद्धेः परतस्तु सः**' असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे. तार्किकांचा तर्क अथवा बुद्धिमंतांची बुद्धि जेथें कुंठित होते, तेथून पुढें जाण्यास श्रद्धेचेच पाय समर्थ असतात, किंबहुना श्रद्धेचा प्रांत तेथूनच सुरू होतो. '**श्रद्धावान् लभते ज्ञानम्**' असे गीतेंत सांगितलें आहे; 'बुद्धिमान् लभते ज्ञानं' असें सांगितलें नाहीं. श्रद्धा ही बुद्धीला हातांत धरूनच पुढें नेते. बुद्धीला श्रद्धेचा हस्तस्पर्श झाल्याबरोबर तिच्यांतील एकंदर दोष जाऊन ती परमतत्त्वाशीं जाऊन भिडणेस समर्थ होते. तें 'अतींद्रिय' तत्त्व मग 'बुद्धिग्राह्य' होतें. तोंपर्यंत नाहीं. याकरितां कोणी बुद्धिमंतांनीं व विद्यावंतांनीं आपल्या बुद्धीच्या व विद्येच्या जोरावर भरंवसून संतांच्या परीक्षेच्या प्रयत्नाचा अभिमान बाळगूं नये. सद्गुरूला शोधण्यापूर्वी आपण 'सच्छिष्य' आहों काय याचा विचार करावा. सद्गुरूचीं लक्षणें ग्रंथांतरीं सांगितलीं आहेत, त्याचप्रमाणें सच्छिष्याचींही लक्षणें सांगितलीं आहेत. तीं पाहून आपण आपली पात्रता वाढवावी. म्हणजे भगवंताच्या कृपेनें सद्गुरूची प्राप्ति होऊन परमार्थमार्गाचा प्रकाश होईल. ही पात्रता येण्यासाठीं काय केलें पाहिजे हें भागवतांत सांगितलें आहे.

> **यमानभीक्ष्णं सेवेत नियमान् मत्परः क्वचित् ।**
> **मदभिज्ञं गुरुं शान्तं उपासीत मदात्मकम् ॥ ५ ॥**
> **अमानमत्सरो दक्षो निर्ममो दृढसौहृदः ।**
> **असत्वरोऽर्थजिज्ञासुरनसूयुरमोघवाक् ॥ ६ ॥**

— श्रीमद्भागवत, स्कं. ११, अ. १०

"**यम व नियम** यांचें यथायोग्य सेवन करावें व श्रीगुरूला मद्रूप मानून अनन्यभावें भजावें;" असें भगवंतांनीं सांगून शिष्यानें आणखी कोणत्या गुणांनीं संपन्न असावें हेंही सांगितलें आहे. शिष्यानें "अमानी, निर्मत्सर, दक्ष (साधन करण्यांत अत्यंत सावध व तत्पर), निर्मम, गुरूच्या ठिकाणीं सुहृदपणा, अचंचळता, जिज्ञासूपणा, असूयाराहित्य व सत्यवचन हे नऊ गुण तर शिष्यांमध्यें असलेच पाहिजेत." वरील श्लोकांपैकीं ६ व्या श्लोकावर श्रीएकनाथमहाराजांनीं ९५ ओव्यांची टीका अतीव सुंदर लिहिली आहे, ती जिज्ञासूंनीं त्या प्रासादिक ग्रंथांतच पहावी अशी आम्ही शिफारस करितों. ती टीका वाचली म्हणजे आपण कुठें चुकतों अथवा आपली

कोठें उणीव आहे हें समजून येऊन, ती भरून काढण्यास स्फुरण येईल. तात्पर्य, सद्गुरूचें अंतरंग पारखण्यापूर्वी शिष्यानें आपलें अंतरंग पारखावें; म्हणजे गुरुकृपेला तो पात्र होईल व परमात्मा कोणातरी व्यक्तीच्या अंगांत गुरुरूपानें प्रगट होऊन त्यावर अनुग्रह करील. मग तो कर्मकिंकर न राहतां ब्रह्मज्ञानाचा अधिकारी होईल.

शिष्याच्या अंतरंगांत गुरुप्राप्तीची तळमळ उत्पन्न झाल्यानंतर परमात्मा शिष्याच्या प्रकृतिभेदानुसार अथवा सुकृततारतम्यानुसार निरनिराळ्या अधिकाराचे गुरु गांठ घालून देतो. महाभारतांत कचानें शुक्राचार्यांच्या दर्शनाबरोबर त्याची स्तुति केलेली आहे. तेंच वर्णन पांडवप्रतापांत पांचव्या अध्यायांत श्रीधरानें आणलेलें आहे. त्याचा सारांश खालीं देतों, त्यावरून गुरूचे प्रकार लक्षांत येतील.

**गुरु बारा प्रकारचे असतात**; त्यांचीं नांवें :—

| | | | |
|---|---|---|---|
| १ **धातुर्वादी**, | २ **चंदन**, | ३ **विचार**, | ४ **अनुग्रह**, |
| ५ **परीस**, | ६ **कच्छप**, | ७ **चंद्र** | ८ **दर्पण**, |
| ९ **छायानिधि**, | १० **नादनिधि**, | ११ **क्रौंचपक्षी**, | १२ **सूर्यकांत**. |

१ ला '**धातुर्वादी**' गुरु—हा शिष्याकडून तीर्थाटण करवून नाना साधनें सांगून शेवटीं ज्ञानप्राप्ति करून देतो.

२ रा '**चंदन**' गुरु—हा चंदनवृक्ष जसा आपल्याजवळच्या वृक्षांना आपल्यासारखाच चंदन बनवितो; (पण हिंगण, वेळू व केळ हे शिवाय करून), तसा अभक्त शिवायकरून आपल्या केवळ समागमानेंच हा भक्तांस तारून नेतो.

३ रा '**विचार**' गुरु—हा नित्यानित्य, सदसद्, सारासार विचारानें शिष्यास ज्ञान करून देऊन पिपीलिकामार्गानें साक्षात्कार करून देतो.

४ था '**अनुग्रह**' गुरु—हा शिष्यावर कृपानुग्रह करितो, ज्याच्या प्रतापानेंच सायास न होतां शिष्यास ज्ञान होतें.

५ वा '**परिस**' गुरु—परीस ज्याप्रमाणें स्पर्शमात्रानें लोहाचें सुवर्ण बनवितो, त्याप्रमाणें हा करस्पर्शानेंच साधकास दिव्य ज्ञान देतो.

६ वा '**कच्छप**' गुरु—कूर्म म्हणजे कासवी ज्याप्रमाणें नुसत्या अवलोकनानें पिलांचें पोषण करिते, त्याप्रमाणें हा कृपावलोकनानेंच शिष्याचा उद्धार करितो.

७ वा '**चंद्र**' गुरु—चंद्र उदय पावतांच चंद्रकांतास पाझर फुटतो, त्याचप्रमाणें या गुरूचें अंतर दयावंत होतांच दूरचे शिष्यही तरतात.

८ वा '**दर्पण**' गुरु — आरशांत पाहिल्याबरोबर आपलें मुख आपणांस दिसतें, त्याप्रमाणें ह्याच्या नुसत्या दर्शनानें स्वरूपज्ञान होतें; कसलेच सायास पडत नाहींत.

९ वा '**छायानिधि**' गुरु — छायानिधि नांवाचा एक मोठा पक्षी आकाशांत फिरत असतो, त्याची छाया ज्याच्यावर पडते तो राजा होतो, त्याप्रमाणें ह्या योग्याची छाया ज्या पुरुषावर पडते, तो तात्काळ स्वानंदसाम्राज्याधिपति होतो.

१० वा '**नादनिधि**' गुरु — नादनिधि नांवाचा मणि आहे, ज्या धातूंची ध्वनी ह्याच्या कानांत पडते, त्या सर्व धातु स्वस्थानीं सुवर्ण बनतात. त्याप्रमाणें मुमुक्षूची कारुण्यवाणी ह्याच्या कानीं पडतांच मुमुक्षूस दिव्य ज्ञान होतें.

११ वा '**क्रौंचपक्षी**' गुरु — क्रौंच नांवाची पक्षिणी समुद्रतीरीं पिलें ठेवून चारा घेण्यासाठीं सहासहा महिने दूर देशीं फिरावयास जाते व वारंवार आकाशाकडे डोळे करून पिलांची आठवण करिते, त्यायोगानें येथें पिलें पुष्ट होतात. त्याचप्रमाणें हा गुरु ज्यांची आठवण करितो, ते आपापल्या स्थानीं असतांच तरून जातात.

१२ वा '**सूर्यकांत**' गुरु — सूर्यदर्शनानें सूर्यकांत मण्यांत अथवा भिंगांत एकदम अग्नि पडतो व खालीं धरलेला कापूस जळून जातो (सूर्याची इच्छा नसतांही), त्याप्रमाणें ह्या गुरूची दृष्टि जिकडे झळकते ते पुरुष तात्काळ विदेहत्व पावतात.

ह्यांपैकीं पहिले तीन शिवाय करून बाकीचे असाधारण कोटींतील गुरु असाधारण अधिकाराच्या शिष्यांसच लाभतात; सामान्य माणसानें असामान्य गुरूची भेट होण्याची इच्छा धरून आळसांत काळ घालवूं नये. ना. ज. महत्त्व भाग १ ला, पृ. १२८ मध्यें श्रीसोहिरोबा आंबियेची गोष्ट सांगितली आहे. तसेंच पृष्ठ १३६-३७ वर विसोबा खेचरांना श्रीज्ञानेश्वर महाराजांचा अनुग्रह कसा झाला, हें सांगितलें आहे. शिवाय **नियतगुरु**, अनियत गुरुविषयींही विवरण केलें आहे, तें येथें पुनः एकदां वाचून पहावें अशी आम्ही वाचकांस सूचना देतों.

* * * *

## प्रत्यक्ष उपास्य देवताच गुरु –

झाल्याचीं उदाहरणें कलियुगांत सांपडतात. श्री**जनार्दन**स्वामी, श्री**दासो**पंत व श्री**नारायण** महाराज जालवणकर, यांना श्रीदत्तानें व श्री**सम**र्थांना श्रीरामानें प्रत्यक्ष भेट देऊन अनुग्रह दिला. श्री**तु**काराम महाराजांचे परमगुरु श्री**राघव**चैतन्य

यांनीं श्रीव्यासांपासूनच अनुग्रह मिळविण्याबद्दलचा निश्चय करून तप केलें, त्याप्रमाणें त्यांस प्रत्यक्ष व्यासोनारायणांनीं दर्शन देऊन अनुग्रह दिला, ही गोष्ट चैतन्यविजयांत प्रसिद्ध आहे. आधुनिक जगप्रसिद्ध सत्पुरुष श्रीरामकृष्णपरमहंस यांना त्यांचें उपास्य दैवत कालिमाता हिजकडूनच अनुग्रह झाला, ही गोष्ट त्यांच्या चरित्रांत प्रसिद्ध आहेच. याचप्रमाणें श्रीनारायण महाराज केडगांवकर यांना गाणगापुरांत व हल्लीं विलायतेस गेलेले ' पुरोहित स्वामी ' ( शंकर गजानन पुरोहित, बी. ए., एल्‌एल्. बी. ) यांना गिरनारपर्वतावर श्रीदत्तदर्शन होऊन अनुग्रह झाला, ही गोष्ट त्यांचें चरित्र जाणणाऱ्याला माहीत आहेच. ( म. पुरोहित यांची भेट या लेखकाला आठ वर्षांपूर्वी हुबळी येथें झालेली होती.* ) परमपूज्य महानुभाव श्रीमद्वासुदेवानंद-सरस्वती यांनासुद्धां श्रीनरसोबाच्या वाडींत प्रत्यक्ष श्रीदत्तदर्शन होऊन अनुग्रह मिळालेली गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. याशिवाय एकदोन बांधव श्रीदत्तदर्शनानें पुनीत झालेले या लेखकाच्या अत्यंत परिचयाचे आहेत. त्यांची तपश्चर्याही तशीच भयंकर आहे. त्यांच्या कोपभयानें त्यांचा नामनिर्देश येथें करवत नाहीं. तात्पर्य, मनुष्य गुरु नसतां देवताच गुरु झालेले पुण्यपुंज पुरुष फार थोडे सांपडतात. सर्वसाधारण लोकांना देवतादर्शनाचे कष्ट काढणें शक्य नसतें. करितां त्यांनीं मनुष्यगुरूचाच आश्रय करून श्रेयोमार्गास लागलें पाहिजे. त्याशिवाय गत्यंतरच नाहीं.

**वेदान्तानमनेकत्वात् संशयानां बहुत्वतः ।**
**वेद्यस्याप्यतिसूक्ष्मत्वान्न जानाति गुरुंविना ॥**

" वेदान्त अनेक रूपाचा असतो व संशयही अनेक असतात आणि वेद्य वस्तु ( आत्मतत्त्व ) ही अत्यंत सूक्ष्म आहे, याकरितां गुरुवांचून मनुष्य ती वस्तु जाणूं शकत नाहीं. "

श्रीसमर्थ म्हणतात —

**" सद्गुरूवीण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं ।**
**अज्ञान प्राणी प्रवाहीं । वाहातचि गेले ॥**

---

* हे सांप्रत विरक्त वेषांत विलायतेस गेलेले असून, त्यांनीं इंग्रजी भाषेत आत्मचरित्र नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे.

*********************************************

**ज्ञानविरहित जें जें केलें । तें तें जन्मासी मूळ झालें ।**
**म्हणूनि सद्गुरूचीं पाउलें । सदृढ धरावीं ॥**
**करूनि नाना सायास । केला चौदा विद्यांचा अभ्यास ।**
**रिद्धिसिद्धि सावकाश । वोळल्या जरी ॥**
**तरी सद्गुरुकृपेविरहित । सर्वथा न घडे स्वहित ।**
**यमपुरीचा अनर्थ । चुकेना येणें ॥**
**जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस निधान ।**
**तैसें सद्गुरुवचनें ज्ञान-। प्रकाश होय ॥**
**सद्गुरूवीण जन्म निर्फळ । सद्गुरुवीण दुःख सकळ ।**
**सद्गुरूवीण तळमळ । जाणार नाहीं ॥**
**सद्गुरूचेनि अभयंकरें । प्रगट होइजे ईश्वरें ।**
**संसारदुःखें अपारें । नासोनि जातीं ॥**
**मागें झाले थोर थोर । संत महंत मुनेश्वर ।**
**तयांसहि ज्ञानविज्ञानविचार । सद्गुरूचेनि ॥**
**श्रीरामकृष्ण आदिकरूनि । अति तत्पर गुरुभजनीं ।**
**सिद्ध साधु आणि संतजनीं । गुरुदास्य केलें ॥**
**असो जयासी मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।**
**सद्गुरूवीण मोक्ष पावावा । हें कल्पान्तीं न घडे ॥ "**

— दासबोध, द. ५

याप्रमाणें आपल्या प्राचीन संतांचीं गुरूंच्या आवश्यकतेविषयींचीं वचनें हजारों आहेत. तीं प्राचीन ग्रंथ वाचणाऱ्यांच्या पहाण्यांत येतात व येतीलच; तथापि आधुनिक विद्वान संत **श्रीविवेकानंदस्वामी** यांचा या विषयावरील अभिप्राय देऊन हें प्रकरण आटपतें घेऊं. ते आपल्या ' भक्तियोगांत ' म्हणतात —

" उन्नतीच्या दिशेचें आक्रमण केवळ ग्रंथांच्या साहाय्यानें होणें शक्य नाहीं. एका जीवात्म्याला जें चालन मिळावयाचें तें दुसऱ्या जीवात्म्याकडून मिळतें. तें त्याला दुसऱ्या कोणत्याही ( जड ) वस्तूकडून प्राप्त होत नाहीं. सारा जन्म आपण ग्रंथांचा अभ्यास केला तर, फार झालें तर आपली बुद्धि मात्र जागृत होईल, पण अखेरीस धार्मिक उन्नतीची एक पायरीही आपण चढलों नाहीं असें आपल्या अनुभवास

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

येईल...आपल्या जीवात्म्याला जें चालन मिळावयाचें तें दुसऱ्या जीवात्म्याकडूनच मिळणें शक्य आहे.

" ब्रह्मजिज्ञासा ज्याच्या ठिकाणीं तीव्र झाली आहे, त्याचे डोळे उघडण्याचें कार्य गुरु करतो. ... आपल्या मनोरूपी कमलाच्या विकसनाचें कार्य सच्छील आणि शहाण्या गुरूकडूनच होतें. ज्ञानाची परिसीमा जें ब्रह्मज्ञान, तें विकत घेतां येत नाहीं किंवा तें ग्रंथांतूनही मिळवितां येत नाहीं. तुम्हीं जगाचा कोनाकोपरा धुंडाळून पाहिला, तुम्हीं हिमालय, आल्प्स आणि कॉकेशस इत्यादि, सारे पर्वत पालथे घातले, तुम्हीं साऱ्या समुद्रांचे तळ शोधले आणि गोबीच्या महारण्यांत अथवा तिबेटांत सारा जन्म फिरत राहिलां, तरी तुमच्या अंतःकरणाची तयारी होईपर्यंत आणि **तुमचा गुरु तुम्हांस भेटेपर्यंत ब्रह्मज्ञानाची प्राप्ति तुम्हांला होणार नाहीं.** "

— स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ, पंचम खण्ड

तात्पर्य, '**सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय**' हा अगदीं अभेद्य सिद्धान्त समजावा, हें अगदीं त्रिकालाबाधित सत्य आहे असें जाणावें व सद्गुरुपदाचा आश्रय करून दुस्तर भवसागर तरून जावा किंवा शोषून टाकावा. असें करील तोच खरा शूर व पंडित होय, तोच धन्य होय.



# साधकांच्या अडचणी व कांहीं सूचना.

मनुष्यांत **बद्ध**, **मुमुक्षु**, **साधक** व **सिद्ध** अशा चार कोटी असतात. ' **बद्ध** ' म्हणजे केवळ प्रापंचिक, फक्त इहलोकचाच – देह – इंद्रियसंबंधीं सुखाचाच – विचार करणारे लोक; ' **मुमुक्षु** ' म्हणजे या संसारांत कितीही सुखें भोगलीं तरी तीं दुःखमिश्रित व दुःखपरिणामी आहेत, हें जग नश्वर आहे, जीवाला जन्मानंतर मरण व मरणानंतर जन्म घ्यावे लागतात, याकरितां या जन्ममरणाच्या परंपरेंतून कशी सुटका होईल म्हणजे मोक्ष केव्हां व कसा मिळेल अशी इच्छा करणारा; ' **साधक** ' म्हणजे संतसद्गुरूचा आश्रय करून त्यांनीं सांगितलेलें साधन करीत असणारा; आणि ' **सिद्ध** ' म्हणजे साधन उत्तम रीतीनें–तीव्रसंवेगानें–करून साध्य प्राप्त करून घेतलेला. ( या चारी कोटींचें वर्णन श्रीसमर्थांनीं दासबोधांत उत्तम रीतीनें व विस्तृतपणें केलेलें आहे तें जिज्ञासूंनीं तेथें पाहून घ्यावें. )

मागच्या लेखांत गुरूचे प्रकार व त्यांचीं लक्षणें सांगितलीं, त्याबरोबरच शिष्याचीं लक्षणें व त्यांचीं कर्तव्येंही थोडक्यांत सांगितलीं आहेत; तथापि या लेखांत साधकांना कांहीं विशेष सूचना द्याव्याशा वाटल्यावरून देत आहें. साधक कुठें चुकतात व त्यांनीं कशी सावधगिरी राखली असतां त्यांचें तारूं खडकावर न आपटतां व तुफानांत न सांपडतां सुरक्षितपणें पैलतीरास जाईल, हें सांगितलें असतां तें त्यांना फारच उपयुक्त होईल, अशी मला आशा आहे.

## गुरूचा शोध कसा करावा ?

सुप्रसिद्ध हिंदी ' कल्याण ' मासिकाच्या एका अंकांत ( जून १९३२ ) ' गुरु–अन्वेषण ' नांवाचा लेख आलेला आहे, तो गुरु-शोधकांना फारच साहाय्यक असल्यामुळें, प्रथम त्याचा सारांश येथें देतों.

" आजकाल ' गुरु-वरण ' ही एक मोठीच बिकट गोष्ट होऊन बसली आहे. कारण, शिष्याचा अविद्यांधकार हरण करणारे गुरु फारच कमी मिळतात. शिष्याचें द्रव्य हरण करणारे अथवा दुकानदारीप्रमाणें आपल्या मानप्रख्यातीचाच मुख्य उद्देश बाळगणारे व त्याकरितां अयोग्य नीतीचाही व्यवहार करणारे गुरुच पुष्कळ मिळतात. अशा गुरूच्या फंदांत पडून पुष्कळ भाळेभोळे शिष्य फसून जातात. त्यांतील कित्येकांचें आयुष्य व्यर्थ होऊन जातें. कित्येक तर अशा साधनांस लागतात कीं, ज्यायोगें त्यांचें स्वास्थ्य नाहींसें होतें, अगर अदृश्य जगाच्या मायिक दृश्यांला व चमत्कारांला

राहून, त्याचप्रमाणें क्षुद्र शक्ति संपादन करून, मुक्तीच्या ऐवजीं अधिकाधिक बंधनांतच ते पडतात. चांगले गुरु सदोदित लोकहितांत तत्पर राहून, जिज्ञासूंच्या योग्यतेनुसार त्यांना उपदेश देणें आपलें कर्तव्य समजतात. ' विवेकचूडामणी ' मध्यें सद्गुरूचें लक्षण असें दिलें आहे —

**अयं स्वभावः स्वत एव यत्पर – श्रमापनोद्प्रवणं महात्मनाम् ।**
**सुधांशुरेष स्वयमर्ककर्कश – प्रभाभितप्तामवति क्षितिं किल ॥ ४० ॥**

" सूर्याच्या प्रखर प्रभेनें अभितप्त झालेल्या पृथ्वीस चंद्र ज्याप्रमाणें शांत करितो, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या क्लेशांचा नाश करण्यांत तत्पर असणें हा महात्म्यांचा स्वयंसिद्ध स्वभावच असतो. "

साधकांना गुरूची अनिवार्य आवश्यकता आहे. जे खरे साधक असतात, व ज्यांचा परमेश्वरावर भरंवसा असतो, त्यांना तो दयाळू परमात्मा कोणत्या ना कोणत्या प्रकारें सद्गुरूची गांठ घालून देतोच. (पण दिरंगाई ज्यांना असह्य होते त्यांनीं) सद्गुरूच्या प्राप्तीचा एक उपाय ( अथवा तोडगा पुढें लिहिल्याप्रमाणें ) करून पाहावा. एकादशीच्या दिवशीं पूर्ण निराहार उपवास करून, संध्याकाळीं स्नान करून जपध्यानादि झाल्यानंतर निजण्याच्या वेळीं, गोमयानें सारविलेल्या भूमीवर जलानें पवित्र केलेल्या दर्भाच्या चटईवर निजावें व नीज पडण्याच्या पूर्वी भगवद्गीतेंतील पुढें लिहिलेला श्लोक मनांतल्या मनांत म्हणत रहावें व म्हणत असतां त्याच्या अर्थाचेंही चिंतन चालवीत असावें.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः ।**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे ।**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥**

अर्जुन भगवंताला म्हणतो कीं, " ममताजनित शोकमोहानें मी मूढ झालों असल्यामुळें धर्माधर्माचा निश्चय माझ्या बुद्धीला होत नाहीं. मी अत्यंत दीन होऊन तुला शरण आलों आहें, मी तुझा शिष्य आहें; करितां ज्यांत माझें कल्याण आहे असा निश्चित उपाय तूं मला सांग. "

" या विषयांत ही एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं, जो मनुष्य अर्जुना-प्रमाणें कल्याणमार्गाचा ' उत्कट जिज्ञासु ' होऊन, तो मार्ग न मिळाल्यामुळें ' व्याकुळ '

झाला आहे व भगवंतालाच परम गुरु मानून, तोच आपल्यास कल्याणाचा योग्य मार्ग दाखविणारा आहे असें म्हणून त्याची विनम्रभावानें प्रार्थना करील, त्यासच त्या प्रार्थनेचा प्रत्यय येईल. या भावानें भावित झालेला साधक जर व्याकुळ होत्साता या श्लोकाच्या जपानें आपल्या पारमार्थिक कल्याणाचा मार्ग जाणण्याबद्दल प्रार्थना करील, तर भगवंत त्याला स्वप्नांत योग्य असें उत्तर देईल. एका एकादशीला स्वप्नांत इष्ट संदेश मिळाला नाहीं, तर दुसऱ्या एकादशीस असेच व्रत करावें; असें एका महात्म्याचें सांगणें आहे. आणि एका साधकाला ( जिज्ञासूला ) थोड्या दिवसांखालीं स्वप्नांत तसें उत्तर मिळालेलें आहे. केव्हां केव्हां हें उत्तर स्पष्ट न मिळतां सांकेतिक असतें, त्याच्या भावाचा विचार केला म्हणजे त्याचा खुलासा होतो. " इत्यादि.

वरील गीताश्लोकाचा फक्त परमार्थकार्यालाच उपयोग करावा, असें त्या लेखकानें म्हटलेलें आहे. पण दुसऱ्या एका महात्म्याकडून असें कळतें कीं, प्रपंचांत कोणत्याही संकटावस्थेंत काय करावें हें अगदीं सुचत नाहींसे झालें म्हणजे वरील गीताश्लोकाचें पुढें लिहिल्याप्रमाणें अनुष्ठान करावें. तो प्रकार असा :– सकाळीं उठून प्रातर्विधि झाल्यावर स्नान वगैरे आटोपून व्रताचा संकल्प करून पाणी सोडावें व दिवसभर उपवास करून ( फक्त पाणी पिऊन ) तुळसीजवळ किंवा अश्वत्थाजवळ अथवा देवाजवळ बसून एक हजार जप करावा. सर्व दिवस भगवच्चिंतनांत घालवावा. संध्याकाळीं देवाला सांज्याचा ( शिऱ्याचा ) नैवेद्य दाखवून तो खाऊन सोवळ्यानेंच देवाकडे झोपावें. म्हणजे स्वप्नांत सूचना मिळते. सूचनेचा संदेश मिळेपर्यंत रोज असें करावें. इत्यादि.

## दक्षिणामूर्तिविधानानें मंत्रग्रहण

गुरुशिवायही नामस्मरण केलें तर तें फुकट जात नाहीं याबद्दल पहिल्या भागांत (पृ. ९८ ते १०३) सप्रमाण सांगितलेलें वाचकांच्या लक्षांत असेलच. त्यांत आपल्या इष्टदेवतेलाच गुरु कल्पून मंत्रग्रहण कसें करावें हेंही सांगितलेलें आहे. त्यानंतर ' दक्षिणामूर्तिविधानानें ' मंत्रग्रहण करून जपास आरंभ करावा, असें शास्त्रांत सांगितलें असल्याबद्दल व परमपूज्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज हेही कोणाकोणास या विधानानें मंत्रदीक्षा देत असल्याबद्दल त्यांच्या एका विद्वान् शिष्याकडून समजून आलें. त्या विधानाची माहिती त्याचेकडून कळली ती येथें देणें योग्य होईल असें वाटल्यावरून थोडक्यांत देत आहे.

प्रथम शास्त्रदृष्टीनें 'सिद्धारिचक्र' वगैरेवरून विचार करून अमुक मंत्र ग्रहण करावयाचा असें ठरविल्यानंतर, मग तो मंत्रजप सकामबुद्धीनें करावयाचा असो अथवा निष्कामबुद्धीनें करावयाचा असो, पुढें लिहिल्याप्रमाणें विधान करावें. स्नानसंध्या वगैरे आटपून ( सकाम भावना असलेस त्या विशिष्ट कामनेचा उच्चार करावयाचा अथवा निष्काम असलेस आपल्या इष्टदेवतेच्या नामाचा उच्चार करून 'अमुकदेवताप्रीत्यर्थ' असें म्हणून पाणी सोडावयाचें ) श्रीसदाशिवाचा 'दक्षिणामूर्ति' नामक जो आद्य अवतार त्यालाच सद्गुरु कल्पून, संकल्प करतांना देशकालादिकांचा उच्चार झाल्यानंतर – 'श्रीदक्षिणामूर्ति-सद्गुरोः सकाशात् अमुकदेवताप्रीत्यर्थं अमुक देवतायाः महामंत्रग्रहणं करिष्ये, तदंगत्वेन षोडशोचारपूजनं करिष्ये, आदौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं श्रीगणपतिस्मरणं पूजनं वा करिष्ये' तसेंच — वाङ्मनःकायशुद्ध्यर्थं अमुककृच्छ्रप्रायश्चित्तं करिष्ये' असें म्हणून पाणी सोडावें ( आणि त्याप्रमाणें करावें. ) त्यानंतर —

**निधये सर्वविद्यानां भिषजे भवरोगिणां ।**
**गुरवे सर्वलोकानां दक्षिणामूर्तये नमः ॥**

अशा ध्यानश्लोकानें लिंगावर किंवा सुपारीवर श्रीदक्षिणामूर्तीचें आवाहन करून षोडशोपचार पूजा करावी व पूजेंतील मंत्रपुष्प, नमस्कार, प्रार्थना वगैरे झाल्यानंतर, कागदावर पूर्वीच लिहून ठेवलेला आपला इष्टमंत्र मूर्तीसमोर ठेवून, तो त्या गुरुमूर्तीकडून ऐकल्याची भावना करून आपणच तीनदां वाचावा; व त्या वेळेपासून जप करण्यास प्रारंभ करावा. ( अशा विधानानें शिष्याला जप दिल्यास गुरूचीही जबाबदारी कमी होते. निगर्वी गुरु शिष्याकडून इष्टदेवतेची पूजा करवून अथवा मानसपूजाही करवून, त्या देवतेकडूनच मंत्र मिळतो अशी भावना करण्यास सांगून आपण कानांत मंत्र सांगतात. ) तात्पर्य, प्रत्यक्ष गुरूपेक्षां शिष्याच्या अंतःकरणांतील 'गुरुभाव' त्याचेवर प्रसाद करीत असतो.

*　　*　　*　　*

येथपर्यंत ज्यांना प्रत्यक्ष गुरु भेटला नाहीं, त्यांनीं गुरुप्राप्तीप्रीत्यर्थ 'शास्त्रीय प्रयत्न' कोणता अथवा कसा करावा हें सांगितलें; तसेंच, गुरु तर मिळत नाहीं व भलत्या सलत्यावर विश्वास बसत नाहीं, अशी मनाची स्थिति झाल्यास त्यानें काय करावें हेंही सांगितलें. आतां ज्यांना गुरूची प्राप्ति झाली आहे, म्हणजे पूर्वऋणानुबंधाप्रमाणें ज्यांनीं कोणा एखाद्यास गुरु मानून त्याजकडून मंत्रग्रहण वगैरे केलें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आहे, अशा साधकांना कांहीं अनुभवाच्या सूचना दिल्यास त्या त्यांना परमार्थमार्ग आक्रमण्यास फारच उपयोगी पडतील असें वाटल्यावरून यथामति देत आहें.

आजपर्यंतच्या स्वतःच्या व जगाच्या अनुभवावरून विचार केला असतां असें दिसून येतें कीं, श्रद्धापुरःसर गुरूला शरण जाऊन अनुग्रह मिळविलेले अर्थात् गुरुमार्गांत पडलेले शेंकडा ९९ साधक अगदीं 'अल्पतृप्त' असतात! बाकीच्या अभाविक लोकांपेक्षां हे बरे; पण ज्या हेतूकरितां आपण ह्या मार्गांत शिरलों, त्या मार्गाचा पल्ला पोंचविण्याचें आपलें कर्तव्य आहे हें ते विसरतात; किंबहुना पल्ला पोंचविण्याचा ते विचारच करीत नाहींत. आपण मार्गावर पडलों एवढ्यानेंच ते कृतार्थता मानितात. 'संध्याकाळच्या आंत' म्ह० आयुष्यरवि मावळण्याच्या पूर्वी आपण ह्या मार्गानें चालून मोक्ष-मुक्काम गांठला पाहिजे याची ते फिकिरच करीत नाहींत! किंबहुना याची कित्येकांना जाणीवच असत नाहीं असें स्पष्ट दिसून येतें. आडरानांत भटकत असतांना त्या रानांतील रानफळें खाण्याची लागलेली संवय ते सोडूं इच्छीत नाहींत; कारण त्याला मोठा मनोनिग्रह लागतो, तो त्यांच्या ठिकाणीं असत नाहीं. फक्त मार्गावर येऊन थोडा वेळ उभे राहतात, त्या मार्गाची शोभा पाहातात व मार्गानें चालून जाऊन मुक्काम गांठून लीलेनें परत आलेल्या लोकांकडून त्या मार्गाचें व मुक्कामाच्या स्थळाचें वर्णन ऐकण्यांतच हे गुंगून जातात. स्वतः मार्ग झपाट्यानें चालावा व 'संध्याकाळच्या आंत' मुक्काम गांठावा याचा ते विचारच करीत नाहींत! कोणी अज्ञानानें करीत नाहींत, तर कोणी आळसानें करीत नाहींत; कोणी पांथस्थ (गुरुमार्गानें राजमार्गानें-राजयोगमार्गानें चालणारे साधक) रानफळें खाण्याच्या लागलेल्या जबरदस्त संवयीमुळें (विषयवासनेमुळें) पुनः बाजूच्या रानांतच जाऊन पडतात. कारण ह्या राजमार्गाला लागूनच-अगदीं दोहोंबाजूनें हें दाट रान आहे. ह्या रानांतून (विषयाटवींतून) च प्रवीण एंजिनिअरांनीं (संतांनीं) हा मार्ग शोधून काढून तो इतका चांगला रुंद व साफ करून ठेवला आहे कीं, यावरून कोणी डोळे झांकून अथवा धावत चालूं लागला तरी पडण्याची किंवा ठेंचाळण्याची भीति नाहीं. ('धावन् निमील्य वा नेत्रे न पतेन्न स्खलेदिह' -भाग०) असा हा सुंदर राजमार्ग आहे. हें सगळें खरें, पण मार्ग चालणार कोण? चालूं लागल्यानंतर ना मुक्कामाला पोचण्याची गोष्ट! मार्गालाच मुक्काम समजून तेथेंच रमूं लागले अथवा रेंगाळूं लागले, तर कसें होणार? याकरितां आळस अनास्था व कुसंग सोडून साधकांनीं गुरूपदिष्ट मार्गानें चालूं लागलें पाहिजे, मध्यें थांबतां नये, मार्ग सोडून आडवाटेनें जातां नये व गतीमध्यें मंदता करतां नये.

आतां मार्ग चालत असतां श्रीगुरूचा सांगात असेल तर फारच बरें; पण असें गुरुसन्निधानाचें भाग्य सर्वांनाच सदोदित लाभत नाहीं. तथापि त्या मार्गावर 'संतमांदियाळी' नेहमीं चालत असते. संत हे श्रीगुरूची दुसरी प्रतिमाच होत. त्यांच्या संगतीनें चालू लागलें असतां कसलाच धोका नाहीं. तथापि आळस, अनास्था व अल्पतृप्ति पार टाकून दिली पाहिजे. साधनाचे कष्ट सोसण्यास नेहमीं उत्साह वाटला पाहिजे. कारण —

**साधनावीण जो ब्रह्म-प्राप्ती इच्छी, जसा शिशु ।**
**मातेच्या अंकि बैसोनी धरूं पाहे शशी नभीं ॥**

अशी त्याची गति होईल. श्रीगुरूला अनन्यभावें शरण गेल्यावर साधनाचें कचाट अंगीं लागूं नये अशी कित्येकांची समजूत असते; व कांहीं गुरु, शरणागत शिष्याला साधनाच्या कचाट्यांत न पाडतां निजकृपाबलानें उद्धरून नेतातही; पण अशीं उदाहरणें फार क्वचितच असतात. तसे गुरुही थोडे व तशा रीतीनें अनन्यभावें शरण जाणारे शिष्यही थोडे. करितां तशा आळशीपणाच्या कल्पना सोडून देऊन, श्रीएकनाथादिकांप्रमाणें गुरुसंगतींत व गुरुसेवेंत चिरकाळ घालविण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें करणेंच श्रेयस्कर.

**"तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥"**

या भगवद्वचनानुसार ज्ञानप्राप्तीकरितां **प्रणिपात, परिप्रश्न** व **सेवा** हीं तीन मुख्य साधनें अवलंबिलीं पाहिजेत. पण प्रत्येक साधकाला हीं तिन्ही सारख्या प्रमाणांत केलीं पाहिजेत असें नाहीं.

श्रीदत्तप्रेमलहरी ग्रंथांत यासंबंधानें ऊहापोह केला आहे तो असा—

"कांहीं भक्त **प्रणिपाताचा** आश्रय करून, म्हणजे लीन होऊन सद्गुरूकडे येतात. ते अनन्यगतिक होऊन सद्गुरूस शरण येत असल्यामुळें सद्गुरूच्या कृपेचा ओघ सहजींसहज त्या अनन्य भक्तांकडे वळतो व सद्गुरूनें परमवात्सल्यानें दिलेल्या प्रेमदेणगीनें कृतार्थ होऊन ते समाधान पावतात. त्यांचे ठिकाणीं तर्ककुतर्क, नाना-तऱ्हेच्या कल्पना वगैरे भानगडी नसल्यामुळें त्यांची सद्गुरूनें एकदां जें सांगितलें, त्यावर दृढ श्रद्धा तात्काल बसून सद्गुरूस त्यांचें पूर्ण समाधान करण्यास शब्दांची म्हणजे वारंवार उपदेश करण्याची फारशी जरूर असत नाहीं.

"कांहीं भक्त सद्गुरूची मनोभावानें सेवा" करून त्याच्या कृपेला पात्र होतात. त्यांचें लक्ष सद्गुरूच्या बोलण्याकडे अगर उपदेशाकडे फारसें नसतें. आपली सेवा बरी कीं आपण बरे...अशा एकनिष्ठ सेवारत भक्तांना संशयच उठत नसल्यामुळें त्यांचें समाधान करण्यास गुरूला शब्दाचा फारसा उपयोग करावा लागत नाहीं.

"सद्गुरूला शरण जाऊन त्यांना 'प्रश्न करून' आपली शंका निरसन करून, घेणारेहि पुष्कळ असतात. अशा लोकांमध्यें बरेच शिकलेले, वाचलेले, तार्किक, चिकित्सक वगैरे लोक असावयाचे. त्यांचें शंकानिरसन होऊन संशय फिटून समाधान होण्यास वेळ लागतो. त्यांचा **ग्रंथिभेद्** व **संशयच्छेद्** करण्यास सत्पुरुषांना शब्दाचा म्हणजे बोध–खड्गाचाच उपयोग करावा लागतो. त्याशिवाय, भिन्नभिन्न संस्कारांच्या योगानें त्यांच्या अंतःकरणांत संशय–कुतर्कादिकांचें जें दाट रान माजलेलें असतें तें साफ तुटून नाहींसें होणार नाहीं व अंतःकरणभूमि स्वरूपानुभवग्रहणाला योग्य होणार नाहीं. या लोकांच्या चिकित्सकपणामुळें व तार्किक प्रश्नांनीं सत्पुरुषांना फार त्रास होत असेल; परंतु त्यांच्यापासून जगाचा एक मोठाच फायदा होत असतो. तो असा कीं, असा प्रश्नरूपी धक्का मिळाल्यानें, आत्मरंगीं पूर्ण रंगून निजनिष्ठ-आत्मरत-आत्मक्रीड असणाऱ्या महात्म्यांना बोधरूपानें प्रगट होणें भाग पडतें; व त्यांच्या अंतःकरणांतील प्रेमसांठ्याला तोंड फुटून त्या द्वारानें बोधानंदरसाचा प्रवाह बाहेर पडूं लागतो; व त्यायोगें कित्येक जिज्ञासु व मुमुक्षु कृतार्थ होतात. आजपर्यंत असंख्य अनुभवी महात्म्यांचा गूढ आत्मानुभव याच मार्गानें म्हणजे प्रश्नोत्तररूपानें प्रगट झाला आहे; व याचीं उदाहरणें उपनिषदादि ग्रंथांत पुष्कळ आहेत. श्रीमद्भगवद्गीतारूपी परमामृताचा जो अमूल्य ठेवा निर्माण झाला तो प्रणिपात व (परि) प्रश्न यांच्यामुळेंच झाला."

"परम कनवाळू महात्म्यांना जो शरण आला व ज्याला त्यांनीं एकदां आपला म्हटलें, त्याच्या कल्याणाची ते सतत काळजी वाहात असल्यामुळें जेणेंकरून दिवसेंदिवस त्याची अनुभवमार्गीं प्रगति होईल व त्याची उन्नति होईल अशा रीतीनें ते नेहमीं त्याला बोधजागृति देत असतात. त्यामुळें प्रत्येक वेळीं शिष्यानें प्रश्नही विचारण्याची वाट न पहातां, अथवा मुग्ध प्रश्न, त्याच्या अनुच्चारित शंका, त्याच्या अडचणी, आपणच समजून ते बोध करीत असतात. किंबहुना सत्पुरुष हे 'मेघोपदेश' ('मेघवृष्टिन्यायानें' उपदेश) करीत असतात. म्हणजे ज्याप्रमाणें मेघ हे पात्रा-पात्राचा विचार न करितां (सर्वत्र सारखी) पर्जन्यवृष्टि करितात, त्याप्रमाणें

मनुष्यमात्राचें कल्याण चिंतणारे महात्मे मानणाऱ्यांस व न मानणाऱ्यांसहि सत्यबोध करीत असतात. ”

—श्रीदत्तप्रेमलहरी–पुष्प ७ वें, प्रस्तावना.*

“ अधिकारानुरूप गुरुपुत्रांचे पांच **वर्ग** आहेत. ( १ **शूद्र**, २ **वैश्य**, ३ **क्षत्रिय**, ४ **ब्राह्मण**, ५ शुद्ध **वर्गातीत.** )

१ ची दृष्टि **स्थूल**देहाच्या चेष्टेवरच असते.
२ ची दृष्टि **सूक्ष्म**देहाच्या स्थितीवरच राहते.
३ ची **कारण**देहावर आनंदाच्या स्थितीवरच असते.
४ ची बोधसंपत्ति, ज्ञानप्रकाश यांवर असते.
५ ची शुद्ध प्रेमच पहात असते.

**पहिला** ( शुद्र ) आपल्या गुरूचें देहाभरण, खान, पान, चेष्टा हीं पहातो.

**दुसरा** ( वैश्य ) इंद्रियजय, वासनाक्षय, दृढनिश्चय, शास्त्रविजय, अन्यमतखंडण-सामर्थ्य, वीरशैवभक्ति हीं पहातो.

**तिसरा** ( क्षत्रिय ) उपासनासिद्धि-योग, समाधि, उपरति, द्वंद्वसहिष्णुता, देहावर अनासक्ति, परवशता, हीं पहात असतो.

**चौथा** ( ब्राह्मण ) उपदेशहातवटी, बोधसौकर्य, अनुभवदृढीकरण, परमानंदप्राप्ति, जीवन्मुक्ति, अखंडैक्यज्ञान, कृतकृत्यता, कर्तव्यशून्यता हीं लक्षणें पहातो.

“ **पांचवा** ( शुद्ध-वर्गातीत ) सद्गुरूनें **आपला** म्हटलें, तेव्हांच आपलें कार्य झालें; बंधमोक्ष बालकहाणी, ऐक्यस्थिति मूळचीच, नवीन नाहीं; पायीं एकदां पडल्यावर तेथून उठण्यास अहंकारच उरला नाहीं; **आपल्यावर गुरुमायेचें अद्वितीय प्रेम आहे; स्वस्थ रहावें.** अशा वीरनिश्चयानें सर्वकाळ प्रपंच-परमार्थ

* बेळगांवचे सुप्रसिद्ध सत्पुरुष श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर हे श्रीज्ञानेश्वरासारखे ज्ञानी व श्रीएकनाथासारखे महान् गुरुभक्त होऊन गेले. त्यांचे अमोलिक लेख व संभाषणें ‘ श्रीदत्तप्रेमलहरी-पुष्पमाला ’ नामक ग्रंथमालेंतून प्रसिद्ध झालेलीं आहेत. गुरुभक्तिप्रेमानें तर तीं अगदीं ओथंबलीं आहेत. हीं पुस्तकें वेदान्तजिज्ञासूंनीं व व गुरुपुत्रांनीं अवश्य वाचून पहावीं, अशी आम्ही प्रेमानें शिफारस करितों. हीं पुस्तकें मिळण्याचा पत्ता–‘ श्रीपंत-ग्रंथप्रसारक मंडळ, बाळेकुंद्रीकरांचा वाडा, समादेवी गल्ली, बेळगांव असा आहे.

गुरुरूपच पहात, प्रेमानंदांतच सहजसमाधिमुखानें डुलत असतो. **याचें ज्ञान, वैराग्य, भक्तिप्रेम त्याच्या जन्मास गेलेल्या पुरुषाला मौनसमाधींत कळणार आहे.**

" वर दर्शीविलेल्या पांच वर्गापैकीं आपण कोणत्या वर्गांत मोडतों, हें आपल्यास विचारून जागृत व्हावें; आणि चरम ( शेवटच्या वरील ) पायरीवर जाऊन उभा राहीपर्यंत **मध्यें कोठेंच न थांबण्याचा सद्गुरुकृपेनें निश्चय करून, गुरुमायेचें तान्हें बाळ होऊन, त्याच्या भावाभावातीत शुद्धानंद-मांडीवर खेळत रहावें.** तेथेंच विदेह कैवल्याची पुनरुत्थानरहित झोंप लागते. " ... ... ... ...

## साधकाचें कर्तव्यकर्म

" ज्याला या भवसागरांतून पार पडणें आहे, त्यानें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्तन ठेवलें पाहिजे.

**सर्व तमोगुणाचें मूळ अन्न आहे.** त्याकरितां युक्त आहार, युक्त निद्रा, युक्त व्यवहार, युक्त भाषण, इत्यादि सर्व देहासंबंधीं कर्तव्यें अगदीं नियमित असावीं. अन्नापासून काम, क्रोध, मद, मत्सर, दंभ, अहंकार इत्यादि दुर्गुण उठतात. **या देहाला अधिक खायला घातलें कीं आपल्या स्वाधीन न राहतां साधनास आड येतो.** तद्वतच हें शरीर चांगलें पोषिलें, मऊ मऊ कपडे दिले, आजाराचे वेळीं औषध देणें, पथ्य करणें, त्या वेळीं हरएक प्रकारची काळजी बाळगल्यानें अनावर होऊन चौऱ्यांशींच्या फेऱ्यांत आणून पाडतो. तर याचा संग सुटेल अशा रीतीनें विचारपूर्वक वर्तन ठेवणें; यापासून तोटे किती आहेत, ते या देहाला अन्न, वस्त्र, वनिता, सुगंध, संगीत, सुरूप इत्यादि विषयांची किंचित् गोडी लाविली कीं, **योगाचे प्रबळ ' वैरी '–लय, विक्षेप, कषाय, रसास्वाद** हे चार उरावर नाचूं लागतात; आणि योगाचे तोंडीं माती घालतात. " ... ... ...

" **मोक्षार्थ खटपट करणाऱ्या साधकास अवश्य प्राप्त होणाऱ्या ' अवस्था ' चार.** त्यांपैकीं जरकरितां एखादी झाली नाहीं, तर तो लोकांतराप्रत जाईल, पुनरावृत्ति चुकणार नाहीं. एक दोन साधून ' मुक्त ' म्हणविणारे **भ्रष्ट.** त्यांची गोष्ट सुद्धां ऐकूं नये. कारण **निर्विकल्प समाधि प्राप्त करून घेणाऱ्यांनीं या अवस्था साधल्याच पाहिजेत.** उगीच शब्द-विटंबना केली,

अवस्थांतर वृत्ति नाहीं, तर सर्व व्यर्थ आहे. पाण्यांत होम जाळल्याप्रमाणें निर्फळ. गाढवाचें तट्टू ( घोडें ) होणार नाहीं.

( १ ) **मंत्र** ( योग ) :— पहिली **'पशु-अवस्था.'** कशाचीच काळजी न करणें; मिळेल तें जेवायचें. कोठेंही पाणी प्यावयाचें. उकिर्ड्यांवर किंवा गोठ्यांत याला जेवूं घाला, **दोन्ही सारखींच.** कोणीं "असें कां" म्हणून दटावलें कीं, तो रस्ता सोडावयाचा. पुढें बोलावलें तरी जावयाचें नाहीं. खुशाल भलतीकडे असावयाचें. **चिंता मुळींच करावयाची नाहीं. मागील आठवण असावयाची नाहीं. सध्याची कल्पना करावयाची नाहीं. पुढील व्यवस्थेची विवंचना, आशा, हीं बिलकुल करावयाचीं नाहींत.** मानापमानाचा पूर्णपणें त्याग.

( २ ) **लय** ( योग ) :— **'शिशु-अवस्था.' अभिमान** बिलकुल असावयाचा **नाहीं.** सदा आनंदी. भूक लागल्यास रडावयाचें. कोणी घातलें खाल्लें, न मिळालें तरी **खेळांतच निमग्न.** विधि-निषेध, पाप-पुण्य, लहान-थोर, उत्तम-कनिष्ठ यांची **उपाधि किंचितही असावयाची नाहीं.**

( ३ ) **हट** ( योग ) :— **'झोंपाळू.'** सदा दृष्टि **अर्धोन्मीलित,** ब्रह्मचिंतनीं वृत्ति गढून जाणें, कोणत्याही दृश्य पदार्थाचें चिंतन करितां चंचल न होणें, सदा **ब्रह्मानंदाची गुंगी** राहणें. त्या स्थितींत उठण्यास मार्ग नाहीं.

( ४ ) **राज** ( योग ) :— **'निद्रा निरंतर.' डोळे अंतर्मुख** झालेले ; **वृत्ति ऊर्ध्व** झालेली ; मनाचें **उन्मन** झालेलें ; इंद्रियें ब्रह्मानंदसागरीं बुडून शांत झालेलीं, क्षणभरही न विसंबतां **ब्रह्मविचार** करीत असणें, चुकूनही देहाकडे लक्ष जावयाचें नाहीं *; केव्हांही ध्येय, ध्याता, ध्यान विसरून **निरालंबी,** निर्विकार, निरंजन, निर्मुक्त होऊन राहणें.

"या वरील **चार अवस्था** साधकांच्या झाल्या. पण निजनिष्ठ **सद्गुरूच्या पायाशीं खिळून राहिला** आणि त्याच्या आज्ञा मानण्यास जीवितही खर्च करण्यास तयार ; सर्वत्र त्याचें स्वरूप पाहून **अति दीन, नम्र, शांत, क्षमाशील,** सदा **सद्गुरूचें चिंतन, भजनपूजन, सेवा इत्यादिमध्यें चूर होतो,** त्याच्या आज्ञेपेक्षां श्रेष्ठ कांहींच नाहीं, त्याची कृपा साधण्यांतच, त्याच्या वचनाप्रमाणें चालण्यांतच पूर्ण आनंद मानितो, ज्याला **गुरुभक्तीची मोठी आवड, आपणास**

* यालाच **'अप्रमत्तस्तदा भवति'** असें श्रुति म्हणते.

**नाहींसा करून तोच पूर्ण आहे,** असें समजून, सहजरीत्या सर्वत्र समबुद्धि, समशील, **अंतर्बाह्य अमृताप्रमाणें सर्वसेव्य** अशा आंत बाहेर **मंगल स्वरूप पहात जाणाऱ्याला स्थिति गति नाहीं.** तोच ज्ञानस्वरूप, **त्याचे पायींच मोक्ष विश्रांतीस येतो.**" — श्रीदत्तप्रेमलहरी, पुष्प ५ वें.

* * * * *

## गुरूवरील श्रद्धा गुरुकृपेनेंच टिकावयाची

साधकांना गुरूची आवश्यकता तर आहेच, हें मागील लेखावरून वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. त्या गुरूचा शोध कसा करावा, गुरुप्राप्तीनंतर ' साधकांचीं कर्तव्यें ' काय असतात, साधकांच्या जाती किती असतात, साधकांच्या ' अवस्था ' किती असतात, वगैरेबद्दलचा उहापोहही अधिकारी संतांच्या वाणीनें मागच्या लेखांत केलेला आहे. साधकांच्या जाती निराळ्या, त्याप्रमाणें गुरूंच्याही जाति अथवा स्वभाव निरनिराळे असतात, याबद्दलचाही उल्लेख मागें येऊन गेला आहे. आतां एकदां गुरुवरण झाल्यानंतर त्यांच्या स्वभावाशीं आपला स्वभाव कसा मिळता घ्यावा याबद्दलच्या सूचना दिल्यास त्याही साधकास उपयोगी पडतील असें वाटल्यावरून देत आहें. जगाच्या व्यवहारांत किंवा आपल्या एका कुटुंबांतसुद्धां निरनिराळ्या स्वभावाचीं माणसें असतात, त्या सर्वांचे स्वभाव आपल्या स्वभावाशीं तंतोतंत मिळतात असें बहुधा होतच नाहीं. आपल्या चौकटींत त्यांचे स्वभाव बसवून घ्यावे लागतात. लौकिक अथवा भौतिक व्यवहारांत जर असें केल्याशिवाय गत्यंतर नसतें, तर मग अलौकिक अथवा अभौतिक व्यवहारांत असें केल्याशिवाय कसें चालेल? **ब्रह्मज्ञानी किंवा ब्रह्मनिष्ठ झाले तरी प्रकृतिस्वभाव बदलत नसतात.** संतांच्या ठिकाणीं ' बालोन्मत्तपिशाच ' वृत्ति किंवा शांत–उग्र–उदासीन वृत्ति, अथवा एकाच व्यक्तीमध्यें भिन्नभिन्न काळीं भिन्नभिन्न वृत्ति दिसतात, तेव्हां त्या त्या काळीं आपली वृत्ति साधकानें ( शिष्यानें ) कशी अचल अथवा निर्विकार राखावी हें समजलें पाहिजे. ( निर्दंभतेची खात्री झाल्यानंतर ) शिष्यानें आपली वृत्ति सांभाळण्यास जपलें पाहिजे. त्याबद्दल खालील वचनें लक्ष्यांत ठेवल्यास फार उपयोग होईल :—

**" गुरु दाखवी नाना भाव । परी न ढळवावा आपला भाव ।**
**तरीच शिष्य महानुभाव । होऊं शकेल परमार्थी ॥**
**जेव्हां दाखवी शांति वरिष्ठ । तेव्हां भावणें गुरु वशिष्ठ ।**
**भोळेपणा दावितां श्रेष्ठ । गौरीकांत गणावा ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

जरी करीतसे छळणास । प्रगटला म्हणावा दुर्वास ।
गुरु होतांचि कोपिष्ठ । वीरभद्र स्पष्ट म्हणावा ॥
जळीं विचरूं लागतां गुरु । प्रगटला म्हणावा मत्स्यावतारु ॥
भारवाहक होतां विचारु । कूर्मावतारु करावा ॥
करकरा खाऊं लागे दांत । अन्याय हिरण्याक्ष दैत्य ।
वधाया प्रगटला सत्य । वराहरूपें सद्गुरु हा ॥
आरक्त करूनियां नयन । गुरगुरूं लागतांचि जाण ।
नृसिंह प्रगटला म्हणोन । प्रल्हादभावें शरण जावें ॥
मागूनि दमवी दान धन । तेव्हां जाणावा वामन ।
कठोर झालिया अंतःकरण । रेणुकानंदन गणावा ॥
टाकूनि वैभव धरी कांतार । तेव्हां जाणावा रामचंद्र ।
वर्ते नटासम अथवा जार । नंदकिशोर समजावा ।
नग्न बैसे धरूनि मौन । तेव्हां म्हणावें बौद्धाभिधान ॥
तुरगारूढ खड्गा दारुण । धरितां, कल्की ओळखिजे ॥
माकडचेष्टा करी उड्डाण । म्हणावा सीताशोकहरण ।
दान करितां म्हणावा कर्ण । अनन्यपूर्ण असावें ॥ " इत्यादि.

— राघवदासकृत श्रीमाणिकप्रभुचरित्र, अ. १३*

गुरूच्या विकारावर कशी कशी भावना करावी, हें वरील ओंव्यांत फारच सुंदरपणानें दाखविलें आहे. सच्छिष्यांना गुरुभावाचें पोषण करण्यास याचा फारच उपयोग होईल असें आमचें मत आहे. परंतु असाही पुष्कळांचा अनुभव आहे कीं, गुरूवरील श्रद्धा ही स्वतःच्या बुद्धिबळावर टिकणें शक्य नसून त्यांची कृपा असेल तरच ती टिकते. तथापि, व्यायामकर्ते शरीर कमावतात, गवयी कंठ कमावतात, लेखक अक्षर कमावतात, सराफ दृष्टि कमावतात, त्याचप्रमाणें परमार्थकर्त्यांनीं भाव कमावण्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. कारण येथें ' भावाचें बळ ' च कार्यकारी आहे, ' तर्काचें बळ ' चालत नाहीं. कारण—

* आमचे मित्र श्री. राघवदास रामनामे, बेळगांव, यांनीं हें श्रीमाणिकप्रभुचरित्र ओंवीबद्ध केलेलें फारच सुंदर पण अप्रकाशित आहे; तें लवकर प्रकाशित होवो असें आम्ही इच्छितों.

## संतांचें देहप्रारब्ध किंवा लीलाप्रारब्ध

चमत्कारिक असतें. ते अंतरांतून प्रकृतिबंधनामधून मोकळे झालेले असतात. म्हणून जगाच्या व्यावहारिक नियमांचें बंधन पाळण्यास ते कोणाचे बांधलेले नसतात. लोकसंग्रहास्तव कदाचित् कोणी पाळतातही, नाहीं असें नाहीं. पण त्यांनीं तें पाळलेंच पाहिजे असें निर्बंधन कोणी घालूं शकणार नाहीं. फार काय, वेदांचें नियमनही त्यांवर चालत नाहीं.

**" ऐसे आचरितां भागवतधर्म । बाधूं न शके कर्माकर्म ।**
**कर्मासी ज्याची आज्ञा नेम । तो पुरुषोत्तम भजनामाजीं ॥ ...**
**ऐसा ब्रह्मानुभवी जो देख । कर्म तेथ होय रंक ।**
**वेद् तयाचे सेवक । विधिविवेक कामारी ॥ "**

— एकनाथी भागवत

तात्पर्य, संतांच्या बाह्य आचरणावरून, त्यांच्या कंगाल किंवा श्रीमंती थाटाच्या राहणीवरून त्यांच्या अंतरांतील योग्यता जाणतां यावयाची नाहीं. व्यावहारिक बुद्धीच्या घमेंडीनें त्यांच्या आचरणावर कोणी टीका करूं नये. आपणास त्यांचा स्वभाव पटला नाहीं अथवा वर्तन मानलें नाहीं, तर त्यांचा निकट सहवास करूं नये. पण निंदेच्या पापांत तर साधकांनीं बिलकूल पडूं नये. भगवान म्हणतात —

**" उद्धवा निंदास्तुतीची कथा । सांडी सांडी गा सर्वथा ।**
**तरीच पावशी परमार्था । निजस्वार्था निजबोधु ॥...**
**मी एक सर्वज्ञातापूर्ण । ऐसा धरोनि ज्ञानाभिमान ।**
**जगाचे देखे दोषगुण । निंदी ब्राह्मण मुख्यत्वें ॥**
**पराचें स्वाभाविक कर्म । स्वयें निंदणें हा अधर्म ।**

कारण —

**हनुमंत ज्ञाता परम । त्यास वानरी कर्म सोडीना ॥**
**नारद ज्ञातेपणें मोठा । सत्य मानला श्रेष्ठश्रेष्ठां ।**
**तोही कळिलावा कळिकांटा । स्वभावचेष्टा अनिवार ॥**
**गरुड देवाचें वाहन । सदा तिष्ठे हात जोडून ।**
**तोही करी सर्पभक्षण । ऐसें कर्म जाण स्वाभाविक ॥**
**विचारितां जग त्रिगुण । गुणानुसारें कर्माचरण ।**
**तेथ पाहतां दोषगुण । दोषी जाण पाहे तो ॥**

**जगीं पहावी एकात्मता । हे ब्रह्मस्थिति गा सर्वथा ।**
**सांडूनि, गुणदोष पहातां । तो निजात्मघाता प्रवर्ते ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. २८

साधकाला थोडेंसें ज्ञान कळूं लागलें, नव्हे, ज्ञान कळण्याचा भास झाला, म्हणजे तो मोठ्यामोठ्यांची निंदा करूं लागतो. असें बरेच वेळां पाहण्यांत आल्यामुळें ही सूचना जरा जास्त अगत्यानें द्यावी लागत आहे. श्रीभगवानही उद्धवाला हेंच बजावून सांगतात :—

**" अभिमानाची जाति कैशी । अधिक खवळे सज्ञानापाशीं ।**
**तो दाखवी गुणदोषांसी । निंदास्तवनासी उपजवी ॥**
**आपुल्या वृत्तीसी जो समान । त्याचें अळूमाळ करी स्तवन ।**
**न मने आपणासी ज्याचा गुण । त्यासी निंदी आपण यथेष्ट ॥**
**निंदास्तुति उपजे जेथ । भेद क्षोभला उठे तेथ ।**
**निःशेष निर्दाळी परमार्थ । महा अनर्थ अंगीं वाजे ॥**
**निंदेपाठीं अनर्थ । उधार लागों नेदी तेथ ।**
**रोकडा अंगीं आदळत । निजस्वार्थघातक ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. २८

असेंही पुष्कळ ठिकाणीं अनुभवास येतें कीं, अगदीं प्रापंचिक लोक एकमेकांची निंदा करितात, त्याप्रमाणें पारमार्थिक म्हणविणारे लोक आपल्या गुरूचें किंवा संप्रदायाचें श्रेष्ठत्व स्थापण्याकरितां इतरांच्या गुरूची व संप्रदायाची निंदा अथवा थट्टा करीत असतात ! त्यांनींही वरील ओव्या नीट लक्ष्यांत ठेवाव्या व नकळत घडणाऱ्या आत्मघाती दोषांपासून परावृत्त व्हावें.

* * *

## सिद्धपणाची खोटी समजूत

कित्येक साधक स्वतः साधनाची पराकाष्ठा करून पूर्णत्व मिळविल्यावांचून आपण सिद्ध झालों असें स्वतः मानतात व लोकांसही भासवितात. त्यायोगें ते लोकांस फसवितात व आपणासही फसवून घेतात ! अगदींच दांभिकपणानें, म्हणजे आपला चरितार्थाचा किंवा इंद्रियांचा स्वार्थ साधण्याकरितां भोळ्या भाविकांस फसवितात त्यांची गोष्ट सोडून द्या ; कारण त्यांना मुळीं साधकच म्हणतां येणार

नाहीं. ते परमार्थाचें तर नाहींच, पण प्रपंचाचेंही साधन करणारे नसून केवळ निरयगतीचेंच साधन करणारे होत ! परंतु खऱ्या आस्थेनें परमार्थास लागलेले कांहीं लोक पूर्णत्वाच्या स्थितीचा विचारही न करितां ( अनुभव तर दूरच ), साधनाच्या पूर्वावस्थेंत कांहीं चमत्कार – ज्योतिर्दर्शन, नादश्रवण, भविष्यज्ञान, परांतरज्ञान अथवा स्वप्नांत किंवा प्रत्यक्ष उपास्यदेवतेचें दर्शन व संभाषण वगैरे – झालें म्हणजे तेवढ्यानें कृतार्थता मानणारे व जगांत सिद्धपणा मिरविणारे आढळून येतात. परमेश्वरच कृपा करील तेव्हां सत्संगानें त्यांना खरा मार्ग व अंतिम ध्येय दिसूं लागेल, नसलेस ते कुठल्याकुठें वाहवतील हें सांगतां येत नाहीं. आत्माकारवृत्तीच्या संतताभ्यासानें निजानंदाचा अनुभव येईल, तेव्हांच विषयानंदाची प्रवृत्ति मोडेल (' परं दृष्ट्वा निवर्तते ') ; नसल्यास नाहीं. तें दुःखरहित सुख, ज्याला ' निर्दुःखानंद ', ' चिदानंद, ' ' निजानंद ' अथवा ' आत्मानंद ' किंवा ' ब्रह्मानंद ' म्हणतात, तें अनुभवल्यावांचून विषयानंदाची वासना जावयाची नाहीं, ती गेल्यावांचून गर्भवास चुकावयाचा नाहीं.

**" अनुभविलें तें सुख । तो संसारचक्राचें न पाहे मुख ।**
**तुका म्हणे रामें सुख दिधलें आपुलें ।**
**तया गर्भवासा येणें जाणें खुंटलें ॥ "**

अशी संतांची अनुभविक वाणी आहे.

येथें ' आपुलें सुख ' म्हणजेच **स्वात्मसुख, महासुख, चित्सुख, आत्यंतिक** सुख, **निजानंद** असें समजावें. ह्या निजानंद साक्षात्कारावांचून इतर अद्‌भुत साक्षात्कार झाले, तरी त्यास ' सिद्धपण ' म्हणतां येणार नाहीं. तसें जो म्हणेल, स्वतःला तसें मानील, तर तो योगभ्रष्ट अथवा योगच्युत झाल्यावांचून रहाणार नाहीं. **' सुखमात्यन्तिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् '** ( भ. गी. ) या वचनांत सांगितल्याप्रमाणें, तें ' अतीन्द्रिय ' असें ' आत्यन्तिक ' सुख परम शुद्ध अशा बुद्धीनें ग्रहण झालें नाहीं, तोंपर्यंत तो साधक इन्द्रियसुखाच्याच मार्गें लागणार. ' इंद्रियसुखाचा त्याग मुमुक्षूनें हवा तर करावा, सिद्ध-दशेंत तसें करण्याचें कारण नाहीं ; पापपुण्याचा विचार प्राकृत लोकांकरितां सांगितला आहे ; स्वर्ग-नरक, बंध-मोक्ष, गुरु-शास्त्र हें सर्व जेथें मिथ्या म्हणून सांगितलें आहे, तेथें पुण्यपाप व विधिनिषेध कोठें राहातात ? कर्माकर्म सर्व ब्रह्मरूप आहे, इंद्रियांचीं कर्में इंद्रियें करितात, आत्मा पापपुण्यापासून अलिप्त, आणि आपण देह नसून आत्मा आहों ' अशा समजुतीनें कांहीं साधक

यथेष्टाचरणास प्रवृत्त होतात ! त्यांना ह्या वृत्तीस अनुकूल अशीं ग्रंथांतील वचनेंही मिळतात अथवा ते शोधून काढतात. फार काय सांगावें, त्यांच्या वर्तनाच्या विरुद्ध असणाऱ्या वचनांचा अर्थ सुद्धां बदलून आपणांस अनुकूल असा त्याचा अर्थ करितात ! त्यांची ही हातचलाखी कदाचित् नसूं शकेल, पण खरा सत्संग नसल्यामुळें ज्ञानाभिमानाच्या योगें ते स्वतः फसतात व लोकांस फसवितात !

देहप्रारब्धानुसार ज्ञान्यांच्या वर्तनांत व परिस्थितींत भिन्नता दिसून येते. श्रीसमर्थ ' सुमुहूर्त–सावधाना 'च्या वेळीं लग्नमंडपांतून पळून जाऊन आजन्म ब्रह्मचारी राहिले, तर श्रीतुकाराममहाराजांनीं दोन लग्नें करून घेतलीं; श्रीसमर्थ भिक्षा मागून राहात, तर श्रीरंगनाथ व अमृतराय हे अगदीं चैनीनें श्रीमंती थाटांत वागत; इत्यादि उदाहरणें पाहिलीं म्हणजे ' देहप्रारब्ध ' म्हणून एक अनुल्लंघ्य शक्ति आहे; त्या शक्तीपुढें सर्वसाधारण मनुष्यापासून तों मोठमोठ्या अवतारिकांनाही मान वांकवावी लागते यांत संशय नाहीं. पण ' देहप्रारब्ध ' नांवाच्या पडद्याआड मुमुक्षूला व कच्च्या मनाच्या साधकांना चुका करण्याचा मोह पडतो. त्या चुका साधकांना स्वार्थापासून च्युत करून अनर्थांत पाडतात. असे हे अनर्थ अथवा अधःपात चुकवावे म्हणून कृपाळू संतांनीं ' सावधगिरी ' ( caution ) च्या पाट्या मार्गांतील वळणावर, धोक्यांच्या स्थळीं लावून ठेवल्या आहेत. त्या पाहून साधकांनीं आपली साधनाभ्यासाची मोटार हांकली पाहिजे. नसल्यास अपघात होऊन स्वतःचा व दुसऱ्याचाही नाश होण्याचा संभव असतो. प्रारब्ध हें अपरिहार्य आहे – अपरिहार्य म्हणजे टाळतां न येणारें – व टाळण्याचा प्रयत्न केला असतां तें जन्मांतराला कारण होतें, म्हणून तें भोगूनच टाकलें पाहिजे; अशा समजुतीनें, कोणी साधक, एकांतांत परस्त्री आपण होऊन आली असतां, हा एक आपला देहप्रारब्धाचा योग आहे असें समजून भोगाची इच्छा करील, तर तसें करूं नये, म्हणून सुंदर शब्दांनीं ' पेन्ट ' करून खालील पाटी श्रीतुकाराममहाराजांनीं साधकाच्या मार्गावर लाविली आहे. ती स्वहितेच्छु साधकांनीं नीट वाचून पहावी.

**" सुगंध म्हणोनि चोळूं नये फूल। खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥**
**मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद। यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥**
**कर्मफळ म्हणुनी इच्छूं नये काम। तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥"**

याचा अर्थ :– फूल उत्तम सुगंधी आहे म्हणून तें चोळून त्याचा वास घेऊं नये; मूल फारच गोजिरवाणें – आवडतें म्हणून त्याला मारून खाऊं नये; मोतीं मोठें पाणीदार म्हणून त्या पाण्याचा स्वाद चाखून पाहूं नये; मृदंग, सतार, सारंगी, इत्यादि

************************************************

यंत्रें उत्तम नादाचीं म्हणून तीं यंत्रें फोडून त्यांतील नाद शोधूं नये ; त्याप्रमाणें परस्त्री तर सोडूनच द्या, पण स्वस्त्री देखील एकादशी, पितृतिथि वगैरे वर्ज्यकाळीं येईल तर तिचा प्रारब्ध म्हणून अंगीकार करूं नये, असें हें कर्मफळभोगाचें 'वर्म' श्रीतुकाराममहाराजांनीं उघड करून दाखविलें आहे. स्वतः त्यांनीं तसें आचरण केलें आहे. त्याचा सुपरिणाम त्यांनीं अनुभविला आहे व कृपाळुपणानें हें 'ट्रेड सीक्रेट' त्यांनीं जीवाच्या कल्याणाकरितां उघड केलें आहे. याचेकडे न पाहतां श्रीकृष्णादिकांचीं उदाहरणें घेऊन जो साधक यथेष्टाचरण बुद्धिपुरःसर करील, 'इंद्रियासवडीं लपूं नको' हे संतांचे इषारे लक्षांत घेणार नाहीं, त्याचा अधःपात झाल्यावांचून रहाणार नाहीं. आतां **श्रीकृष्णाप्रमाणें सोळा सहस्र स्त्रिया भोगून ब्रह्मचारी रहाण्याची शक्ति** वा युक्ति ज्याला सांपडली आहे, श्रीकृष्णाप्रमाणें आपल्या कुळाची-वंशाची होळी आपल्या हातानें करण्याचें धैर्य व निर्ममत्व ज्याला बाणलें आहे, त्यानें परस्त्रीसेवनादि निषिद्ध कर्में खुशाल करावीं. **शास्त्रांनीं घालून दिलेले नियम** म्हणजे जीवांवर उगीच लादलेले जुलूम नसून आपल्या अतीन्द्रियद्रष्ट्या ऋषींनीं शोधून काढलेले **निसर्गाचे कायदे आहेत.** निसर्गराजाचा कायदा मोठा जुलमी असतो ; तो कोणत्याही जुलमी राजाच्या कायद्यापेक्षां अत्यंत कठोर असतो ; कारण त्या कायद्यांत क्षमा हा शब्द नाहीं. कल्याणेच्छु जीवांनीं हे कायदे पाळलेच पाहिजेत. तसें करण्यांत त्यांचें इहपर कल्याण असून पुढील वंशजांचेंही कल्याण आहे. परस्त्रीच्या लोभानें रावणकौरवादिकांचा 'कुळक्षय' झाला. ही पौराणिक गोष्ट म्हणून बाजूस ठेवली, तरी ऐतिहासिक गोष्टींत पेशव्यादिकांच्या राज्यलक्ष्मीच्या नाशास तेंच कारण झालें आहे ; श्रीशिवाजीमहाराजांच्या अभ्युदयास त्यांचें ब्रह्मचर्य म्हणजे परदाराभिलाषशून्यता हें एक कारण असून त्यांच्या पुत्राचें त्याउलट वर्तन झाल्यामुळें त्याचा परिणामही किती उलटा झाला हें इतिहासज्ञांस माहीतच आहे. कोणी म्हणतील, शिवाजीमहाराजादिकांच्या अभ्युदयास-यशःप्राप्तीस-स्वदारनिष्ठता एवढेंच कारण पुरें झालें काय ? तर तसें नव्हे ; **लौकिक प्रयत्नाला अलौकिक पुण्याईची साहाय्यता असेल तर ते प्रयत्न फलद्रूप होतात ; नसलेस नाहीं. मग हे प्रयत्न प्रपंचाचे असोत किंवा परमार्थाचे असोत. प्रपंच देखील ज्याला चांगला व्हावा असें वाटत असेल, त्यानें सुद्धा जर मनोजय व इंद्रियजय साधणें अवश्य आहे, तर मग परमार्थांत त्याची किती आवश्यकता आहे हें काय सांगावें ?** स्वदारनिष्ठतारूप ब्रह्मचर्य ज्याचें चांगलें असेल ; त्यालाच 'अचूक यत्न' करणेच्या कल्पना सुचतील,

त्याच्याच हातून अचूक कार्यें घडून येतील व त्या कार्यास यशही अचूक ठेवलेलें असेल. बिन्दुधारणेनें म्हणजे **ब्रह्मचर्यानें बुद्धींत तेज व ओज यांची वृद्धि होते, आणि त्यायोगें संकल्पसिद्धि प्राप्त होऊन सर्व भाग्यें घरीं चालून येतात.** याकरितां साधकांनीं या बाबतींत फार सावध राहिलें पाहिजे.

साधकानें कामविकाराच्या बाबतींत सावध राहिलें पाहिजे, तसें क्रोधविकाराच्या बाबतींतही सावध असलें पाहिजे. काम जिंकणें सोपें नाहीं, पण त्यापेक्षांही क्रोध जिंकणें कठीण आहे. हे दोघेही तपाची हानि करणारे महाशत्रु आहेत. कामानें तपाची हानि होते, पण त्या हानीच्या मोबदल्यांत थोडासा भोग तरी मिळतो; परंतु जे क्रोधाला वश होतात, ते बिनमोबदल्यानें तपाला आंचवतात !

**" जे मज कामासी वश होती । ते तप वेंचोनि भोग भोगिती ।**
**जे आतुडले क्रोधाच्या हातीं । ते वृथा नागवती तपासी ॥...**
**क्षुधेतृषेतें नेमूनि । जिव्हा शिश्न आकळोनि ।**
**मज कामातें जिंतिलें मानोनि । निष्कामाभिमानी उन्मत्त ॥**
**अल्प अपमाना हातीं । जे क्रोधासी वश होती ।**
**ते शाप देऊनि तपसंपत्ति । व्यर्थ नागविती निजनिष्ठा ॥...**
**जे अपार सागर तरती । ते गोष्पदोदकीं बुडती ।**
**तेवीं मज कामातें जिणोनि जाती । तेही नागविजेति निजक्रोधें ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. ४

विश्वामित्रानें मेनकेच्या नादीं लागून साठ हजार वर्षांची तपःसंपत्ति घालविली, त्याप्रमाणें गौतमानें व कपिल महामुनीनें अनुक्रमें इंद्रास व सगरपुत्रांस शाप देऊन आपल्या तपाचा नाश करून घेतला, असें शास्त्रांत सांगितलें आहे. ह्या गोष्टी साधकानें लक्षांत घेऊन आपली वृत्ति शांत राखण्याचा अभ्यास केला पाहिजे. बुद्धिसाम्ययोगामध्यें शांतवृत्ति सजातीय असल्यामुळें तिची फार आवश्यकता आहे. करितां परमार्थसाधकांनीं शांतीचा अभ्यास जरूर केला पाहिजे.

**" अपकाऱ्यावरी जो कोपला । तो तत्काळ कोपें नागवला ।**
**अपकाऱ्या जेणें उपकार केला । तोचि दादुला परमार्थी ॥**
**परमार्थाची मुख्यत्वें स्थिति । पाहिजे गा परम शांति ।**
**ते शांतीची निजस्थिति । दावी लोकांप्रति आचरोनि ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. ८

इतर प्राकृत लोकांप्रमाणें कांहीं परमार्थी म्हणविणारे लोक लहानसहान गोष्टींतही रागावत असलेले दृष्टीस पडतात आणि हा राग बाहेरच्या लोकांपेक्षां ते घरच्या लोकांवर अधिक काढतात ! बाहेरच्या लोकांस शांति व क्षमा दाखवून भलेपण घेतात, पण घरांतील लोकांकडे त्याच्या उलट वागतात, ही मोठी चूक आहे. आतां घरांत राहणारे साधक बायकामुलांच्या व नोकरचाकरांच्या चुकीच्या वर्तनाकडे दुर्लक्ष करून खोटी क्षमा धरतील तर ती उभयपक्षीं तोट्याला कारण होईल, ही गोष्ट खरी आहे; पण आपल्या आश्रयास असलेल्या (अथवा परमेश्वरानें आपल्या आश्रयार्थ ठेवलेल्या) लोकांवर क्षुल्लक कारणाने रागावणें यांत आपली मोठी हानि आहे. हा गोष्टही खोटी नाहीं, हें साधकानें जाणलें पाहिजे. प्रपंचांत कोप करण्याचे प्रसंग येतात, पण तो कोप ओठांतून असावा, पोटांतून नसावा. पोटांतून राग उठेल तर समजावें कीं, त्याच्या अपराधाबद्दलची शिक्षा आपण करून घेतली. कारण शांतिसुखाचा भंग ही मोठी शिक्षा नव्हे का ? मुलामाणसांवर **भीतीचा दाब ठेवण्यापेक्षां प्रीतीचें वजन ठेवणें चांगलें,** ही गोष्ट लक्षांत ठेवावी. प्रपंचांत वागणाऱ्या साधकांना कामक्रोधाचे प्रसंग येतातच. पण त्या कामक्रोधाच्या हारीं न जातां, आपण त्यांनाच आपल्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

भगवान म्हणतात—कामक्रोधांचे वेग सहनच केले पाहिजेत, आणि असें करितो तोच मनुष्य **युक्त** (योगी) व तोच **सुखी,** त्यालाच अंतःसुख व ब्रह्मनिर्वाण प्राप्त होतें.

**शक्नोतीहैव यः सोढुं, प्राक्शरीरविमोक्षणात् ॥**
**कामक्रोधोद्भवं वेगं, स युक्तः स सुखी नरः ॥**

—भगवद्गीता, अ. ५

**“कामक्रोधांचे वेग । सोशी, न इच्छी विषयभोग ।**
**त्यासी जितांचि होय मुक्तीचा योग । शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच ॥...**
**तोचि कामक्रोधांचे वेग । सोसी ज्याला अंतःसुखाचा योग ।**
**आणि त्यासचि हा नित्यसुखसंयोग ।**
**जो वेग सोसूं शके नित्य कामक्रोधांचे ॥”**

—यथार्थदीपिका, अ० ५

असे कामक्रोधांचे वेग सोसणें हे देवाधर्मावर, शास्त्रावर किंवा दुसऱ्या कोणावर उपकार करण्याकरितां नव्हे तर स्वतःवरच ते उपकार आहेत, स्वतःचेंच त्यांत कल्याण

आहे असें समजावें. करितां त्याबद्दल कसलीही फुशारकी न मारतां किंवा न मानितां तशी शक्ति देण्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे किंवा दिली असेल तर त्याचे आभार मानले पाहिजेत.

तात्पर्य, सिद्ध पुरुष अमुकच रीतीनें वागतील, किंवा त्यांनीं अमुकच रीतीनें वागावें असा कांहीं नेम नसतो, म्हणून तीं लक्षणें ( बाह्य आचरणाचीं ) साधकांनीं आपल्या अभ्यासांत पाडण्याचा यत्न करूं नये, नव्हे, तशी कल्पनाही मनांत आणूं नये. त्यांच्या स्वसंवेद्य अंतरंगलक्षणाचा — जीवशिवयोग किंवा चित्तचैतन्ययोग याचाच — सच्च्या साधकांनीं अभ्यास करण्याचा अंतरंगापासून प्रयत्न करावा. म्हणजे त्यांचें इष्ट ध्येय त्यांना निश्चयानें प्राप्त होईल. अपरोक्षज्ञानी पुरुषसुद्धां शास्त्राचे हे नियम कदाचित् कसल्या तरी मोहानें मोडील, तर त्याला देखील त्याचें शासन ईश्वरी नियमाप्रमाणें भोगावें लागेल, नव्हे लागतेंच ; मग गरीब मुमुक्षूंची व साधकांची काय कथा ? इंद्रचंद्रादि देव अपरोक्ष ज्ञानी आहेत, पण त्या इंद्रचंद्रांनीं अनुक्रमें गौतमपत्नी अहिल्या व बृहस्पतिपत्नी तारा यांच्याशीं अशास्त्रीय कामसंबंध केल्यामुळें त्यांना त्यांच्या त्या कर्माबद्दल शासन भोगावें लागल्याची गोष्ट पुराणप्रसिद्ध आहे. ब्रह्मज्ञानानंतर सुद्धां मनोनाश व वासनाक्षय यांचा मुद्दाम अभ्यास केला पाहिजे. जीवन्मुक्तीनंतर ‘ दृष्ट ’सुखाच्या लाभासाठीं तो अभ्यास करणें अवश्य आहे, अशाबद्दल वेदान्तशास्त्रकारांनीं साधकांना सूचना देऊन ठेवली आहे. शास्त्राच्या या सूचनांकडे लक्ष देऊन जो वागणार नाहीं, त्याला कर्माच्या कायद्याप्रमाणें शिक्षा झाल्यावांचून रहाणार नाहीं ; मग तो अज्ञानी असो वा ज्ञानी असो.

* * * *

## ज्ञान्यांचे कामक्रोध !

ज्ञान्याला कामक्रोध असतात कीं नाहींत, असा प्रश्न पुष्कळांना उद्भवतो. सर्वसाधारण लोकांच्या मतें – ज्ञानी म्हटला म्हणजे त्याला सर्व कांहीं सारखें दिसलें पाहिजे, त्याला आपपर भाव नसावा, त्याला कामक्रोध असूं नयेत, त्याला आंबट तिखट समजतां नये, कोणी दगड मारले तरी मारून घ्यावे, खायाला गवत घातलें तर खाऊन सोडावें ; तसेंच त्यानें लोकांचे रोग बरे करावे, मेलेलीं प्रेतें उठवावीं, इत्यादि.

**“ पाण्यामध्यें मासा झोंप घेतो कैसा ।**
**जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ॥ ”**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

या वचनाप्रमाणें ज्ञान्याची स्थिति अथवा ज्ञान्याचीं लक्षणें ज्ञान्यासच ठाऊक असतात. "अंतर्निष्ठांच्या खुणा, अंतर्निष्ठ जाणती" असें समर्थ म्हणतात. अज्ञान्यानें ज्ञानाची किंवा योग्यतेची परीक्षा करणें अथवा त्याविषयीं आपलें मत बोलून दाखविणें, म्हणजे बिनयत्तेतील मुलानें बी. ए. मास्तरच्या विद्वत्तेची परीक्षा करणें किंवा त्याच्याविषयीं आपलें मत बोलून दाखविणें होय. अथवा याबद्दल ग्राम्य दृष्टांत द्यावयाचा झाल्यास असें म्हणतां येईल कीं, एखाद्या तृतीयप्रकृति मनुष्यानें एखाद्या पद्मिनी स्त्रीची परीक्षा करणें होय.

ज्ञानी अथवा मुक्त बाहेरच्या लक्षणांनीं जाणतां येत नाहीं; तसें करूं गेल्यास, अमुक्ताला मुक्त व मुक्ताला अमुक्त म्हणणेचा प्रमाद घडणेचा संभव असतो. एखाद–दुसरें लक्षण अवचित दिसून आलें तर तेवढ्यावरून त्यास मुक्त कोण म्हणणार ? प्रत्यक्ष श्रीकृष्णासारखा पूर्णावतारी पुरुष, कीं, ज्यानें लहानपणींच पूतनावध, गोवर्धनोद्धार, दावाग्निप्राशन, कालियामर्दन इत्यादि अचाट कृत्यें केलीं, त्याचें देखील मुक्तपण मानायला जग कबूल नाहीं, तेथें इतर गरीब साधूंची काय कथा ! लोकांचे विकल्प मोठे गहन असतात. भगवान् उद्धवास मुक्तांचीं लक्षणें सांगतांना म्हणतात :—

**" म्यां सांगितलीं जीं जीं लक्षणें । तीं तीं मुक्ताचीं मुक्तच जाणे ।**
**आणिकासी व्युत्पत्तिपणें । मुक्त जाणणें हें न घडे ॥ ......**
**प्रारब्ध वशास्तव जाण । एखादें अवचटें दिसे चिन्ह ।**
**इतुक्यासाठीं मुक्तपण । मानी कोण जगामाजी ॥**
**शुक-वामदेव मुक्त म्हणतां । सर्वांसी न म्हणवे सर्वथा ।**
**मा इतरांची काय कथा । माझीहि मुक्तता न मानिती ॥**
**म्यां गोवर्धनु उचलिला । दावाग्नि प्राशिला ।**
**अघबक विदारिला । प्रत्यक्ष नाशिला काळिया ॥**
**जों जों हा देहाडा* । तों तों नीच नवा पवाडा ।**
**निजसुखाचा उघडा । केला रोकडा सुकाळ ॥**
**त्या माझें मुक्तपण । न मानिती याज्ञिकब्राह्मण ।**
**इतरांची कथा कोण । विकल्प दारुण लौकिकीं ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. ११

* सगुण अवतारदेह.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तात्पर्य, मुक्तांचीं लक्षणें मुक्तच जाणूं शकतात. इतरांनीं त्याबद्दल तटस्थच राहणें वरें. उगीच विकल्प वाढवूं नयेत. दगडाला व काष्ठालाही कामक्रोध नसतात, म्हणून दगड व काष्ठ साधु झाले काय ? उपनिषत्कालीन महान् ज्ञानी ऋषि **याज्ञवल्क्य** यांना **कात्यायनी** व **मैत्रेयी** नांवाच्या दोन पत्नी होत्या. पैकीं मैत्रेयीनें **जनकराजाच्या** सभेंत याज्ञवल्क्याचा झालेला उत्कर्ष पाहून, पति असावा तर असा ज्ञानी असावा, अशा इच्छेनें याज्ञवल्क्याला तिनें विनति केली. त्यापूर्वी याज्ञवल्क्याचें लग्न कात्यायनीशीं झालेलें होतें. याज्ञवल्क्यानें सांगितलें, या देहाची मालकीण कात्यायनी आहे, तिला विचार. तेव्हां मैत्रेयीनें कात्यायनीची प्रार्थना करून तिच्या संमतीनें, अगदीं प्रौढपणीं याज्ञवल्क्याशीं लग्न लाविलें. यावरून केवळ विषयाच्या अभिलाषेनें याज्ञवल्क्यानें तिच्याशीं लग्न केलें असें होत नाहीं. तथापि छांदोग्य उपनिषदांतील **रैक्क** मुनीची कथा वाचिली असतां, तो ब्रह्मज्ञानी असतांही त्याला विषयाभिलाषा होती असें स्पष्ट दिसून येतें. एक क्षत्रिय राजा श्रेष्ठ पुरुषाच्या प्रेरणेनें ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठीं रैक्क मुनीकडे गेला. त्यावेळीं तो मुनि वयोवृद्ध, अंगावर कंडु उठल्यामुळें एका गाड्याच्या खालीं उन्हाकडे पाठ करून अंग शेकत बसला होता. राजानें जाऊन त्याला नम्रभावें साष्टांग प्रणाम करून ब्रह्मज्ञान सांगणेविषयीं प्रार्थना केली. ती ऐकून रैक्क म्हणाला, तुझी कन्या मला देशील तर मी तुला ब्रह्मज्ञान देईन. राजानें कबूल करून त्या मुनीला सद्भावानें कन्यादान केलें व त्याच्यापासून ब्रह्मज्ञानाची प्राप्ति करून घेतली. सूतसंहितेंत तर अशी एक कथा आहे कीं, एक वेश्या ब्रह्मनिष्ठाची मैथुनसहित सेवा करून ब्रह्मज्ञान होऊन परम गतीला गेली. अर्वाचीन संतांपैकीं श्रीएकनाथ, श्रीतुकाराम व रंगनाथ, अमृतराय वगैरे साधु गृहस्थाश्रमी म्हणजे स्त्रीपुत्रादिसंपन्न होते. श्रीयाज्ञवल्क्य ऋषीप्रमाणें श्रीतुकाराममहाराजांनाही दोन बायका होत्या. वैकुंठारोहणाच्या वेळीं त्यांची बायको चार महिन्यांची गरोदर होती. इत्यादि गोष्टींवरून पहातां ज्ञानी पुरुषांना कामादि विकार असतात असें सिद्ध होतें. कामाप्रमाणें त्यांच्यांत क्रोधही असूं शकतो, हें त्यांच्या चरित्रावरून व प्रासंगिक वचनांवरूनही कळून येतें. परंतु ज्ञान्यांचे कामक्रोध आणि अज्ञान्याचे कामक्रोध यांत महदंतर आहे. मामलेदार रस्त्यानें चालूं लागला असतां त्याच्या मागेंपुढें शिपाई असतात व कैद्यांच्याही मागेंपुढें शिपाई असतात. पण कैदी हे शिपायांच्या ताब्यांत असतात व शिपाई मामलेदारांच्या ताब्यांत वागतात. ह्याच फरक अज्ञानी व ज्ञानी यांच्या कामक्रोधांत समजून घ्यावा. कित्येक वेळां ज्ञानीही अवश होऊन गेलेले आढळतात. उदाहरणार्थ — विश्वामित्र व दुर्वास ऋषि,

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

हे दोघेही ब्रह्मज्ञानी, पण महाक्रोधी अथवा शीघ्रकोपी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांना त्यांच्या क्रोधवशत्वाबद्दल पश्चात्तापही करावा लागला आहे. पण ज्यांचेवर त्यांनीं क्रोध केला, त्यांना आपलें तप अर्पण करून त्यांचें महत् कल्याण केलें आहे, ही गोष्ट साधकानीं विसरतां कामां नये. ह्या गोष्टी एवढ्याचकरितां सांगितल्या आहेत कीं, ज्ञान्यांच्या ठिकाणीं असे कांहीं दोष दिसले तरी त्याबद्दल आपलें मन कलुषित करून घेऊं नये. त्यायोगें आपल्या तपाची हानि होते. थोरांच्या गोष्टी थोरांनाच शोभतात. 'ईश्वराणां वचः सत्यम्,' 'न देवचरितं चरेत्' हीं वचनें लक्ष्यांत ठेवावीं. थोराचीं भाषणें तेवढीं घ्यावीं. त्यांचें आचरण घेऊं नये. पराशरऋषीच्या कामविकारापासून व्यासासारखें रत्न निर्माण झालें; अर्जुनाच्या मोहविकारापासून गीतेसारखें रत्न बाहेर पडलें, दुर्वासाच्या क्रोधविकारापासून परमेश्वराचे दशावतार प्रगट झाले. या गोष्टींचा विचार करून थोरांच्या आचरणाकडे दृष्टि न देतां, साधकानें आपलें मन निर्विकार ठेवणेबद्दल प्रयत्न करणें अवश्य आहे.

"साधूचा (ज्ञात्याचा) सदाचार आहे किंवा दुराचार आहे हें कांहीं एक पाहूं नये; कारण त्याचा कशाही प्रकारचा विहार असला तरी तो मुक्त आहे, याविषयीं अणुमात्र संशय धरूं नये. ज्याचा खरा ग्रंथिभेद झाला, जो अभ्यासानें अभिन्न परमात्म्यांत समरसला, ज्याला भलतेही अवस्थेंत मीपण स्फुरत नाहीं, ज्याला आपला देह परोक्षासारखा झाला, ज्याची देहात्मबुद्धीप्रमाणें ब्रह्मात्मबुद्धि दृढ झाली, त्याची क्रिया जरी यथेष्ट असली तरी तो मुक्त आहे याविषयीं संशय नाहीं. ज्ञानी जरी यथेच्छ वागला तरी तो प्रारब्धाला सोडून वागत नाहीं. मग त्याचें वर्तन सदाचाराचें होवो किंवा दुराचाराचें होवो. भलतें कां वर्तन होईना तो मुक्त आहे. जो कोणी साधक त्याचें वर्तन पाहून उणीव मानील, त्याच्या उत्तम गतीचा क्षय होईल. (कारण) ज्ञात्याच्या शुभाशुभ कर्माचे वांटेकरी दोघेजण आहेत. (१) जे ज्ञात्यास निंदितात, गांजितात, व्यर्थ दुराग्रहानें हेळसितात, ते ज्ञात्यांच्या पापाचे वांटेकरी होतात. (२) आणि जे त्यांस एकभावें स्तवितात, पूजितात, सदा त्यांची सेवा करितात, त्यांस ज्ञात्यांचें सर्व पुण्य मिळतें. याप्रमाणें ज्ञात्याच्या पापपुण्याचे वांटेकरी श्रुतीनें योजिले आहेत." —वाक्यवृत्ति

"तस्य पुत्रा दायमुपयान्ति सुहृदः
साधुकृत्यां द्विषन्तः पापकृत्यानिति।"

—श्रुति

इत्यादि प्रमाणांवरून पहातां, ज्ञानी पुरुषांकडूनही प्रारब्धकर्मानुसार असदाचरण होण्याचा संभव आहे असें दिसून येतें. यथार्थदीपिकेंत म्हटलें आहे — " असुरांप्रमाणें देवही विषयासक्त असतात, पण देवांकडून तसे कांहीं प्रमाद घडले तरी ते भगवद्भक्तीच्या प्रतापामुळें लगेच विरक्त होतात. "

**" असु म्हणिजे इंद्रियें । र म्हणिजे रमणें निश्चयें ।**
**इंद्रियद्वारा विषयासक्त अत्यंत स्वयें । ' असुर ' ते भगवद्भक्तिरहित जे ॥ देवही विषयासक्त । परंतु सर्वेश्वराचें भक्त ।**
**क्षण न लागतां होती विरक्त । प्रतापें भगवद्भक्तीच्या ॥** " इत्यादि.

— यथार्थदीपिका, अ. ९

तात्पर्य, देहधारी झाला कीं, तो प्रारब्धाच्या आधीन असतो. फलज्योतिषाचें ज्याला उत्तम ज्ञान आहे त्याला एखाद्याची जन्मकुंडली पहातांच तो मनुष्य अथवा ती स्त्री सदाचरणी किंवा दुराचरणी आहे हें स्पष्ट कळतें. वधू पसंत करतांना वराच्या पत्रिकेशीं किती गुण मिळतात हें पहावयाचें असतेंच; पण त्याबरोबर ती पतिव्रता राहील कीं तिचा वांकडा पाय पडेल, हें कुंडलींतील ग्रहांवरून जाणून करावी लागते व कुलीन पुरुष तितका बारीक विचार करूनच पसंत करीत असतात. जन्मकुंडली म्हणजे पूर्वापर कर्म जाणण्याचा एक सुंदर आरसा आहे. तो पाहण्याची सुंदर दृष्टि मात्र पाहिजे. या दृष्टीनें विचार करून पहातां प्रत्येक मनुष्य अगदीं ' अवश ' होत्साता बरीं वाईट कर्में करीत असतो. ( हें ज्योतिषशास्त्रानेंही सिद्ध होतें. ) करितां, सूज्ञानें ( परमार्थजिज्ञासूनें ) कोणाचीही निंदास्तुति करूं नये; मग ज्ञानी पुरुषाकडेही त्याच दृष्टीनें पहावें, याबद्दल कशाला सांगितलें पाहिजे? कारण, ज्ञानी झाला तरी तो प्रारब्धाला सोडून वागूं शकत नाहीं.

ज्ञान्याचें लक्षण बाह्य वर्तनावरून ठरवितां येत नाहीं.

**" ज्ञानिनो लक्षणं किंचिन्नियतं नैव विद्यते ।**
**रागी कश्चित् विरक्तो वा शांतो वा क्रुद्धमानसः ॥**
**ज्ञानिनो लक्षणं बोधः अन्तस्तल्लक्षणांतरम् । "**

— योगवाशिष्ट

**अर्थ :—** " ज्ञान्याचें अमुकच लक्षण असतें असें कांहीं सांगतां येणार नाहीं. कोणी वशिष्ठयाज्ञवल्क्यासारखा लोभी असतो; कोणी इंद्र व चंद्रासारखा कामीही

असतो; कोणी शुकासारखा विरक्त असतो, कोणी नाथासारखा शांतही असतो आणि कोणी दुर्वासाप्रमाणें मोठा क्रोधीही असूं शकतो! या ( बाह्य ) लक्षणांवरून ज्ञानी ओळखतां येणार नाहीं. **स्वात्मबोध असणें हेंच ज्ञान्याचें मुख्य लक्षण होय.**... आत्मज्ञानानें देहस्वभाव निवृत्त होणें शक्य नाहीं. ज्ञानानें फक्त देहादिकांविषयी किंवा दैहिक विकारांविषयीं मिथ्यात्वनिश्चय होतो. पण त्याचा निःशेष त्याग किंवा नाश देहपातानंतरच होईल किंवा ज्या कालीं देहभानरहित ब्रह्माकार मन झालें असेल, त्या कालीं मात्र कामक्रोधादि मनोधर्म उद्भवणार नाहींत. ...देहभान आहे तेथपर्यंत अज्ञलोकांप्रमाणेंच तत्त्वज्ञ पुरुषांनाही कामक्रोधादि विकार झाल्यावांचून राहाणार नाहींत."

—सर्वमतखंडण आणि ब्रह्मविद्यारहस्य, पृ. २३६-३७

परंतु ह्या विधानावरून ज्ञान्याला यथेष्टाचरण करण्याची शास्त्रांनीं मुभा दिली आहे असें मात्र समजूं नये. फक्त साधकांना ज्ञान्यांची निंदा करण्याचा मोह पडूं नये एवढ्याकरितांच ही माहिती दिली आहे.

दुसरें—ज्ञान्यांकडून प्रारब्धवशात् पापाचरण घडलें, तर त्यांना तें धुऊन टाकण्याचें सामर्थ्य असतें. क्षणभराच्या ब्रह्ममयवृत्तीनें कोटिजन्मांचीं पापें नाहींशीं होतात, असें शास्त्रांत सांगितलें आहे. ब्रह्ममय वृत्तीनें ब्रह्मसाक्षात्कार एकदां झाला, म्हणजे इच्छेस येईल तेव्हां त्या अवस्थेंत गेल्यानंतर पुण्यपापें दोन्हीही जळून जातात, आणि मोक्षास जाण्यास पुण्य व पाप दोन्ही जळालींच पाहिजेत.

**पुण्यपाप दोनी झडती । तैं नित्यमुक्ति पाविजे ॥**

—एकनाथी भागवत, अ. २

नसलेस पुण्यानें स्वर्गाचें बंधन व पापानें नरकाचें बंधन प्राप्त होतें, पुण्यपापांचे संस्कार जीवाच्या बुद्धिवृत्तीचा आश्रय करून असतात. ती बुद्धिवृत्ति श्रीहरिगुरुकृपेनें ब्रह्माशीं तादात्म्य पावली, म्हणजे तिच्यांतील जन्ममरणबंधनकारक दोष जळून जातात व ती निर्मळ ब्रह्मरूप होते. ब्रह्माकारवृत्तीनें अविद्येचा नाश झाला तरी ज्ञात्याच्या ठिकाणीं 'अविद्यालेश' म्हणून देहपातापर्यंत असतोच. त्यास 'हिंगाच्या पोत्यामधून सर्व हिंग काढून टाकला तरी त्याचा वास त्या पोत्याला राहतोच' असा दृष्टांत शास्त्रकारांनीं दिलेला आहे. ज्ञात्याकडून कांहीं प्रमाद झालेले दिसतात ते ह्या

अविद्यालेशामुळेंच होत, असें जाणून साधकांनीं व इतर कल्याणेच्छु प्रापंचिकांनींही साधुनिंदेपासून परावृत्त राहणेंच श्रेयस्कर.

साधुनिंदा तर सोडूनच द्या, पण कल्याणेच्छु पुरुषांनीं दुसऱ्या कोणाचीही निंदा करूं नये. कारण निंदक ज्याची निंदा करितो, त्याच्या पापाचा तो अंशतः वांटेकरी होतो. "परनिंदेनें परवध, आत्मस्तुतिनेंचि आत्मवध होतो" अशी महाभारतांत नीति सांगितली आहे. तेव्हां आपलें घरचें खाऊन बाजारच्या भाकऱ्या भाजण्याचा धंदा कां करावा बरें? निंदा म्हणजे 'परापवाद' अथवा 'परदोषोद्घाटन' करणें होय. ते दोष मग खरे असोत अथवा खोटे असोत. कोणी खोटा दोषारोप करणें म्हणजे निंदा म्हणतात व खरे दोष असतील त्यांचा उच्चार करणें ही निंदा नव्हे असें समजून त्या दोषांचा मोठ्या आढ्यतेनें लोकांसमोर उच्चार करतात. पण ही त्यांची चूक होय; ती त्यांची स्वकपोलकल्पित व्याख्या होय. अशा करणीनें ते आपल्या तपाची हानि करून घेतात! पाप्यांच्या पापाचा उच्चार करणें म्हणजे त्यांच्या पापधुणीस मदत करणें होय. पापधुणीस मदत करणें म्हणजे तें पाप आपण घेणें होय. संतांनीं निंदकांचे अनेक ठिकाणीं आभार मानिले आहेत, ते याच दृष्टीनें. निंदक हा बिनमोलानें पापदोष धुऊन टाकणारा 'परीट', जिभेनें मलदोष धुऊन टाकणाऱ्या आईपेक्षां 'मायाळू आई' इत्यादि शब्दोपचारांनीं त्यांनीं निंदकांना गौरविलें आहे त्याचा हेतु हाच. जगांत अगदीं सोपा धंदा कोणता असेल तर लोकांचे दोष काढून बोलत बसावयाचें, आणि सर्वांत कठिण काम कोणतें असेल तर आपले दोष शोधून ते घालवून द्यावयाचे. पहिल्यांत फायदा कवडीचाही नाहीं, दुसऱ्यांत फायदा लाखाचा; जन्माचें कल्याण, परंतु 'शहाणा तो धणी घेतो येथें.' साधकांनीं लोकांच्या दोषांकडे पहातांना आई आपल्या मुलाच्या दोषांकडे जितक्या प्रेमळपणानें व काढून टाकण्याच्या बुद्धीनें पहाते तसें पहावें; आणि स्वतःच्या दोषांकडे पहातांना शत्रूच्या दृष्टीनें पहावें. आपले लहानसान दोष देखील दांतओठ चावून, मुठी आवळून दूर करण्याचा प्रयत्न करावा. कोणी साधु पाप करतांना दिसला, तर त्यावर रागावण्यापेक्षां ह्या पापांतून तो कसा सुटेल, कसा घसरतो आहे, कसा सुधरेल, अशा करुणादृष्टीनें त्याजकडे पहावें. नुसतें पहावें नव्हे, तर शक्य असल्यास त्यांतून त्याला सोडविण्याचा प्रयत्नही करावा, तरच याचा बहादुरी. निंदा करणें हें सोपें काम, तें कोणीही करील. गुरु मच्छिंदरनाथ हे स्त्रीराज्यांत जाऊन स्त्रीलंपट होऊन राहिलेले, त्यांचा शिष्य गोरखनाथ यास

कळून आल्यानंतर गुरुविषयींची पूज्य भावना तिळमात्रही ढळूं न देतां, त्यांना तेथून सोडविण्याचीच पराकाष्ठा त्यानें केली. हें उदाहरण साधकांनीं अवश्य ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

इतर संतांप्रमाणें श्रीतुकाराममहाराजांनींही निंदेसारखें पातक नाहीं असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. पण त्यांनींच ' जग अवघें आम्हां देव । परी निंदितो स्वभाव ' असेंही एके ठिकाणीं म्हटलें आहे. पण या म्हणण्यांत त्यांचा, जीवांच्या हिता-संबंधींचा कळकळीचा विचारच दिसून येतो, नहून विकार दिसून येत नाहीं. लोकांचे दोषच न दिसणें हा वृत्तीचा जडपणा किंवा ब्राह्मी स्थिति असूं शकेल ; पण दोष दिसूनही मन निर्विकार राहूं देणें हाच खरा साधुपणा अथवा सौजन्य आहे, हें साधकांनीं लक्षांत ठेवावें. '**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते**' हा अभ्यास साधकांनीं जरूर केला पाहिजे. ' Hate sin & not sinner ' म्ह० पापाचा द्वेष करा, पण पाप्याचा द्वेष करूं नका, असें बायबलांत सांगितलें आहे, त्याचा अर्थ हाच आहे. तात्पर्य, ज्ञानाभिमानानें ( सिद्धपणाच्या खोट्या समजुतीनें ) संतांच्या निंदेस किंवा द्वेषास साधकांनीं केव्हांही प्रवृत्त होऊं नये. कारण —

**" अज्ञानी विश्वासें साधु वंदी । ज्ञानाभिमानी दोहोंतें निंदी ।**
**यालागीं त्यातें त्रिशुद्धी । अवश्य बाधी अतिदोष ॥**
**साधुविश्वासें अज्ञान फिटे । ज्ञानाभिमानियां विकल्प मोठे ।**
**त्यांसी विश्वास कदा न घटे । अभिमानहठें अधःपात ॥**

— एकनाथी भागवत, अ. ५

**" संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर तें यमपुरी ॥**
**त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जनां होय पीडा ॥...**
**संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥ "**

— तुकाराम

**" संतच्छल श्री-संतति-नाशक । कां न मानिसि या वचना ॥**
**तूं निंदूं नको सुजना ॥ "**

— सोहिरोबानाथ

याप्रमाणें सत्पुरुषाचीं वचनें आहेत, हीं लक्षांत घेऊन साधकांनीं वर सांगितल्याप्रमाणें आपलेच दोष आपण कठोर दृष्टीनें पहाणेचा अभ्यास ठेवावा. त्यांत त्यांचें कल्याण आहे.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

साधूंची किंवा दुसऱ्या कोणाचीही निंदा साधकांनीं करूं नये असें वर सांगितलें; पण आपली निंदा दुसऱ्यांनीं केली असतां साधकांनीं आपली वृत्ति कशी राखावी याचाही विचार अवश्य केला पाहिजे. याबद्दल नाथांच्या खालील ओंव्या लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत :—

**" निंदेचिया वाग्बाणीं । दारुण विंधिल्या दुर्जनीं ।**
**द्वेषु उपजों नेदी मनीं । हित मानी निंदेचें ॥**
**जेणें जेणें निजनिंदा केली । तो तो मानी हितमाउली ।**
**पापमळांची क्षाळणा झाली । शुद्ध केली माझी वृत्ति ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. १०

**" आपुल्या अंगींचे मळ । पुढिलीं क्षाळितां सकळ ।**
**जो क्रोधेंसीं करी तळमळ । तो मूर्ख केवळ आत्मघाती ॥**
**संमुख कोणी निंदा करिती । तेणें अत्यंत सुखावे चित्तीं ।**
**म्हणे मज तुष्टला श्रीपती । पापाची निष्कृती सहजें होय ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. २३

तात्पर्य, साधकानें दुसऱ्याच्या गुणावगुणांकडे लक्ष न देतां स्वतःच्या अवगुणांकडे करडी नजर ठेवणें अत्यंत हितकारक आहे.

* * * *

## साधकांनीं कामक्रोध कां व कसे जिंकावे ?

साधकांनीं दुसऱ्याच्या दुर्वृत्तीकडे किंवा दुराचरणाकडे लक्ष देऊन त्याची निंदा करूं नये असें मागच्या लेखांत सांगितलें. याचें वर्म असें कीं, दुसऱ्याच्या दोषाबद्दल त्याची निंदा करीत असतां, ते त्याचे दोष, तो त्याचा नीचपणा आपण आपल्या हृदयांत वागवितों, त्याच्या त्या नीचपणास आपण आपल्या हृदयांत जागा देतों असें होतें. याचा अर्थ रस्त्यावरील केरकचरा आपण आपल्या घरांत आणवून सांठवितों असा होत नाहीं काय? आपल्या घरांतील केर बाहेर टाकायचा कीं बाहेरील केर घरांत आणून भरायचा? असें करीत गेलों तर आपली गृहशुद्धि (हृदयशुद्धि) केव्हां व्हावयाची बरें? आणि अशी गृहशुद्धि झाल्यावांचून भगवताचें अधिष्ठान तेथें कसें मांडेल? अशा त्या अशुद्ध हृदयांत भगवंताची अभिव्यक्ति कशी होईल बरें? आपल्याच घरांतील केर काढून टाकतांना पुरे वाट होऊन जाते, निघतां निघत नाहीं; मग आपल्या हातानें बाहेरचा केर आणून आंत टाकूं लागलों,

तर तें घर आपल्या साऱ्या हयातींत तरी शुद्ध होईल काय ? शिवाय आपणांस न कळत दाराच्या छिद्रांतून बाहेरचा केर (विजातीय वृत्तिसमूह) आंत येऊन शिरतो तो वेगळाच. तो एकदम आपल्या नजरेसही पडत नाहीं. बारीक नजरेनें (सूक्ष्म अंतर्दृष्टीनें) पहावें तेव्हां कोठें तो दिसला तर दिसतो, नसलेस नाहीं. असा रोजच्या रोज सांचत असलेला केर पूर्वीच्या केराच्या ढिगासहित काढून टाकतांना नाकीं नव येतात, मग आपण होऊन वाटेवरचा केर आपल्या हातानें आणून घरीं टाकूं लागलों तर कसें व्हावयाचें बरें ? नरदेहांतील आयुष्याची क्षणिकता व आयुष्याचें मोल लक्षांत आणून हा फुकटचा उपद्व्याप शहाण्यानें (शीघ्र कल्याणेच्छु पुरुषानें) कधींही करूं नये. परदोषाकारवृत्ति तर राहोच, पण साधी विषयाकारवृत्तीही न करण्याबद्दल साधकांनीं खबरदारी घेतली पाहिजे. कारण नरदेहासारखें अनायासें लाधलेलें निधान एकदां हातचें गेलें, कीं पुन्हां तें सांपडेल अशी आशा करणें मूर्खपणाचें आहे. करितां नरदेह प्राप्त झाल्यानंतर त्या देहाचें सार्थक म्हणजे ब्रह्मज्ञान अर्थात् ब्रह्मानंद प्राप्त करून घेण्याकरितां साधकानें बिलकुल आळस अथवा उपेक्षा करतां कामा नये. पशुपक्ष्यांच्या देहाप्रमाणें मनुष्यदेहही पांचभौतिकच खरा, पण मनुष्यदेहींचें जें ज्ञान आहे, त्याची किंमत फार मोठी आहे. त्या ज्ञानानें नराला नारायणाची पदवी संपादन करितां येते. **नारायणपदवी म्हणजे सच्चिदानंद-पदवी होय.**

**" मनुष्यदेहींचेनि ज्ञानें । सच्चिदानंद पदवी घेणें ।**
**एवढा अधिकार नारायणें । कृपावलोकनें दिधला ॥**
**मनुष्यदेहीं ब्रह्मज्ञान । पुढील जन्मीं मी करीन ।**
**म्हणे, तो नागवला जाण । सोलीव अज्ञान त्यापाशीं ॥**
**ब्रह्मज्ञानेंवीण जे शास्त्रज्ञ । ते अंधारींचे खद्योत जाण ।**
**अज्ञाननिशीमाजी तेज गहन । सूर्योदयीं कोण त्यां देखे ॥**
**पावोनिया मनुष्यपणा । जो न साधी ब्रह्मज्ञाना ।**
**तो दाढीचा मेंढा जाणा । विषयाचरणा विचरतु ॥**
**येणें देहें याचि वृत्तीं । आपुली आपण न जाणे मुक्ति ।**
**नेघवे भगवत्पदप्राप्ति । तैं वृथा व्युत्पत्ति नरदेहीं ॥**
**वृथा त्याचें ज्ञान ध्यान । वृथा त्याचें यजनयाजन ।**
**वृथा त्याचें धर्माचरण । चैतन्यघन जरी नोहे ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. ९

कृपाळू संतांनीं साधकांना ह्या सूचनाच नव्हेत, तर प्रेमसंतापानें शिव्याच दिल्या आहेत. "ब्रह्मज्ञानावांचून मोठे शास्त्री पंडित झाले तरी ते अंधारांतील खद्योत म्हणजे काजवेच होत. त्यांचें ज्ञान, ध्यान, यजनयाजन सर्व व्यर्थ होय. मनुष्यत्व पावल्यानंतर जो ब्रह्मज्ञान म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार साधीत नाहीं, तो विषयरानांत चरणारा 'दाढीचा मेंढा' म्हणजे बोकड होय," असें म्हटलें आहे! ह्या त्यांच्या संतापाच्या शिव्यांनीं जो संतापणार नाहीं, (तप्त होणार नाहीं, चिडणार नाहीं), तो पुरुषच नव्हे व स्त्रीही पण नव्हे; त्यास तृतीय प्रकृतीचाच गणला पाहिजे. सौम्य शब्दांत बोलावयाचें झाल्यास, त्यांना पिसे अथवा बालिश किंवा अज्ञान बालक हवें तर म्हणावें. 'पिशाच्या हातांत कोलीत' दिलें तर तो पाहील तें जाळीत सुटतो, किंवा लहान पोराच्या हातांत शस्त्र दिल्यास, तें कोणाला भोसकेल किंवा आपल्यालाच कापून घेईल याचा नेम नसतो, त्याप्रमाणें अनधिकारी अथवा अविरक्त आळशी साधक हे शास्त्रवचनांचा उपयोग कसा व कुठें करतील याचा नेम नाहीं. ते दुसऱ्याचाही नाश करतील आणि आपलाही करून घेतील.

**"पिशा हातें धेंडेवाळी। दिधल्या तो सर्वत्र जाळी।**
**तेवीं असत्संगें करी होळी। स्वधर्म समूळीं जाळित॥**
**बालकाहातीं दिधलें शस्त्र। खोंचितां न म्हणे आपपर।**
**छेदी आपुलेंचि शरीर। हितविचार तें नेणे॥**
**तैसा असत्संगें खरा। घाली दंभाचा पसारा।**
**नाहीं विवेकाचा थारा। कामशास्त्रा प्रवर्तें॥**
**न कळे निजसुखाची गोडी। पडला विषयांचिये वोढी॥"**

— एकनाथी भागवत, अ. १०

अशी त्याची स्थिति होते! निजसुखाची गोडी न चाखल्यामुळें विषयसुखाच्या ओढीला ते लागतात. मी देह नव्हे, मी आत्मा, आणि आत्मा हा गुणसंगानें, इंद्रियसंगानें बद्ध होत नाहीं.

**"नट अंधत्वें अवगला। परी तो आंधळा नाहीं झाला।**
**तैसा आत्मा गुणसंगें क्रीडला। तरी असे संचला निर्गुणत्वें॥**
**नटु अंधत्वें नव्हे अंधु। आत्मा गुणसंगें नव्हे बद्धु।**
**गुणमायिक आत्मा शुद्धु। या त्या संबंधु असेना॥"**

************************************************

अशा वचनांच्या आधारें ते विषयी बनतात. “ विषयांत परमात्म्याची व्याप्ति नाहीं काय ? इंद्रियें आणि मन तरी कोणीं उत्पन्न केलें आहे ? मन तर आपलें स्वरूप आहे–‘ इंद्रियाणां मनश्चास्मि ’ असें भगवान म्हणणात, त्याला कोंडण्याचा प्रयत्न करणें हा योगमार्ग आहे, ज्ञानमार्ग नव्हे व भक्तिमार्गही नव्हे, ” इत्यादि कल्पना करून ते साधकवर्गांतून मुमुक्षूच्या वर्गांत, नव्हे त्याच्याही खालच्या म्हणजे बद्धाच्या वर्गांत जातात. अशा लोकांना पंचदशीकार —

**“ ज्ञानापूर्वीं शास्त्राची तरि भीती होती तुजला ।**
**तीहि जाउनी विषय भोगण्या देह कसा तव सजला ? ॥ ”**

असा प्रश्न करितात. अशा लोकांना श्रीसमर्थांनींही पुढीलप्रमाणें टोला मारला आहे. ते म्हणतात —

**“ निरूपणमिसें निंदा घडे । संवादमिसें विवाद पडे ।**
**उपाधिमिसें येऊनि जडे । अभिमान अंगीं ॥**
**तैसा ब्रह्मज्ञानमिसें । आळस अंतरीं प्रवेशे ।**
**म्हणे साधनाचें पिसें । काय करावें ॥–**
**‘ किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किम् ।**
**आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥ ’—**
**वचन आधारीं लाविलें । जैसें शस्त्र फिरविलें ।**
**स्वतः हाणोनि घेतलें । जयापरी ॥**
**तैसा उपायाचा अपाय । विपरीतपणें स्वहित जाय ।**
**साधन सोडितां होय । मुक्तपणें बद्ध ॥”** इ० तसेंच—

‘ इंद्रियाणां मनश्चास्मि ’ या भवगद्गीतेमधील १० व्या अध्यायांतील विभूतियोगाच्या वचनाचा अर्थ, मन म्ह. भगवंताची ‘ विभूति ’ आहे असें न जाणतां, भगवंताचें ‘ स्वरूप ’ असें समजून त्याची म्हणजे त्या मनाची आराधना करण्यांत श्रेयस् मानणाऱ्या लोकांना उद्देशून समर्थ म्हणतात —

**“ ( अश्वत्थः सर्ववृक्षाणां ) माझी विभूति पिंपळ । म्हणोनि**
**बोलिला गोपाळ । वृक्ष तोडितां तत्काळ । तुटत आहे ॥**
**( श्लोक ) ‘ नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ ’—**

शस्त्राचेनि तुटेना। अग्नीचेनि जळेना।
उदकामध्यें कालवेना। स्वरूप माझें॥
पिंपळ तुटे शस्त्रानें। पिंपळ जळे पावकानें।
पिंपळ कालवे उदकानें। नाशिवंत॥
तुटे जळे बुडे उडे। आतां ऐक्य कैसें घडे।
ह्मणोनि हें उजेडे। सद्गुरुमुखें॥
इंद्रियाणां मनश्चास्मि। कृष्ण म्हणे मन तो मी।
तरी कां आवरावी ऊर्मि। चंचळ मनाची॥
ऐसें कृष्ण कां बोलिला ?। (तर) साधनमार्ग दाखविला।
खडे मांडूनि शिकविला। वोनामा जेवीं॥"

—दासबोध, ६।६

श्री एकनाथमहाराजही भिक्षुगीत (अ. २३) वर्णन करितांना म्हणतात —

"त्या मनासी निग्रहो न करितां। जीवाची न चुके व्यथा।
मनाचेनि छंदें नाचतां। साधनें सर्वथा व्यर्थ होती।"

'दानं स्वधर्मो नियमो यमश्च। सर्वे मनोनिग्रहलक्षणान्ताः' (अ. २३, श्लो. ४६) यावर टीका करतांना नाथराय म्हणतात —

"व्रत दान स्वधर्म सकळ। यांसी मनोनिग्रहो मुख्य फळ।
तेणेंवीण अवघें विकळ। साधनें निष्फळ साधका॥" इत्यादि.

ह्या मनाबद्दल श्रीतुकाराममहाराजांनीही धायधाय मोकलली आहे. त्यांचे खालील उद्गार पहा —

"रात्रिदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन॥
फजितखोरा मना किती तुज सांगों। नको कोणा लागों मागमागें॥
मन माझें चपळ न राहे निश्चळ। घडी एकी पळ स्थिर नाहीं॥
आतां तूं उदास नव्हे नारायणा। धांवे मज दीना गांजियलें॥
होऊं नको कांहीं या मना आधीन। नायके वचन याचें कांहीं॥
आपुले आधीन करूनिया ठेवा। नाहीं तरी जीवा घातक हें॥
तुका म्हणे झाले जे मनाआधीन। तयांसी बंधन यम करी॥"

*******************************************

याप्रमाणें मनाविरुद्ध तक्रार करणारीं त्यांचीं शेंकडों वचनें आहेत. श्री**ज्ञानेश्वर**-महाराजही या मनासंबंधानें व इंद्रियांसंबंधानेंही काय सांगतात पहा —

**“ जे बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी ।**
**धैर्येंसी हातफळी । मिळवूनि जाय ॥**
**जें निरोधिलें घे उवावो । जया संयमुचि होय सावावो ।**
**तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ॥......**
**ये-हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं ।**
**तरी साद्यंतचि पाहीं । संसारु असे ॥ ...**
**जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निःसंगाही आपजे संगती ॥ ...**
**तैसें विषयाचें ध्यान । जरी विपायें वाहे मन ।**
**तरी येसणें हें पतन । गिवसीत पावे ॥** ” इत्यादि.

याप्रमाणें प्रत्यक्ष विषय सोडून द्या, पण विषयाचें नुसतें मनानें चिंतन झालें तरी पतन हें ठेवलेलें आहे असें सांगतात. याप्रमाणें हा मनाचा मारकपणा कोठवर वर्णावा ?

तात्पर्य, मनोनिग्रहावांचून सर्व साधनें व्यर्थ होत, याबद्दल सर्व शास्त्रकारांची, श्रुतिस्मृतिपुराणांची व आधुनिक सर्व संतांचीहि एकवाक्यता आहे. मग त्याच्या निग्रहाचे मार्ग अथवा युक्ति हव्या तर प्रत्येकाच्या निरनिराळ्या असोत.

सूक्ष्म विचार करितां मनोनिग्रहापूर्वी **इंद्रियनिग्रह प्रथम साध्य केला पाहिजे.**

**“ म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें ।**
**लाळावीं ना कौतुकें । आदिकरूनी ॥**
**हां गा सर्पेंसीं खेळों येईल ? । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धी जाईल ? ।**
**सांगें हळाहळ जिरेल । सेविलिया कायी ? ॥**
**देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सावरे जैसा उधवला ।**
**तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोव्हे ॥**

— ज्ञानेश्वरी, अ. ३

कारण, दुष्पूर अग्निरूप असा काम, जो ज्ञान्याचा नित्य वैरी, असें गीतेंत सांगितलें आहे (अ. ३ श्लो. ३९ ), त्याचें अधिष्ठान म्हणजे राहण्याचें ठिकाण

***********************************************

इंद्रियें हीं पहिल्या पायरीवर असून मन व बुद्धि त्यानंतरचीं आहेत; याकरितां इंद्रियांचें **नियमन प्रथम** केलें पाहिजे, व त्यायोगानें ज्ञानविज्ञानाचा शत्रु जो काम त्याला जिंकलें पाहिजे.

> **" तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
> **पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ "**
>
> —भगवद्गीता, अ. ३।४१

इंद्रियांचा निग्रह केला, म्हणजे मग मन व बुद्धि यांचा निग्रह करण्यास कठिण पडत नाहीं, असें इंद्रियनिग्रहाचें महत्त्व आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> **" यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ।**
> **आधीं निर्दाळूनि घालीं तियें । सर्वथैव ॥**
> **मग मनाची धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल ।**
> **इतुकेन थारा मोडेल । या पापियांचा ॥ "**

असे हे कामक्रोध '**महाशन**' व '**महापाप्मा**', ज्ञान्यांचे '**नित्यवैरी**' असल्यामुळें, 'आत्यन्तिक कल्याणेच्छु' ज्ञानी पुरुषांनीं अथवा जिज्ञासूंनीं त्यांना जिंकलेंच पाहिजे असें भगवंतांनीं अट्टाहासानें सांगून, त्यांना जिंकण्याची बिनतोड युक्तिही पण हृदयाच्या कळकळीनें सांगून दिली आहे. ती युक्ति अथवा उपाय खालीं लिहिल्याप्रमाणें :—

> **" इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
> **मनसस्तु परा बुद्धिर्योबुद्धेः परतस्तु सः ॥**
> **एवं बुद्धेः परं बुध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
> **जहि शत्रुं महाबाहो ! कामरूपं दुरासदम् ॥ "**
>
> —भगवद्गीता, अ. ३ श्लोक ४२।४३

स्थूलदेहाच्या पलीकडे इंद्रियें, इंद्रियांच्या पलीकडे मन, मनाच्या पलीकडे बुद्धि व बुद्धीच्या पलीकडे तो म्हणजे आत्मा असतो. ( आत्मा म्ह. आपण, मी. ) अर्थात् देह मी नव्हे, इंद्रियें मी नव्हे, मन मी नव्हे व बुद्धिही मी नव्हे; बुद्धीच्या पलीकडे असणारा, बुद्धीचा प्रकाशक, बुद्धिसाक्षी असा मी आहें; असें '**बुध्वा**' म्हणजे जाणून त्या निश्चयात्मक बुद्धीच्या योगें मनाला स्वस्वरूपाच्या ठिकाणीं '**संस्तभ्य**' म्हणजे योजून ( स्थिर करून ) कामरूपी वैऱ्याला मार.

'**संसारकारणं-खल्वनात्मनि देहादावहंभावस्तदन्यत्र ममभावश्च।** ( शंकरानंदी टी. ) अनात्मरूप देहेंद्रियादिकांच्या ठिकाणीं अहंभाव ( मीपणाची वृत्ति ) आणि इतरत्र ममभाव ( माझेपणाची वृत्ति ) हेंच संसाराचें कारण ; अथवा याचेंच नांव संसार. आणि हा मनामुळें उत्पन्न होतो. तें मनच वरील सत्य ज्ञानानें देहेंद्रियांमधून काढून स्वरूपाच्या ठिकाणीं योजिलें, अर्थात् त्याची दृश्याकारता मोडून त्याला स्वरूपाकार केलें, म्हणजे कामरूपी शत्रु मेलाच.

मन विषयाकार तरी होतें कशासाठीं ? सुखासाठीं. विषय हे जड आहेत, आणि सर्वप्रकाशक आत्मा हा 'नित्यानंदैकरस–' 'चिदानंदैकरस'–स्वरूप आहे, असें त्याच्या प्रत्ययाला आलें, दृढतर प्रत्यग्वृत्तीच्या अभ्यासानें त्याला आत्मसाक्षात्कार झाला, अर्थात् घरच्या घरीं त्याला 'महासुख' मिळालें, तर 'क्षुद्रसुखा'साठीं तें बाहेर भटकायला कशाला जाईल ? मुलाला घरच्या घरीं जिलब्या-लाडू पोटभर खावयास मिळाले, तर बाहेर दहाजणांच्या घरीं ( दशेंद्रियांच्या द्वारीं ) भाकरीच्या तुकड्यासाठीं भीक मागायला तें कशाला जाईल बरें ? दुसरें, संसारबंधनाला कारण मन आहे, तसें मोक्षालाही कारण तेंच आहे. '**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः**' ही उक्ति प्रसिद्ध आहे. त्याला एकदां स्वरूपसुखाची गोडी लाविली पाहिजे, म्हणजे त्याची विषयभोगेच्छा नाहींशी होईल.

> "**स्वरूपगोडी लागतां मना । सकळ जाती कामना ।**
> **भोगेच्छा सर्वथा असेना । स्थितप्रज्ञासी ॥**
> **आत्मा बरा कळल्यावरी । विषयवासने कैंची उरी ।**
> **तो इच्छा धरील कां परी । ऐसें श्रुतिही बोलती ॥**"

— यथार्थदीपिका, अ. २

वास्तविक 'विषय-सुख' ही भाषाच मुळीं खोटी आहे. ज्यांनीं आत्मस्वरूपाचा–आत्मसुखाचा–अनुभव घेतला नाहीं तेच, भिकारी ज्याप्रमाणें कोंडा देखील सेवन करितो त्याप्रमाणें, इंद्रियजन्य विषयसुखांत रममाण होतात, असें श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> "**जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले ।**
> **जैसें रंकू का आळुकैलें । तुषातें सेवी ॥......**
> **विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वाया जल्पिजे ।**
> **जैसें महुर का म्हणिजे । विषकंदातें ॥**"

तसेंच, विद्यमान नसलेली अविद्या तेच खरी करून दाखवितात, कीं जे विषयदुःख हें सुखबुद्धीनें घेतात !

**“ म्हणोनि अविद्याजात नाथिलें । तें तिहींच साच दाविलें ।**
**जिहीं सुखबुद्धीं घेतलें । विषयदुःख ॥ ”**

परंतु हें लक्षांत ठेवावें कीं, असें बोलण्याचा अधिकार त्यांचाच आहे, कीं ज्यांनीं अंतरसुखाची – आत्मसुखाची – गोडी चाखिली ; आणि हीच गोडी घेण्याकरितां तर मनुष्यजन्म आहे. विषयसुखाला विषय, इंद्रियें, व मन यांची एकमेकांस साहाय्यता पाहिजे. म्हणून विषयसुख हें ‘ पराधीन ’ आहे, ‘ परतंत्र ’ आहे. आत्मसुख त्याच्या उलट. विषय तर बाहेरचे बाहेर राहातात, पण इंद्रियें व मन हीं देखील तेथें जाऊं शकत नाहींत. विषय, इंद्रियें व मन हीं तेथें असत नाहींत. त्यांच्या पलीकडे तें स्वसंवेद्य असतें. म्हणून तें ‘ **स्व**-आधीन ’ ‘ **स्व**-तंत्र ’ म्हटलें जातें. तें अंतींद्रियसुख विशुद्ध बुद्धिवृत्तीनेंच ग्रहण होऊं शकतें. ( ‘ बुद्धिग्राह्य-मतीन्द्रियम् ’) बुद्धींत अशुद्धता म्हटली म्हणजे कामक्रोधादि वासनांची ! त्यांचें निर्मूलन केल्याशिवाय ती विशुद्ध होऊं शकत नाहीं व तशी विशुद्ध झाल्याशिवाय तिला आत्मसाक्षात्कार म्हणजे आत्मसुख–निजसुख–निजानंद–ब्रह्मानंदसाक्षात्कार होऊं शकणार नाहीं. तो झाल्याशिवाय जीवाचें संसृतिबंधन चुकणार नाहीं. तें बंधन तोडून टाकणें हाच खरा पुरुषार्थ – चतुर्थ पुरुषार्थ – होय, आणि तो साधणाराच खरा पुरुषार्थी होय.

मन जेव्हां देहेंद्रियांचें तादात्म्य घेतें, तेव्हांच तें बहिर्मुख होऊन विषयांकडे धांवतें, अर्थात् विषयाकार होतें ; तेंच जेव्हां यथार्थज्ञानानें आत्म्याचें तादात्म्य घेतें, तेव्हां अंतर्मुख होऊन अखण्डानंदैकरस आत्मस्वरूपाचा अनुभव पावतें. अर्थात् आत्माकार होतें. ( आत्म्याचें तादात्म्य म्हणजेच आत्माकार होणें. ) घटाकारवृत्तीनेंच घटज्ञान म्हणजे घटसाक्षात्कार होतो, त्याप्रमाणेंच आत्माकारवृत्तीनें आत्मज्ञान म्हणजे आत्मसाक्षात्कार संभवतो. अर्थात् ‘ **आत्मज्ञान** म्हणजे **आत्माकारवृत्ति** ’ ही व्याख्या सत्साधकांनीं लक्षांत ठेवावी. ह्या आत्मज्ञानानेंच म्हणजे आत्माकारवृत्तीनेंच अविद्येचा नाश संभवतो, शाब्दिक आत्मज्ञानानें अविद्यानाश संभवत नाहीं. अविद्यानाशकर्त्री आत्माकारवृत्ति साधणें म्हणजेच ‘ मनोनाश ’ करणें होय. यालाच क्वचित् ‘ मनोलय ’ हि म्हणतात. सुषुप्तींतही मनोलय होतो, पण त्याचा उपयोग नाहीं. स्वरूपांत मनोलय

झाला पाहिजे. तेव्हांच त्याचा खरा 'नाश' होतो. असा नाश झाल्यानंतर मन मनपणानें न उठतां त्याचें 'उन्मन' होतें असें भगवान श्रीरमण महर्षि आपल्या 'उपदेश सारांत' सांगतात). ह्या मनोनाश साधण्याकरितां **साधकांनीं 'वैराग्य-' पूर्वक 'अभ्यास-' च नेटानें केला पाहिजे.** ('अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते' असें भगवान म्हणतात.) आत्मप्राप्ति (आत्मानंदानुभूति) झाली पाहिजे आणि अभ्यास करण्यास आळस केला, तर कसें होणार ?

**"तूं प्राप्तीची चाड वाहसी। परि अभ्यासीं दक्षु न होसी।**
**तैं सांग पां काय बिहसी। दुवाडपणा ?॥"**

—ज्ञानेश्वरी, अ. ६।१६०

पण या अभ्यासास वैराग्याची जोड पाहिजे, हें विसरतां कामा नये. वैराग्यांत एकेंद्रिय वैराग्य, वशीकारसंज्ञक वैराग्य, अपरवैराग्य, परवैराग्य असे अनेक प्रकार आहेत. त्यांचें वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे. येथें वैराग्य म्हणजे इंद्रियांची विषयाकडे असणारी ओढ कमी करणें एवढेंच घ्यावें म्हणजे पुरे. कारण असें वैराग्य नसेल तर तो अभ्यासाचा मुळीं अधिकारीच होणार नाहीं.

**"जो रसनेंद्रियाचा अंकिला। का निद्रेसी जीवें विकला।**
**तो येथ नाहीं म्हणितला। अधिकारिया॥"**

पेहेलवान लोकांचें शक्ति कमाविणें हें ध्येय अथवा साध्य असतें, आणि व्यायाम हें साधन असतें. पण आरोग्य हें त्या साधनाचेंही पहिलें साधन असतें. आरोग्यावांचून त्यांना व्यायाम व शक्तिसंपादन केव्हांही साधतां येणार नाहीं. त्याप्रमाणें साधकांना मनोलयरूपी साध्य साधण्याला आत्माकारवृत्तीचा 'अभ्यास' केला पाहिजे, त्यास जितेंद्रियतारूप 'वैराग्य' अवश्य पाहिजे. वैराग्य हें आरोग्याप्रमाणें अभ्यासरूप व्यायामाचा मूळ पाया आहे. म्हणून भगवंतांनीं 'अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते' या वचनांत 'च' शब्दानें दोन्हींची जरूरी दाखविली आहे.

**"कीं मुख्य येथें अभ्यास। वैराग्य साधन त्यास।**
**मन जिंकणें ज्यास। हीं दोन्ही अगत्य त्यास असावीं॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**आत्मतत्व आधीं कळावें । मग मन अभ्यासीं वळावें ।**
**अभ्यासीं त्यासि कवळावें । वैराग्ययुक्त बुद्धीनें ॥**
**स्थिर करावया मना । स्थळ आत्मयाविना ।**
**मायिक पदार्थीं कांहीं असेना । वावरोंच लागे अन्यत्र ॥**
**ज्यास पाहिजे सुख । तें सुख चैतन्यावांचूनि नाहीं आणिक ।**
**चित्स्वरूपीं करितां अंतर्मुख । स्थैर्य पावे ॥**
**तेथें स्थिरत्व मन पावे । परी पूर्वसंस्कार त्याला आठवे ।**
**म्हणूनि विषयांकडे धांवे । विषय ते जडत्वें मानूनि ॥**
**तेव्हां पाहिजे वैराग्य । त्या वैराग्यें स्वानंदसौभाग्य ।**
**जतन होय, नासे अभाग्य । विषयवासना ॥**
**चित्स्वरूपीं मन । लाविताहि करी विषयचिंतन ।**
**तेथें पाहिजे वैराग्य साधन । त्या वैराग्यसंस्कारें तें परते ॥**
**स्वरूपीं लागणें अभ्यास । तेथूनि उठतां त्यास ।**
**परतवूनि योजणें यास । वैराग्य पाहिजे ॥**
**एवं वैराग्य अभ्यास दोनी । उपाय, या दोंहींकरूनि ।**
**मनाचा निग्रह म्हणोनि । श्रीकृष्ण बोलिला ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. ६

तात्पर्य, स्वरूपाच्या ठिकाणीं मनाचा लय साधण्याची साधकांनीं पराकाष्ठा केली पाहिजे ; व हा प्रयत्न करीत असतां कठिण जाऊं नये म्हणून जितेंद्रियत्वाचा रहिल्यापासून अभ्यास केला पाहिजे. शास्त्रकारांनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें इंद्रियाला विषय देत गेलें म्हणजे हें सुलभ पडतें,

" **विधीनें सेवन । तें त्यागाच्नि समान ॥** " (तुकाराम).

स्थितप्रज्ञाचीं लक्षणें सांगतांना —

" **यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥** "

ह्या श्लोकांत इंद्रियें मनालाही जर्जर करणारीं, मनाला आपल्या आहारांत आणणारीं, विषयदर्शनाबरोबर मनाला व्याकुल करणारीं आहेत असें म्हटलेलं आहे आणि याकरितांच इंद्रियांना पूर्वीं जिंकलें पाहिजे असें स्थितप्रज्ञाच्या

`* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *`

लक्षणपरंपरेमध्यें भगवंतांनीं वरचेवर सांगितलें आहे. (भगवद्गीता, अ. २ श्लोक ५८, ६०, ६१, ६४, ६७ व विशेषेंकरून श्लोक ६८ हे व यांवरील सर्वांच्या टीका हव्या तर वाचून पहाव्या. विस्तारभयास्तव येथें अधिक देतां येत नाहीं.)

* * * *

आतां इंद्रियांचा राजा जें मन त्याच्या **नि**ग्रहाविषयीं, त्याच्या **मै**त्रीविषयीं व त्याच्या **प्र**सादाविषयीं थोडेसें सांगून हा विषय आटोपता घेऊं.

" **विजातीयं प्रत्ययतिरस्कारपूर्तिका सजातीयप्रत्ययावृत्ति-रभ्यासः** " —अर्थात् विजातीयप्रत्ययतिरस्कारपूर्वक सजातीय प्रत्ययाचा प्रवाह वाहूं देणें यास ' अभ्यास ' असें शास्त्रकार म्हणतात. ' **अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते** ' म्हणून भगवंतांनीं मनोजयाचा जो उपाय सांगितला, त्यांतील अभ्यास तो हा होय. ब्रह्मप्रत्ययाभ्यासानें विजातीय प्रत्ययाचा निःशेष नाश झाला म्हणजे त्या त्या वासनांचा क्षय होतो. ' निमित्ताचा नाश झाला असतां नैमित्तिकाचा नाश आपोआप होतो ' या न्यायानें, मनाच्या चंचलतेला कारण ज्या बाह्य ( विषय- ) वासना त्यांचा नाश झाला म्हणजे मन आपोआपच निश्चल होतें. यासाठीं तीव्र मुमुक्षूंनीं वर सांगितल्याप्रमाणें वैराग्ययुक्त अभ्यासाचा निरंतर (चिरकाल) अभ्यास चालवावा म्हणजे त्यायोगें मन आपोआप निश्चल होईल. आत्मतत्त्व जाणलेलें असलें तरी, वैराग्ययुक्त तीव्र अभ्यासाच्या अभावीं त्या त्या वासनांच्या योगानें त्या योग्याची वृत्ति बहिर्मुखच होईल. ' सदा सर्वत्र ब्रह्मदृष्टि ' रूप जो **ज्ञान**योग तो त्याला दुर्लभ होईल. अधिष्ठान ब्रह्मदर्शनानें उत्पन्न होणारा जो ' संतत ब्रह्मप्रत्यय ' तो त्याला दुष्प्राप होईल असें प्रत्यक्ष भगवंताचें मत आहे. (' असंयतात्मनो योगो दुष्प्राप इति मे मतिः ')

विषयप्रवण मनाला विषयांतून काढून निर्विषय करणें ही कांहीं मस्करीची गोष्ट नाहीं. स्वदेशावर असलेली पुष्कळ दिवसांची परकीय सत्ता नाहींशी करून आपली सत्ता स्थापित करणें, अर्थात् ' स्वराज्य ' मिळविणें, ' पूर्ण स्वातंत्र्य ' ' निर्भेळ स्वातंत्र्य ' मिळविणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. त्याचप्रमाणें परकीय असे जे विषय त्यांची सत्ता मनावर अनंत काळापासून ( अनंत जन्मांपासून ) बसलेली

१ भ. गी. शंकरानंदी टीका, अ. ६ श्लो. ३५।३६.

***********************************************

आहे, आणि त्यामुळें मन अगदीं पराधीन झालें आहे, पंगू बनलें आहे. त्यास त्यांच्या ताब्यांतून सोडवून स्वराज्याधिष्ठित करणें, स्वानंदसाम्राज्यपदावर बसविणें खरोखरच सुसाध्य नाहीं. पण ' असाध्य तें साध्य करितां सायास। कारण **अभ्यास** तुका म्हणे ' अभ्यासाला तें साध्य आहे. करितां अभ्यास करायला आळस करितां कामा नये.

**" ये मथनीं आळस केला। तरी ज्ञानाग्नीचा आविर्भाव गेला।**
**आपणिया आपण वंचला। थित्या मुकला साधना ॥**
**धरितां आळसाची मागी। येव्हडा अनर्थ वाजे अंगीं।**
**आठही प्रहर शिणताती योगी। या योगालागीं साधावया ॥**
**निज स्वार्थालागीं सावधान। गुरुवचनाचें अनुसंधान।**
**अविश्रम करितां मंथन। ब्रह्मज्ञान तैं प्रगटे ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. १०

( श्रीविवेकानंदस्वामी गुरूच्या भेटीनंतर एकांतांत राहून गुरूक्त साधन करीत असतां फक्त दोन तास देहाच्या विश्रांतीकरितां राखून दररोज २२ तास ध्यानाभ्यास करीत असत म्हणे. आणि म्हणूनच ते इतके दिग्विजयी पुरुष झाले! असो. )

निजधैर्यानें मनाच्या हात धुवून मागें लागलें पाहिजे. त्याला भितां कामा नये तें ' वृत्तिशून्य ' होईपर्यंत आपण असावध असतां कामा नये. कृष्णसर्पाची मान मुठींत मिळाली असतां तो मरेपर्यंत मूठ आवळीत राहिली पाहिजे. थोडीशी ढिली केली तर तो याला खाऊन सोडील. नाथांचे खालील उद्गार पहा :—

**" मनबुद्ध्यादि इंद्रियें प्राण। निजधैर्यें धरोनि आपण।**
**नित्य केलिया आत्मप्रवण। परतोनि जाण येवों नेदी ॥**
**वागुरें बांधिल्या मृसागी। पारधी जाऊं नेदी त्या वनासी।**
**तेवीं धैर्यें आकळोनि मनासी। देहापाशीं येवों नेदी ॥**
**देहासी नाना भोगसमृद्धी। वाबूनियां गजस्कंधीं।**
**ऐसें सुख होतां त्रिशुद्धी। मनासी देहबुद्धि धरूं नेदी ॥**
**प्रळयकाळाच्या कडकडाटीं। महाभूतां होतां आटाटी।**
**तरी मनासी देहाची भेटी। धैर्यें जगजेठी होंचि नेदी ॥**

*****************************************************

**( तेथ काळाचेनि हटतटें । वृत्ति परब्रह्माचिये वाटे ।**
**लावूनियां नेटेंपाटें । चिन्मात्र पेठे विकली ॥ )**
**जंववरी वृत्तिशून्य नव्हे मन । तंववरी विश्वासेना विचक्षण ।**
**वृत्तिरूपें सिंतरील मन । यालागीं 'सावधान' निजबोधें ॥**
**हा हो दुर्वासाऐसा सज्ञान । त्यासी क्षणक्षणा क्षोभवी मन ।**
**न विचारितां गुणागुण । शाप दारुण देवों धांवे ॥**
**या मनाऐसें नाडक । जगामाजीं नाहीं आणिक ।**
**छळछद्में नाडी ज्ञाते लोक । साधु घातक मनाचे ॥**
**अति नाटकी नाटक मन । मुक्तत्वें धरी अभिमान ।**
**त्याचें करावया निर्दळण । साधु 'सावधान' निजबोधें ॥**
**मुखीं धरिलिया कृष्णसर्पासी । ढिलें करितां तो तत्काळ ग्रासी ।**
**मरे तंववरी आवळावें त्यासी । तेवीं मनासी निर्दाळिती ॥ "**

एकनाथी भागवत, अ. ११, श्लो. ३१ मधील 'धृतिमान्' व 'अप्रमत्त' पदावरील हें अप्रतिम व्याख्यान पाहाण्यासारखें आहे.

मनाचें 'निर्दळण' हा शब्द निष्ठुर असला, तो प्रयत्न कठिण असला, दुस्तर असला, तरी त्याचें फळ अत्यंत मधुर, शाश्वत व अखंड आहे. तें साधण्याकरितां वर लिहिल्याप्रमाणें मनाचा 'घात' परम सावधानपणें केलाच पाहिजे. ही एक मनाशीं लढाईच आहे. ही करून जो मनास जिंकेल तोच खरा शूर होय. श्रीतुकाराम महाराज म्हणतात —

**" मन गुंतलें लुलया । जाय धांवोनि त्या ठाया ॥ १ ॥**
**मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ २ ॥**
**तुका म्हणे येणें । बहु नाडिले शहाणे ॥ ३ ॥**

पण अशी लढाई करणें ज्यांना शक्य वाटत नसेल, त्यांनीं श्रीगुरुस्मरणपूर्वक मनाशीं 'मैत्री' करण्याचा प्रयत्न करावा. मनाची मैत्री संपादन होईल व मन एकदां प्रसन्न होईल, तर साधकाला पुढील काळजी करण्याचें कारणच नाहीं. मनच आपलें आपण पाहून घेतें.

**" एवं मनातें ऐशियापरी । न साधवेचि करून 'वैरी'**
**तरी मनासी करूनि 'मैत्री' । मन सुखी करी मित्रत्वें ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**प्राकृत मित्रांची मैत्री । उपकारी प्रत्युपकारी ।**
**तेंहि विषय सुखावरी । येर येर घरीं उचितानुकाळें ॥**
**तैशी नव्हे मनाची मैत्री । उपकारेंवीण प्रत्युपकारी ।**
**सकळ दुखांतें निवारी । सुखसागरीं नांदवी ॥**
**अधर्मी प्रवर्ततां आपण । मनचि मनासी निवारी जाण ।**
**असत्याची वाचेसि आण । आपणया आपण मन घाली ॥**
**कैशी मनाची मैत्री परम । निःशेष जाळावया कर्माकर्म ।**
**जोडावया चित्तशुद्धीचें वर्म । स्मरे हरिनाम ' अहर्निशीं ' ॥**
**जेवी हिरेनि हिरा चिरिजे । तेवीं मनेंचि मन धरिजे ।**
**हेंहि तैंचि गा लाहिजे । जैं गुरुकृपा पाविजे संपूर्ण स्वयें ॥**
**सद्गुरुकृपा झालिया संपूर्ण । हे मनची मनासी दावी खूण ।**
**तेणें निजसुखें सुखावोन । मनचि प्रसन्न मनासी होय ॥**
**मन मनासी झालिया प्रसन्न । तेव्हां वृत्ति होय निरभिमान ।**
**ऐसें साधका निज समाधान । मनें आपण साधिजे ॥**
**ऐसे मैत्रीसी मन सादर । जवळीं असतां निरंतर ।**
**त्यातें ओसंडूनि पामर । प्राकृत नर मित्र करिती ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. २३

मनाची मैत्री अशा प्रकारची फारच उपकारक असल्याचें जाणून श्रीसमर्थांनींही तसा प्रयत्न केला व साधकांस धडा घालून ठेवला. त्याची साक्ष म्हणजे महाराष्ट्रांत आबालवृद्धांच्या तोंडीं असलेले '**मनाचे श्लोक**' होत.

**" मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।**
**मना वासना दुष्ट कामा नये रे ०॥ ...**
**मना गूज रे तूज हें प्राप्त झालें ।**
**परी अंतरीं पाहिजे यत्न केले ॥ ...**
**मना वासना वासुदेवीं वसूं दे ।**
**मना कामना कामसंगीं नसूं दे ॥ "**

इत्यादि सर्व श्लोक हे दुसरें काय दर्शवितात बरें ? तर वर सांगितल्याप्रमाणें **मनाशीं मैत्री !**

आतां मनाशीं ‘ वैर ’ करितां आलें नाहीं व ‘ मैत्री ’ करणेंही साधलें नाहीं, तर त्याची ‘ उपेक्षा ’ करावी, त्याच्या सांगण्याकडे लक्षच देऊं नये, असें सांगतात :—

**“ वैर करोनि मनचि मारावें । मित्रत्वें मनें मन साधावें ।**
**इयें दोनी जैं न संभवे । तैं उपेक्षावें मनातें ॥**
**मन म्हणेल जें सुख । तें सांडावें आवश्यक ।**
**मन म्हणेल जें दुःख । तेंही निःशेख त्यजावें ॥**
**ऐसें ‘ उदास ’ मन देख । जो करी आवश्यक ।**
**तरी तो झाला अमनस्क । शांति अलोलिक ते ठायीं ॥**
**शत्रु मित्र उदासीन । करूनि वश्य न करी मन ।**
**जो धरी देहाभिमान । त्याचें भवभ्रमण सरेना ॥ ”** इत्यादि.

—एकनाथी भागवत, अ. २३

तात्पर्य —योगानें, सांख्यविचारानें ( ज्ञानानें ), किंवा भक्तीनें — कोणत्या तरी एका अथवा अनेक उपायांनीं या मनाला वश केल्यावांचून भवभ्रमण संपणार नाहीं. इतर मार्गापेक्षां भक्तिमार्ग हा सोपा आहे यांत संशय नाहीं.

**“ स्वभावतां मन चंचळ । विषयवासना अति चपळ ।**
**निर्गुण ब्रह्मीं केवळ । नाहीं बळ प्रवेशावया ॥**
**तरी सांख्य योग संन्यासू । हा न करावा आयासू ।**
**माझिया भक्तीचा विलासू । अति उल्हासू करावा ॥**
**माझेनि भजनें कृतकृत्यता । दृढ विश्वास धरोनि चित्ता ।**
**भजनीं प्रवर्तावें सर्वथा । ‘ अविश्रमता अहर्निशीं ’ ॥**
**माझें भजन करितां । न पडे ज्ञानाची पंगिस्तता ।**
**माझे भजनें नित्यमुक्तता । जाण मद्भक्तां मद्भावें ॥**
**ज्ञानेवीण भक्ति न घडे । म्हणती ते शब्दज्ञान-धडफुडे ।**
**भक्तीस्तव जाण रोकडें । ज्ञान जोडे अपरोक्ष ॥ ”**

—एकनाथी भागवत, अ. ११

अहाहा ! असा भक्तीचा महिमा छातीठोकपणानें दुसऱ्या कोणी क्वचितच सांगितला असेल. केवळ भक्तीनें अपरोक्ष ज्ञानाची प्राप्ति कशी होते हें समजलें पाहिजे, तर ‘ जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे ॥ ’ असो.

* * *

## ब्रह्मज्ञान म्हणजे पुस्तकी ज्ञान अथवा शब्दज्ञान नव्हे.

या शब्दज्ञानानें भूक निवणार नाहीं, तळमळ जाणार नाहीं, संसृति शमणार नाहीं; तर **ब्रह्मज्ञान म्हणजे ब्रह्मानंदसाक्षात्कार.** आणि हा ब्रह्मानंदसाक्षात्कार ब्रह्माकार वृत्तीनें होतो. म्हणून ब्रह्मज्ञान म्हणजे ब्रह्माकारवृत्ति असेहि म्हणतात. श्रीसिद्धारूढस्वामी वरचेवर म्हणत असत कीं, " **पंडित हे ग्रंथांचा अभ्यास करितात व ज्ञानी हे वृत्तीचा** ( तदाकारतेचा ) **अभ्यास करितात. ग्रंथांच्या अभ्यासानें मुक्ति मिळाली असती तर सगळे पंडित मुक्त झाले असते, पण तसा लोकानुभव नाहीं.** " इत्यादि. तसेंच ते म्हणत— " **आत्म्यानें मोक्ष नाहीं, आत्मज्ञानानें मोक्ष.** आत्म्यानें मोक्ष असता तर आत्मा हा सर्वांच्या हृदयांत असतोच. त्यामुळें सर्व जीव मुक्तच झाले असते, पण तसें नाहीं. याकरितां आत्म्यानें मोक्ष नाहीं; आत्मज्ञानानें मोक्ष, आणि आत्मज्ञान म्हणजे आपलेपणाचें ज्ञान आणि हें तर सर्वांना आहेच. पण तें अयथार्थ ( अन्यथा भावानें ) आहे, यथार्थरूपानें नाहीं. आत्म्याच्या यथार्थ ज्ञानानेंच मोक्ष. पण हें मोक्षदायक आत्मज्ञान म्हणजे आत्मविषयक ' शब्दज्ञान ' नव्हे. कारण या शब्दज्ञानानें अविद्येचें आवरण नष्ट होत नाहीं. यासाठीं अविद्यानाशक " **आत्मज्ञान म्हणजे आत्माकारवृत्तीचा उदय** " इत्यादि.

वृत्ति आत्माकार होणें म्हणजे देहेंद्रियविषयादि अनात्मवस्तूचें तादात्म्य सोडून, तिनें आपल्या अधिष्ठानसत्तेचें म्हणजे आत्मवस्तूचें तादात्म्य पावणें. निरनिराळ्या गुरुसंप्रदायांत योगमुद्रादि नाना साधनें अनादि कालापासून प्रचलित आहेत; त्या सर्वांचें तात्पर्य, वृत्तींचा बहिर्मुखपणाचा स्वाभाविक धर्म आहे तो बदलून, तिला अथवा त्यांना ( सर्व वृत्तींना ) आत्माभिमुख करणें हेंच आहे. ब्रह्मांडामधील गोपींचें श्रीकृष्णाशीं रत होणें म्हणजे पिंडामधील वृत्तीचें आत्म्याशीं रममाण होणें. ही रासक्रीडा अंतरांत अनुभवितो, तोच सर्व बंधनांपासून मुक्त होतो. आत्म्याशीं रत होणें म्हणजे वृत्ति आत्माकार होणें, आत्मस्वरूपांत समरसून जाणें. ' **चित्ताचें चैतन्य होणें** ' असेंही यास म्हणतात. अशा वेळीं ' महासुखा ' चा जो अनुभव येतो, त्याचें वर्णन सहस्रमुखाच्यानेंही करवणार नाहीं. श्रीज्ञानेश्वरमहाराज यासंबंधानें म्हणतात :—

**" प सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनले घोघें ।**
**ते काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ? ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**ना ते समुद्रचि होऊनि ठेले । तेवीं चित्ताचें चैतन्य झालें ।**
**जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥**

—ज्ञानेश्वरी, अ. ८

**तैसें चित्त लया जाय । आणि चैतन्यचि आघवें होय ।**
**ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥**
**तें ( मन ) सुखाचेनि सांगातें । आलें परब्रह्म आंतौतें ।**
**तेथ लवण जैसें जळातें । सांडूं नेणे ॥**
**तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्याचिये राउळीं ॥**
**महासुखाची दिवाळी । जगेंसीं दिसे ॥**
**परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे ।**
**देखतखेवों ओळखे । म्हणे तत्त्व हें मीचि ॥**
**तिये ओळखीचि सरिसे । सुखाचिया साम्राज्यीं बैसे ।**
**मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥ "**

—ज्ञानेश्वरी, अ. ६

या स्वानुभवसुखालाच ब्रह्मानंद, **निजानंद**, **चिदानंद**, **स्वात्मानंद**, परमानंद, **स्वानंद** अशीं नांवें आहेत; ह्या आत्मलाभाकरितांच नरजन्म आहे. नरजन्माचें सार्थक तें हेंच आहे. मुमुक्षूचें, **साधकांचें अंतिम ध्येय तें हेंच** आहे.

पण हें सुख भोगतांना, पक्षी फळ चुंबितो तसें वेगळेपणानें भोगावयाचें नसतें, अवेगळेपणानें म्हणजे 'मीच तें सुख' (वरच्या एका ओंवींत सांगितल्या-प्रमाणें 'म्हणे तत्त्व हें मीचि') अशा वृत्तीनें भोगावयाचें असतें. तेथें भोग्य व भोक्तेपण नाहीसें होतें. (भोग्य व भोक्ता एकरूप होतात.) यावर श्रीज्ञानेश्वर महाराज खुणेची भाषा बोलतात, ती अशी—

**" जयातें बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेष ।**
**अंतरीं सुख । एक आथी ॥**
**परी तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।**
**तैसें नव्हे, तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥**
**भोगीं अवस्था एक उठी । ते अहंकाराचा अंचळ लोटी ।**
**मग सुखेंसी घे आंठी । गाढेपणें ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।**
**तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥.........**
**म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें ।**
**तें खुणाचि पावेल स्वभावें । आत्माराम ॥**
**जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण राहिले ।**
**ते मी जाणें निखिळ ओतले । सामरस्याचे ॥**
**ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।**
**कीं महाबोधें बिढार । केले जैसें ॥.........**
**अर्जुना, अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं ।**
**मग स्थिराऊनि तेही । तेंचि झाले ॥ "**

—ज्ञानेश्वरी, अ. ५ श्लो. २३–२५ वरील टीका

याप्रमाणें ज्यांनीं त्या ब्रह्मसुखाच्या, महासुखाच्या, अनंतसुखाच्या डोहांत बुडून तळ गांठला, ते वेगळेपणानें न राहतां तद्रूप (सुखस्वरूप) होऊन जातात. अभ्यासबळानें अनुभवाच्या या पायरीवर चढण्याचें हें ध्येय साधकांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेवलें पाहिजे. हें आपल्यास कसें साध्य होईल? अशी काळजी किंवा संदेह साधकांनीं हृदयांत वागवूं नये. अभ्यास करून तर पाहा.

**" हें कायिसयावरी होये । ऐसा जरी संदेहो वर्तताहे ।**
**तरी अभ्यासूनि आदीं पाहे । मग नव्हे तरी कोपे ॥ "**

म्हणजे अभ्यास अगोदर करून पाहा, आणि साध्य झालें नाहीं तर मग आमच्यावर रागव म्हणे ! असें भगवान अर्जुनास सांगतात (ज्ञानेश्वरी, अ. ८।८०). किती कळवळ्याचें व प्रेमाचें सांगणें हें आहे बरें! यापेक्षां आम्ही तरी अधिक कळकळीनें व युक्तीनें काय सांगणार ?

ज्यानें अभ्यासानें हें परमानंदसुख, हा परमात्मसाक्षात्कार करून घेतला, त्याची विषयावर तुच्छबुद्धि झाल्याशिवाय कशी राहील? जो आत्मरत, आत्मक्रीड, आत्माराम (आत्मस्वरूपांत आराम पावलेला) झाला, तो इंद्रियावर येऊन विषयानंदाकरितां धडपड कशाला करील ?

**" जो आपणपें सांडूनि कांहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं ।**
**तो विषय न सेवी हें कायी । विचित्र येथ ॥**

**सहजें** (अकृत्रिम) **सुखाचेनि अपारें। सुरवाडलेनि अंतरें।**
**रचिला म्हणवूनि बाहिरें। पाऊल न घाली॥"**

— ज्ञानेश्वरी, अ. ५, श्लो. २१ टी.

**" जैसें समुद्रीं लवण न पडे। तंव वेगळें अल्प आवडे।**
**मग होय सिंधूचिएवढें। मिळे तेव्हां॥**
**तैसें संकल्पौनि काढिलें। जयाचें मन चैतन्यचि झालें।**
**तेणें एकदेशीय परी व्यापिलें। लोकत्रय॥"**

असें झाल्यानंतर त्याचीं इंद्रियें त्याच्या ताब्यांत वागतात, तो सांगेल तें तीं ऐकतात. आणि अशीं इंद्रियें ज्याच्या ताब्यांत आलीं, 'कूर्मोऽगानीव सर्वशः' या वचनाप्रमाणें कासव जसे आपले अवयव बिनआयासानें आंत व बाहेर काढतो, त्याप्रमाणें विषयांमधून इंद्रियांना आवरणें (परतविणें) अथवा विषयांत वावरूं देणें हें जो सहज लीलेनें करूं शकतो, त्याचीच प्रज्ञा म्हणजे बुद्धि स्थिर झाली, अर्थात् तोच 'स्थितप्रज्ञ' झाला असें म्हणतां येईल.

**" तैसीं इंद्रियें आपैतीं होतीं। जयाचे म्हणितलें करिती।**
**तयाची प्रज्ञा जाण स्थिती। पातली असे॥"**

— ज्ञानेश्वरी, अ. २

असें होणार नाहीं, आत्मस्वरूपीं बुद्धि स्थिरता पावणार नाहीं, तो 'मुक्तपणें बद्ध' होऊन विषयकर्दमांत पडल्याशिवाय राहणार नाहीं. शास्त्रांतील वचनें म्हणजे अविद्याबंधन तोडून टाकण्याचीं तीक्ष्ण शस्त्रेंच खरीं, पण त्या शस्त्रांनीं बंधन तोडण्याऐवजीं, तो आपलेच हातपाय तोडून घेईल! कारण त्याची पक्वबुद्धि (स्थिरप्रज्ञा अथवा प्रौढबुद्धि) नसून विषयेंद्रियसंयोगांत रमणारी बालबुद्धि असल्यामुळें त्याचे हातून आत्मघाताचे असे प्रयत्न होणारच. ('बालका हातीं दिधलें शस्त्र। छेदी आपलेंच शरीर॥' हें मागें सांगितलेंच आहे.) जो खरा शूर असेल, जो खरा पुरुष असेल, तोच शत्रूंवर तुटून पडून शस्त्रानें त्यांचा नाश करील. असें ज्याला करतां येणार नाहीं, तो भ्याड अथवा तृतीयप्रकृति असें म्हणणेस हरकत नाहीं. अशा मनुष्याला 'उपाय तेच अपाय' दिसूं लागतात अथवा होतात. या तत्त्वावर श्रीतुकाराममहाराजांचा एक **गमतीचा अभंग** आहे.

**"ढाल तरवारें गुंतले हे कर । म्हणे तो झुंजार कैसा झुंजों ॥ १ ॥**
**पेटी पडदळे सिले टोप ओझें । हें तो झालें दुजें मरणमूळ ॥ २ ॥**
**बैसविलें मला येणें अश्वावरी । धावूं पळूं तरी कैसा आतां ॥ ३ ॥**
**असोनि उपाय म्हणे हे अपाय । म्हणे हाय हाय काय करूं ॥ ४ ॥**
**तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ५ ॥"**

या अभंगाची एक गोष्ट अथवा आख्यायिका आहे, ती सर्व वाचकांस ठाऊक असण्याचा संभव नाहीं व ती ठाऊक असल्याशिवाय याचा अर्थ बरोबर लागणार नाहीं, म्हणून ती थोडक्यांत सांगतों :— एका खेडेगांवांतील सर्व पुरुष मंडळी गांव सोडून दूरवर शेतांत काम करण्यासाठीं गेलेली होती. ही संधि साधून कांहीं दरोडेखोर गांव लुटण्याकरितां आले. पूर्वी गांवाला वेशीचे दरवाजे असत. तो बंद असलेला दरवाजा चोरट्यांनीं फोडण्यास आरंभ केला. गांवांतील बायकांनीं तें ओळखून गांवांत असलेल्या एका तृतीयप्रकृति ( षंढ ) मनुष्यास त्यांनीं लढाऊ शिपायाचा वेष देऊन घोड्यावर बसविलें. अंगांत चिलखत, डोकीवर टोप व हातांत ढाल तरवार देऊन त्याला सांगितलें, चल मर्दासारखा पुढें. आम्ही तुझ्यामागून मुसळें घेऊन येतों तुझ्या साह्याला ! इत्यादि. तो बाहेरून बनविलेला मर्द, अंगांत मर्दुमकीचा गंधच नाहीं, त्याला तें सगळें चमत्कारिकच वाटूं लागलें. तो म्हणाला, दोन्ही हात ढाल तलवारींत गुंतले, मी युद्ध कसें करूं ? अंगांतील चिलखत व डोकीवर टोप हें एक नवीनच ओझें मरणाला मूळ झालें ! बरें, पळून जावें म्हटलें तर पाय रिकिबींत अडकले, पळावें तरी कसें ? हाय हाय, काय करूं ? इत्यादि. तुकोबाराय म्हणतात, तो मूर्ख मनुष्य उपाय तेच अपाय मानूं लागला, त्याप्रमाणें जीव हा स्वतः परब्रह्म ( सच्चिदानंदस्वरूप ) असतां, **संतसंगाचें वर्म** चुकल्यामुळें, स्वतःच्या स्वानंदसाम्राज्यास मुकून दहाजणांच्या दारीं ( दशेंद्रियांच्या द्वारें ) सुखाची भीक मागत फिरत आहे ! या मूर्खपणाला काय म्हणावें ? ज्या वचनांच्या अभ्यासानें, विषयकर्दमांत लोळविणाऱ्या कामक्रोधादि वैऱ्यांचा नाश करावयाचा, त्या वचनांच्या आधारानें हा विषयकर्दमांतील बेडूक होऊन बसतो !

**बायको ही काम जिंकण्याकरितां व मुलें हीं क्रोध जिंकण्याकरितां असतात, हें वर्म न जाणतां कामक्रोधवृद्धीकडे त्यांचा हा मूढ मनुष्य उपयोग करून घेतो ! कांहीं प्रामाणिक साधक वरील वर्म न जाणल्यामुळेंच कामक्रोधाच्या त्यागासाठीं बायकामुलांचा त्याग करितात. विषयसंस्कारांच्या आधीन असलेले**

कांहीं साधक, वरील वर्म न कळल्यामुळेंच ' इंद्रियांचीं कर्में इंद्रियें करितात, आत्मा पापपुण्यापासून अलिप्त आहे,' अशा शब्दज्ञानानें बायकामुलांची आसक्ति न सोडतां त्यांतच गुरफटून राहतात! अनीति-वर्तनही करितात! विषयेंद्रियसंयोगानें होणाऱ्या सुखाच्या लालसेमुळें अतीन्द्रिय सुखाच्या लाभाला आंचवतात! मन मोठें लबाड आहे. तें कुठून तरी पळवाट काढून कल्याणाचा मार्ग चुकविण्यास पहातें. सोपीशीं वाटणारीं एकदोन वचनें आधारास घेऊन इतर शेंकडों वचनें बाजूस लोटून देतें व जीवास खड्ड्यांत घालतें. ' मुक्तपणें बद्ध ' करून सोडतें! तरी स्वार्थेच्छु पुरुषांनीं या असंस्कारी मनाच्या हारीं न जातां, त्याला आपल्या हारीं आणण्याचा प्रयत्न करावा. तें नसत्या खोडी करूं लागेल तर दांतओंठ चावून मुठी आवळून त्यास चिरडून टाकण्याचा प्रयत्न करावा, असें योगवाशिष्टांत सांगितलें आहे. विवेकाची सांगड त्याला लावून दिली म्हणजे त्याच्या दमनास आयास कमी पडतात. सत्संगांत हें सर्व अनायासें घडून येतें. याकरितां साधकांनीं नेहमीं सत्संगांत सच्छास्त्रश्रवणाचा अभ्यास करीत असावा. सत्संगांत नुसतें राहिलें तरीहि पुष्कळ काम होतें. मनाच्या उच्छृंखलतेला आपण घाबरून जाऊं नये. त्याची काय बिशाद आहे? श्रीहरिगुरुकृपेनें आपण त्यास जिंकूंच जिंकूं असा त्वेष धारण करावा.

> **" कायसा भवभयाचा पाड । घेईन कोटिजन्मांचा सूड ।**
> **नासल्या आयुष्याचा कैवाड । करीन निवाड येणें देहें ॥**
> **देहासी आली वार्धक्यता । परी वृद्धत्व नव्हे माझिया चित्ता ॥**
> **तेणें चित्तें चिंतूनि भगवंता । भवबंध आतां छेदीन ॥**
> **उरलें आयुष्य येथ । कळिकाळाचे पाडीन दांत ॥**
> **गर्भदुःखाचें खणेन खत । मरणाचा घात मी करीन ॥ "**
>
> — एकनाथी भागवत, अ. २३

अशा तऱ्हेचा हिय्या अथवा निश्चय धरावा. ' निश्चयाचें बळ ' झालें कीं तेंच त्याचें ' फळ ' होतें. बळच फळांत रूपांतर पावतें.

## विषयांचा त्याग अशक्य, विषयासक्तीचा त्याग अवश्य !

परमार्थसाधनांत वैराग्य म्हणजे विषयाचा त्याग ठिकठिकाणीं सांगितला आहे. पण विषयत्याग सर्वथैव तर कोणासच साध्य नाहीं. कारण विषयदानावांचून देहाचें जगणेंच मुळीं अशक्य आहे.

**“ बहुतीं विषय निंदिले । आणि तेचि सेवीत गेले ।**
**विषयत्यागें देह चाले । हें तों घडेना ॥**
**विषयत्यागेंविण कांहीं । परलोक तो प्राप्त नाहीं ।**
**ऐसें बोलणें ठाईं ठाईं । बरें पहा ॥**
**प्रपंची खाती जेविती । परमार्थी काय उपवास करिती ।**
**उभयतां सारखे दिसती । विषयाविषयीं ॥ ”**

असें आहे. मग कसें व्हावें ? विषयत्याग तर अवश्य आहे आणि भोगांवाचून सुटका नाहीं ; मग करावें कसें ? याचें वर्मही त्यापुढेंच संतांनीं सांगून ठेवलें आहे. संत इतके कांहीं निष्ठुर किंवा व्यवहारशून्य नाहींत, कीं ते परलोकच्या सुखासाठीं जीवाला आतां उपाशी मरायला सांगतील ! विषयग्रहणाविषयीं ते पुढें सांगतात —

**“ सबळ[1] विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण[2] घेणें ।**
**विषयत्यागाचीं लक्षणें । वोळखा ऐसीं ॥ ” —**

— दासबोध, १२।७

**“ जेणें सहाय होतीं शमासी । त्या युक्तीं राखणें इंद्रियांसी ।**
**विधीवेगळें नेदी भोगासी । आवरी अहर्निशीं वैराग्यें ॥**
**मोकळें न सांडूनि मन । न सोडूनि अनुसंधान ।**
**करावें अन्नपानशयन । हें विषयदान निजहिता ॥ ”**

— एकनाथी भागवत, अ. १९।२०

पण अशा तऱ्हेनें इंद्रियांना विषय घेऊं देणें हा कांहीं मोठा परमार्थ नव्हे. अशा तऱ्हेचा ‘ युक्ताहारविहार ’ सुशिक्षित व सुजाण प्रापंचिक लोकही आरोग्याकरितां व दीर्घायुष्याकरितां करीत असतात. ज्यांना खाण्यापिण्याची चैन करण्याकरितां जगायचें नाहीं, तर जगण्याकरितां खाणेंपिणें करावयाचें असतें व मरण्याकरितां जगावयाचें नसून कांहीं कर्तबगारी करण्याकरितां जगावयाचें असतें, त्यांना सुद्धां पंचविषय हे जेवढ्यास तेवढे घ्यावयाचे असतात ; तर मग ज्यांना कळिकाळाशीं झुंजून स्वानंदसाम्राज्याचा उपभोग घ्यावयाचा असतो, त्यांना विषयभोगांत अशी उदासीनता अथवा कडक नियमितपणा ( निष्काळजीपणा नव्हे ) नको का धरायला ?

१ उन्मादक. २ गरजेपुरते.

**याचा सारांश** एवढाच कीं, ज्याला 'अतीन्द्रिय' अशा ब्रह्मसुखाचा लाभ करून घ्यावयाचा आहे, त्यानें 'जितेन्द्रिय' राहून विषयसुखाबद्दल उदासीन असलें पाहिजे. 'कोटि ग्रंथांनीं जें सांगावयाचें, तें अर्ध्या श्लोकांत सांगतों' (श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रथकोटिभिः) ह्या वचनाप्रमाणें, हजारों शब्द व वाक्यें खर्च करून साधकांना हिताच्या ज्या सूचना द्यावयाच्या, त्या वरील 'सारांशा' च्या एका वाक्यानें दिलेल्या आहेत असें समजावें व सत्साधकांनीं मनाचा ढिलेपणा सोडून त्याला खंबीर करण्याचा प्रयत्न करावा, आणि ज्ञानविज्ञानाचा नाश करणारा महापापी जो काम त्याला जिंकून विजयी व्हावें.



# थोडासा वेदान्त

**" कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखिल प्रबंध ।**
**माजीं आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ "**

— ज्ञानेश्वरी, अ. ९

श्रीज्ञानेश्वरींतील वरील ओंवीस अनुसरून ह्या नामजपाच्या पुस्तकांत आत्मस्वरूपाची विशद चर्चा, उदंड नसली तरी थोडीशी तरी करणें अवश्य आहे. ओघानुसार यापूर्वीं ही चर्चा झालेलीच आहे आणि ती मर्मज्ञ वाचकांच्या लक्षांत पण आल्यावांचून रहाणार नाहीं. तथापि या लेखांतही ती थोडी स्वतंत्रपणें करण्याचें योजिलें आहे.

नामानें नामीचें स्वरूप जाणावयाचें म्हणजे साक्षात्कृत करून घ्यावयाचें असल्यामुळें त्याचें स्वरूप नीट बुद्धिगम्य होण्यासाठीं त्याविषयीं चर्चा विशद ( स्पष्ट ) रीतीनें होणें जरूर आहे. दुसरें असें कीं, पुढें '**नामयोगरहस्य**' विषय येणार आहे, तो वाचकांना आत्मसात् करून घेण्यास याचा फार उपयोग होईल.

ह्या आत्मचर्चेलाच 'वेदान्त' असें म्हणतात. हें वेदान्तशास्त्र किती गंभीर ( मोठें व गहन ) आहे हें त्यावर झालेल्या ग्रंथांच्या संख्येवरूनही समजून येईल. यावर वादांचीं रणेंहि माजून राहिलीं आहेत, वेदांतील सर्व उपनिषद्भाग तर ह्याकरितांच निर्माण झालेला आहे. त्याशिवाय ब्रह्मसूत्रें, गीता, भागवत व इतर पुराणांमधूनही ह्याची चर्चा झालेली आहे. त्या मूळ ग्रंथांवर संस्कृतांत भाष्यें, टीका, टिप्पणी, व्याख्यानें वगैरे होऊन, भरतखंडांतील सर्व प्राकृत भाषांमधूनही संतमहानुभावांनीं व विद्वान लोकांनीं गद्यपद्यात्मक अनेक ग्रंथ रचिले आहेत.

ह्यांपैकीं कांहीं ग्रंथ 'वादी'लोकांकरितां व कांहीं 'शिष्य'जनांकरितां म्हणून निर्माण झाले आहेत. ज्यांच्या डोक्यांत संशयांचें अथवा तर्कवितर्कांचें जंगल माजून राहिलें आहे, त्यांच्याकरितां पहिल्या जातीचे म्हणजे खंडणमंडणात्मक ग्रंथ; व पूर्व पुण्याईनें जे संशयाच्या रानांत सांपडले नाहींत, जे शुद्धभाव व विश्वाससंपन्न आहेत, त्यांच्याकरितां दुसऱ्या जातीचे म्हणजे सरळ सिद्धांतात्मक ग्रंथ निर्माण झाले आहेत. त्या त्या संस्काराचे अथवा अधिकाराचे लोक ते ते ग्रंथ वाचीत असतात.

येथें फक्त दुसऱ्या जातीच्या लोकांकरितां म्हणजे साध्या जिज्ञासूंकरितां आणि तेंही फक्त 'रूपरेषा' (Outline) लक्षांत येण्यापुरतेंच लिहिण्यांत येईल. आणि विस्तारभयास्तवही तसें करणें प्राप्त आहे.

वेदान्तांत फक्त **आत्मानात्मविचार** (आत्मा कोण व अनात्मा कोण यांचा विवेक) सांगितलेला आहे. (यांतच **जीव, जगत्, ईश्वर, बंध, मोक्ष** इत्यादिकांचा विचार येऊन जातो.)

'आत्मा' म्हणजे आपण हें प्रथम पुष्कळ श्रोत्यांना माहीत नसतें. आत्मा शब्द वेदान्तांत ह्या अर्थानें वापरलेला असतो, हें माहीत नसलेले, वेदान्तप्रिय अनेक सुशिक्षित लोकही आम्हांस आढळले आहेत. 'आत्मज' म्हणजे आपला मुलगा हें व्यवहारांतही प्रसिद्ध आहे. यावरूनही आत्मा म्हणजे आपण हें सहज सिद्ध होतें. पण हा अर्थ लक्षांत न घेतां जन्मभर वेदान्त ऐकला तरी, 'बारा वर्षे रामायण ऐकून रामाची सीता कोण' हें न कळणाऱ्या अजाण श्रोत्यांप्रमाणें त्यांची गत होते! करितां ज्या शास्त्राची माहिती आपणांस करून घ्यावयाची असते, त्याची प्रथम 'परिभाषा' बिनचूक जाणून घेतली पाहिजे. गीतेंत अथवा अन्यत्र कोठें कोठें आत्मा शब्द इतर अर्थानेंही आलेला दिसतो, तथापि वेदान्तशास्त्रांत आत्मा शब्दाचा 'आपण' (मी) हाच अर्थ मुख्य आहे. आणि ह्या अर्थाच्या भावनेनें तो ऐकत किंवा वाचीत गेला, तरच त्या दिव्य तत्त्वाचा यथार्थ बोध होणार आहे. म्हणून ही सहज सूचना दिली आहे. असो.

आत्म्याचें (आपलें) यथार्थ स्वरूप न जाणल्यानेंच हा जीव जन्ममरणाच्या परंपरेंत सांपडला आहे. यांतून सुटणें याचेंच नांव **मोक्ष** [१] **घरदार, बायकामुलें म्हणजे संसार** अथवा प्रपंच असें पुष्कळ लोक समजतात; पण ती चूक आहे. कारण यांतून सुटायला एवढा अट्टाहास कशाला? तर [२] **जन्ममरणाची परंपरा** ('किती वेळां जन्मा यावें। किती व्हावें फजीत'–तु.) **हा संसार** होय. तिसरा अर्थ [३] **प्रपंच म्हजणे पंचभूतांचा प्रकर्ष जेथें झाला आहे; असा देह** पण यांतून सुटणें हाही मोक्ष नव्हे, कारण मरणाच्या वेळीं सर्व जीव यांतून सुटतातच; तर [४] **देह म्हणजे देहभाव हाच मुख्य संसार** होय. यांतून सुटणें याचेंच नांव मोक्ष. ['देहभाव' याच्यामध्यें 'अहं' आणि 'मम' हे दोन भाव येतात. याकरितां थोडक्यांत

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

बोलावयाचें तर **अहं** आणि **मम (मी** व **माझें)** म्हणजेच संसार, हें वर्म जिज्ञासूंनीं लक्षांत ठेवावें. ]

**" अनात्मन्यात्मधीर्बंधस्तन्नाशो मोक्ष उच्यते "**

याचा अर्थ – अनात्म्याचे ठिकाणीं आत्मबुद्धि होणें याचें नांव **बंध** व ह्या बंधाचा नाश तो **मोक्ष.** (देहेंद्रियप्राणमनबुद्धि हीं, आत्मा म्हणजे आपण नव्हे, म्हणून अनात्मा; यांचे ठिकाणीं आत्मबुद्धि करणें म्हणजे हा साडेतीन हात देह तोच मी असें मानणें याचें नांव बंध. घर निराळें, घरकार निराळा, शेत निराळें, शेतकरी निराळा, त्याप्रमाणें देह निराळा व देही म्हणजे देहांत राहणारा, देहेंद्रियादिसंघातास साक्षित्वानें जाणणारा आपण निराळा, असें जाणणें याचें नांव आत्मज्ञान ; व या ज्ञानानें मोक्ष.

**" न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ।**
**सर्वाशासंक्षये चेतःक्षये मोक्ष इतीष्यते ॥ "**
**" अज्ञानहृदयग्रंथि-नाशो मोक्ष इति स्मृतः ॥ "**

मोक्ष कांहीं आकाशांत नाहीं, पाताळांत नाहीं किंवा भूतलावर नाहीं. वासनाक्षयपूर्वक चित्तनाश होणें याचें नांव मोक्ष. अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि व आत्म्याच्या ठिकाणीं अनात्मबुद्धि एतद्रूप जें अज्ञान – यालाच 'चिदचिद्ग्रंथि' किंवा 'चिज्जडग्रंथि' असें म्हणतात; याचा जो नाश, त्यालाच **मोक्ष** असें म्हणतात.

ह्या अज्ञानाचा म्हणजे अविवेकाचा नाश विवेकानें होतो. ह्या विवेकास वेदान्तांत 'आत्मानात्मविवेक' म्हणतात. आत्मा हा चेतन आहे व अनात्मा जड आहे, आत्मा हा द्रष्टा आहे व अनात्मा दृश्य आहे, असें जाणून देहादिक जें दृश्य त्याचें तादात्म्य सोडून – अर्थात् देहादिक 'मी' व देहसंबंधीं दारापुत्रादिक 'माझें' ही बुद्धि सोडून – याचा द्रष्टा जो आपण त्याच्या ठिकाणीं बुद्धीची स्थिरता करणें, हें या विवेकाचें तात्पर्य आहे. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे आजपर्यंत देह तो मी असा जो बुद्धीचा निश्चय होता तो सोडून आत्मा मी असा निश्चय करावा.

**" आत्मबुद्धि निश्चयाची । तेचि दशा मोक्षश्रीची ॥**
**'अहमात्मा' हें कधींचि । विसरों नये ॥ "**

— दासबोध

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

'अहं आत्मा' हा विसर पडला कीं, देहबुद्धि स्फुरूं लागते व तसें झालें कीं विवेकाची शुद्धि उडून जाते, याकरितां आत्मबुद्धि घट्ट करावी.

**" आठवतां देहबुद्धि । उडे विवेकाची शुद्धि ।**
**याकारणें आत्मशुद्धि सदृढ करावी ॥ "**

— दासबोध

आत्म्याच्या अज्ञानानें जगाचें (स्वदेहादिक सर्व दृश्याचें) भान होतें, तें आत्म्याच्या ज्ञानानेंच नाहींसें होतें. यास उदाहरण – दोरीच्या अज्ञानानें सर्प भासतो, तो दोरीच्या ज्ञानानेंच नाहींसा होतो.

**" आत्माज्ञानाज्जगद्भाति ह्यात्मज्ञानान्निवर्तते ।**
**रज्ज्वज्ञानादहिर्भाति तज्ज्ञानाच्च निवर्तते ॥ "**

— योगवासिष्ठ

याकरितां देहबुद्धि सोडून आत्मबुद्धि धरावी, म्हणजे 'मोक्षश्री' (मोक्षलक्ष्मी) गळयांत माळ घालील; किंबहुना वर सांगितल्याप्रमाणें, हीच 'मोक्षश्रीची दशा' म्हणजे स्वरूप होय. '**स्वस्वरूपावस्थितिर्मोक्षः**' असें मोक्षाचें थोडक्यांत स्वरूप सांगितलें आहे.

**धर्म**, **अर्थ**, **काम** आणि **मोक्ष** असे चार पुरुषार्थ आहेत. ते साधण्याकरितांच मनुष्यदेह आहे. पैकीं चौथा पुरुषार्थ जो मोक्ष तो साधणें म्हणजे '**नरका नारायण**' होणें होय; आणि हा अनुभव पण जीवंतपणींच घ्यावयाचा असतो, मेल्यावर नव्हे. मेल्यानंतर आम्हांस मोक्ष होईल असें म्हणणारे ते मूर्ख किंवा महामूर्खही नव्हेत, तर 'अतिमूर्ख' असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात —

**" मेल्यावरी मोक्ष आम्हांसी होईल । ऐसें जे म्हणतील ते अतिमूर्ख । १ ।**
**दीप गेल्यावरी कैंचा गा प्रकाश । झाकापाकी त्यास कासयाची । २ ।**
**गृह न जळतां शिंपिजे उदक । शेखीं तें निष्टंक काय कीजे । ३ ।**
**जंववरी देह आहे तंववरी साधन । करुनियां ज्ञान साधिजे कीं । ४ ।**

त्या ज्ञानाचें स्वरूप काय ? तर —

**आहे मी हा कोण करावा विचार । म्हणे ज्ञानेश्वर अनुभवें । ५ । "**

श्रीसमर्थही ज्ञानाचें लक्षण असेंच सांगतात —

*********************************************

**" ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।**
**पहावें आपणासी आपण । या नांव ज्ञान ॥ "**

— दासबोध

झाला, संपला वेदान्त. हाच शास्त्रकारांनीं मुमुक्षूंच्या सुखबोधार्थ नाना तऱ्हांनीं सांगितला आहे.

* * * *

**" येन शब्दं रसं रूपं गंधं जानासि राघव ।**
**तमात्मानं परं ब्रह्म जानीहि परमेश्वरम् ॥ "**

— योगवाशिष्ठ

ह्या एका श्लोकांत सर्व वेदान्ताचें तत्त्व सांठविलें आहे. शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध हे पांचही विषय ज्या चित्सत्तेनें जाणले जातात, ती चित्सत्ता म्हणजे आत्मा, तोच परब्रह्म व परमेश्वर आहे, असा त्याचा अर्थ आहे.

* * * *

**" दृग्दृश्यौ द्वौ पदार्थौ स्तः, परस्परविलक्षणौ ।**
**दृग् ब्रह्म दृश्यं मायेति, सर्ववेदान्तडिंडिमः ॥**
**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ॥**
**अनेन वेद्यं सच्छास्त्रमिति वेदान्तडिंडिमः ॥ "**

ह्या एकेका श्लोकांतही श्रीमच्छंकराचार्यांनीं सर्व वेदान्ताचें सार सांगून सोडलें आहे. यांचा अर्थ असा आहे कीं, 'दृक्' म्हणजे द्रष्टा (पाहणारा) व 'दृश्य' म्हणजे पाहण्याची वस्तु, असे दोनच पदार्थ या संसारांत आहेत. पैकीं 'दृक्' हें **ब्रह्म** व 'दृश्य' ही **माया** होय, असा वेदान्ताचा डांगोरा आहे. दुसरें, ब्रह्म हें सत्य म्हणजे त्रिकाळीं असणारें अर्थात् अविनाशी आणि दृश्य असें जें जगत् तें मिथ्या म्हणजे नाशवंत; तसेंच जीव हा ब्रह्मरूप आहे, अन्यरूप नाहीं, असा वेदान्त डांगोरा पिटतो.

* * * *

यांत आचार्यांनीं आपल्या वेदान्तांत —

**'जीवब्रह्मैक्य' सांगितलें आहे, 'जीवेश्वरैक्य' सांगितलें नाहीं,** ही खूण लक्षांत ठेविली पाहिजे. 'तत्त्वमसि' महावाक्यांतील **त्वं**-पदाचा वाच्यांश

**********************************************

जीव व लक्ष्यांश कूटस्थ (प्रत्यगात्मा) आहे; आणि तत्-पदाचा वाच्यांश ईश्वर असून लक्ष्यांश ब्रह्म आहे. लक्ष्यांश – लक्ष्यांशांचें ऐक्य आहे; वाच्यांश – वाच्यांशांचें नाहीं व वाच्यांश – लक्ष्यांशांचेंही नाहीं, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

ह्या ऐक्यावर नऊ प्रकारच्या शंका घेतल्या जातात. हें ऐक्य **नु**तिपर आहे, कीं **उप**चारपर, कीं **उपा**सनापर, कीं **सा**दृश्यपर, कीं **का**र्यकारणपर, कीं **गु**णगुणीपर, कीं **जा**तिव्यक्तिपर, कीं **अं**शांशीपर, कीं **वि**कारपर आहे, अशा शंका घेऊन त्यांचें यथोक्त खंडन करून समाधान असें सांगितलें आहे कीं, कर्ण ज्याप्रमाणें आपणास अज्ञानानें 'राधेय' समजत होता, तोच ज्ञानानंतर आपणास 'कौंतेय' मानूं लागला, त्याप्रमाणें हें जीवब्रह्माचें ऐक्य आहे, असें समजावें.

* * * *

वेदान्तविचारांत 'आत्मानात्मविवेक' हाच मुख्य आहे.

> **" दृश्यं सर्वमनात्मा स्याद्, दृगेवात्मा विवेकिनः ।**
> **आत्मानात्मविवेकोऽयं, कथितो ग्रंथकोटिभिः ॥ "**

सर्व दृश्य हें **अनात्मा** म्हणजे जड आहे, आणि त्याचा जो द्रष्टा तोच **आत्मा** (शुद्ध चैतन्यस्वरूप) आहे. कोट्यवधि ग्रंथांनीं आत्मानात्मविवेकाचें **स्व**रूप असेंच सांगितलें आहे.

—आचार्यकृत 'आत्मानात्मविवेक'

पण प्रथम दृश्याचें स्वरूप स्पष्ट समजलें पाहिजे. पुष्कळ लोक 'दृश्य' म्हणजे डोळ्यांला दिसतें तेवढेंच, असें समजतात; पण तसें नव्हे. डोळ्यांला दिसणारा म्हणजे डोळ्यांनीं ग्रहण केला जाणारा, जाणला जाणारा, 'रूप' विषय हें फक्त डोळ्याचें दृश्य होय; याचप्रमाणें 'शब्द' विषय हा कानाचें दृश्य, 'स्पर्श' विषय हा त्वचेचें दृश्य, 'रस' विषय हा जिव्हेचें दृश्य व 'गंध' विषय हा नाकाचें म्हणजे घ्राणेंद्रियाचें दृश्य होय. सर्व जगत् या पंचविषयांत येऊन जातें. उदाहरणार्थ, शब्द विषयांत फोनोग्राफ, पियानो, सतार, सारंगीपासून तों विजेच्या भयंकर कडकडाटापर्यंत सर्व 'ध्वनि' येऊन जातात. शरिरांत होणारा अनाहत ध्वनि (कान घट्ट दाबून धरल्यानंतर डोक्यांत ऐकूं येतो तो) हाही शब्दविषयांतच मोडतो. एकंदर षड्रसान्न हें रसविषयांत येऊन जातें. याप्रमाणेंच इतर तीनही विषय जाणावे. या पंचविषयांस जाणण्याकरितां देवानें पंचज्ञानेंद्रियें दिलीं आहेत. जगांत

सहावा विषय नाहीं, म्हणून सहावें इंद्रिय नाहीं असें समजावें. आतां सहावा विषय नाहींही, पण आहेही ; आणि तो साधकांना एकांतांत अभ्यासास बसल्या वेळीं फार बाधा करितो, तसे हे पंचविषय बाधा करीत नाहींत. वरील पंच विषय जिंकणें सोपें, पण हा सहावा विषय जिंकणें फार कठिण. हा सहावा विषय म्हणजे मनाच्या कल्पना अथवा वृत्ति होत आणि त्यांस जाणणारें सहावें इंद्रियही आहे. त्याचें नांव ' मन '. ' **मनःषष्ठानींद्रियाणि** ' असें गीतेंतही सांगितलें आहे. ज्ञानेंद्रियांला धरून मोजलें तर मन सहावें इंद्रिय होतें, आणि कर्मेंद्रियांसह धरून मोजतात तेव्हां मनाला ' अकरावें इंद्रिय ' म्हणतात. ह्या अकराही इंद्रियांना जिंकणें हीच खरी एकादशी होय. मोक्षाकरितां प्रत्येक मुमुक्षूनें ती केली पाहिजे. ह्या एकादशीसंबंधानें खालील पदें महत्त्वाचीं असल्यामुळें येथें देण्यांत येत आहेत.

**( पद ) – " एकादशेंद्रियां साक्ष मीचि । हीच एकादशी ॥ ध्रु० ॥**
**नाहीं विषयविषयी–भेद । सच्चिदेकरसीं ॥ हीच० ॥ १ ॥**
**भोक्ता भोग्य भोगहि मीचि । सदानंदराशी ॥ हीच० ॥ २ ॥**
**बाळावधूत द्वादशी माझी । दत्त चिदाकाशीं ॥ हीच० ॥ ३ ॥ "**
**( पद ) – " झाली एकादशी । रमतों सहज चिद्विलासीं ॥ ध्रु० ॥**
**भोग्यचि नाहीं भोक्ता कैंचा । नित्य उपवासी ॥ रमतों० ॥ १ ॥**
**माझा मीचि सर्वा ठायीं । सहज उदासी ॥ रमतों० ॥ २ ॥**
**बालमुकुंद धन्य सद्गुरु । दत्तहृदयवासी ॥ रमतों० ॥ ३ ॥**

— श्रीपंतमहाराजकृत दत्तप्रेमलहरी

तात्पर्य, विषय हे इंद्रियांचे दृश्य; आहेत व इंद्रियें द्रष्टा आहेत; तीं इंद्रियें दृश्य आहेत व मन द्रष्टा आहे ; हें मन अर्थात् मनाच्या वृत्ति अथवा बुद्धिवृत्ति दृश्य आहेत, त्यांचा द्रष्टा साक्षी आहे. तो मात्र कोणाचाच दृश्य नाहीं, तो केवळ दृग्रूप आहे. ( हाच आत्मा होय. ) हेंच खालील श्लोकांत सांगितलें आहे.

**रूपं दृश्यं लोचनं दृक्, तद्दृश्यं दृक् तु मानसम् ।**
**दृश्या धीवृत्तयः साक्षी, दृगेव तु न दृश्यते ॥**

— उपदेशसाहस्री

श्रीवामनपंडितांचाही ह्या अर्थाचा एक श्लोक आहे —

**रूपातें देखते चक्षू, चक्षूतें देखतें मन ।**
**मनातें देखता आत्मा, आत्मा ब्रह्मचि आपण ॥**

******************************************

ह्याही एका श्लोकांत सर्व वेदान्त येतो. देहेंद्रिय-प्राणमनबुद्धीपर्यंत सर्व दृश्य आहेत, त्यांचा साक्षी ( त्यांना पहाणारा, त्यांना प्रकाशिणारा ) आत्मा ( आपण ) आहे. 'धियो यो नः प्रचोदयात्' 'यो बुद्धेः परतस्तु सः' तो ह्राच; आणि ह्रा आत्मा सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म आहे, **हें सर्व वेदान्ताचें सार आहे.**

* * * *

**उफराट्या दृष्टीचें पहाणें। जें द्रष्ट्यामाजीं दृष्टि मुरवणें।**
**पहातया मुळासी जाणे। स्वस्वरूपासी ॥**

—परमामृत

या एका ओंवींतही सर्व वेदान्ताचें सार व साधन सांगितलें आहे. तें योग्य रीतीनें समजून घेऊन करीत राहिल्यास प्राप्ति दूर नाहीं.

पण हें बोलणें फार सोपें आहे. नुसत्या बोलानें ( शब्दज्ञानानें ) काम भागत नाहीं; त्याला **अपरोक्षज्ञान** व्हावें लागतें. आणि तें होण्याकरितांच नानाप्रकारचे साधनाभ्यास शास्त्रकारांनीं व संतांनीं सांगितले आहेत. या साधनमार्गांत – **भूचरी, खेचरी,** अगोचरी, **चराचरी, षण्मुखी, शांभवी** इत्यादि 'मुद्रा'; तसेंच **पिपीलिका, मर्कट, मीन, विहंगम** इत्यादि 'मार्ग' यांचा अंतर्भाव होतो. या सर्वांचें तात्पर्य **चित्ताचें चैतन्य होणें** हेंच असतें. हें कार्य ध्यानोपासना – सांख्यविचारयोग यानेंही साधतें. तीव्र सगुणभक्तीनें लवकर साधतें, असा सर्व संतांचा अनुभव आहे.

**यथा ज्ञानंविना मुक्तिर्नास्त्युपायशतैरपि।**
**तथा भक्तिंविना ज्ञानं नास्त्युपायसहस्रतः॥**

ज्याप्रमाणें ज्ञानावांचून शेंकडों उपाय केले तरी मुक्ति मिळत नाहीं, त्याप्रमाणें भक्तीवांचून हजारों उपाय केले तरी ज्ञान लाभत नाहीं. ह्या भक्तींतही नानाविध भेद आहेत. त्यांत नवविधा प्रसिद्ध असून, त्या नवविधांमध्यें नामस्मरणरूप तृतीय भक्ति फार सुलभ आहे. ह्या नामस्मरणानें ज्ञानाच्या सप्त भूमिकांतील पंचमभूमीपर्यंत साधक पोंचतो, असें श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामींचें मत पहिल्या भागांत ( पृ. २८ मध्यें ) दिलेलें वाचकांच्या लक्षांत असेलच. त्या ठिकाणीं फक्त भूमिकांचा नामनिर्देश मात्र केलेला आहे. येथें रूपनिर्देश थोडा तरी केल्याशिवाय ह्रा 'थोडासा वेदान्त' पुरा करणें योग्य वाटत नाहीं. कारण ह्या भूमिकांची स्पष्ट-

अथवा साधारण तरी कल्पना मनांत उभी राहिल्यावांचून खऱ्या जिज्ञासूंचें समाधान होणार नाहीं. कारण ही कल्पना नसेल, तर जन्मभर साधन करीत राहून आपण कुठल्या भूमिकेवर म्हणजे पायरीवर आहों, पुढें किती पायऱ्या आपणास चढावयाच्या आहेत याचें अनुमान त्यास होणार नाहीं; व हें अनुमान न झालें, तर तो आपली गति वाढविण्याची इच्छा करणार नाहीं आणि तशी गति न वाढवितां आळसानें, मंदगतीनें चालूं लागेल, तर आयुष्यरवि मावळण्याच्या पूर्वी तो मुक्कामाला कदाचित पोंचणार नाहीं. अल्पतृप्त जिज्ञासूला अथवा साधकांना याची गरज भासणार नाहीं. कदाचित् ते घाबरूनही जातील; पण तीव्र मुमुक्षूंना व साधकांना त्या भूमिकांचें स्वरूप कळणें हें अगत्याचें भासतें, नव्हे, त्यांना यायोगें आनंदोत्साह वांटल्यावांचून रहाणार नाहीं, म्हणून थोडक्यांत त्यांचें स्वरूप येथें सांगतों.

## ज्ञानाच्या सप्त भूमिका

**“ ज्ञानभूमिः ‘ शुभेच्छा ’ ख्या प्रथमा समुदाहृता ।**
**‘ विचारणा ’ द्वितीया च, तृतीया ‘ तनुमानसा ’ ॥**
**‘ सत्त्वा-पत्ति ’ श्चतुर्थी स्यात्, ततो –‘ऽसंसक्ति’नामिका ।**
**‘ पदार्थाभाविनी ’ षष्ठी, सप्तमी ‘ तूर्यगा ’ स्मृता ॥ ”**

— योगवाशिष्ठ

याप्रमाणें ह्या सात भूमिकांचीं नांवें आहेत. यांचें स्वरूप थोडक्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें आहे —

( १ ) अनेक जन्मांच्या अंतीं मनुष्याला पुण्यपरिपाकवशात् **नित्य** व **अनित्य** वस्तूंचा विचार होऊन ‘ मोक्षेच्छा ’ उत्पन्न होते. हिलाच ‘ **शु**भेच्छा ’ म्हणतात, ही पहिली भूमि.

( २ ) त्यानंतर तो गुरूला शरण जाऊन श्रवणमननादिरूप वेदान्तविचार करूं लागतो. ही ‘ **वि**चारणा ’ नामक दुसरी भूमि.

( ३ ) त्यानंतर निदिध्यासानें मनाला एकाग्रतेच्या योगें तो सूक्ष्मवस्तुग्रहणयोग्यता आणतो. ही ‘ **त**नुमानसा ’ तिसरी भूमि.

( ४ ) त्यानंतर वेदान्तमहावाक्यविचारानें **अपरोक्ष ब्रह्म साक्षात्कार** होतो, ही ‘ **सत्त्वा**पत्ति ’ नामक चतुर्थ भूमि.

( ५ ) त्यानंतर सविकल्पसमाधीच्या अभ्यासानें निरुद्ध झालेल्या मनाला **निर्विकल्प समाध्यवस्था** प्राप्त होणें, ही पांचवी भूमि.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

( ६ ) तिच्या अभ्यासातिरेकानें होणारी चिरकालावस्थायिता ही सहावी भूमि. नंतर —

( ७ ) सहावीच्याही परिपाकानें सर्वकाळ स्वप्रकाश चिदानंदैकरस ब्रह्मस्वरूपांत मग्न राहून, समुद्राच्या मध्यभागीं बुडविलेला घट ज्याप्रमाणें आंत बाहेर पाण्यानें व्यापलेला असतो, त्याप्रमाणें अंतर्बाह्य स्वरूपानें हा पूर्ण होतो. ही सातवी भूमि होय.

यांतील पहिल्या तीन भूमिका ( **शुभेच्छा, विचारणा व तनुमानसा** ) ह्या ' साधन ' रूप असून यांना **जाग्रद्** अवस्थेची उपमा देतात. कारण जागृतीप्रमाणें या भूमिकांमध्यें सर्व द्वैत-प्रपंच सत्यत्वानें भासतो.

चतुर्थभूमिका ( **सत्त्वापत्ति** ) ही ' फल ' रूप असून हिला **स्वप्नावस्थेची** उपमा देतात. कारण द्वैतप्रपंचाचा बोध झाला असला तरी या अवस्थेंत त्याचा थोडा भास होतो. ह्या भूमींत ब्रह्मसाक्षात्कार होतो, म्हणून या भूमिकेंतील योगी ' **ब्रह्मविद्** ' म्हटला जातो.

**पांचवी, सहावी व सातवी** ( **असंससक्ति, पदार्थाभाविनी व तूर्यगा** ) ह्या भूमिका जीवन्मुक्तीचे अवांतर भेद आहेत. यांना निर्विकल्पसमाधि-अभ्यासजन्य विश्रांतितारतम्यानुसार खालील नांवें आहेत. पैकीं पांचव्या भूमिकेस **सुषुप्ति** म्हणतात. कारण द्वैताभासाचा यांत अभाव असतो. या भूमिकेस प्राप्त झालेल्या योग्याला ' स्वतोत्थान ' असतें. ह्या योग्यास ' **ब्रह्मविद्वर** ' असें म्हणतात.

**सहावी** भूमिका **गाढ सुषुप्ति** म्हटली जाते. या भूमिकेस पोंचलेल्या योग्याचें परप्रयत्नानें उत्थान होतें. याला ' **ब्रह्मविद्वरीयान्** ' असें म्हणतात.

**सातव्या** भूमिकेस **तूर्यावस्था** म्हणतात. या भूमिकेस प्राप्त झालेल्या योग्याला स्वयं किंवा परतोत्थानही नाहीं. कारण जगत्प्रतिभास-शून्यत्वामुळें तो सर्वकाळ तन्मय होऊन राहतो. याचा देहनिर्वाह स्वप्रयत्नावांचून परमेश्वरनिर्मित प्राणवायूनेंच होतो. शिकविलेले बैल वगैरे सारथ्याच्या प्रयत्नावांचून, पुढें असणाऱ्या गांवास रथ, गाडी वगैरे पूर्वाभ्यासानें ओढून नेतात, त्याप्रमाणें असंप्रज्ञात समाधिप्रतिपादक योगशास्त्राचें पर्यवसान येथेंच होतें. या अवस्थेला अनुसरूनच भागवतांतील एकादशस्कंधांतील १३ व्या अध्यायांतील ३६ वा श्लोक आहे. या अवस्थेस पोंचलेल्या योग्यास ' **ब्रह्मविद्वरिष्ठ** ' अशी संज्ञा आहे.

"तां प्राप्तस्य योगिनः स्वतः परतो वा व्युत्थानमेव नास्ति, जगत्प्रतिभासशून्यतया सर्वदा तन्मयत्वेनैवावस्थानात् । तस्य च देहनिर्वाहो विनैव स्वप्रयत्नं परमेश्वरप्रेरितप्राणवायुनैव निष्पद्यते । यथा हि शिक्षितो बलीवर्दादिः सारथिप्रयत्नं विना स्वयमेव रथशकटादिकं पुरोवर्तिनं ग्रामं नयति तद्वत् । अत्रैवासंप्रज्ञातसमाधिप्रतिपादिकानि योगशास्त्राणि पर्यवस्यन्ति । एनामेव चावस्थामधिकृत्य भागवते ( ११ । १३ । ३६ ) प्रतिपादितम् – 'देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा, सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम् । दैवादुपेतमथ दैववशादपेतं, वासो यथा परिहितं मदिरामदांधः ॥' इति । तामेनामवस्थां प्राप्तो ब्रह्मविद्वरिष्ठ इति ।"

—भगवद्गीता, ब्रह्मानंदगिरिटीका, अ. २, श्लो. ५५

वरील भागवताच्या श्लोकावर श्रीएकनाथमहाराजांची ६५ ओंव्यांची टीका आहे. त्यांतील थोड्याशा ओंव्या त्या स्थितीची कल्पना येण्यासाठीं म्हणून जिज्ञासु वाचकांकरितां खालीं देतों :—

"दृढ ठसावल्या चैतन्यघन । स्वरूपीं वृत्ति होय निमग्न ।
तेव्हां दिसतेंही भर्जित भान । तेंही स्फुरण निमालें ॥...
एवं पावूनि माझ्या स्वरूपासी । स्वानंदपूर्ण साधकासी ।
सुखें सुखरूपता झाली त्यासी । निजदेहासी विसरोनी ॥
मग उठलें कीं बैसलें । चालतें कीं राहिलें ।
जागतें कीं निजलें । हें स्मरण ठेलें देहाचें ॥...
हें मंत्रीं कीं तंत्रीं । तीर्थीं कीं क्षेत्रीं ।
विष्ठीं कीं मूत्रीं । आहे पवित्रीं स्मरेना तो ॥
हें गजीं कीं तुरगीं । कीं अंगनासंभोगीं ।
खरीं कीं उरगीं । अंगींच्या अंगीं स्मरेना तो ॥
हें काशीं कीं कैकटीं[1] । नरकीं कीं वैकुंठीं ।
घरीं कीं कपाटीं[2] । राहिलें नेहटीं[3] स्मरेना तो ॥
हें पूजिलें कीं गांजिलें । धरिलें कीं मारिलें ।
देहाचें एकही केलें । अथवा काय झालें स्मरेना तो ॥" इत्यादि.

१ एक अपवित्र देश. २ गुहेंत. ३ निश्चयानें.

ह्या स्थितीवर शंका घेऊन तिचें समाधानही भगवान कसें गंभीरपणानें सांगतात तें पहा —

“ऐकोनी सज्ञानाची स्थिति । तुम्हांसी गमेल ऐसें चित्तीं ।
केवळ जड मूढ झाली प्राप्ति । एकही स्फूर्ति स्फुरेना ॥
जेवीं का केवळ पाषाण । तैसें झालें अंतःकरण ।
एकही स्फुरेना स्फुरण । ज्ञातेपण घडे कैसें ॥
ऐसी धरिल्या आशंका । ते विषयीं सावध ऐका ।
ज्ञान-अज्ञान भूमिका । अतर्क्य लोकां निश्चित ॥
केवळ जें शुद्ध ज्ञान । आणि जड मूढ अज्ञान ।
दोहींची दशा समान । तेथीलही खूण मी जाणें ॥
शोधावया अध्यात्मग्रंथ भले । अंधमूकां हातीं दिधले ।
तें ऐके देखे ना बोले । तैसें जडत्वें झालें अज्ञान ॥
जेवीं का खरें कुडें नाणें । पाहतां दिसे सारिखेंपणें ।
खरें पारखोनि घेती देखणे । मूर्खा नाडणें ते ठायीं ॥
तेवीं ज्ञानाज्ञानाची गेठ । भेसळली दिसे एकवट ।
तेथ अणुभरी चुकल्या वाट । पाखंड उद्भट अंगीं वाजे ॥
यालागीं मद्भक्तीपाशीं आले । जे माझ्या विश्वासा टेकले ।
त्यांसी म्यां निजरूप आपुलें । खरें दिधलें अतिशुद्ध ॥
माझ्या नामविश्वासासाटीं । प्रल्हाद द्वंद्वें पायें पिटी ।
न घेतां मुक्ति लागे पाठीं । विश्वासें भेटी माझ्या रूपीं ॥
ऐसे पावोनि माझ्या निजस्वरूपासी । विसरले देहअभिमानासी ।
झाले चैतन्यघन सर्वांशीं । आनंदसमरसीं । निमग्न ॥...
छाया विष्ठेवरी पडे । कां पालखीमाजीं चढे ।
पुरुषासी सुखदुःख न जोडे । ज्ञात्यासी तेणें पाडें देहभोग ॥
येथवरी निजदेहासी । कैसेनि विसर पडला त्यासी ।
ऐक त्याही अभिप्रायासी । दृष्टांतेंसीं सांगेन ॥
जो मोलें मदिरा पिवोनि ठाये । तो तेणें मदें नाचे गाये ।
देहवंत देह विसरोनि जाये । वस्त्र नाहीं आहे स्मरेना ॥

**हा तंव ब्रह्मरस प्याला। परमानंदें तृप्त झाला।**
**देहो झाला कीं मेला। आठवू ठेला तेणें मदें॥"**

—एकनाथी भागवत, अ. १३

याप्रमाणें सप्तम म्हणजे 'तूर्यगा' नामक भूमिकेवरील ज्ञात्याची स्थिति **असते.** याच्या देहाचें भरणपोषण अदृश्यशक्तीनें म्हणजे प्रारब्धानें होतें. (अज्ञान्याचेंही त्याच शक्तीनें होतें; पण तो देहाभिमान धरतो, सज्ञान धरीत नाहीं, एवढाच त्यांत भेद आहे.) असो. चतुर्थ भूमिकेला **स्वप्नावस्था,** पंचम भूमिकेला **सुषुप्ति,** सहावीला **गाढसुषुप्ति** आणि सातवीला **तूर्यावस्था** म्हणतात, त्यांचे हेतु वर दिलेच आहेत. याप्रमाणें हे **जीवन्मुक्तीचे** भेद आहेत. यापुढील 'तूर्यातीत' नामक अवस्था सांगितली आहे. तीस '**विदेहमुक्ति**' असें म्हणतात.

**"एषा हि जीवन्मुक्तेषु, तूर्यावस्थेह विद्यते।**
**विदेहमुक्तिविषयस्तूर्यातीतमतः परम्॥"**

—योगवाशिष्ठ

विदेहमुक्तीस पोंचलेल्या पुरुषास ईश्वराप्रमाणें जगताची उत्पत्तिस्थितिलय करण्याचें 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' सामर्थ्य प्राप्त होतें असें कोणी म्हणतात, कोणी 'जगद्व्यापारवर्ज्य—' ता प्रतिपादितात. त्या गोष्टीचा विचार पण खालच्या पायरीवरील लोकांस करून तरी काय फायदा? तें कसेही असो. पण 'स्वतोत्थान-परतोत्थानरहित' समाविधान पुरुषाची स्थिति ऐकून एखादा देशभक्त साधक म्हणेल, कीं 'अशी अवस्था काय कामाची? असली समाधि आपणास नको.' इत्यादि. त्याला एवढेंच उत्तर कीं, असे समाधिवंत पुरुष लाखांत नव्हे, तर कोटींतही एखादा मिळणें कठिण; कारण ही अवस्था कांहीं वाटेवर पडली नाहीं. सहजसाध्य नाहीं. अशा एखाद्या व्यक्तीवांचून देशकार्य अडणार नाहीं. मात्र अशा व्यक्तीच्या पुण्यस्मरणानें देशकार्यकर्त्या पुरुषास अदृश्यशक्तीचा जो पुरवठा होईल, तो त्याच्या दृश्य लौकिक प्रयत्नांपेक्षां सहस्रपटीनें शक्तिसंचारक व कार्यकारी होऊं शकेल असा विश्वास असूं द्यावा. उगीच तशा पुरुषाच्या किंवा त्या स्थितीच्या तिरस्कारानें आपली जिव्हा विटाळून घेऊन पापांत पडूं नये. *(खाऊन पिऊन चैन करीत राहणारे हजारों तरुण

* आंग्लविद्याविभूषितांना याबद्दलची कांहीं विशेष माहिती पाहिजे असेल तर त्यांनीं श्रीरामकृष्णमिशनतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'प्रबुद्धभारत' (Awakened India) नामक इंग्रजी मासिकाच्या पहिल्या वर्षाच्या १२ व्या अंकामधील "Sages & their usefulness" (साधुसंत व त्यांचा उपयोगीपणा) हा लेख वाचून पहावा.

***********************************************

व शक्तिमान पुरुष देशकार्य न करणारे असे जिवंत आहेत. त्यांचाच विचार करून, त्यांचें मन वळवून त्यांना आपल्या क्षेत्रांत ओढण्याचा हवा तर प्रयत्न करावा. ) चतुर्थ भूमिकेवरील ( क्वचित् पंचम भूमिकेवरील ) पुरुष मात्र लोकोद्धाराकरितां अभ्युदय व निःश्रेयस संपादण्याचीं कार्यें करूं शकेल. किंवा त्यावरील भूमिकांस पोंचलेले पुरुषही, 'ईश्वरी नियंत्रणानुसार ' खालच्या भूमिकेला येऊनच लोकोद्धाराचीं कार्यें करूं शकतात. पण असे पुरुष हे बहुतेक 'आधिकारिक' कोटींतील जीवन्मुक्त असतात. साधे जीवन्मुक्त निराळे व आधिकारिक कोटींतील जीवनमुक्त निराळे. हे जगाच्या सुस्थितीकरितां ईश्वराज्ञेनुसार भूतलावर वारंवार जन्म म्हणजे अवतार घेत असतात. (हें मागें एके ठिकाणीं टीपेंत सांगितलेलें वाचकांच्या लक्षांत असेलच.) ईश्वरनियंत्रणाची कक्षा कोठपर्यंत, तिच्या बाहेर कोण पोंचलेले असतात. वगैरे विषय स्वतंत्र आहे. त्याचा विचार करणेचें हें स्थळ नव्हे.

**चतुर्थ भूमिकेंत ब्रह्मसाक्षात्कार होऊन कृतार्थता प्राप्त होते,** करितां साधकांनीं येथपर्यंत पोंचण्याचा अट्टाहासानें प्रयत्न केला पाहिजे, इतकेंच मुख्यतः येथें सांगणें आहे; आणि ह्या चतुर्थ भूमिकेस पोंचण्याकरितां श्रवण-मनन निदिध्यास-रूप **विचारणा** व **तनुमानसा** नामक द्वितीय व तृतीय भूमिकेचा कळकळीनें अभ्यास करणें अवश्य आहे. मनाची ' तनुता ' म्हणजे कृशता, अर्थात् संतमुखोद्भूत सच्छास्त्रविचारणेच्या योगें अनात्मभावनेची क्षीणता करणें, हीच ' तनुमानसा ' होय. ही चांगली साध्य केली, म्हणजे पुढील ' सत्वापत्ति ' भूमिका अल्पायासानें साध्य होते." ह्या भूमींत गेलेल्या साधकाचें चित्त, दुधांत जसें पाणी मिळून जातें त्याप्रमाणें आत्म्यामध्यें त्रिपुटीरहित होऊन मिळून जातें. ही स्थिति निर्विकल्पसमाधिरूप आहे; व या भूमिकेस प्राप्त झालेल्या योग्यास ' ब्रह्मवित् ' म्हणतात (हें मागें सांगितलेंच आहे). या चार दशांचा अभ्यास केल्यामुळें व चित्ताचा बाह्य आणि आभ्यंतर आकारांशीं संसर्ग न होणें एतल्लक्षण समाधीचा

---

रसिक व मार्मिक विद्वानांना तो पृथ्वीच्या मोलाचा वाटेल. याचप्रमाणें वऱ्हाडांतील प्रसिद्ध विद्वान कै. दत्तात्रेय कृष्ण दामले यांचें ' गृहस्थाश्रम ' नांवाचें, कौटुंबिक व राष्ट्रीय प्रपंचव्यवहार अत्यंत यशस्वी रीतीनें करण्यास शिकविणारें अमोलिक पुस्तक वाचून पाहावें. म्हणजे वरीलसारख्या सिद्ध पुरुषांच्या हातांत ' मूळ प्रेरणाशक्ति ' च येत असल्यामुळें तिच्या द्वारें ते गुप्तपणें देशकार्य कसें करीत असतात, त्यांचे नुसते आशीर्वादच अर्वाचीन पुढाऱ्यांना घेतां आले तर किती काम होईल, वगैरे समजून येऊन तशा सिद्ध साधुसंतांविषयीं त्यांचा आदर वाढल्यावांचून रहाणार नाहीं.

परिपाक झाल्यामुळें **चित्तांत ब्रह्मात्मभाव अतिदृढ होतो, म्हणजे निरतिशय आनंद व ' नित्य अपरोक्ष ब्रह्मच मी आहें ' असा साक्षात्कार दृढ होतो.** या पांचव्या भूमिकेस प्राप्त झालेल्या योग्यास ' ब्रह्मविद्वर ' असें म्हणतात. या भूमींत अविद्या व तिचें कार्य यांची संसक्ति मुळींच नसते. म्हणून हिला ' **असंसक्ति** ' म्हणतात. " इत्यादि.

— बृहद्योगवाशिष्टसार, भा. १ ला.

चौथ्या भूमिकेंत ' कोमल अपरोक्ष ' व पांचव्या भूमिकेंत ' दृढ अपरोक्ष ' होतें. तेव्हां या भूमिका त्वरित साध्य होण्यास वर म्हटल्याप्रमाणें मनाचें तन्वीकरण म्हणजे ' **तनुमानसा,** ' व ही साध्य होण्यास सम्यक् ' **विचारणा** ' झाली पाहिजे. ह्या भूमिकेवर उत्तम रीतीनें आरूढ होण्याकरितां खालील विचार फारच साहाय्यकारी होतील. करितां वाचकांनीं ते श्रीहरिगुरुस्मरणपूर्वक शांतपणें वाचून त्यांचें मनन करावें, म्हणजे परमात्मकृपेनें सर्व ' प्रतिबंध ' दूर होऊन ज्ञानाचा उदय होण्यास फार मदत होईल.

*　　*　　*

## ज्ञानोदयास प्रतिबंध–
## आवरण व विक्षेप

ब्रह्म अथवा आत्मा नित्य अपरोक्षच आहे. परंतु त्याचा प्रत्यय आला पाहिजे.

**" तैसा तूं सहज असती । परी आलें पाहिजे प्रत्ययासी "**

— परमामृत

हा प्रत्यय न येण्यास कारण जीवाला अविद्येनें झालेला भ्रम. अविद्येच्या **आवरण** व **विक्षेप** अशा दोन शक्ति आहेत. **आवरण** म्हणजे ज्ञानास झांकणें, तें लुप्तप्राय करणें; आणि **विक्षेप** म्हणजे विपरीत भासविणें. आत्मा चित्स्वरूप-शुद्धचैतन्यरूप–आहे असें न जाणणें हें ' आवरण ' होय. एवढें आवरणच असतें तर फारसें बिघडलें नसतें, पण तो **चित्**च्या ( चैतन्याच्या ) उलट म्हणजे जड आहे असें भासविणें हा ' विक्षेप ' व हाच मोठा घातकर आहे. ' मी कोण ' हें न जाणल्यानें तेवढें नुकसान नाहीं; पण मी देह नसतांना ' मी देह ' असें समजण्यानें मोठें नुकसान आहे. ह्या विपरीत ज्ञानामुळेंच लक्षचौऱ्यांशींचे फेरे जीवाला भोगावे लागतात. पण आवरणच विक्षेपाला कारण असतें हें मात्र विसरतां

************************************************************

कामा नये. करितां प्रथम आवरणाचाच नाश झाला पाहिजे, मग विक्षेपाचा. (ब्रह्मावर जग दिसणें हा विक्षेप.)

*  *  *

## व्यतिरेक आणि अन्वय

'आवरणभंग' **व्यतिरेकज्ञानानें** होतो आणि 'विक्षेपभंग.' **अन्वयज्ञानानें** होतो. मातींत घट नाहीं, तंतूंत पट नाहीं, सुवर्णांत अलंकार नाहीं असें जें पहाणें यास 'व्यतिरेक' म्हणतात व घटांत माती आहे, पटांत तंतु आहे, अलंकारांत सुवर्ण आहे असें जें पहाणें त्यास 'अन्वय' म्हणतात. याप्रमाणें, ब्रह्मांत जग नाहीं असें जें पहाणें त्यास 'व्यतिरेक' व जगांत ब्रह्म आहे असें जें पहाणें त्यास 'अन्वय' म्हणतात. 'मातींत घटाचा **व्यतिरेक** व घटांत मातीचा **अन्वय**' अशीही भाषा बोलतात. याप्रमाणें ब्रह्मांत जगाचा व्यतिरेक व जगांत ब्रह्माचा अन्वय, असें म्हणतात. अगदीं सोप्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ब्रह्मांत जग नाहीं, पण जगांत ब्रह्म आहे. (असें जें जाणणें याचें नांव **ज्ञान**, व याहून इतर जें–चौदा विद्या चौसष्ट कलादि सर्व–हें **अज्ञान**.) आवरणभंग हा व्यतिरेकानें म्हणजे 'प्रत्यग्वृत्ती' च्या अभ्यासानें होतो.

> **"मी कोण हें न कळे मज। या आवरणाचा भंग होतसे कळतां निज। जडसाक्षी चित्स्वरूप हा उमज। होतां, आवरण नासतें॥ ऐसें नासलें आवरण। चित्तीं झालें चित्स्फुरण। प्रत्यग्वृत्तीं पुनः पुनः योजणें अंतःकरण। यास म्हणावा 'अभ्यास'॥**
>
> —यथार्थदीपिका, अ. १२

## 'पराक्' व 'प्रत्यक्'

**पराङ्मुख** म्हणजे बहिर्मुख व प्रत्यङ्मुख म्हणजे अंतर्मुख अर्थात् 'आत्माभिमुख.' (प्रत्यक् म्हणजे आत्मा व **पराक्** म्हणजे अनात्मा.) इंद्रियांची वृत्ति स्वभावतःच बहिर्मुख असते. ('पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूः') बाह्य विषयांत सुख (नव्हे, सुखाभास) आहे असा बुद्धीचा निश्चय असेपर्यंत म्हणजे विषयांत सत्यमति असेपर्यंत विषय हे अंतःकरणवृत्तीला इंद्रियांच्या द्वारानें खेंचून बाहेर ओढीत असतात. त्या विषयांच्या ठिकाणीं विचारदृष्टीनें दोषदर्शन होऊं लागलें, विषय हे जड आहेत, अनात्मरूप आहेत, असुखरूप अर्थात् दुःखात्मक किंवा दुःखपरिणामी आहेत, आणि आत्माच

सर्व सुखाचा उगम आहे — सुखाचा सागर आहे -- सुखस्वरूप आहे, असा श्रवण-मननानें बुद्धीचा निश्चय झाला, म्हणजे वृत्ति बहिर्मुखता सोडून अंतर्मुख होऊं लागते. वृत्तीला बहिर्मुख होण्याचा अभ्यास अनंत काळाचा ( अनंत जन्मांचा ) असल्यामुळें ती एकाएकीं अंतर्मुख होत नाहीं; 'पराङ्मुख' च होत असते. तिला प्रथम बलात्कारानें पण हळू हळू ( शनैः शनैः ) 'प्रत्यङ्मुख' करण्याचा प्रयत्न म्हणजे अभ्यासच केला पाहिजे. ह्या प्रत्यङ्मुखतेच्या वृत्तीला 'प्रत्यग्वृत्ति' असें म्हणतात.

## प्रत्यग्वृत्तीचा अभ्यास

म्हणजे देह मी नव्हे, इंद्रियें मी नव्हे, प्राण मी नव्हे, तसेंच मन-बुद्धि-चित्त-अहंकारही मी नव्हे. कारण हीं सर्व दृश्य असून मी यांचा द्रष्टा ( पहाणारा ) साक्षी आहें, आणि हा साक्षी शुद्ध चैतन्यस्वरूप आहे असें जाणून त्याचेंच चिंतन करणें अर्थात् त्या चैतन्यस्वरूपाकडे वृत्ति वळवीत राहणें.

ह्या चैतन्याकडे वृत्ति आकर्षण करण्याकरितांच शास्त्रकारांनीं स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण देह, अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय कोश; जागृति, स्वप्न, सुषुप्ति अवस्था इत्यादि अनात्मवस्तूंचें स्वरूप सांगून ह्या सर्वांच्या पलीकडे राहणारा, ह्या सर्वांना आपल्या प्रकाशानें प्रकाशित करणारा तो आत्मा, अशा नाना तऱ्हेच्या प्रक्रिया सांगितल्या आहेत. कोणत्या तरी प्रक्रियेनें अथवा बोधाच्या तऱ्हेनें या जीवाची वृत्ति आपल्या स्वप्रकाश म्हणजे चिद्रूप, सद्रूप व आनंदरूप अशा मूळ स्वरूपाकडे वळो अशी श्रुति-माउलीची व संत-माय-बापांची कळकळ! ह्या प्रत्यग्वृत्तीच्या चिराभ्यासानें सच्चिदानंदस्वरूपाचा जो अनुभव येतो, त्यास 'त्वंपदसाक्षात्कार' म्हणतात. पण एवढ्यानेंच काम भागत नाहीं; ज्ञानाची पूर्णता होत नाहीं. कारण, जडनिषेधानें आत्मा कळल्यावरही जडद्वैत शिल्लक राहतेंच. असें द्वैत राहिल्यानंतर त्यास 'अद्वैत-ज्ञान' झालें असें कसें म्हणतां येईल? ज्या ज्ञानानें सर्व जड जग चिन्मय भासूं लागेल तेंच खरें अथवा पूर्ण ज्ञान होय. त्यालाच 'तत्पदसाक्षात्कार' म्हणतात.

**"यालागीं आत्मा कळलियावरी। जडद्वैत उरलें असेचि जरी।**
**त्यास ज्ञान झालें ऐसी वैखरी। संतांची न बोले ॥**
**जरी जडनिषेधें स्वरूप-स्फुरण। तेंचि म्हणावें सर्वात्मबोधाचें कारण।**
**तरी जों न कळे 'जडचैतन्यैक्य' खूण। ज्ञान न म्हणवे त्या ज्ञानातें ॥**

**ज्या ज्ञानें आत्म्यामध्यें सर्व भूतांचें निरीक्षण ।**
**तें 'ज्ञान' म्हणे कमलेक्षण ।**
**'येन भूतान्यशेषेण, द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि' म्हणोनि ॥"**

—यथार्थदीपिका, अ. १२

नुसत्या व्यतिरेकानें म्हणजे त्वंपदसाक्षात्कारानें जीवन्मुक्ति लाभत नाहीं, ती अन्वयानें म्हणजे तत्पदसाक्षात्कारानेंच लाभते, हें रहस्य साधकांनीं लक्षांत ठेवावें. त्वंपद म्हणजे 'आत्मा' व तत्पद म्हणजे 'परमात्मा'. आत्मा म्हणजे घटाकाश व परमात्मा म्हणजे मठाकाश अथवा महाकाश, हाही दृष्टांत लक्षांत ठेवल्यास पुरे. आत्म्यालाच 'कूटस्थ' किंवा 'प्रत्यगात्मा' म्हणतात, आणि परमात्म्याला 'ब्रह्म' किंवा 'परब्रह्म' म्हणतात, ही परिभाषाही लक्षांत असावी. अनंत-कोटि ब्रह्मांडांना अंतर्बाह्य व्यापून असणारें जें चैतन्य त्याचें नांव 'परब्रह्म-परमात्मा,' आणि व्यष्टिगत अंतःकरणोपहित जें चैतन्य त्याचें नांव 'कूटस्थ-आत्मा'. चिदाभास जो जीव त्याचें मूळस्वरूप-शुद्धस्वरूप आत्मा, आणि हा आत्माच परब्रह्म परमात्मा, अशी अद्वैत वेदांताची विचारसरणी आहे. अगोदर 'अहं ब्रह्मास्मि' व नंतर 'सर्वं खल्विदं ब्रह्म.'

**"आत्मानात्मप्रतीतिः प्रथममभिहिता सत्यमिथ्यात्वयोगात्,**
**द्वेधा ब्रह्मप्रतीतिर्निगमनिगदिता स्वानुभूत्योपपत्त्या ।**
**आद्या देहानुबंधाद्भवति तदपरा सा च सर्वात्मकत्वात्,**
**आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात् ॥"**

—शतश्लोकी

जिज्ञासूंच्या सुखबोधार्थ प्रथम आत्मा-अनात्मा अथवा सत्य व असत्य किंवा चैतन्य व जड यांचा परस्पर-भिन्नत्वानें विचार सांगितला जातो. तो बुद्धीला ग्रहण होत चालला, बुद्धि प्रौढ होत चालली, तिला अत्यंत सूक्ष्म विचाराचें सामर्थ्य आलें, म्हणजे जड जगत् (अंतर्बहिरिंद्रियगोचर विश्व) हें मिथ्या आहे, अधिष्ठान आत्माच सत्य आहे, अर्थात् जड हें जड नसून 'चैतन्याचें तें अन्यथाभान' आहे, म्हणजे चैतन्यच तें आहे, अशी शिकवण तिला दिली जाते, नव्हे, तसा तिला अनुभव येतो. प्रथम 'मी ब्रह्म' असा अनुभव, नंतर 'सर्वब्रह्म' असा प्रत्यय. 'मी देह' असें अज्ञानावस्थेंत स्फुरत होतें, तो भ्रम ज्ञानोत्तरकालीं अथवा ज्ञानसमकालीं नष्ट होऊन 'मी ब्रह्म'-सच्चिदानंदस्वरूप असें स्फुरण

होऊं लागतें, ही प्रतीति मग सर्व जगतांत येऊं लागते. ( वरील श्लोकांत आचार्यांनीं ' अनुभव उदिते ' हे शब्द घातले आहेत, ते फारच महत्त्वाचे आहेत हें लक्षांत घेतलें पाहिजे. कारण तसा पहिला अनुभव उदेल्याशिवाय पुढील दुसरा अनुभव येणें शक्य नाहीं. म्हणून प्रथम व्यतिरेकानें ' अहं ब्रह्मास्मि ' चा अनुभव, नंतर अन्वयानें ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' चा अनुभव. ) आणि अशी अखंड प्रतीति येऊं लागली म्हणजेच जीवन्मुक्त होतो; तोंपर्यंत नाहीं.

**" व्यतिरेकयोगीं चित्त । मुरे आत्मस्वरूपीं अत्यंत ।**
**अन्वययोगीं सर्वत्र निश्चित । आत्मा देखे तरंगीं जैसा समुद्र ॥**
**व्यतिरेकयोगीं जड कांहीं । आत्मस्वरूपीं दिसत नाहीं ।**
**अन्वययोगीं चराचरही । आत्माच वाटे ॥**
**व्यतिरेक योग ऐसा । त्याच योगें जीवन्मुक्त कैसा ।**
**जडतरंगांत चिद्रसा । न देखे जोंवरी ॥**
**यालागीं अन्वययोगावीण । व्यतिरेकयोगेंचि न घडे जीवन्मुक्तपण ।**
**म्हणोनि व्यतिरेकयोगनिपुण । जीवन्मुक्त अन्वययोगेंचि बोलिला ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. ६

तात्पर्य, सर्व जड हें जड नसून चिन्मात्र आहे, विश्व हें विश्व नसून ब्रह्म आहे, असा सर्व संतांचा अनुभव आहे. ' **विश्व ब्रह्मचि ठेलें** ' हें ' **प्रगट गुज** ' श्रीज्ञानेश्वरमहाराज बोलले आहेत, किंवा हें ' प्रगट गुज ' म्हणजे ' ओपन सीक्रेट ' त्यांनीं जगाला सांगितलें आहे.

**" हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तम । ऐसा जयाचा मनोधर्म "...**
**" तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पैं आघवें ॥ "...**
**" म्हणौनि विश्वपण जावें । मग तैं मातें घेयावें ।**
**तैसा नव्हे, आघवें । सगटचि मी ॥ "** — ज्ञानेश्वरी

**" चैतन्याचें अन्यथा भान । तें हें जाण चराचर ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. ११

हें नाथांचें वचन तर किती स्पष्ट, गोड व पृथ्वीमोलाचें आहे म्हणून सांगावें ? याचा विस्तार अथवा स्पष्टीकरण जिज्ञासूंनीं त्यांच्या मूळ ग्रंथांतच पहावें अशी आम्ही शिफारस करितों. हीं प्राचीन संतांचीं वचनें ज्यांना बुद्धिगम्य होण्यास कठीण जातील, त्यांनीं बंगालचे रामदास म्हणजे विवेकानंद व पंजाबचे एकनाथ म्हणजे

**स्वामी रामतीर्थ** यांचे इंग्रजी मराठी ग्रंथ वाचून पहावे. स्वामी **रामतीर्थ** यांनीं अमेरिकेंतील महान् विद्वान श्रोतृसमूहासमोर '**सर्वात्मभाव**' या विषयावर व्याख्यान देतांना म्हटलें आहे —

" **सर्वात्मभाव** ही केवळ कल्पना नाहीं. **सर्वात्मभाव** ही मारून मुटकून तयार केलेली अस्वाभाविक कल्पना नाहीं. जीवनाचीं उच्चत्तम ध्येयें साध्य करून घेण्याकरितां आपणांला निरनिराळ्या सद्गुणांचा अभ्यास करावा लागत नाहीं काय ? जीवित यशस्वी होण्यास त्या सद्गुणांचा उपयोग आहेच. परंतु भासमान होणारीं सर्व शरीरें माझींच आहेत; माझींच तीं वेषांतरें आहेत, सर्व ठिकाणीं मीच आहें, या सत्याचा अनुभव करणें, मनाच्या सर्व शक्ति या सत्याच्या ठिकाणीं एकवटणें, हें जीविताचें सार्थक करण्यास अत्यंत आवश्यक व उपयोगी आहे. **सर्वात्मभाव हें सर्व सत्यांचें सत्य आहे.** "

— फडके यांचा 'स्वामी रामतीर्थ' खंड ९, पृ. ६३

सारांश, दुधांत साखर किंवा पाण्यांत मीठ ज्याप्रमाणें एकरूपानें दिसत असतें, त्याप्रमाणें जगांत ब्रह्म पहाणें, याचें नांव ज्ञान नव्हे; तर तरंगांत जसें पाणी किंवा अलंकारांत जसें सुवर्ण, तसें चराचरांत ब्रह्म पहाणें याचें नांव 'ज्ञान' होय.

**" ज्ञान याचेंचि नाम । ज्या ज्ञानें कळे चराचर ब्रह्म ।**
**जडजगीं पाहणें चैतन्य परम । तें ज्ञान, सोनें जैसें पहाणें अलंकारीं ॥"**

— यथार्थदीपिका

**श्रीशंकराचार्य** आपल्या 'अपरोक्षानुभूतीत' म्हणतात —

**यथा तरंगकल्लोलैर्जलमेव स्फुरत्यलम् ।**
**पात्ररूपेण ताम्रं हि ब्रह्मांडाद्यैस्तथात्मता ॥**

**" जैसें तरंगाचे कल्लोळ । पाहों जातां दिसे जळ ।**
**तैसें दिसे 'आत्मत्व' केवळ । ब्रह्मांडादि जड पदार्थ पहातां ॥**
**दुसराही दृष्टांत । ऐसा या श्लोकांत ।**
**कीं पात्ररूपें पहातां अत्यंत । तांबेंचि दिसे ॥**
**ऐसेच दृष्टांत नानाप्रकार । तरंग कार्य, जड विकार ।**
**त्यांत जैसा जळरूपें सागर । चैतन्य असे जडमात्रीं ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. १५

***********************************************

शिष्याला प्रथम जडाहून आत्मा निराळा आहे असें सांगून, नंतर जड सर्व चिन्मात्र आहे असें समजावून देणें, हीच ' **गुरुत्वाची सीमा** ' होय.

**" चिदात्मत्वें दावी गुरुवर जडें सर्व शरणा ।**
**' गुरुत्वाची सीमा ' हरि करितसे त्याच चरणा ॥**
**पहासी तूं पार्था ! स्थिरचर चिदब्धींच लहरी ।**
**असें ज्ञान ज्ञानी वदतिल म्हणे आपण हरि ॥ "**

— वामनपंडित

घटाचें स्वरूप माती, अलंकाराचें स्वरूप सुवर्ण, तसेंच पटाचें म्हणजे वस्त्राचें स्वरूप ( निजरूप, खरें रूप, मूळ रूप ) काय आहे हें स्पष्ट दाखविण्याकरितां, ज्याप्रमाणें त्या वस्त्राच्या अगदीं अखेरच्या दशा ( सुताच्या दोऱ्या ) दाखवाव्या लागतात, त्याप्रमाणें आत्म्याचें निजरूप म्हणजे शुद्धरूप दाखविण्याकरितां व्यतिरेकज्ञानानें जिज्ञासु शिष्याला प्रथम जडाहून आत्मा निराळा आहे असें समजून द्यावें लागतें. देह, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि व तिच्या एकंदर वृत्ति दृश्य आहेत, त्या सर्व वृत्तींचा साक्षी आपण ( आत्मा ) त्यांहून निराळा आहे, वृत्ति ह्या साक्षिभास्य आहेत, क्षणिक आहेत, आणि साक्षी हा स्वयंप्रकाश आहे, शाश्वत आहे, म्हणजे ' प्रत्यगात्मा ' ब्रह्म आहे असें जाणणें, हा स्वयंप्रकाश आत्म्याचा साक्षात्कार होणें, हा **व्य**तिरेक म्हणजे ' **त्वं**पदसाक्षात्कार ' होय, आणि मग देहेंद्रियादि सर्व चराचर जगत् हें ब्रह्म आहे असें जाणणें हा अन्वय म्हणजे ' **तत्**पदसाक्षात्कार ' होय. प्रथम ' अहं ब्रह्मास्मि ' व मागाहून ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' हीच **ज्ञानाची पूर्णता.**

**आत्मा ज्ञानमयः पुण्यो देहो मांसमयोऽशुचिः ।**
**तयोरैक्यं प्रपश्यन्ति किमज्ञानमतः परम् ॥**

**अर्थ :** आत्मा हा ज्ञानमय म्हणजे चित्स्वरूप व पवित्र, आणि देह हा मांसमय म्हणजे जड व अपवित्र; असें असतां देहालाच आत्मा ( आपण ) मानितात, यापरतें अज्ञान कोणतें ?

— अपरोक्षानुभूति, श्लोक २०

' याप्रमाणें, आत्मा व देह यांचा भेद प्रथम सांगून देहात्मत्व निवारण केलें, आतां देहभेदाचें मिथ्यात्व सांगतों ' ( श्लोक ४२ ) असें सांगून पुढील श्लोकांत आचार्यांनीं ब्रह्मावर जीवत्वाचा व जगताचा भास होतो तो मिथ्या असून

ब्रह्मच सत्य आहे असें श्रुति, युक्ति व अनुभवानें सिद्ध केलें आहे. तें जिज्ञासूंनीं मूळांतच पहावें. येथें उदाहरणाकरितां एक दोन श्लोक देतों :—

**रज्ज्वज्ञानात्क्षणेनैव यद्वद्रज्जुर्हि सर्पिणी ।**
**भाति तद्वच्चितिः साक्षाद्विश्वाकारेण केवला ॥**

**अर्थ :** रज्जूच्या अज्ञानानें रज्जु ( दोरी ) च सर्परूपानें भासावी, त्याप्रमाणें प्रत्यक्ष चिति ( चैतन्य ) च विश्वाकारानें भासतें.

**'चैतन्याचें अन्यथा भान । तें हें जाण चराचर'**

हे नाथांचे उद्गार मागें दिलेच आहेत.

**यथैव मृण्मयः कुंभस्तद्वद्देहोऽपि चिन्मयः ।**
**आत्मानात्मविभागोऽयं मुधैव क्रियते बुधैः ॥**

**अर्थ :** ज्याप्रमाणें कुंभ ( घट ) हा मृण्मय ( मृत्तिकास्वरूप ) आहे, त्याप्रमाणें देहसुद्धां चिन्मय ( चैतन्यस्वरूप ) आहे. ज्ञानी लोक आत्मा व अनात्मा यांचा भेद फुकट करितात.

'ज्याप्रमाणें रज्जु सोडून भ्रांतीनें सर्पग्रहण करितात, त्याप्रमाणें सत्यवस्तूच्या अज्ञानानें मूढबुद्धि पुरुष जगत् पाहात असतो. रज्जूचें स्वरूप जाणलें म्हणजे सर्पभ्रांति रहात नाहीं, त्याप्रमाणें सद्रूप-चिद्रूप-आनंदरूप, अस्तिभातिप्रियरूप अधिष्ठान ( ब्रह्म ) जाणलें असतां प्रपंच म्हणजे विश्व शून्य होऊन जातें.' ( ९५ । ९६ ). अशी ही 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' पाहाण्याची खूण आहे. एकच चिति ( चैतन्य ) शब्द-स्पर्श-रूप-रस-गंधरूपानें नटली आहे. मूळांतील एक वस्तूचें एकत्व ( अद्वितीयत्व ) न मोडतां तिचें अनेकत्वानें होणें, हेंच त्या परमात्म्याचें 'पश्य मे योगमैश्वरं' या गीतावचनांत सांगितल्याप्रमाणें योगैश्वर्य आहे. हाच त्या परमेश्वराचा 'ऐश्वर योग' आहे.

सुवर्णालंकार, तंतुपट, जलतरंग या दृष्टांतांपेक्षां संगीतांतील स्वर-वर्ण-रागाचा दृष्टांत सरस वाटतो. गाणाऱ्याचा मूळचा स्वर एकच असतो, पण तो गाणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें षड्ज–गांधार-पंचमादि रूपानें भिन्न भिन्न होतो, तसेंच ह्या त्याच्या स्वरांत म्हणजे आवाजांत निरनिराळे वर्ण ( अक्षरें ) निघतात, त्याचप्रमाणें निरनिराळे रागही निघतात. त्या रागांमधून उत्पन्न होणाऱ्या स्वराच्या आंदोलनानें सर्प डुलणें, मस्त हत्तीही नम्र होणें, हिंडोल ( डोलारा ) हलूं लागणें, पाऊस पडणें,

दिवे लागणें इत्यादि नाना चमत्कार सृष्टींत अनुभवास येतात. भिन्न-भिन्न वर्णरागादि उत्पन्न होऊन नष्ट झाले तरी स्वर नष्ट होत नाहीं. ह्या नानात्वामध्यें स्वराचें एकत्व भंगत नाहीं, असें जो पाहातो तोच पाहातो. 'नेह नानास्ति किंचन' 'विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति' इत्यादि वचनांत सांगितलेलें तत्त्व हेंच आहे. (वरील दृष्टांत कानडी निजगुणशिवयोगी' यांच्या ग्रंथांत सांपडतो.) असो.

* * * *

वरील ज्ञान पचनीं पाडण्याकरितां कृपाळू संतांनीं व शास्त्रकारांनीं नानाप्रकारच्या युक्ति म्हणजे साधनें सांगितलीं आहेत. "मन राजसतामस वृत्तीनें वृद्धीला प्राप्त होऊन अति स्थूल होत असतें. तें स्थूल मन आत्मसाक्षात्काराला योग्य नाहीं. कारण दुर्विज्ञेयतेमुळें आत्मा अति सूक्ष्म आहे. अशा सूक्ष्म आत्म्याचा स्थूल मनानें साक्षात्कार होत नाहीं. स्थूल कुदळीनें सूक्ष्म वस्त्र शिवतां येत नाहीं, त्याला सूक्ष्म सुईच लागते. तसें सूक्ष्म मनानेंच सूक्ष्म आत्म्याचा साक्षात्कार संभवतो. 'दृश्यते त्वग्र्या बुध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः' अति सूक्ष्म बुद्धीनेंच आत्म्याचा साक्षात्कार सांगितला आहे. 'यतो वाचो निवर्तन्ते,' 'अवाङ्मनसगोचरम्' इत्यादि श्रुतीमध्यें वाणी, मन हीं आत्मसाक्षात्काराला कारण नाहींत असें सांगितलें आहे, तें वर सांगितल्याप्रमाणें स्थूल म्हणजे अशुद्ध मनाविषयीं म्हणून समजावें.

**'मनसैवानुद्रष्टव्यम्। दृश्यते त्वग्र्या बुद्धया० ॥'**

या श्रुतींनीं (श्रवणमनननिदिध्याससंस्कारजन्य) शुद्ध मनाला (बुद्धीला) च आत्मा अथवा ब्रह्मसाक्षात्काराचें करण मानणें योग्य आहे! – (तत्त्वानुसंधान). अशा शुद्ध मनालाच, मागें सांगितल्याप्रमाणें 'तनुमानसा' नामक तिसरी ज्ञानभूमिका म्हणतात. ह्या तिसऱ्या भूमिकेवर साधक आरूढ झाला म्हणजे ब्रह्मसाक्षात्काराची चौथी भूमिका तो सहज चढूं शकतो. अधिष्ठानरूप ब्रह्माच्या ज्ञानानें जगाचा बोध झाला म्हणजे जें ब्रह्म राहतें, तें आपण आहे असें ज्ञान 'प्रत्यभिज्ञेनें' होतें. हें ज्ञान, हा अनुभव, हा साक्षात्कार सुलभ होण्याकरितां, पचनीं पडण्याकरितां शास्त्रकारांनीं

## षट्समाधींचा अभ्यास

सांगितला आहे. (१) अंतर्दृश्यानुविद्ध सविकल्पसमाधि, (२) अंतःशब्दानुविद्ध सविकल्प समाधि, (या दोन्हींच्या अभ्यासानें,) (३) अंतर्निर्विकल्प समाधि; तसेंच (४) बाह्य दृश्यानुविद्ध सविकल्प समाधि, (५) बाह्य शब्दानुविद्ध सविकल्पसमाधि, (६) वरील दोन्हींच्या अभ्यासानें—'बाह्यनिर्विकल्प समाधि,'

अशा या सहा प्रकारच्या समाधि आहेत. ज्ञानमार्गांतील साधकांना हा षट्समाधींचा अभ्यास फार उपयोगी आहे. हा अभ्यास केव्हां व कुठपर्यंत करावा, याबद्दल आचार्य पुढील श्लोकांत सांगतात—

**उत्थाने वाप्यनुत्थानेऽप्यप्रमत्तो जितेंद्रियः ।**
**समाधिषट्कं कुर्वीत सर्वदा प्रयतो यतिः ॥ ९०० ॥**
**विपरीतार्थधीर्यावन्न निःशेषं निवर्तते ।**
**स्वरूपस्फुरणं यावन्न प्रसिद्धत्यनिर्गलम् ।**
**तावत्समाधिषट्केन नयेत्कालं निरंतरम् ॥ ९०१ ॥**

**भावार्थ :** उत्थान व अनुत्थानकालींही, अप्रमत्त व जितेंद्रिय होऊन यत्नशील साधकानें ह्या समाधिषट्काचा अभ्यास करावा. मायाजनित आवरण व विक्षेप समूळ नाहींसे होत तोंपर्यंत म्हणजे आत्म्यावर तद्विपरीत उत्पन्न झालेली अनात्मबुद्धि म्हणजे देहबुद्धि व ब्रह्मावर झालेली जगद्बुद्धि निखालस नष्ट होईपर्यंत ह्या समाधींचा अभ्यास केला पाहिजे. यांत प्रमाद होऊं देतां कामा नये.

**न प्रमादोऽत्र कर्तव्यो विदुषा मोक्षमिच्छता ।**
**प्रमादे जृंभते माया सूर्यापाये तमो यथा ॥ ९०२ ॥**
**स्वानुभूतिं परित्यज्य न तिष्ठन्ति क्षणं बुधाः ।**
**स्वानुभूतौ प्रमादो यः स मृत्युर्न यमः सताम् ॥ ९०३ ॥**

—आचार्यकृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह

**भावार्थ :** मोक्ष इच्छिणाऱ्या विद्वानानें या अभ्यासांत प्रमाद न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. कारण, सूर्यास्तकालीं जसा अंधकार, तसा प्रमादांत मायेचा उद्भव होतो. तत्त्वज्ञानी पुरुष स्वानुभूति सोडून क्षणभरही राहात नाहींत. कारण स्वानुभूतीच्या ठिकाणीं जो प्रमाद, तोच ज्ञात्यांचा मृत्यु होय; यम हा मृत्यु नव्हे !

वर सांगितल्यापैकीं तीन समाधि अंतरांत करण्याच्या व पुढच्या तीन समाधि संपूर्ण द्वैतनिवृत्तीकरितां बाहेरील दृश्य जगतांत साधावयाच्या.

**" यथा समाधित्रितयं यत्नेन क्रियते हृदि ।**
**तथैव बाह्यदेशेऽपि कार्यं द्वैतनिवृत्तये ॥ "**

ह्या समाधींचें किंवा त्यांच्या अभ्यासाचें विस्तृत वर्णन त्या त्या मूळ ग्रंथांत अथवा वेदान्तास वाहिलेल्या इतर पुस्तकांत पाहून घ्यावें. विस्तारभयास्तव तें येथें

देतां येत नाहीं. येथें दिग्दर्शन मात्र केलें आहे. तें इतक्याचकरितां कीं, साधकांना आपल्या ध्येयाची नीट कल्पना यावी आणि तें साध्य होईपर्यंत त्यांनीं किती खबरदार, किती सावध असलें पाहिजे, हें त्यांस समजावें. पुष्कळसे साधक, गुरुशरणागत लोक, प्रथम 'सत्त्वापत्ती-' पर्यंत पोंचतच नाहींत, म्हणजे 'ब्रह्मविद्' होतच नाहींत. मग 'ब्रह्मविद्वर,' – 'वरीयान्,' – 'वरिष्ठ' या अवस्था तर दूरच राहिल्या. हरिगुरुकृपेनें कित्येक चतुर्थ भूमिकेपर्यंत पोंचतात. पण स्वानंदानुभवाच्या झुळुकेनें तेवढ्यावरच तृप्त राहातात व आपणांस कृतार्थ मानितात. आतां बाकींच्यापेक्षां ते कृतार्थ खरेच; पण ही अल्पतृप्ति त्यांना 'अप्रमत्त' पणाला पोंचवीत नाहीं. कैकवेळा 'प्रमादशील' म्हणजे 'प्रमत्त' च बनविते. पण असें होणें योग्य नव्हे.

**देहात्मधीवद्ब्रह्मात्म-धीदार्ढ्ये कृतकृत्यता ।**

— लघुवाक्यवृत्ति

ज्ञानापूर्वी जशी देहात्मबुद्धि दृढतर असते, जागृत्स्वप्नसुषुप्तीमध्येंही तिचा विसर पडत नाहीं, तशी म्हणजे तितकी दृढता जेव्हां ब्रह्मात्मबुद्धीची होईल, तेव्हांच खरी 'कृतकृत्यता' समजावयाची. अशी अखंडता बाणली नाहीं, तोंपर्यंत पूर्णता समजतां कामा नये.

**'अखंडता जंव बाणलि नाहीं, पूर्ण म्हणे तो पाषांड ।'**

— श्रीरमावल्लभदास

अप्रमत्त केव्हां होतो याबद्दल खालील श्रुति व तीवरील वामनपंडितांची टीका अगदीं पाहाण्यासारखी आहे. ती वाचून भावार्थ नीट लक्षांत घेतला असतां सत्साधकाला निःसंदेह-दृष्टीचा लाभ खचित होईल व त्याचें ध्येयाविषयीं अंधारांत चांचपडत पडणें थांबेल.

**यदा पंचावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसासह ।**
**बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः 'परमां गतिम्' ॥**

---

**१ भावार्थ :** ज्या कालीं मनासह ज्ञानेंद्रियांच्या वृत्ति निश्चल राहातात, बुद्धिही निर्व्यापार होऊन असते, त्या कालीं त्या स्थितीस '**परमगति**' असें म्हणतात. तिलाच म्ह. इंद्रियांच्या स्थिरधारणेला 'योग' ही संज्ञा आहे. हा योग बाणला म्हणजेच योगी '**अप्रमत्त**' होतो. इत्यादि.

********************************************************

तां योगमिति मन्यंते स्थिरामिंद्रियधारणाम् ।
अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ॥

"जेव्हां पांचां ज्ञानेंद्रियांच्या वृत्ति । मनासहित निश्चळ राहती ।
बुद्धीची चेष्टा गति । राहे, परमगति त्या गतीतें म्हणावें ॥
ऐसी जे परमागति । तीतें योग म्हणोनि म्हणती ।
त्या योगाची हेंचि स्थिति । कीं स्थिरा इंद्रियांची धारणा ॥
कीं 'प्रपंच' म्हणावें तया । जो अनुभवा ये पांचां इंद्रियां ।
शब्दस्पर्शरूपरसगंध यां- । वेगळा प्रपंच काय असे ? ॥
चित्त झालें चिन्मय । तेव्हां कोण्या विषयातें कोण कल्पी इंद्रिय ।
प्रत्यगात्मस्मृतीचाच निश्चय । तन्मयत्वेंचि उरे बुद्धीचा ॥
ऐसी धारणा स्थिति । तीस 'योग' ऐसें म्हणती ।
परी 'अप्रमत्त' तेव्हां, जेव्हां ये रीतीं । स्थिति बाणे ॥
ज्यास स्वरूपाची विस्मृति । त्यास 'प्रमत्त' ऐसें म्हणती ।
स्मृति जातां पदच्युति । प्रमत्तातें ॥
ऐसा योग बाणे । श्रुति त्यातें 'अप्रमत्त' म्हणे ।
कीं योगसिद्ध शहाणे । ते स्वचिदात्मता न विसरती ॥
चिदात्मता आपली विसरे । तेव्हां देहात्मता आयती स्फुरे ।
मग काय ते समयीं उरे । अंतर ज्ञानिया अज्ञानियास ॥" इत्यादि.

—यथार्थदीपिका, अ. ६, ओं. ११३३-४०

जाग्रदवस्थेंत, ज्ञानेंद्रियें मन व बुद्धि यांची जी निर्व्यापार स्थिति ती 'समाधि' होय. अशी ही निर्व्यापारता साधण्याकरितांच कांहीं संप्रदायांत ज्ञानवल्ली (गांजा), अफू, मद्यादि मादक पदार्थांचें सेवन करितात ! पण पाण्यांत तरंगतां यावें म्हणून पोहण्यास शिकणारे लोक प्रथम कंबरेला भोपळा वगैरे बांधतात व शरिराला पाण्यावर तरंगण्याची एकदां ट्रक साधली म्हणजे तीं साधनें टाकून देऊन पाण्यांत आपोआप पडून यथेच्छ विहार करितात, त्याप्रमाणें वरील मादक पदार्थ सेवन करणारे लोक करीत नाहींत ! कारण, तशी निर्व्यापारता ही त्या वृत्तीला नेहटून आत्मस्वरूपांत स्थिर करण्याकरितां असते, हें वर्म त्यांना माहीत नसतें, किंवा पुढें पुढें ते विसरतात व त्या व्यसनालाच ते चिकटतात ! (सात्त्विक गुरुभक्त साधकांना अशा साधनांचें कारण नाहीं.) एक कल्पना उठून नाहींशी झाली व दुसरी अजून उठली नाहीं यामधील जी स्थिति, अथवा जागृति-अवस्था संपली

पण निद्रावस्था आली नाहीं किंवा निद्रा संपली पण जागृति प्राप्त झाली नाहीं, यामधील जी स्थिति, ती निर्विकल्प-अवस्था. ह्या अवस्थेंत राहण्याचा अभ्यास करणें हा समाधीचा अभ्यास होय. ह्या मध्यसंधींतच ' निर्विकल्पक चैतन्य ' स्पष्ट प्रतीतीस येतें.

**नष्टे पूर्वविकल्पे तु यावदन्यस्य नोदयः।**
**निर्विकल्पकचैतन्यं स्पष्टं तावद्विभासते॥**
**एकद्वित्रिक्षणेनैव विकल्पस्य निरोधनं।**
**क्रमेणाभ्यस्यतां यत्नाद् ब्रह्मानुभवकांक्षिभिः॥....**
**स्वतःसिद्धा विकल्पास्ते निरोद्धव्याः प्रयत्नतः।**
**शक्यः सर्वनिरोधेन समाधिर्योगिनां प्रियः॥**

— लघुवाक्यवृत्ति

कल्पना अथवा वृत्तिनिरोधाचा अभ्यास एकांतांत बसून करावा. आज एक क्षण निरोध केला, तर उद्यां दोन क्षण, परवां तीन क्षण, याप्रमाणें क्रमाक्रमानें अभ्यास करून कल्पनांचा निरोध साधला म्हणजे योग्यांना प्रिय अशी समाधि शक्य होते. याला प्राणायामादिकांची खटपट नाहीं. शांत चित्तानें स्वस्थ बसून चित्स्वरूपाच्या ध्यानाचाच अभ्यास केला पाहिजे. पाण्यावर आलेलें शेवाळ दूर केलें पाहिजे, पाणी तयारच असतें. **आत्मप्रातीकरितां प्रयत्न नको, प्रतिबंध दूर करण्याकरितांच प्रयत्न पाहिजे.** आकाशांतील सूर्याप्रमाणें आत्मा सिद्धच आहे, त्यावर आलेलें वृत्तिरूप आभाळ अभ्यासरूप वायूनें दूर सारलें पाहिजे.

**" उठे वृत्ती बैसे, परि न उठणें तूज बसणें।**
**वसे साक्षित्वानें, परि न कधिं त्या आंत घुसणें॥**
**अशा धैर्यें मेरू–सम अढळ बा तूं तुजमधीं।**
**असंगत्वें प्राप्ती तुझि तुजचि याला न अवधी। "**
**" उठों नेदी वृत्ती सहज सुख येईल उदया।**
**तदाकारें पोटीं स्फुरत सुख जें आपण तया॥ "**

— श्रीबांदकरमहाराजकृत स्वात्मतत्त्वामृतशतक

वृत्तीच्याही **युक्ता, संयुक्ता, विलग्ना, मग्ना, रुद्धा, लीना** व **सहजा** अशा सात भूमिका सांगितल्या आहेत. त्यांचा विस्तार करणेस येथें अवकाश नाहीं. त्या तत्त्वज्ञानी संत-सद्गुरूकडूनच समजून घेतल्या पाहिजेत. येथें दिग्दर्शन मात्र करितों.

****************************************************

"वृत्ति निराकृति झाली। आपआपणा पाहूं लागली।
हेंचि साक्षिरूप बोली। होणें घडे ॥...
सारांश तरी काय घेणें। वृत्तीचें निराकृति होणें।
हीच वृत्तीची 'लीन' होणें। अवस्था असे ॥
वृत्ति लीन झाली असतां। तिचा नेट हेलकावा आतां।
शांत होतो, ती लीनावस्था। ही निर्विकल्प समाधि ॥...
वृत्तीसी बाहेर जातां नये। विषयासी आंत येतां नये।
ऐसे उभय मार्ग बंद होये। आनंद दुमदुमे ॥
तो आनंद सांगतां न ये। तो ब्रह्मानंदचि होये।
धन्य ते आत्मनिष्ठ होये। स्वरूपीं पार नसे ॥
परी या समाधीं[1] उत्थानलय। असल्यानें परिच्छिन्न होय।
ही व्यापक समाधि न होय। क्षीण कासया ॥
निराकार साक्षी लहरीरूपें। वृत्ति होते साकार रूपें।
तरी सहा भूमिकेंतून बापें। हवी ती घ्यावी ॥
त्या भूमिकेवरी स्थिरावून। वृत्तिनेटासी आवरून।
वृत्तीला अवलोकन करून। निर्विषय होई ॥
निर्विषय होतां, साक्षिरूप। आहेचि आहे अमूप।
साक्षीची लहरी वृत्तिरूप। स्थिरता येथें ॥...
तेथ विकार नाहीं त्याग नाहीं। केवल प्रकाशचि पाही।
तो वृत्तिउपाधीं झांकला होई। आंतचे आंत ॥
वृत्ति जेव्हां प्रकाशीं[2] मुरली। तेव्हांचि ती दीपली।
तें तो प्रकाश बाहेर घाली। घाली नव्हे आहेचि ॥
अंतर्बाह्य ओतप्रोत। होताचि होता त्यांत।
आंत बाहेर वृत्तीनें येत। ती वृत्ति हरवली ॥...
वृत्ति तुझी चिच्छक्ति माया। मायारूप वृत्तीसह पहा या।
अथवा वृत्ति लीन करूनियां। तटस्थ साक्षी होई ॥
जैसा राहसी तैसी क्रीडा। तुझीच आहे समज पुढां।
माझा अनुभव सांगतों गाढा। ऐकून घेई ॥

१ ही व्यतिरेकयोगसमाधि. २ स्वयंप्रकाश साक्षिस्वरूपांत.

**वृत्ति स्वयं लीन जाहली । ' स्वयंप्रकाशावस्था ' बाणली ।**
**ही जी ' सहजावस्था ' बोलिली । तेथें राही सदैव ॥**
**आम्ही भोगितों अखंडानंद । सहजावस्थीं सदैव धुंद ।**
**ऐसा सुखमय कंद । तूंही होआवें ॥ "**

—पैठणकर दत्तमहाराजकृत – ' **स्वानंदतरंग** '

**मनुष्यजन्माचें अंतिम ध्येय म्हणजे ' दुःखाची आत्यंतिक निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति '** ही वरील वृत्तिनिरोधाच्या अभ्यासानें मनुष्याच्या पदरीं पडते. हा मोक्षानंद नरजन्माला येऊन ज्यानें साक्षात् अनुभविला नाहीं, तो ' मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ' या वचनाप्रमाणें शेपूट व शिंगें नसलेला पशु होय, असें शास्त्रकार व संत मोठ्या कृपाळु रागानें म्हणतात. याकरितां साधकानें अभ्यासाची पराकाष्ठा करून हा मोक्षानंद, अखंडानंद प्राप्त करून घेतला पाहिजे. असो.

× × × ×

मनुष्य परमार्थप्राप्तीकरितां दानधर्म, योगयाग, भजनपूजन इत्यादि द्रव्यसाध्य व कष्टसाध्य अनेक साधनें आनंदानें करील, पण घटकाभर निष्क्रिय निर्व्यापार चित्तानें स्वस्थ बसण्याचें साधन करणें मोठें जड वाटतें. शाळेंतील मुलांना तुम्ही नाचा, उडा, खेळ खेळा म्हणून हवें तेवढें सांगा, आनंदानें करतील; पण डोळे झांकून दोन मिनिटें बसल्या जागीं स्वस्थ बसा म्हणून सांगितलेंस किती जड जातें तें अगदीं पाहाण्यासारखें असतें. ती एक त्यांना मोठी शिक्षा वाटते. जपानांत शाळा सुटतांना मुलांना कवाईत वगैरे शिकवून झाल्यावर डोळे झांकून दोन मिनिटें स्वस्थ बसण्याचा धडा देत असतात. यास तिकडे Lesson of Silence ( स्वस्थ बसण्याचा धडा ) म्हणतात. स्वस्थ बसण्याचा धडा म्हणजेच एकाग्रतेचा अभ्यास होय. हाच समाधीचा अभ्यास. व्यवहारांतील मोठमोठे शोधदेखील अशा समाधीनेंच लागले आहेत. उद्दिष्ट विषयाहून इतर ( विजातीय ) कल्पना सोडून, त्याच एक विषयाकडे चित्ताची मोहर लावणें, यालाच ' समाधि ' म्हणतात. अशा समाधींतच पुष्कळ गूढें उकलतात. मोठमोठीं कठिण उदाहरणें सुटतात. समाधि म्हणजे बुद्धीची समता, साम्यावस्था. याहीपेक्षां सोप्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास, समता म्हणजे विषमताराहित्य; विषमता म्हणजे अनेकाग्रता अथवा चंचलता; आणि चंचलतेचा अभाव म्हणजे स्थिरता. ही स्थिरता अनात्मविषयांत केल्यास त्यांतील गूढाचा प्रकाश होतो, त्याचप्रमाणें आत्मविषयांत म्हणजे आत्मस्वरूपांत केल्यास

त्यांतील गूढ जें सद्-चिद्-आनंदरूप, त्या रूपाचा म्हणजे जीवन्मुक्तींतील **विलक्षणानंदाचा** अनुभव येतो. मन व बुद्धि ज्या प्रमाणांत स्थिरता पावेल, त्या प्रमाणांत त्या **विलक्षणानंदाचा–सहजानंदाचा–अखडानंदाचा** अनुभव येत जाईल. योग्याच्या त्या ' नियत ' ( निरुद्ध ) चित्ताला गीतेंत निवातदीपाची उपमा दिली आहे ( ' यथा दीपो निवातस्थो० '–अ. ६, श्लो. १९ ). पण असें हें चित्त निवातदीपवत् स्थिर केव्हां होईल ? तर स्वरूपानंद चाखावयास मिळेल तेव्हां. स्वरूपानंद चाखावयास केव्हां मिळेल ? तर चित्त स्वरूपांत स्थिरावेल तेव्हां. अशी ही परस्परांची सांगड आहे. तथापि चित्ताच्या स्थिरतेचाच अभ्यास प्रथम केला पाहिजे.

**" कीं स्वरूपानंद चाखे । निजानंदें चित्त माखे ।**
**तेव्हां तें आपणास राखे । स्वरूपीं स्वरूपाकार करी ॥**
**कर्दम-जळांतील मासा । क्षीरसागरीं पडतां जैसा ।**
**परमसुखी होय तैसा । भाव चित्ताचा निजसुखीं ॥**
**आत्माच सुख केवळ । परीं सुख न वाटे जों वृत्तीची चळवळ ।**
**वृत्ति राहतां निश्चळ । ये अनुभवास सुखरूपें ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. ६

× × × ×

## श्रीतुकाराममहाराजांचा एक दिव्य अभंग

महाराजांच्या ह्या अभंगांत वरील निश्चलतेचें तत्त्व अथवा साधन कसें विशद करून सांगितलें आहे तें पाहा —

**" बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥**
**अंतरीं येउनी राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥**
**राम-कृष्ण-हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥**
**तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होय भाव एकविध ॥ "**

या अभंगांतील पहिल्या कडव्यांत, एकांतांत बसून चित्त शुद्ध म्हणजे निर्व्यापार वृत्तिरहित करण्याचा अभ्यास सुचविला असून, त्याचें फळ अमर्याद सुखाची म्हणजे परमसुखाची ( निजसुख–निजानंद–ब्रह्मानंद, निरतिशयानंद याची ) प्राप्ति सांगितली आहे. या आनंदालाच ' गोपाळ ' ही संज्ञा. हा अंतरांत येऊन राहील म्हणजे हृदयांत गुप्त असलेला प्रगट होईल. पण हें सायासाचें म्हणजे प्रयत्नाचें फळ केव्हां

प्राप्त होईल ? तर तशा हेतूनें निवांत बसूं लागाल तेव्हां ; हें दुसऱ्या कडव्यांत सांगितलें आहे. आणि दुसरें कडवें म्हणजे अभंगाचें ध्रुवपद असतें, हें सांप्रदायिकांना तर सांगावयास नकोच. ध्रुवपद हें बाकीच्या प्रत्येक कडव्याच्या अखेरीस म्हणावयाचें असतें ; अर्थात **'सायासाचें फळ बैसलिया'** ही सूचना ध्रुवत्वानें म्हणजे अढळपणानें, मुख्यत्वानें सांगितली आहे हें लक्षांत घ्यावें व साधकानें रोज स्वस्थ बसण्याचा अभ्यास वाढवावा. * आतां 'स्वस्थ' शब्दाचा अर्थही लक्षांत घेण्यासारखा आहे. 'स्वस्मिन् स्थितः स्वस्थः' असा त्याचा विग्रह होतो. स्वस्मिन् म्हणजे आपल्या स्वरूपांत, स्थित म्हणजे राहिलेला. अर्थात् स्वस्थ बसणें म्हणजे बहिर्मुख वृत्ति सोडून आत्मस्वरूपांत वृत्ति स्थिर करीत राहणें होय. पण असें करणें किती कठिण आहे, हें तें करूं लागल्याशिवाय कळणें शक्य नाहीं. भजनपूजन, तीर्थयात्रा, उपवास, स्तोत्रपाठ, किंबहुना पंचाग्निसाधनासारखीं शरीराला अत्यंत क्लेश देणारीं तपें करण्यास कष्ट वाटणार नाहींत ; पण एकांतांत बसून मनांत उठणाऱ्या कल्पना सोडून देऊन 'निवात दीपवत्' स्थिर राहण्याचा अभ्यास करणें अत्यंत कष्टदायक आहे. अगदीं निराश होण्याचाच प्रसंग येतो. करितां ज्यांना तसें करवणार नाहीं, करवत नाहीं, त्यांनीं निराश न होतां 'रामकृष्णहरी' इत्यादि भगवंताचें नामस्मरण करावें. त्या पवित्र नामांतच वृत्तीला गुंतवावें. **स्मरण हा मनाचा धर्म आहे व उच्चारण हा वाचेचा धर्म आहे.** (याचा विशेष विचार पुढें 'नामयोगरहस्य' प्रकरणांत केला जाईल.) ज्याला मनानें स्मरण करवत नसेल त्यानें वाचेनें 'वेळोवेळां' म्हणजे अखंड उच्चार करीत असावें. अशी तिसऱ्या कडव्यांत कृपाळूपणानें 'सुखसंपादनीय' साधनाची महाराजांनीं सूचना दिली आहे. वेळोवेळां अथवा अखंड म्हणजे २४ तास असें करवत नसेल तर या अभ्यासाकरितां निग्रहानें तास अर्धा तास जितका वेळ बसाल तितका वेळ तरी हा नामोच्चार

---

* "You will know more with your eyes shut than with your eyes open. — Sister Nivedita.

उघड्या डोळ्यांपेक्षां झांकलेल्या डोळ्यानें तुम्हांला अधिक ज्ञान होईल.
— सिस्टर निवेदिता.

"The voice of silence can never be heard in the hubbub of the world. — Harrison Brown.

गूढ अंतर्ध्वनि अथवा 'अंतर्यामींचा आदेश' जगाच्या गलबल्यामध्यें केव्हांही ऐकूं येणें शक्य नाहीं. — हारिसन ब्राऊन.

**************************************************

'अखंड' करावा. तीव्र साधकानें १ प्रहर म्हणजे तीन तास अथवा निदान तीन घटका ( ७२ मिनिटें ) तरी निश्चल बसण्याचा नेम धरावा. त्या पवित्र नामध्वनीवर चित्ताचा तितका वेळ संयम करावा. श्रीतुकाराममहाराज त्याबद्दल उगीच अजमासपंचकानें किंवा वेळ मारून नेण्याकरितां म्हणून उथळपणानें कांहीं तरी न सांगतां 'ऐसें देईन मी दिव्य' म्हणजे शपथ देऊन, प्रतिज्ञा करून सांगतात कीं, वरील साधनावर '**एकविध भाव**' म्हणजे एकनिष्ठ प्रीति, निश्चळ निष्ठा उत्पन्न होईल, तर त्याला श्रीगोपाळाचा म्हणजे देहेंद्रियप्राणमनबुद्धिचालक परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावांचून राहाणार नाहीं. इत्यादि.

*    *    *    *

## समाधीच्या अभ्यासांतील विघ्नें

कोणत्याही चांगल्या कामांत विघ्नें हीं असावयाचींच. जणूं हा निसर्गाचाच नियम. पण हीं विघ्नें सत्कार्यास प्रवृत्त झालेल्या लोकांना हताश किंवा निर्बळ करण्याकरितां येत नसून त्यांचा उत्साह व त्यांचें बळ वाढविण्याकरितांच येत असतात. हें वर्म जाणून जे तसा नेटाचा प्रयत्न करितात, त्यांना सिद्धि प्राप्त झाल्यावांचून राहात नाहीं. वरील समाधीच्या म्हणजे आत्मसाक्षात्काराच्या मार्गांतही 'अनुसंधानराहित्य, भोगलालसा, भय, तम, विक्षेप, तेज, स्पंद, शून्यता, इत्यादि प्रकारचें विघ्नबाहुल्य येत असतें, त्याचा ब्रह्मविज्जनांनीं त्याग केला पाहिजे. या विघ्नांचा त्याग करून **जो प्रमादरहित, वशी** ( जितेंद्रिय व जितमनस्क ) **आणि समाधिनिष्ठ होतो, तो साक्षात् ब्रह्म होण्याला पात्र होतो**'–( सर्व वेदान्तसिद्धांतसार संग्रह श्लो. ९२१–२३ ) वरील विघ्नांखेरीज लोकवासना, शास्त्रवासना, देहवासना हीं विघ्नेंही आचार्यांच्या विवेकचूडामणि ग्रंथांत सांगितलीं आहेत. पातंजल योगदर्शनांत हीं व दुसरीं कांहीं विघ्नें सांगितलीं आहेत. याचप्रमाणें समाधीच्या अभ्यासांत चित्ताची एकाग्रता होऊं लागली म्हणजे मनाला व इंद्रियांना सूक्ष्मज्ञानग्रहणाची योग्यता येते. दूरदर्शन, दूरश्रवण, अंतर्ज्ञान ( लोकांच्या मनांतील समजणें ), भविष्यज्ञान, वाक्सिद्धि इ. इ. लहानमोठ्या सिद्धि प्राप्त होतात. त्यांना भुलून साधक त्यांच्या मागें लागला कीं, तो आरूढच्युत होतो ( खालीं घसरतो ). याकरितां साधकांनीं फार सावध राहिलें पाहिजे. **वैराग्याचा** आश्रय बळकट असेल तर **अभ्यास** तडीला जाण्यास फार साहाय्य होतें. '**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते**' या गीतावचनांतील तात्पर्य हेंच आहे.

**" चित्स्वरूपीं मन । लावितांहि करी विषयचिंतन ।**
**तेथें पाहिजे वैराग्यसाधन । त्या वैराग्यसंस्कारें तें परते ॥**
**स्वरूपीं लागणें हा अभ्यास । तेथूनि उठतां त्यास ।**
**परतवूनि योजणें यास । वैराग्य पाहिजे ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. ६, ओं. ८९९।९००

असा वैराग्ययुक्त अभ्यास चालविला, वर दर्शित केलेलीं आंतर व बाह्य विघ्नें प्रयत्नानें दूर केलीं, तरी अभ्यास सिद्ध होण्याला **लय, विक्षेप, कषाय,** व **रसास्वाद** हीं चार विघ्नें येतात, तीं महत्प्रयत्नानें दूर केलीं पाहिजेत. या चार विघ्नांपैकीं पहिलीं तीन विघ्नें बाधक व चौथें विघ्न हें तेवढें बाधक नसून साधक आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. स्वानुभवी पुरुषांनीं अनुभव घेऊन घेऊन पुढील साधकांच्या उपयोगाकरितां ते अनुभव लिहून ठेवले आहेत. तींच शास्त्रें होत. त्यांचें अधिकारी पुरुषांकडून सम्यक् रीतीनें ज्ञान करून घेतलें पाहिजे.

ह्या अभ्यासांत ' लय ' व ' विक्षेप ' हीं दोन विघ्नें मोठीं होत. **लय** म्हणजे निद्रा व **विक्षेप** म्हणजे नसत्या कल्पना उठणें. लय कदाचित् दूर करतां येईल, पण विक्षेप ( कल्पनाप्रवाह ) बंद करितां येणें फार कठीण. हें जाणूनच श्रीनामदेवरायांनीं भगवंताकडे **' कल्पनेची बाधा न हो कोणेकाळीं । हे संतमंडळी सुखी असो '** असें मागणें सर्व साधकांकरितां कळकळीनें मागितलें आहे. त्यापुढें **' अहंकाराचा वारा न लागो राजसां '** ही प्रार्थना केली आहे. याचें कारण कल्पनाप्रवाह बंद झाला तरी सात्विक अहंकार किंवा सूक्ष्म ज्ञानाभिमान राहतो. तो तर मोठाच बाधक आहे. म्हणून त्याचा वाराही ' राजसां ' म्हणजे सकुमार भाविक विष्णुदासांना लागूं देऊं नको, असें म्हटलें आहे. वरील दोन्ही विघ्नें अखंड नामस्मरणानें, स्वल्पायासानें नाहींशीं होतात व या साधनाचा दृढावलंबन करणारे साधक कल्याणाला ' आत्यंतिक क्षेमाला ' पोंचतात, हा सिद्धांत अथवा अनुभव आहे. म्हणून, **' नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग '** असें म्हटलें आहे. पांडुरंगरूपी निधान म्हणजे पांडुरंगाचें नाम ( यांत नाम व नामी यांचा अभेद सुचविला आहे ) ज्याच्या मुखांत आहे त्याचें शश्वत् कल्याण असो असें मागितलें आहे. हा प्रार्थनारूप अभंग वारकरी संप्रदायांत व इतरत्रही भजनाच्या अखेरीस नेहमीं म्हणण्याचा प्रघात आहे. पण अतिपरिचयामुळें त्याच्या खोल अर्थाकडे कोणाचें लक्ष जात नाहीं. या अभंगाचें व वरील **' बैसोनि निवांत शुद्ध करी चित्त '** या श्रीतुकोबारायांच्या अभगाचें किती साम्य आहे तें मर्मज्ञ वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

हालणाऱ्या पाण्यांत प्रतिबिंब दिसूं शकत नाहीं, तें स्थिर झालेल्या पाण्यांतच दिसतें. त्याप्रमाणें 'कल्पनेची चुळबुळ' चालू असेपर्यंत आत्म्याचें सच्चिदानंदरूप प्रतीतीस येत नाहीं. कल्पनेचा विराम म्हणजे चित्ताचा उपरम जसजसा होत जातो, तसतसें तें 'आत्यंतिक सुख' म्हणजे ज्या सुखाला 'अंतपार नाहीं' ज्यांत 'दुःखकोटि हारपूनि जाती' असें सुख बुद्धिगम्य होऊं लागतें, प्रतीत होतें.

**"यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥**
**सुखमात्यन्तिकं यत्तद्-बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥"**

या गीताश्लोकांत (अ. ६, २०।२१) वरील तत्त्वच सांगितलें आहे. "यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति । अथ यदल्पं तन्मर्त्यं तद्‌दुःखम्" या सामवेदश्रुतीमध्यें याच सुखाचें वर्णन आहे. हें परम सुख '**अतीन्द्रिय**' म्हणजे इंद्रियगम्य नसून, **बुद्धिग्राह्य**' आहे असें भगवान म्हणतात. तसेंच तें प्राप्त झालें असतां तो योगी त्यापासून चलन पावत नाहीं; त्यापेक्षां जगांत दुसरा कोणताही अधिक लाभ आहे असें तो मानीत नाहीं आणि देहप्रारब्धानें प्रळयकाळासारखीं दुःखें प्राप्त झालीं तरी त्यांयोगें तो आत्मप्रभेच्या सुखांतून ढळत नाहीं, असें

**"यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥"**

पुढच्या श्लोकांत सांगितलें आहे. याच 'दुःखसंयोगरहित' सुखाला, 'निर्दुःखानंदाला' **योग** ही संज्ञा आहे. हा योग 'निर्विण्ण' चित्तानें म्हणजे वैराग्ययुक्त होऊन निश्चयानें साधला पाहिजे; व त्याकरितां, संकल्पापासून उत्पन्न झालेले सर्व काम सोडून देऊन, मनानें इंद्रियसमुदायाचें उत्तम प्रकारें नियमन करून, धैर्ययुक्त बुद्धीनें त्या मनाला हळुहळू आत्मस्वरूपांत स्थिर करावें व तदितर दुसरें कसलेंच चिंतन करूं नये. ('शनैः शनैरुपमेद्‌बुद्ध्या धृतिगृहीतया । **आत्मसंस्थं मनः** कृत्वा **न किंचिदपि चिन्तयेत्**') असें पुढील २२।२३।२४।२५ श्लोकांत सांगितलें आहे. आस्थाळू साधकांनीं गीतेंतील 'अभ्यासयोग' नांवाचा हा ६ वा अध्याय ज्ञानेश्वरी, यथार्थदीपिका, रमावल्लभदासकृत 'चमत्कारी' टीका वगैरे ग्रंथांच्या आधारानें वाचून पाहून आत्मसात् करावा व जीवाचें सार्थक करून घ्यावें.

* * *

## वृत्तिशून्य अवस्था

वर सांगितलेला अभ्यास करणेस कसलेच श्रम नाहींत. कर्म–उपासनादि मार्गांत शरीर, जिव्हा, मन इत्यादिकांच्या कांहीं तरी क्रियांची जरूरी असते. परंतु या मार्गांत, मनाला आत्मस्वरूपांत लीन करून—डुबवून, तसल्या सर्व क्रिया थांबविणें हेंच मुख्य कर्तव्य असतें. ( '**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत्**' तें हेंच. ) कायिक, वाचिक अथवा मानसिक कसलीही का असेना, क्रिया करणें म्हणजे श्रमाचें असतें आणि त्यापासून मिळण्याचें फळ स्वर्गादिप्राप्ति अथवा देवतादर्शन इत्यादि हें आपणाहून निराळें, दूरचें व अप्रत्यक्ष असतें; पण आत्मा तसा नव्हे.

"आत्मा नित्य अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष आहे. तो प्रत्येक प्राण्याच्या अंतरांत ( हृदयांत ) असतोच असतो आणि म्हणूनच त्याचा साक्षात्कार मिळविणें सोप्यांतलें सोपें आहे. पण तें केव्हां ? तर देह व जगत् यांसंबंधीं असलेली सत्यत्वाची भावना निखालस नष्ट होईल तेव्हां ! ...आत्म्याचा फार थोड्या वेळांत साक्षात्कार होईल. फक्त पाहिजे आहे ती गाढ एकाग्रता; अर्थात् विषय व त्यांसंबंधाच्या कल्पना अथवा वृत्ति यांपासून चित्ताला मागें वळविणें म्हणजे चित्त वृत्तिरहित करणें. पण हा वृत्तिरहितपणा बेसावधपणाचा उपयोगी नाहीं, हें येथें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. ही सावधगिरी फार महत्त्वाची आहे; कारण निद्रा ( सुषुप्ति ) व समाधि ह्या दोन्ही अवस्था वृत्तिराहित्याच्या असतात. पण **केवळ वृत्तिराहित्य हेंच कांहीं अंतिम साध्य नव्हे.** प्राणायामादिकांनीं मनाला मूर्च्छित करणें ही कांहीं खरी समाधि नव्हे. सुषुप्तींत असणारें वृत्तिराहित्य, तसेंच पित्तप्रकोप किंवा आघातामुळें येणाऱ्या मूर्छेंतील वृत्तिराहित्य, गांजा-भाग-दारू इत्यादि मादक द्रव्यांच्या सेवनानें येणारें वृत्तिराहित्य किंवा प्राणायामानें मनाला दमवून येणारें वृत्तिराहित्य यांचा तादृश फायदा नाहीं. वृत्ति स्वरूपांत समरसून जाण्यानें येणारें वृत्तिराहित्य ( Wide-awake thoughtlessness ) पाहिजे आहे. हें साधण्याकरितां कोणत्या तरी एका वस्तूचें एकाग्र चिंतन असावें. गायत्रीसारखा एखादा मंत्र किंवा देवाचें नाम अथवा देवाचें रूपही या कामीं चालेल. पण एकाग्रतेकरितां वस्तु निवडावयाची त्यांत 'मी' ही वस्तु इतर सर्व वस्तूंपेक्षां चांगली. याचें कारण असें कीं, अंतरांत उत्पन्न होणाऱ्या सर्व कल्पनांची अथवा वृत्तींची इमारत 'मी देह' या एकाच वृत्तीच्या पायावर उभारलेली असते. सर्व वृत्तींच्या मुळाशीं 'मी देह' ही एक सामान्य वृत्ति असतेच असते. जर का ही एक वृत्ति काढून

************************************************

टाकिली, तर बाकीच्या सर्व वृत्ति नष्ट झाल्याच म्हणून समजावें. प्रथम साधकानें 'मी देह नव्हे' अशी अगदीं खात्री करून घेतली पाहिजे; इतकेंच नव्हे, तर 'मी कोण' म्हणजे माझें खरें स्वरूप काय आहे हें शोधून काढीन असा निश्चयच केला पाहिजे. अर्थात् अंतर्मुख होऊन 'मी कोण' असा त्यानें स्वतःला प्रश्न केला पाहिजे; ह्या एका प्रश्नावर अथवा विषयावर चित्ताचा संयम केला (तें रोखून धरलें), म्हणजे मन इतर सर्व कल्पनांपासून अगदीं रिकामें होईल व शेवटीं 'मी कोण' हा विचारही नाहींसा होऊन, तें गूढ अगम्य अशा एका स्थानीं बुडून जाईल. तें अगम्य स्थान म्हणजेच आत्मा; त्यांत तें समरसेल. येथें वेदान्तांत जिकडे तिकडे सांगितलेलें 'मी अमुक म्हणजे तो मी (सोऽहं)' वगैरेचें ध्यानही नको आहे; कारण 'मी' ही वस्तु काय आहे हें साधनाभ्यासानें ज्याचें त्यालाच समजून येतें. 'मी अमुक' असें विशिष्ट मत अथवा विश्वास धरून चालण्याचें कारण नाहीं. एकाग्रतेच्या ध्यानानें सृष्टीमधील विजातीय म्हणजे आपणाहून अन्य अशा गूढ तत्त्वाचे जर शोध लागले आहेत, तर आपला शोध म्हणजे आपल्या स्वरूपाचें ज्ञान आपणास त्या साधनानें (एकाग्रतेच्या ध्यानानें) होणार नाहीं काय? **जेव्हां मन त्या अंतरात्म्याकडे** (जो प्रत्येकाच्या अंतःकरणांत 'मी मी' म्हणून स्फुरतो त्याकडे) **पोंचतें, तेव्हां 'मी देह' हें स्फुरण नष्ट होतें व स्वानंदाचा उदय होतो.** आत्म्याचा कोणत्याही प्रतिबंधानें रहित असा प्रकाश स्वयंसिद्ध आनंदरूप असतो; कारण **आत्म्याचा स्वभावधर्मच आनंद आहे.** जन्ममरणांचें दुष्ट दुःखदायक चक्र तोडून मोडून टाकण्याला हाच एक सर्वांत सुलभ मार्ग आहे. तो मार्ग म्हणजे **मन, वाणी व शरीर यांचे सर्व व्यापार** (क्रिया) **बंद करणें.** याच्या योगें आत्मा तत्काळ आपल्या स्वयंप्रकाशानें प्रकाशित होतो. भक्तीनें प्राप्त होणाऱ्या, सर्वोत्तम व अतिश्रेष्ठ अशा परमेश्वराच्या कृपेनें जेव्हां मन आत्म्यांत लीन होतें, तेव्हांच सर्वश्रेष्ठ अशा चिदाकाशाचा (Supreme Spirit-sky) प्रकाश होतो. ज्याच्या प्रकाशानेंच हें मन व इतर जगत् प्रकाशित होत असतें; 'चिदाकाश' हेंच आत्म्याचें (आपलें) खरें स्वरूप आहे. ह्या चिदाकाशांतच किंवा चिदाकाशाच्या प्रकाशानेंच 'चित्ताकाश' (मन) कार्यकारी बनतें व ह्या चित्ताकाशांतच बाहेरील 'भूताकाश' प्रतीत होतें; ह्या भूताकाशांतच हें सर्व जगत् सामावलें आहे. जेव्हां चिदाकाश प्रकाशित होतें, तेव्हां दुसरें कांहींही प्रकाशूं शकत नाहीं. ही प्रकाशस्थिति म्हणजेच **पूर्ण अद्वैत** आणि म्हणूनच ती भयरहित, मृत्युरहित व कोणत्याही प्रकारच्या

******************************************

अपायानें रहित अशी आहे. ही अवस्था अथवा हें तत्त्व, जगांतील पाप-दुःख-अपूर्णता-दुष्टता-दुर्बलता या सर्वांचा उगमच असा जो अहंकार त्याचें नाशक आहे. अर्थात् तें मृत्यूचा मृत्यु व जीवनाचें जीवन आहे."

—श्रीरमणमहर्षिकृत 'आत्मविद्या'

* * * *

## आकाश आणि स्वरूप यांतील भेद

सुवर्णादि नाना धातु, रत्नें, काष्ठ, वृक्ष, पाषाण, इत्यादि मिळून **पृथ्वी.** ही जड व कठीण अशी आहे.

पृथ्वीपेक्षां **जल**तत्त्व व्यापक व मृदु असें आहे. पृथ्वीवरील समुद्र, नद्या, तेल वगैरे पातळ पदार्थ, तसेंच शरिरांतील वीर्य, रक्त, मूत्र, लाळ वगैरे पदार्थ जलतत्त्वांत मोडतात.

**तेज**-तत्त्वांत चंद्र. सूर्य, तारांगणें, विद्युल्लता, अग्नि, (समुद्रांतील वडवाग्नि व शरिरांतील जठराग्नि इ.). धातुरत्नें इत्यादिकांची व शरिराची कांति, तसेंच डोळ्यांतील पाणी ह्या सर्वांचा समावेश होतो. हें तेज-तत्त्व जलतत्त्वापेक्षां सूक्ष्म (विरल) व व्यापक आहे.

**वायु** हा तेजापेक्षां सूक्ष्म (विरल) व चंचल आहे. वृक्षादिकांचें हालणें, डोलणें, शरिराची एकंदर हालचाल (चलन, वलन, प्रसारण, निरोधन, आकुंचन इत्यादि) हें सर्व वायूमुळें होतें. आकाशांत मेघमंडळ व चंद्रसूर्यादि गोल हे बहुतेक वायूमुळेंच धरले जातात. ब्रह्मांडांतील चारी खाणींतील जीवांचें जीवन वायूवरच अवलंबून आहे. मागील तीन तत्त्वांच्या साह्यावांचून प्राणी कांहीं काळ जगूं शकेल, परंतु साधारणतः वायुतत्त्वावांचून क्षणभरहि जगणें शक्य नाहीं. ब्रह्मांडांतील हें वायुतत्त्व तेजतत्त्वापेक्षां मृदु (विरल) व व्यापक आहे.

**आकाश**तत्त्व हें तर मागील चारी तत्त्वांपेक्षां सूक्ष्म म्हणजे विरल आणि व्यापक आहे. जगताला कारणीभूत अशीं हीं पंचमहाभूतें एकापेक्षां एक विरल आणि व्यापक होत गेलीं आहेत. (विरलता ही व्यापकतेस कारण म्हटल्यास चालेल, अथवा व्यापकतेमुळेंच विरलता असेंही म्हणतां येईल.) पृथ्वीपेक्षां आप व्यापक, आपापेक्षां तेज व्यापक, तेजापेक्षां वायु व्यापक व वायूपेक्षांही आकाश सूक्ष्म आणि व्यापक आहे. फार काय बोलावें, ब्रह्मासारखीच आकाशाची व्याप्ति आहे.

*********************************************

ब्रह्म हें सर्वव्यापक, अचळ, अढळ, निर्मळ, निश्चळ, निरवयव व निरंश आहे, त्याचप्रमाणें आकाशही सर्वव्यापक, अचळ, अढळ, निर्मळ, निश्चळ, निरवयव व निरंश आहे. मग आकाशालाच ब्रह्म कां म्हणूं नये ? तर आकाश हें जड आहे व ब्रह्म हें चैतन्यरूप आहे. आकाशाला शास्त्रांत उत्पत्ति सांगितली आहे.

**'आत्मन आकाशः संभूतः ।'**
**'एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ।**
**खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ '** इ.

—श्रुति

ब्रह्म हें आकाशाच्या उलट म्हणजे अज आहे. असा परस्परभेद असल्यामुळें आकाश हें ब्रह्म होऊं शकत नाहीं. ("आकाशस्तल्लिंगात्" ह्या ब्रह्मसूत्रावरील शारीरभाष्यांत आकाश व ब्रह्म यांतील भेदाचें आचार्यांनींही सुंदर विवरण केलेलें आहे.) वरवर पाहाणाऱ्यास दोन्ही सारखीं वाटलीं तरी त्यांत सूक्ष्म भेद आहे, तो सूक्ष्म बुद्धीनेंच ओळखला पाहिजे.

**" वस्तु** (ब्रह्म) **अचळ अढळ । वस्तु निर्मळ निश्चळ ।**
**तैसेंचि आकाश केवळ । वस्तूसारिखें ॥**
**आकाश** (आणि) **स्वरूपा कोण भेद । पहातां दिसती अभेद ।**
**आकाश वस्तुच स्वतःसिद्ध । कां न म्हणावी ॥...**
**सोनें आणि सोनपितळ । एकचि वाटती केवळ ।**
**परी पितळेसी मिळतां ज्वाळ । काळिमा चढे ॥...**
**तैसें आकाश आणि स्वरूप । पहातां वाटती एकरूप ।**
**परी दोहोंमध्यें विक्षेप[1] । शून्यत्वाचा[2] ॥**
**आहाच[3] पहातां कल्पनेसी । सारिखेंच वाटे निश्चयेंसी ।**
**परी आकाश-स्वरूपासी । भेद आहे ॥**
**उन्मनी आणि सुषुप्ति अवस्था । सारिखेंचि वाटे तत्त्वता ।**
**परी विवंचूनि पाहों जातां । भेद आहे ॥ "**

असें सांगून आकाशाला व स्वरूपाला पाहणेची खूण श्रीसमर्थ पुढील ओवींत सांगतात ; ती साधकांनीं सर्वांगाचे कान करून ऐकण्यासारखी आहे—

---

१ विघ्न अथवा भेद. २ आकाशाचे ठिकाणीं शून्यत्व आहे, ब्रह्म हें शून्याचें साक्षी आहे. ३ वरवर ( खोल विचार न करितां ).

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**“ आकाश वेगळेपणें पहावें । स्वरूपीं स्वरूपचि व्हावें ।**
**वस्तूचें पहाणें स्वभावें । ऐसें असे ॥ ”**

—दासबोध, ८।६

आकाश हें आपणाहून निराळेपणानें पहावयाचें (म्हणजे पहातां येतें किंवा दिसतें), तसें स्वरूप हें निराळेपणानें पहावयाचें नाहीं अथवा पहातां येत नाहीं; तर तें आत्मत्वानें म्हणजे स्वरूपच आपण होऊन पहावयाचें आहे. ही रहस्यमय ओंवी किती मोलाची म्हणून सांगावी? परंतु हें

**“ संतसंगेंवीण नुमजे । कांहीं केल्या ॥**
**सकळ माया गाथा गोवी । संतसंगें हे उगवावी ।**
**पाविजे मोक्षाची पदवी । सत्समागमें ॥ ”** असो.

याप्रमाणें हा **भूताकाश** आणि **चिदाकाश** यांचा भेद लक्षांत आल्यानंतर मागच्या लेखांत सांगितल्याप्रमाणें त्या चिदाकाशाचा प्रकाश होण्यासाठीं म्हणजे अनुभव येण्यासाठीं शरीर, जिव्हा आणि मन यांना निर्व्यापार करण्याचा यत्न केला पाहिजे. सुषुप्तीमध्यें हीं तिन्ही निर्व्यापार असतात, तशीं जागृतींत केलीं पाहिजेत, म्हणजे ब्रह्मसुखाचा अनुभव येतो. सुषुप्तींत जीव त्या अमृतमय सुखाचा आस्वाद घेतो, पण त्या वेळीं भान नसल्यामुळें तें व्यर्थप्राय होतें. निद्रेंतून उठल्यानंतर ‘मी सुखानें निजलों होतों. मला कांहीं कळलें नाहीं’ असा निद्राकालीन सुख व अज्ञान यांचा अनुभव सांगतो (‘सुखमहं अस्वाप्सं न किंचिदवेदिषम्’) अर्थात् निद्रेमध्यें परमसुखाचा जीवाला भोग घडतो, म्हणून पूर्वी झालेल्या सर्व श्रमांचा त्याला विसर पडून तो सकाळीं ताजातवाना होऊन उठतो. रोग्याला देखील झोंप लागली तर तो हुषारींत येतो, आणि अशी झोंप रोग्याला न येईल तर डॉक्टरलोक त्याला झोंपेचें म्हणून औषध देऊन झोप आणतात. ही औषधाची झोप कृत्रिम असते. पण अशा कृत्रिम झोपेनें देखील रोग्याला किती विश्रांति वाटते बरें! व्याधि हटण्याला औषधाबरोबर झोपेचेंही साहाय्य होतें. सारांश, निद्रा ही जीवाला अंतर्गत अमृताच्या झऱ्याकडे पोंचविते. “ अद्वैत ब्रह्मसुख तेंची, जें चाखिसि निद्रेमाजीं ” असें पंचदशीकार म्हणतात. निद्रेमध्यें ब्रह्मसुखाचा नकळत भोग जीवाला कसा घडतो याची उपपत्ति जिज्ञासूंनीं पंचदशींत ‘ब्रह्मानंदांत योगानंद’ नामक अकराव्या प्रकरणांत पाहावी. येथें सांगण्याचें कारण एवढेंच कीं, हा ‘न कळत’ होणारा ब्रह्मसुखाचा भोग ‘कळत’ व्हावा म्हणून हें वृत्तिराहित्य, ही वृत्तिशून्य अवस्था (Wide-awake thoughtlessness) साधकांनीं जागृतींत साधण्याचा प्रयत्न करावा.

*****************************************

**निद्रेमाजिं जसा निवृत्त असमी, जागेपणीं हो तसा ।**
**आनंदांत मुरोनि विस्मृति न घे, रक्षी सुखात्मा-ठसा ॥ "**

—श्रीबांदकरमहाराजकृत ' स्वात्मतत्त्वामृतशतक '

* * * *

## तूर्यावस्थेचा अनुभव व अभ्यास

जागृतींतील निद्रा म्हणजे वृत्तिशून्य अवस्था, हिलाच तूर्या अथवा महाकारण देह म्हणतात. याच देहामध्यें अथवा अवस्थेमध्यें आत्मसाक्षात्कार घडतो. **प्रत्येक मनुष्य तूर्यावस्थेंत वारंवार जात असतो**; पण त्याचें त्याला भान राहात नाहीं. एक वृत्ति उठून नाहींशी झाली व दुसरी अद्याप उठली नाहीं अशी जी स्थिति म्हणजे दोन वृत्तींमधील संधि, एका पदार्थावरील दृष्टि काढून दुसऱ्या पदार्थावर नेण्याच्यामधील जी स्थिति त्याचप्रमाणें जागृति व निद्रा यांमधील स्थिति, अथवा दोन श्वासांच्या मधील स्थिति, ह्या स्थिति अथवा संधि यांना तूर्यावस्था अथवा अमनस्कभाव म्हणतात. ( वृत्तिसंधि, अवस्थासंधि, पदार्थसंधि, श्वाससंधि, इत्यादि संधींच्या वेळीं सावध म्हणजे जागरूक राहिलें पाहिजे. असा राहतो त्यालाच जीवन्मुक्तीचा अनुभव येतो. ) एका अलंकाराचा दुसरा अलंकार बनवावयाचा असेल तर तो पहिला मोडल्याशिवाय दुसरा करितां येत नाहीं; अर्थात् दुसरें रूप येण्यापूर्वी त्याला आपल्या मूळच्या शुद्ध रूपांतच जावें लागतें. तसेंच वृत्तीनें एक विषय सोडून दुसरा धरण्यापूर्वी तिला शुद्ध अधिष्ठानस्वरूपांत जाऊन बुडी देऊन वर यावें लागतें. हें शुद्ध रूपांत जाणें म्हणजेच संधिप्रकाशरूप तूर्यावस्थेंत जाणें होय. त्याचें जीवाला ज्ञान असत नाहीं इतकेंच. येथेंच सर्वांचें चुकतें. मागें सांगितलेल्या मायेच्या अथवा अविद्येच्या ज्या दोन शक्ति—**आवरण** आणि **विक्षेप** ( पृ १४८ ) त्या आवरणांतही दोन प्रकार आहेत; एक ' असदात्मक ' आवरण व दुसरें ' अभानात्मक ' आवरण[१]. पैकीं असदात्मक आवरण म्हणजे ब्रह्म अथवा आत्मा

---

१ अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकनिवृत्ति व निरंकुशातृप्ति अशा जीवाच्या सात अवस्था आहेत. पैकीं पहिल्या तीन बंधाला हेतु व पुढील चार मोक्षास हेतु आहेत. आवरणांतही असदावरण व अभानावरण असे दोन भेद आहेत. असदावरण हें श्रवणमननजन्य परोक्षज्ञानानें व अभानावरण हें निदिध्यासजन्य अपरोक्षज्ञानानें नाहींसें होतें. असें झालें म्हणजे कर्तृभोक्तृरूप संसारशोकाची निवृत्ति होऊन, अद्वयानंदलक्षणात्मक प्रत्यग्बोधानें नित्यमुक्तत्व स्फुरूं लागून जीवाला कधींहि नाश न पावणारी अशी निरंकुशातृप्ति प्राप्त होते. —पंचदशी, तृप्तिदीप प्रकरण

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

नाहींच असें वाटणें, तें तत्त्वज्ञ पुरुषांच्या मुखांतून सच्छास्त्राचें श्रवण व मनन केल्यानें नाहींसें होतें; व अभानात्मक आवरण हें अभ्यासानें म्हणजे निदिध्यासानेंच नाहींसें होतें. असा हा आवरणभंग झाला म्हणजे अभानाचें 'भान' झालें कीं, काम आटोपलें. हें चिद्भान म्हणजेच चिदाकाश. याचा प्रत्यय येण्याकरितांच वृत्तिराहित्याचा अभ्यास केला पाहिजे. यालाच तूर्येचा अभ्यास म्हणतात. खालील श्लोक साधकांनीं कंठगत करावा.

> **" जें भान भावविरहीत असे सदा जें ।**
> **निष्कंप निष्क्रिय निरंतर जें विराजे ॥**
> **तें शुद्ध मीच समजोनि त्यजा वियोगा ।**
> **साधा भजा नमुनि सद्गुरुराज योगा ॥ "**

—श्रीनारायणमहाराज जालवणकर

हें भान म्हणजे वृत्ति ज्या ज्ञानावर उठतात तें ज्ञान. याला शुद्धज्ञान, केवलज्ञान, वृत्तिविरहितज्ञान, ज्ञप्ति, चिति इत्यादि नावें आहेत. वरील श्लोकांत जें 'भावविरहित भान' म्हटलें आहे, त्याचा अर्थ 'वृत्तिरहित ज्ञान' असा समजावा. हें निष्कंप व निष्क्रिय म्हणजे अखंडैकरस चैतन्य, 'एकं-नित्यं-विमलं-अचलं' अशा तऱ्हेचें आहे. ह्या वृत्तिरहित ज्ञानाचा साक्षात्कार झाला म्हणजेच 'पूर्ण समाधान' प्राप्त होतें; एरव्हीं नाहीं. श्रीसमर्थ म्हणतात—

> **वृत्तिरहित जें ज्ञान । तेंचि पूर्ण समाधान ।**
> **जेथें तुटे अनुसंधान । मायाब्रह्मींचें ॥ "**

—दासबोध, ७।५

हें वृत्तीचें अधिष्ठानरूप ज्ञान वृत्तीच्या पूर्वी आहे, वृत्तीच्या वेळीं म्हणजे वृत्तींत अनुस्यूत (मण्यांमध्यें जसें सूत) व वृत्तीच्या अंतीं (वृत्तिनाशानंतर) ही आहेच आहे. हें जें वृत्तिरहित शुद्धज्ञान तेंच आपलें निजस्वरूप आहे, ह्या आपल्या स्वरूपाचा आपणास कधीं तरी वियोग आहे काय? व तो होईल तरी कसा? कल्पनेच्या काहुरामुळें वियोग भासतो. तें काहूर शांत झालें, कीं आत्मप्रकाश सहज आहेच आहे. हें काहूर शांत करण्याकरितांच इंद्रियमनोजयादि साधनें आहेत. ह्या साधनांनीं व सारासारविचारयोगानें ज्यानें आपल्या समस्त वासनांचा उपशम केला, त्याला परमात्मा दूर नाहीं.

**“ तया स्वान्तःकरणजिता । सकळ कामोपशांता ।**
**परमात्मा परौता । दूर नाहीं ॥**
**जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये ।**
**तैसें जीवाचें ब्रह्म होये । संकल्पलोपीं ॥ ”**

— ज्ञानेश्वरी, अ. ६

**“ नदी उगमीं स्थिरावे । तरी सिंधुपण कां न पावे ।**
**तैसें जीवाचें ब्रह्म कां नोहे । या स्थिति राहतां ॥ ”**

— परमामृत

येथें ‘ नदी ’ म्हणजे इंद्रियद्वारा बाहेर जाणारी अंतःकरणाची वृत्ति, ‘ उगमीं ’ म्हणजे आपल्या उगमस्थानांत ( वृत्त्यधिष्ठानरूप चैतन्यांत ) च स्थिरावली तर तिला ‘ सिंधुपण ’ म्हणजे ब्रह्मत्व कां येणार नाहीं, असा याचा अर्थ आहे. वृत्ति आपल्या अधिष्ठानाकडे वळली म्हणजे कल्पना थांबलीच. यालाच श्रीज्ञानराजांच्या भाषेंत ‘ संकल्पलोप ’ म्हणतात. असा संकल्पांचा लोप झाला कीं जीवाचें, निजस्वरूप प्रगट होतें. यालाच ‘ जीवाचें ब्रह्म होणें ’ म्हणतात. ब्रह्माचा सदंश व चिदंश थोड्याशा श्रमानें – संतसद्गुरुमुखानें सच्छास्त्राचें श्रवण होऊन परोक्षज्ञान निःसंशयपणें झालें म्हणजे – अनुभवास येतो ; तसा आनंदांश प्रत्ययाला येत नाहीं. चित्स्वरूपाच्या एकाग्रध्यानानें वृत्तीचा विराम जसजसा होत जाईल, तसतसा हा आत्मानंद अनुभवास येऊं लागतो; व तो आला म्हणजेच कृतकृत्यता लाभते.

**“ वश होतां तें मन । राहतां वृत्तीचें चिंतन । अनुभवा**
**ये आनंदघन । जें ‘ सुख आत्यंतिक ’ बोलिलें यामागें ॥ ”**

— यथार्थदीपिका, अ. ६।५१९

**“ तया सुखाचेनि समरसें । पावे सुलीन दशे ।**
**तें बोलावें कैसें । अनुभवी जाणती ॥**
**अहंता स्वरूपीं गळे । विषयतृष्णा मावळे ।**
**इंद्रियांचे लळे । क्रियेवीण पूर्ण होती ॥**
**महासुखाचे अरुवारीं । आलिंगी स्वानुभूति सुंदरी ।**
**ज्ञानमात्र इयापरी । स्वस्वरूप भोगी ॥**
**सदा स्वानंदाचे सोहळे । विषयविजाती वितळे ।**
**स्वरूपसुखाचेनि मेळे । इंद्रियां तृप्ति ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**खुंटलें मनाचें जाणणें । तें सुख अनुवादावें कवणें ।**
**हें अनुभवी तोचि जाणे । इतरां टकमक ॥ ”**

याप्रमाणें श्रीमुकुंदराजांनीं आपल्या ‘ परमामृत ’ नामक ग्रंथांत ( द्वादश प्रकरणांत ) या सुखाचें वर्णन केलें आहे. यांतील ‘ इंद्रियांचे लळे क्रियेवीण पुरती ’; ‘ स्वरूपसुखाचेनि मेळें । इंद्रियां तृप्ति ’ हे शब्द साधकांनीं थोडे अधिक लक्षांत ठेवावे. श्रीएकनाथमहाराजांनींही या सुखाचें वर्णन खालीलप्रमाणें केलेलें आहे.

**“ तेथ देहींचें गेलें देहपण । जन्ममरणा आलें मरण ।**
**विश्वाचें न दिसे भान । आनंदघन कोंदला ॥**
**तेणें सुखस्वरूप जाली दृष्टि । आनंदमय जाली सृष्टि ।**
**परमानंदें चढली पुष्टि । स्वानंदें मिठी घातली ॥**
**त्या सुखाची मर्यादा । कासयानें नव्हे कदा ।**
**जेथ मौन पडिलें वेदां । वृत्ति तत्पदा पावली ॥**
**द्वैत सर्वथा नाहीं पुढें । यालागीं वृत्तीची वाढी मोडे ।**
**तेव्हां तेही ( वृत्ति ) सुखस्वरूपीं बुडे । पुढें वाढे तें नाहीं ॥...**
**दीपीं दीपु एकवटला । मिळणीं एकूचि होऊनि ठेला ।**
**तैसा वृत्तीचा लयो झाला । निर्व्यंग पावला निजसुख ॥ ”**

—एकनाथी भागवत, अ. १०

अशा तऱ्हेनें वृत्तीचा लय आत्मस्वरूपांत होऊन निजानंदाची प्राप्ति झाल्यानंतर त्या साधकाचे ठिकाणीं बाह्य चिन्हें कोणतीं उमटतात याचें वर्णन नाथांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे—

**“ चित्तचैतन्या पडतां मिठी । सुटतां लिंगदेहाची गांठी ।**
**नेत्रीं अश्रूंचा पूर दाटी । रोमांच उठी सर्वांगीं ॥**
**जीवभावाची दशा आटे । अनिवार बाष्प कंठीं दाटे ।**
**कांहीं केल्या शब्द न फुटे । पूर लोटे स्वेदाचा ॥**
**नेत्र झाले उन्मीलित । पुंजाळले जेथींचे तेथ ।**
**विस्मयाचें भरतें येत । वोसंडत स्वानंदें ॥ ”**

—एकनाथी भागवत, अ. ११

( श्रीज्ञानराजांचे उद्गार मागें पृ. १२६ वर दिलेच आहेत. )

हें 'आत्यंतिक सुख' त्यालाच प्राप्त होतें कीं, ज्याचें मन प्रशांत म्हणजे अतिशय शांत **वृत्ति**रहित झालें आहे. रजतमात्मक वृत्तीचें कल्मष नसलेलें, ब्रह्मस्पर्शजनित असें हें सुख आहे.

**" कीं ब्रह्मस्पर्शजनित । जें योगसुख अत्यंत ।**
**तें अनायासें त्याचें चित्त । अनुभवूं लागे ॥ "**

— यथार्थदीपिका, अ. ६।५३९

यांतील 'ब्रह्मस्पर्शजनित' (मूळ श्लोकांतील 'ब्रह्मसंस्पर्श') हा शब्द लक्षांत ठेवण्यासारखा आहे. वृत्तीनें ब्रह्माला स्पर्श केल्यानंतर जें सुख होतें तें, असा त्याचा अर्थ आहे. हें सुख साधननिरपेक्ष म्हणजे 'अयत्नसिद्ध' व आत्मभूत (ब्रह्मभूत) असल्यामुळें अक्षय्य आणि आत्मैकवेद्य आहे.

सुख, आणि यत्नावांचून, हे शब्दच ऐकून सामान्य लोकांना आश्चर्य वाटेल. कारण विषयभोगावांचून सुख नाहीं व यत्नाशिवाय विषयांची प्राप्ति नाहीं, अशी त्यांची समजूत असल्यामुळेंच रात्रंदिवस विषयप्राप्तीकरितां सर्वांची एकसारखी धडपड चाललेली आहे. जेवणाचें ताट वाढून आणून पुढ्यांत ठेवलें तरी, त्यांतील घास उचलून तोंडांत घालणें व दांतांनीं चावून तें गिळणें एवढी खटपट तरी केली पाहिजे. असें असतां साधनाची म्हणजे यत्नाची अपेक्षा नसलेलं अर्थात् अकृत्रिम अथवा सहज, त्यांतही आत्यंतिक म्हणजे अनुपमेय किंवा अमर्याद असें सुख म्हणतात, हें काय गौडबंगाल आहे, असें त्यांना वाटणें साहजिक आहे. पण काय करणार ? तें शास्त्रसिद्ध व अनुभवसिद्ध आहे. सुषुप्तींत सर्वांना त्याचा प्रत्यय आहे. पण 'अतिपरिचयादवज्ञा' या वचनानुसार त्याचा विचार कोणी करीत नाहींत ! विषय आणि इंद्रियें यांच्या संयोगांतच सुख असतें अशी सर्वांची समजूत आहे. पण सुषुप्तींत मन व इंद्रियेंही नाहींत मग विषय कोठले ? असें असतां सुखाची अनुभूति येते, हें सर्वांना प्रत्यक्ष आहे.

**" तदनुत्तमं अनुपमं नित्यं निरतिशयं साधनानपेक्षं अयत्नसिद्धं अक्षय्यं आत्मभूतं आत्मैकवेद्यं ब्राह्मं सुखमुपैति । तदा प्राप्नोतीत्यर्थः । साधननिरपेक्षापारसुखाविर्भावः सुषुप्तौ सर्वप्रत्यक्षः ॥ "**

— भगवद्गीता, शंकरानंदिटीका, अ. ६।२७

( भावार्थ वर आलाच आहे. ) सक्तमजुरीची शिक्षा झालेल्या कैद्यांना त्यांच्या शरीरपोषणाकरितां राजा जसें अन्न देतो, त्याप्रमाणें परमेश्वर संसारांतील कर्मबद्ध जीवांना कृपाळूपणें हें सुषुप्तिसुख देत असतो, असें समजावें. किंबहुना, निर्विषय सुखाची जीवांना कल्पना यावी व त्यांनीं त्याकडे वळावें, म्हणून परमेश्वरानें सुषुप्तिसुख ही ' सॅंपल बाटली ' म्हणून मोफत दिली आहे असें समजावें; व विषयलोलुपता कमी करून निर्विषयसुखाकडे, ब्राह्मसुखाकडे मनाला वळवावें आणि संसारसमुद्राला तरून जावें. त्या सुखाच्या अनुभवाशिवाय जीव संसारचक्रांतून सुटणार नाहीं हें खास समजावें.

**" जेथें नसे रज । तम तेथें नसे सहज ।**
**तें सुख म्हणे ' शांतरज ' । संसारचक्रापलीकडे ॥**
**अनुभविलें तें सुख । तो संसारचक्राचें न पाहे मुख । "**

—यथार्थदीपिका, अ. ६

* * * *

## अद्वैतानुभवाचें साधन व स्वरूप !

वर सांगितल्याप्रमाणें अद्वयानंदाचा अनुभव, अंतर्मुख होऊन प्रत्यग्वृत्तीचा अभ्यास केल्यानें येत असतो. या अभ्यासाला व्यतिरेकयोगाचा अभ्यास म्हणतात. व्यतिरेक दृढ झाल्यानंतर मग अन्वयाचा अभ्यास केला पाहिजे. कारण त्याशिवाय पूर्णता अथवा अखंडता नाहीं. अन्वयानेंच जीवन्मुक्ति लाभते हें मागें सांगितलेंच आहे. कित्येक साधु बारा बारा वर्षें फक्त व्यतिरेकाच्या अभ्यासांत घालवितात. कारण व्यतिरेक शुद्ध चोखाळला म्हणजे अन्वय सुलभ होतो. प्रथम व्यतिरेकानें आपलें शुद्ध स्वरूप जाणावयाचें, मग तें चराचरांत पहावयाचें. शुद्ध स्वरूप जाणलेंच नाहीं, तर चराचरांत तें पाहतां कसें येईल ? दुसरी गोष्ट, शुद्ध स्वरूप अंतःकरणांत जाणलें, पण चराचरांत तें दिसूं लागलें नाहीं, तर द्वैत शिल्लक राहिलेंच. डोळे झांकून बसेपर्यंत अद्वैत व डोळे उघडतांच द्वैत दिसूं लागलें, तर तो जीवन्मुक्त कसा होईल ?

**" आधीं उदक ओळखावें** ( व्यतिरेकानें ) **। मग तें तरंगांत लक्षावें** ( अन्वयानें ) **।** ( तसें ) **आधीं व्यतिरेकें जाणावें** ( स्वरूप ) **। मग चराचरीं पहावें तें सर्व ॥......**

**परंतु उघडूनि नेत्र । देखेल जेव्हां जग विचित्र ।**
**तेव्हां प्रपंच सर्वत्र । दिसों लागेल साचसा ॥**
**हें तों योगीच अद्वैत । डोळे उघडितां दिसे द्वैत ।**
**तेव्हां न म्हणवे निश्चित । जीवन्मुक्त त्यालाही ॥ "**

—यथार्थदीपिका, अ. ६

भगवंतांनीं गीतेंत 'अभ्यास' योगाच्या ६ व्या अध्यायांत **आरुरुक्षु** व **योगारूढ** यांचीं लक्षणें सांगून, बुद्धिग्राह्य व अतींद्रिय अशा 'आत्यंतिक सुखाचें' स्वरूप व अभ्यासक्रम (श्लोक २८ पर्यंत) सांगितला. पण हें 'शांतरजस्, अकल्मष, ब्रह्मसंस्पर्शजन्य आत्यंतिक सुख' हें सर्व व्यतिरेकज्ञानाचें लक्षण अथवा स्वरूप असल्यामुळें, त्याचा अन्वयज्ञानांत पालट झाल्याशिवाय पूर्णता नाहीं, हें दर्शविण्याकरितां

**" सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ "**

हा २९ वा श्लोक सांगितला. सर्वभूतांत आत्मा व आत्म्यांत सर्व भूतें पहाणें हेंच 'समदर्शन' होय. येथें आत्म्यांत सर्व भूतें व सर्वभूतांत आत्मा या शब्दानीं, सर्व घटांत आकाश व आकाशांत सर्व घट हा दृष्टांत, किंवा नदींत पुष्कळसे घट बुडवून ठेवले असतां पाण्यांत घट व घटांच्या आंतबाहेर पाणी, हाही दृष्टांत घेतां कामा नये. कारण या दृष्टांतांनीं द्वैतच सिद्ध होतें. करितां हे दृष्टांत न घेतां तरंगांत जळ व जळांत नाना तरंग अथवा समुद्रांत गारा या दृष्टांताप्रमाणें चराचर विश्वांत आत्मा भरला आहे असें जाणावें, तरच द्वैताची हानि होऊन अद्वैत सिद्ध होईल.

**" आत्मा सचराचरीं । जळ जैसें तरंगांभीतरीं ।**
**चराचर त्यांत जैशा लहरी । एका जळांत ॥ ...**
**तेव्हां सर्व गारांतही । नसे जळावांचूनि कांहीं ।**
**त्या समुद्रीं गारा असूनिही, नाहीं । द्वैत गाराजळांस ॥**
**हे अद्वैताची स्थिति । बाणे त्यास अन्वययोग म्हणती ।**
**अन्वयसमाधिनिष्ठ मति । त्या योगियाची ॥...**
**एवं चाले बोले उठे बैसे । तरी अन्वयसमाधि लागला असे ।**
**कीं जडचैतन्य ऐक्यांत समरसे । मानस त्या योगियाचें ॥......**

**जळ आणि तरंग । यांचा आयता असे योग ।**
**त्या योगीं होतां दृष्टिसंयोग । जळ तरंगीं, तरंग जळीं दिसती ॥**
**तैसा आत्माच सकळ । परि चित्त विषयभावें विकळ ।**
**तें त्या (व्य.) योगें निश्चळ । तो 'योगयुक्तात्मा' म्हणावा ॥...**
**एवं 'व्यतिरेकयोग'। (म्हणजे) ज्या योगीं वृत्तीचा वियोग ।**
**हा[1] 'अन्वययोग-' ही श्रीरंग । वर्णी त्याचा ॥**
**व्यतिरेक-समाधींत बैसे । तरी प्रारब्धीं शरीर असे ।**
**प्रपंचीं वर्ततांही गवसे । आत्माच सर्वत्र ॥...**
**एवं निरोधितां वृत्ति । अनावर होऊं लागती ।**
**तेव्हां कल्पूनि जगदाकृति । सर्वत्र आत्मा पहाया ॥**
**जरी अभ्यास ऐसा असे । तरी कल्पनेंत आत्मा गवसे ।**
**मागुती मन स्वरूपीं समरसे । निरोध वृत्तीचा मागुती ॥"**

—यथार्थदीपिका, अ० ६

शेवटच्या ओंवींतील 'ऐसा अभ्यास' म्हणजे वृत्तिनिरोध करणेचा, करीत असतां (व्यतिरेकसमाधीसाठीं अंतर्मुख होऊन आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं वृत्तीची एकाग्रता करीत असतां) अंतर्गत वासनांमुळें वृत्ति अनावर होऊं लागल्या तर, परमात्म्याच्या रामकृष्णादि आकृतींपेक्षां परमात्म्याच्या जगदाकृतीची कल्पना करून सर्वत्र त्याला पहावें. **'एकांतभक्तिर्गोविंदे यत्सर्वत्र तदीक्षणम्'** या भागवतांतील (सप्तम स्कंध) श्लोकांत हाच अन्वययोग सांगितला आहे. सर्वत्र त्याला पहाणें हेंच एकान्तभक्तीचें लक्षण त्यांत वर्णिलें आहे. मनाची स्थिरता होण्याकरीतां त्याला मूर्तीचें अथवा तिच्या एखाद्या अवयवाचें किंवा बिंदूचें अगर आपल्या शरीरांतील षट्चक्रांपकीं एखाद्या स्थानाचें-भ्रूमध्य, नाभि, हृदय, नेत्रांतील बाहुली इत्यादीचें —एकसारखें ध्यान करण्यास लावणें याला 'एकाग्र' करणें म्हणतात; त्याचप्रमाणें जगांतील अनंतानंत वस्तूंत भगवदीक्षण (भगवद्भावना) करणें म्हणजे **सर्व वस्तूंत एकाच भगवद्रूपाचें अग्र मनाला दाखवीत राहणें यासही एकाग्र करणें म्हणतात. खरी एकाग्रता ती हीच.** अनेक वस्तूंतील चित्त काढून एकाच वस्तूकडे लावणें या एकाग्रतेपेक्षां, अनेक वस्तूंत अखंड एकच वस्तु लक्षिणें हीच **खरी एकाग्रता** होय. पहिली एकदेशीय एकाग्रता ही थोड्याशाही

---

१. श्लोक २९ मध्यें सांगितलेला 'सर्वत्रसमदर्शन' हा.

कारणानें भंग पावूं शकेल, पण दुसरी एकाग्रता कशानेंही भंग पावणार नाहीं. हीच मागें (पृ. १५६) सांगितलेली 'बाह्य दृश्यानुविद्ध व बाह्यशब्दानुविद्ध सविकल्प समाधि' होय. 'आत्म्यावर उत्पन्न झालेली अनात्मबुद्धि व ब्रह्मावर झालेली जगद्बुद्धि निखालस नष्ट होईपर्यंत ह्या समाधीचा अभ्यास केला पाहिजे.' (पृ. १५७) ज्ञानी सर्व चराचरांत चैतन्य पाहतो व एकांतभक्तिसंपन्न भक्त सर्वांत भगवंतास पहातो, इतकाच भेद; परंतु वस्तुतः दोन्हीचें स्वरूप एकच.

*   *   *   *

## प्रपंच मिथ्या म्हणजे काय?

तर एकंदर दिसणारें जगत हें जगत् नसून ब्रह्म आहे असें पहाणें. नहून जड हें नश्वर म्हणजे नाशवंत, म्हणून मिथ्या नव्हे, ही खूण लक्षांत ठेविली पाहिजे. दुसरें **जड हें जड नसून चिन्मात्र आहे** असें ज्ञान झालें, तरी त्या ज्ञानाचें ध्यान केलं पाहिजे. कारण ध्यानावांचून, अनंत कालच्या दृढ संस्कारांमुळें चित्तांत असलेली 'विपरीत भावना' नष्ट होणार नाहीं. आणि ती नष्ट झाल्यावांचून नुसत्या शब्दज्ञानानें अविद्या नष्ट होणार नाहीं. या हेतूनेंच '**ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते**' म्हणजे ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ म्हटलेलें आहे. पुण्यपरिपाकवशात् श्रीहरिगुरुकृपेनें सम्यक् ज्ञान झालें तरी त्याचें जो ध्यान करीत नाहीं, त्यास '**कुयोगी**' असें म्हणतात. अशा कुयोग्यांना इंद्रादिक देव विघ्नें करतात व त्याला योगारूढ होऊं देत नाहींत. (**कुयोगिनो ये विहिताद्यन्तरायैः०**' या प्रमाणार्थ घेतलेल्या भागवतश्लोकावरील वा. पं. ची खालील टीका लक्षपूर्वक वाचावी.)

**"श्रीकृष्ण म्हणे उद्धवा। ज्ञानी होऊनि यत्न बरवा।**
**योगाकारणें न करी, तो म्हणावा। कुयोगी म्हणोनि॥**
**ऐसे जे कुयोगी। यत्न न करिती आत्मयोगीं।**
**देव घालिती विषयभोगीं। बळात्कारें तयांतें॥**
**देव विघ्नें करिती। विषयकामना नाना रीतीं।**
**देऊनियां चेववितो। होऊं न देती योगसिद्धीतें॥**
**ते देव इंद्रियाभिमानी। त्यांच्या इंद्रियांतें खवळूनि।**
**स्त्रीपुरुषांच्या इंद्रियांतें क्षोभवूनि। विघ्नें करिती कुयोगियांतें॥"**

—यथार्थदीपिका, अ. ६

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

हें वर्म लक्षांत घेऊन सत्साधकांनीं ध्यानाभ्यासांत तत्पर राहिलें पाहिजे.

**" देहबुद्धिचा निश्चयो ज्या ढळेना। तया ज्ञान कल्पांतकाळीं कळेना।**
**अहंभाव ज्या मानसींचा विरेना। जुनें ठेवणें मीपणें त्या कळेना॥**
**मना गूज रे तूजला प्राप्त झालें। तरी पाहिजे अंतरीं यत्न केले॥ "**

असें श्रीसमर्थहि मोठ्या कळकळीनें सांगतात. फक्त आत्मानात्मविचार कळला, तेवढ्यावरच जो तृप्त होऊन राहील, त्याची अविद्या कधींहि जाणार नाहीं. सर्वात्मक ज्ञानानंतर त्याच्या ध्यानानें चित्तामधील जडत्वसंस्कार नाहींसे करून ते चिदाकार केले पाहिजेत. तेव्हांच कृत्यकृत्यता प्राप्त होईल. तात्पर्य—

**" तंतूचि पट। मातीच घट।**
**ब्रह्मचि ऐसें निपट। प्रपंचीं दिसे, तरी (तरच) मिथ्या प्रपंच॥**
**नसोनि ऐसा अनुभव। कोणी दाविती युक्तिवैभव।**
**कीं जडीं नश्वरत्व-स्वभाव। मिथ्या म्हणावें याकरितां॥...**
**अलंकार झाला हातें। हातेंचि मोडावें त्यातें।**
**तैसें विश्व काळेंचिकरूनि होतें। नासतें काळेंचिकरूनि॥**
**जों स्थितीचा काळ असे। तोंपर्यंत विश्व भासे।**
**सोनें दिसोनिही नग दिसे। तैसें ब्रह्म दिसोनिही दिसे सर्व॥**
**आणि मोडती अलंकार। सोनें न मोडे निर्विकार।**
**तैसें मोडे घडे चराचर। शाश्वत असे ब्रह्मत्व॥**
**आतां घडे आणि मोडे। हेंही नलगे कनकाकडे।**
**कीं कनकत्व त्याचें न बिघडे। दधिपणें बिघडे जैसें दुग्धत्व॥...**
**एवं प्रपंच अनित्य। आणि ब्रह्म नित्य।**
**प्रपंच मिथ्या ब्रह्म सत्य। तथापि ऐक्य दोहींस॥**
**कळल्या इत्यादि युक्ति। बोलका बोलिला ऐशा उक्ती।**
**तरी न पावतो मुक्ति। जों अनुभव ऐसा होय ना॥**
**कीं अलंकारीं उघडें हेम। तैसें चराचरीं उघडें ब्रह्म।**
**दिसे तेव्हां ज्ञानी उत्तम। वाचाळ शब्दवादीच तोंवरी॥**
**ऐसें, ब्रह्म चित्स्वरूप। आणि जड प्रपंचरूप॥**
**या विपरीत लक्षणासही ऐक्य, । प्रताप करी श्रीगुरूचा॥...**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तंतूवांचूनि पट । मातीवांचूनि घट ।
न दिसती न असती निपट । जैसें मृगजळ तेजावांचूनि ॥
तैसें आत्मसत्तेवीण । कोणत्या जडें जाणावें जड कवण ।
चिदधिष्ठानीं विवर्तपण । ऐसें जडाचें ॥
एवं जितकें जडाचें रूप । तितकें असे स्वात्मस्वरूप ।
इंद्रियदृष्टीस विघरलें थिजलें तूप । बुद्धि-(रूप)-रसनेस रस एक ॥
परंतु माती घटीं उघडी । ऐसी आत्मसत्ता दिसे जडीं ।
तेव्हां या अनुभवीं बुडी । चित्त दे ॥ (परंतु)
हें अवघें युक्तिजाळ । गुरुकृपेनेंचि होय सफळ ।
तोंपर्यंत अत्यंत अकळ । जडीं देखणें चित्स्वरूप ॥"

—यथार्थदीपिका, अ. ६

* * * *

वर सांगितल्याप्रमाणें व्यतिरेक व अन्वयाभ्यासाच्या 'योगें हरिगुरुकृपेनें स्वानुभवसाक्षात्कार झाल्यानंतर तसा

## ज्ञानी व्यवहार करूं शकतो कीं नाहीं ?

कीं तो व्यवहारांत कुचकामाचा होतो ? अशी शंका उद्भवण्याचा संभव आहे. तिचें समाधान करणें क्रमप्राप्त झाल्यामुळें थोडेंसें करीत आहे. बहुतेकांची समजूत अशी असते कीं, प्रकाश व अंधार यांच्याप्रमाणें आत्मज्ञान व व्यवहार परस्परविरोधी आहेत. यथार्थ ज्ञानप्राप्ति (ब्रह्मप्राप्ति) झालेला मनुष्य देहस्थितीस शिवणार नाहीं. मग त्याच्या हातून कर्में कशीं घडावींत ? त्याचें थोडक्यांत उत्तर एवढेंच कीं, ज्ञान झाल्यानंतर प्रारब्ध[१] शेष उरतें व त्या प्रारब्धशक्तीनुसार त्याच्या देहाच्या क्रिया घडत राहतात. त्याचेकडून तसा व्यवहार घडला, तरी त्याला तो बाधक मात्र होत नाहीं. यासंबंधानें पंचदशीकारांनीं 'ध्यानदीप' प्रकरणांत चांगला उहापोह केला आहे. जिज्ञासु वाचकांसाठीं तो थोडक्यांत खालीं देतों—

एवं ध्यानैकनिष्ठोऽपि लेशाल्लौकिकमारभेत् ।
तत्त्वविक्त्वविरोधित्वात् लौकिकं सम्यगाचरेत् ॥

---

१ तैशी साचार वस्तुप्राप्ति । तो नातळे देहस्थिती ॥
तरी देह वर्ते कोणे रीतीं । तो प्रारब्धगतीचेनि शेषें ॥

—एकनाथी भागवत, अ. १३

ध्यानैकनिष्ठ पुरुषाचे संसारांतील व्यवहार कसे तरी म्हणजे वेठीनें होतात, तसे तत्त्ववेत्त्याचे नाहींत. व्यवहारास आणि ज्ञानास विरोध नसल्यामुळें त्याला व्यवहार उत्तम रीतीनें करतां येतो.

**मायामयः प्रपंचोऽयं आत्मा चैतन्यरूपधृक् ।**
**इति बोधे विरोधः को लौकिकव्यवहारिणः ॥ ८८ ॥**

सर्व प्रपंच मायामय म्हणजे मिथ्या आहे, आणि आत्मा चैतन्यस्वरूपी म्हणजे सत्य आहे, असा सम्यक्‌बोध झाल्यानंतर त्याला व्यवहाराचा अडथळा कसा येईल ? त्यावर अशी शंका येते कीं, प्रपंच हा मिथ्या आहे असा निश्चय झाल्यावर व्यवहार घडावा कसा ? त्याचें उत्तर असें कीं —

**अपेक्षते व्यवहृतिर्न प्रपंचस्य वस्तुताम् ।**
**नाप्यात्मजाड्यं किं त्वेषा साधनान्येव कांक्षति ॥ ८९ ॥**
**मनोवाक्कायतद्बाह्यपदार्थाः साधनानि तान् ।**
**तत्त्वविन्नोपमृद्गाति व्यवहारोऽस्य नो कुतः ॥ ९० ॥**

व्यवहार घडण्याला प्रपंच हा खरा आहे, आत्मा जड आहे, ही भ्रांति असलीच पाहिजे असें नाहीं; तर व्यवहार करण्याला त्याचीं जीं मुख्य साधनें आहेत, तीं असलीं म्हणजे झालें. मन, वाणी, शरीर आणि गृहक्षेत्रादि बाह्य विषय हींच व्यवहाराचीं मुख्य साधनें होत. ज्ञान झाल्यानंतर तीं नष्ट होतात असें कांहीं नाहीं. मग व्यवहार होण्यास अडचण कोणती ? लहान मुली बाहुल्यांचा खेळ खेळतात, बाहुल्या कांहीं माणसांसारख्या मनुष्य नव्हेत हें जाणत असूनही त्यांच्या लग्नाचा वगैरे सोहाळा किती थाटानें करितात ! नाटकांतील नट देखील आपली चर्या मिथ्या आहे असे जाणत असतांही कशी संपादणी करितात, हें सर्वांस माहीत आहेच. तात्पर्य, व्यवहार घडण्याला त्यांत सत्यत्वबुद्धि असलीच पाहिजे असें नाहीं.

ज्ञानी पुरुषाच्या हृदयांतील सर्व वासना ( देहबुद्धीच्या अभावामुळें ) नष्ट झाल्यानें, तो समाधि करो, किंवा कर्में करीत राहो, सर्वदा मुक्तच आहे. ज्याचें मन निर्वासन ( द्वैतसंस्काररहित ) झालें, तो कर्म करो किंवा संन्यास घेवो, समाधि करो किंवा जपजाप्य करीत राहो, त्याला त्यापासून कांहीं मिळवायाचें नसतें. ( इत्यादि पुढील विषय मूळ ग्रंथांतच पाहून घ्यावा. विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. )

*************************************************

**श्रीएकनाथ**महाराज आपल्या भागवताच्या टीकेंत अशा ज्ञानी पुरुषाच्या चर्येसंबंधानें सांगतात —

" हेतूवीण अनायासें । पुरुषासवें छाया असे ।
तेवीं सज्ञानासरिसें । देह दिसे मिथ्यात्वें ॥
जैसें गलित पत्र वारेनि चळे । तैसें देह वर्ते प्राचीनमेळें[1] ।
परी देहकर्माचेनि विटाळें । ज्ञाता न मैळे निजबोधें ॥
तो आचरो सकळ कर्मे । अथवा पिसा हो कां निभ्रमें ।
तेणें तेणें अनुक्रमें । जाण परिणमे प्रारब्धें ॥
तो चढो पालखी गजस्कंधीं । कां पडो विष्ठामूत्रसंधीं ।
ते ते प्रारब्धाची सिद्धी । जाण त्रिशुद्धि ज्ञात्यासी ॥
जेथ बाध्यबाधकता फिटली । सकळ अहं-अविद्या तुटली ।
' सहज समाधि ' त्या नांव झाली । हे संख्या केली सिद्धान्तीं ॥
ऐसी जे सैर समाधि[2] अवस्था । तोचि भोग भोगोनि अभोक्ता ।
कर्मे करोनि अकर्ता । जाण तत्त्वतां तो एक ॥
तो क्रिया-करण[3]-संयोगें । डुलत देखिजे विषयभोगें ।
परी समाधिमुद्रा न भंगे । भोगसंगें अलिप्त ॥
त्यासी स्त्री म्हणे माझा भर्ता । पुत्र म्हणे माझा पिता ।
शिष्य म्हणे स्वामी तत्त्वता । त्यांहूनि परता त्यांमाजीं वर्ते ॥...
रावो रानीं वशिन्नला[4]॥ त्या रानासी राजभोग आला ।
रानीं रावो राजत्वा[5] मुकला । मूर्खही या बोला न मानिती ॥
तेवीं पावोनि स्वरूपप्राप्ति । योगी प्रारब्धाच्या स्थिती ।
नाना कर्मे करितां दिसती । परी निजात्मस्थिति भंगेना ॥
स्वरूपावेगळें कांहीं एक । पूर्णासी उरलें नाहीं देख ।
समाधिव्युत्थानाचें मुख । त्यासंमुख येवों लाजे ॥
अर्जुना देवोनि समाधि । सवेंचि घातला महायुद्धीं ।
परी कृष्ण कृपानिधि । तटस्थ त्रिशुद्धी न करीच ॥

---

१ प्रारब्धाच्या योगानें. २ सहज समाधि. ३ इंद्रियें. ४ जाऊन राहिला. ५ राजेपणाला.

**एवं प्रारब्ध जंव असे । तंव मुक्ताचें देह वर्ते ऐसें ।**
**परी अहंममतेचें पिसें । पूर्वील्या ऐसें बाधीना ॥ ''**

—एकनाथी भागवत, अ. १३, श्लोक ३७ वरील टीका

**श्रीदत्त**परमात्म्यांनीं परशुरामास उपदेश करतांना ज्ञान्याच्या व्यवहारक्षमतेविषयीं फारच सुंदर रीतीनें सांगितलें आहे—

" आत्मस्वरूपानें असणाऱ्या ज्ञान्याला व्यवहारानें कांहीं बाध येतो कीं काय ? व्यवहारानें या ज्ञानाला बाध येत असेल, तर मग ज्ञान्यानें समाधींतच सदा राहावें असें म्हणतां येईल...सर्व व्यवहारच मुळीं ज्ञानाच्या आश्रयानें चालत आहे, तर तें ज्ञान त्यानें कसें बाधित होणार तें मला सांग. **ज्या स्वरूपावर जगत् भासमान होतें तें ज्ञान.** त्यावर संकल्पानुसार व्यवहार भासमान होतो. **निःसंकल्प अवस्थेंत एकवार त्या रूपाची बुद्धीला ओळख झाली, म्हणजे पुरुष बंधनिर्मुक्त होऊन कृतार्थ होतो.... सर्व विकल्परहित जें संवेदन तेंच आत्मस्वरूप होय**... ज्ञान्यांचा सर्व व्यवहारच ज्ञानस्वरूप (चिन्मय) असतो. तेव्हां आदर्शातील प्रतिबिंबरूप असलेल्या या व्यवहारानें ज्ञान्याला पुनः भ्रांति होण्याचा संभव काय ?...ज्ञानाच्या योगानें अज्ञानजन्य असें जें असेल त्याची मात्र निवृत्ति होईल खरी, पण निराळ्या दोषानें कांहीं उत्पन्न झालें असल्यास ज्ञान झाल्यानें त्याचा नाश कसा होणार ? पहा कीं, तिमिररोग झालेल्या पुरुषाला दिसणाऱ्या दोन पदार्थांत खरा एकच आहे हें कळतें, पण पहातांना त्याला ते दोनच दिसतात. कारण एकाचे दोन दिसणें हा अज्ञानाचा परिणाम नसून तो एक नेत्रदोष आहे. मग तो ज्ञान झाल्यानें कसा दूर होईल ? त्याप्रमाणें हा जगदाभास जीवांच्या कर्मरूप दोषांमुळें उत्पन्न झालेला आहे, म्हणून कर्माचा नाश होईपर्यंत व्यवहार बंद राहणें शक्य नाहीं. कर्म लय पावतांच एकच अद्वयचैतन्य शेष राहतें. परशुरामा, **व्यवहारामुळें ज्ञात्यांना भ्रांति होण्याचा अगदीं संभव नाहीं.** "

—श्रीदत्तभार्गवसंवाद, प्रकरण २२ वें. *

---

* महाशय बाळकृष्ण भाऊ जोशी, ज्ञानविलास छापखान्याचे मालक पुणें, यांनीं केलेलें हें पुस्तक, अद्वैत सिद्धांताचे उच्च सिद्धांत मांडणारें व कादंबरीसारखें अत्यंत मनोरंजकही असल्यामुळें मुमुक्षु व साधक यांनीं तें अगत्य वाचावें अशी मी मनःपूर्वक शिफारस करतों. यांचीं वेदान्तावरील इतर पुस्तकेंही एकापेक्षां एक चांगलीं वठलीं आहेत, तीं मुमुक्षूंनीं वाचूनच पाहिलीं पाहिजेत, म्हणजे त्यांचें महत्त्व समजेल.

*******************************************

आतां एवढें मात्र ध्यानांत ठेवावें कीं, ज्ञात्यास व्यवहार बाधत नसला तरी साधकास व्यवहार बाधतोच. याकरितां

**" साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाह्य ॥ "**

ह्या वचनाप्रमाणें सत्साधकांनीं शक्य तितकी व्यवहाराची उपाधि कमी करून साधनाभ्यासाकरितां एकांताचें सेवन करीत रहावें म्हणजे बरें.

**" अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा । "**

**" जयास एकांत मानला । अवघ्यांआधीं कळे तयाला । "**

ही दासबोधांतील समर्थांचीं वचनें लक्षांत ठेवावीं. ' **विविक्तदेशसेवित्वं अरतिर्जनसंसदि** ' हें गीतामाउलीनें सांगितलेलें ज्ञानसाधन तर जगप्रसिद्ध आहे. याचेवरील श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें भाष्य वाचावें —

**" आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें ।**
**आवडतीं कपाटें । बसवूं जया ॥**
**बहू एकांतावरी प्रीति । जया जनपदाची खंती ।**
**जाण मनुष्याकारें मूर्ति । ज्ञानाची तो ॥ "**

— ज्ञानेश्वरी, अ. १३

हीं संत महानुभावांचीं वचनें लक्षांत ठेवावीं व आपल्या साधनाभ्यासास अडचण न येईल, अशाच धोरणानें आपलीं व्यवहाराचीं सूत्रें आपण बांधून ठेवावीं. आपलें पारमार्थिक ध्येय पदरांत पडेतोंपर्यंत, साधकानें जनसंसर्गापासूनच व घरच्याही व्यवहारापासून शक्य तितकें अलिप्त राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ध्येय पदरांत पडल्यानंतर मग हवा तो व्यवहार, जो प्रारब्धानें वांट्यास येईल तो, करणेस हरकत नाहीं. तो त्याला बाधक होणार नाहीं. पण ज्ञात्यानें अमुकच कार्य केलें पाहिजे असें निबंधन मात्र त्याजवर लादण्याचा कोणास अधिकार नाहीं. फार काय सांगावें, वेदही त्याला नियामक होऊं शकत नाहीं, मग इतरांची काय कथा ?

**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते । "**

— भगवद्गीता

* * * *

## पुनश्च सर्वात्मभाव व गुरुकृपा !

मागच्या लेखांमधून अनेक ठिकाणीं पुनरुक्ति झाल्याचें वाचकांना आढळून येईल. ब्रह्मानंद अथवा स्वानंद-साक्षात्कारावांचून मोक्ष नाहीं ; व्यतिरेकज्ञान झालें

तरी अन्वयज्ञानावांचून जीवन्मुक्ति नाहीं; जितेंद्रिय झाल्यावांचून अतींद्रिय सौख्य लाभणार नाहीं व अतींद्रिय सौख्याच्या लाभावांचून प्रकृतिबंधनांतून अर्थात् महद्दुःखदायक जन्ममरणाच्या परंपरेंतून सुटका नाहीं; इंद्रियद्वारांनीं बहिर्मुख वाहणारा वृत्तीचा प्रवाह रोकून तिला आत्मस्वरूपीं स्थिर केल्यावांचून अतींद्रिय सौख्याचा अनुभव येणार नाहीं; वृत्ति अथवा कल्पना ह्या दृश्य आहेत, जड आहेत, त्यांना पाहणारा म्हणजे ओळखणारा अथवा प्रकाशिणारा आत्मा हा द्रष्टा (साक्षी) चैतन्यस्वरूप आहे, हें जाणून चित्त चिन्मय करण्याचा अभ्यास केला पाहिजे; त्यानेंच आवरणभंग होतो; व्यतिरेकज्ञानानें आवरणनाश व अन्वयज्ञानानें विक्षेपनाश; अन्वयज्ञानानें (सर्वात्मज्ञानानें) जीवन्मुक्ति प्राप्त होते; हें सर्वात्मज्ञान म्हणजे अंतरांतील दृश्य व बाहेरील दृश्य हें जड नसून सर्व चिन्मात्र आहे असा निश्चय हीच ज्ञानाची अवधि म्हणजे सीमा होय; पण नुसत्या शब्दज्ञानानें कार्यभाग कधींच होणार नाहीं, त्यास अनुभवज्ञानच पाहिजे; असा अनुभव गुरुकृपेवांचून मिळणार नाहीं. इत्यादि विचार अनेक ठिकाणीं ओघानुसार पुनः पुनः आलेले दिसतील. पण ते वायफळ न मानतां दाढर्याकरितांच आहेत असें समजल्यास आनंद होईल. श्रीसमर्थ म्हणतात —

**"कोणी एकें श्रवणमनन । केलेंचि करावें ॥**
**कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ।**
**विवरलेंचि विवरावें । पुनः निरूपण ॥**
**तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें ।**
**कां जें बिघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥**
**सेविलेंचि सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन ।**
**तैसें श्रवणमनन । केलेंचि करावें ॥"** — दासबोध

**श्रीसुरेश्वराचार्य** दक्षिणामूर्ति स्तोत्रावरील आपल्या 'मानसोल्लास' नामक टीकेंत असेंच म्हणतात —

**पौनरुक्तं न दोषोऽत्र शब्देनार्थेन वा भवेत् ।**
**अभ्यासेन गरीयस्त्वमर्थस्य प्रतिपाद्यते ॥**

"Repetition in word or sense can be no fault here (in this Shastra). Frequent reiteration only shows how momentous the theme is."

सारांश, पुनरुक्ति हा येथें दोष मानतां नये. असो.

श्रीमच्छंकराचार्यांनीं अद्वैतसिद्धान्तप्रतिपादक अनेक लहान मोठे **ग्रंथ केले** आहेत, त्याचप्रमाणें अनेक देवतांवर अनेक स्तोत्रें रचिलीं आहेत, **पण त्या** सर्व स्तोत्रांत आचार्यांच्या संप्रदायांत 'दक्षिणामूर्तिस्तोत्र'च प्रामुख्यानें **मानलें** जातें, हें संप्रदायवेत्त्या पुरुषांना सांगणें नकोच. हें स्तोत्र मंत्रमय आहे. या स्तोत्रांत अद्वैतसिद्धांताचीं मूलभूत तत्त्वें फारच थोडक्यांत व सुंदर रीतीनें सांगून दिलीं आहेत. **सर्वात्मत्वभावना हीच ज्ञानाची पूर्णता** त्यांत प्रतिपादिली आहे. या स्तोत्राची फलश्रुति सांगतांना ते म्हणतात (शेवटच्या १० व्या श्लोकांत)—

**"सर्वात्मत्वमिति स्फुटीकृतमिदं यस्मादमुष्मिन् स्तवे**
**तेनास्य श्रवणात्तदर्थमननाद्ध्यानाच्च संकीर्तनात् ।**
**सर्वात्मत्वमहाविभूतिसहितं स्यादीश्वरत्वं ततः**
**सिद्ध्येत्तत्पुनरष्टधा परिणतं चैश्वर्यमव्याहृतम् ॥"**

**भावार्थ :** या स्तोत्रांत सर्वात्मत्व म्हणजे 'विश्व ब्रह्मचि ठेलें' हें तत्त्व विशद केलें असल्यामुळें, याच्या श्रवणानें, त्याच्या अर्थाच्या मननानें व निदिध्यासानें, तसेंच तद्भावयुक्त पठणानें सर्वात्मरूपी महाविभूतिमत्व जें अणिमादि अष्टैश्वर्यांच्या रूपानें परिणत झालें आहे, असें ईश्वरत्व प्राप्त होतें. या श्लोकाच्या 'मानसोल्लास' टीकेंत सुरेश्वराचार्य म्हणतात—

**परिच्छिन्नमहंभावं परित्यज्यानुषंगिकम् ।**
**पूर्णाहंभावलाभोऽस्य स्तोत्रस्य फलमुच्यते ॥**

"To attain to the (natural) state of the Universal Ego, by giving up the causal state of limited Ego, is declared (in this tenth stanza) to be the end of this hymn."

**भावार्थ :** कार्यात्मक एकदेशी म्हणजे संकुचित किंवा अपूर्ण अंहभाव टाकून देऊन, कारणात्मक पूर्णाहंभाव म्हणजे '**किंबहुना चराचर । आपण झाला ॥**' हा **सर्वात्मक** (व्यापक) **अहंभाव** (आपणासकट जग ब्रह्म हा निश्चय) प्राप्त करून घेणें हें या स्तोत्राचें फल आहे. तसेंच या स्तोत्राच्या पठनानें अर्थात् सर्वात्मभावाच्या अभ्यासानें—

**पुत्रपौत्रगृहक्षेत्रधनधान्यसमृद्धयः ।**
**अर्वाचीनाश्च सिद्ध्यन्ति स्वर्गपातालभूमिषु ॥**

"Sons, grandsons, houses, lands, money, grain, all in plenty—these lower ends, too, accrue in Swarga, in Patala and on the Earth."

**भावार्थ :** पुत्र, पौत्र, घरदार, शेतभात, धनधान्य इत्यादींची समृद्धि हीं खालचीं फळें स्वर्ग, पाताळ व भूमीवरही त्या ( सर्वात्मभावसंपन्न ) साधकाला प्राप्त होतात.

**स्वर्गादिराज्यं साम्राज्यं मनुते नहि पंडितः ।**
**तदेव तस्य साम्राज्यं यत्तु स्वाराज्यमात्मनि ॥**

"No wise man, indeed, ever looks upon the kingdom of Swarga as a great empire. That alone is his empire – namely, the identity of his Self with the Supreme being."

**भावार्थ :** ज्ञानी मनुष्य हा स्वर्गादिराज्याला साम्राज्य मानीत नाहीं, त्याचें साम्राज्य म्हणजे आत्मस्वरूपाच्या ठिकाणचें स्वाराज्य ( परमात्म्याशीं जीवात्म्याचें तदेकात्मत्व ).

सर्वात्मभावनेचें पुनः फळ सांगतात –

**सर्वात्मभावनावंतं सेवन्ते सर्वसिद्धयः ।**
**तस्मादात्मनि साम्राज्यं कुर्यान्नियतमानसः ॥**

"All Siddhis ( powers ) come to him who ever contemplates the Self in all, wherefore, with the mind controlled, one should hold his empire in Atman."

**भावार्थ :** सर्वात्मभावनावंताला ( सर्वांमध्यें आत्मा पहाणाराला ) सर्व सिद्धि वश होतात; यासाठीं साधकानें जितमनस्क होऊन आत्म्याचें साम्राज्य प्राप्त करून घेण्यास झटावें.

**' निश्चय बैसे वस्तूकडे । तरी ज्ञानमार्गेंही सामर्थ्य जोडे ॥ '**

असें समर्थ म्हणतात. परंतु असें हें आत्मसाम्राज्य ( आत्म्याच्या ठिकाणीं प्रतिबंधरहित अनुभवस्वातंत्र्य ) प्राप्त होण्यास गुरुकृपेची मात्र अत्यंत आवश्यकता आहे. असें श्रुतिशास्त्रांसुद्धां प्राचीन अर्वाचीन सर्व संत एकमतानें सांगतात.

**गुरुप्रसादाल्लभते योगमष्टांगलक्षणम् ।**

“by the Guru's grace, the devotee attains the eight-stepped yoga.”

**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥**

“Who so hath highest love for God, and for the Guru as for God, to that mahatman the truths here taught shine in full.”

**भावार्थ :** ज्याला देवाच्या ठिकाणीं अत्यंत भक्ति, तशीच गुरूच्याही ठिकाणीं देवासारखीच भक्ति असते, त्यालाच ग्रंथांतरीं सांगितलेले (किंवा ऐकलेले) अर्थ म्हणजे तत्त्वें यथार्थपणें प्रकाशित होतात म्हणजे तीं तत्त्वें पूर्णपणें उमजतात, (अर्थात् इतरांस त्या तत्त्वाचा प्रकाश होणार नाहीं) हें श्रुतीचें वचन आहे.

गुरूच्या आवश्यकतेबद्दल मागें ‘बारा प्रकारचे गुरु व भारतांतील गुरुसंस्था’ या प्रकरणांत (पृ० ८८ ते १४८) सविस्तरपणें उहापोह केलेला आहे. त्यामुळें येथें आणखी लिहिण्याचें कारण वाटत नाहीं. फक्त एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं, झाडून सर्व संतांनीं व आचार्यांसारख्या महापुरुषांनीं गुरुभक्तीची व गुरुकृपेची जी महती वर्णन केली आहे, ती ‘गुरुबाजी’ वाढविण्याकरितां नसून, अधिकारी गुरूच्या कृपेनें शिष्याच्या अंतःकरणांत ब्रह्मभाव संचरतो हा निसर्गनियम आहे, हें त्यांनीं जाणल्यामुळें केली आहे. आतां संत झाले तरी ते मानवदेहधारी होते, त्यामुळें त्यांच्याकडून ‘भ्रमप्रमादशीलते’ मुळें चुकीनें सांगणें होईल असें मानलं तरी, जीवांची परम आप्त श्रुतिमाउली हिनेंसुद्धां वर सांगितल्याप्रमाणें ज्याअर्थी गुरुभक्तीची आवश्यकता सांगितली आहे, त्या अर्थी, देहभावानें भारले जाऊन त्यांत शंका घेणें हें केव्हांही कल्याणसाधक होणार नाहीं. तारुण्यावस्था प्राप्त झाल्यानंतर स्त्रीप्राप्तीची इच्छा होणें जसें साहजिक आहे, तशी मुमुक्षुअवस्था प्राप्त झाल्यानंतर गुरुप्राप्तीचा तळमळ लागणें स्वाभाविक आहे. स्त्रीविषयक आवडी ज्या पुरुषाला उत्पन्न होत नाहीं, तो तृतीयप्रकृति तरी असला पाहिजे, किंवा इंद्रियशक्ति पूर्णावस्थेस न पोंचलेला बालक तरी असला पाहिजे, याचप्रमाणें ज्याला गुरुआवडी उत्पन्न झाली नाहीं अथवा होत नाहीं; तो नास्तिक तरी असला पाहिजे, किंवा खरी मुमुक्षाच उत्पन्न न झालेला अगदीं बद्धावस्थेंतील असला पाहिजे, असें खास समजावें.

* * * *

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

## भावशक्तीनेंच भावोत्पादन होत असतें !

जीवाच्या हृदयांत निरनिराळ्या भावांचा जो संचार होतो तो दुसऱ्याच्या शब्दशक्तीपेक्षां भावशक्तीनेंच होत असतो, हें आपण लहान मुलांस शिकवितांना सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास समजून येईल. दोन तीन वर्षांचें मूल आपल्या आईबापांकडून शब्दाच्या साह्यानें जेव्हां जगांतील निरनिराळ्या वस्तूंचें अथवा गोष्टींचें ज्ञान करून घेऊं लागतें; हें काय, तें काय, असे प्रश्न करूं लागतें, तेव्हां त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें देतांना म्हणजे त्याची वाढती जिज्ञासा तृप्त करतांना आईबापांची कशी तारांबळ उडते याचा अनुभव सर्वांस आहेच. शब्दांमध्यें भाव उत्पन्न करण्याची शक्ति आहे खरी, परंतु केव्हां केव्हां ती अगदीं लुली पडते. इतर वस्तुवाचक शब्दांपेक्षां व वाच्यवस्तूपेक्षां, कालवाचक शब्दांनीं कालभावाचा बोध मुलांना करणें फारच कठीण जातें. उदाहरणार्थ, 'काल', 'आज' व 'उद्यां' या शब्दांनीं तो तो भाव त्यांच्या मनांत उतरविणें कठिण, नव्हे, जवळ जवळ अशक्यच असतें. काल, आज व उद्यां हे शब्द मात्र त्यांच्या ओळखीचे होतात (तोंडांत बसतात), पण त्या शब्दांनीं बोधित होणारा भाव त्यांच्या बुद्धींत न उतरल्यामुळें त्या शब्दांचा प्रयोग करतांना तीं प्रमाद करितात व हंशा पिकवितात. 'मी उद्यां जेवलों,' 'मामा काल येणार,' असें जेव्हां तीं बोलूं लागतात, तेव्हां त्यांच्या अंतरांतील भाव आईबापांच्या अंतरांत बिनचूक उतरतो, पण शब्द चुकत असल्यामुळें मजेनें हसूंच येतें. मुका माणूस शब्दांच्या ऐवजीं मुखमुद्रा व हाताच्या खुणा यांनीं आपल्या मनांतील भाव दुसऱ्याच्या मनांत उतरवितो. मेस्मेरिझम् व हिप्नॉटिझम् करणारे लोक प्रयुज्याच्या अंतःकरणांत, कांहीं न बोलतां व न करितां, आपला इष्टभाव फक्त इच्छाशक्तीनें उत्पन्न करितात हें पुष्कळांनीं पाहिलें असेल. तात्पर्य, शब्द किंवा खुणा इत्यादि ह्या भावशक्तीच्या प्रतिनिधि आहेत. आईबाप आपला इष्ट-भाव लहान मुलांच्या अंतःकरणांत उतरवितांना, मुका माणूस आपला इष्टभाव दुसऱ्याच्या अंतःकरणांत उतरवितांना, किंवा शिक्षक (मास्तर अथवा प्रोफेसर) आपला इष्टभाव विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत उतरवितांना शब्द किंवा खुणा यांचा उपयोग करीत असले तरी, **भावशक्तीनेंच भावोत्पादन होत असतें** हें निर्विवाद आहे. भावशक्तिप्रेषण ज्याचें जितकें जोरदार असेल, तितकें भावोत्पादन त्वरित होतें. केव्हां केव्हां या कामीं कालाची मार्गप्रतीक्षा करावी लागते. तात्पर्य, शब्द व खुणा ह्या निमित्तमात्र आहेत. त्या शब्दांच्या व खुणांच्या मागें भाव

अथवा विचारप्रेषण करणाऱ्या सचेतन व्यक्ति नसतील, तर भावोत्पादनाचें कार्य घडूं शकणार नाहीं असा सामान्य नियम आहे.

श्रीविवेकानंदांनीं अमेरिकेंत जाऊन जेव्हां पौरस्त्य तत्त्वज्ञानामृताचा तेथें वर्षाव केला; भक्तियोग, ज्ञानयोग, राजयोग इत्यादि विषयांवर, व्याख्यानें दिलीं, तेव्हां या दिव्य ( दैवी ) ज्ञानानें त्या लोकांचीं अंतःकरणें सुप्रभ होऊन, त्यांनीं 'हें अलौकिक ज्ञान तुम्हीं कुठल्या शाळेंत अथवा कॉलेजांत संपादन केलें,' असा मोठ्या जिज्ञासेनें प्रश्न केला. तो ऐकून विवेकानंदांनीं 'माझ्या गुरुदेवाकडून' असें उत्तर दिलें. त्यानंतर, 'असे आपले गुरु कोण आहेत, त्यांची माहिती आम्हांस सांगाल काय' असें लोकांनीं विचारलें. तेव्हां विवेकानंदांनीं, 'तुमची ऐकण्याची इच्छा असेल तर आनंदानें सांगूं,' असें सांगून त्याबद्दल एक दिवस ठरविला. वर्तमानपत्रांतून तो जाहीर झाला व त्या दिवशीं ती माहिती ऐकण्यासाठीं विलक्षण कुतूहलामुळें, श्रोत्यांची भयंकर गर्दी लोटली. व्याख्याते व्याख्यान देण्यास उभे राहिले. श्रोतृसमुदाय तर व्याख्यात्यांच्या मुखांतून बाहेर पडणारीं मुक्ताफळें झेलण्यास इतका उत्कंठित झाला होता कीं कांहीं पुसूं नका. व्याख्यात्यांनींही श्रोतृगणावर नजर फेंकून आपल्या परमपूज्य गुरुदेवाविषयींची माहिती सांगण्याच्या बुद्धीनें बोलण्यास आरंभ केला. त्यांच्या तोंडांतून पहिले शब्द 'My master' म्हणजे 'माझे गुरुनाथ' असे निघाले. त्याबरोबर गुरुस्वरूप त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहून कंठ दाटून आला, डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या व अंग रोमांचित होऊन ओंठ थरथर कांपूं लागले. अष्ट सात्त्विक भाव त्यांच्यांत उत्पन्न झाले व दहा मिनिटेंपर्यंत त्यांच्यानें कांहीं बोलवेना! ही त्यांची अवस्था पाहून श्रोते आश्चर्यचकित होऊन गेले. कारण शरीराला कांहीं मार वगैरे लागून जबर दुखापत झाल्याशिवाय अथवा आईबापादि कोणी तरी मेल्याशिवाय डोळ्यांतून अश्रुप्रवाह वाहिलेला त्यांनीं कधीं पाहिलाच नव्हता. हें दृश्य व हा भाव त्यांना अगदीं अपरिचित होता. त्यामुळें ते अगदीं वेड्यासारखे त्यांजकडे पाहूं लागले. एखादा कुशल वक्ता ज्याप्रमाणें आपल्या वक्तृत्वानें श्रोत्यांच्या अंतःकरणांत निरनिराळे रस ( शृंगार, हास्य, करुण, रौद्र, इ० ) उत्पन्न करून श्रोत्यांना तन्मय करून सोडतो, त्याप्रमाणें विवेकानंदांनींही पण श्रोत्यांना, कांहीं न बोलतां न सवरतां, आपल्या भावाशीं अगदीं तन्मय करून सोडलें. "गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्नसंशयाः" म्हणतात तें हेंच. विवेकानंदांचें हें गुरुप्रेम निगुरे लोक कसे जाणूं शकतील? दुष्यंत-शकुंतलेचा पहिल्या भेटींत उत्पन्न झालेला भाव नाटकांतील

प्रेक्षकांपैकीं तृतीयप्रकृति, बालक किंवा मूढ कसे अनुभवूं शकतील ? केव्हांच नाहीं. गुरुप्रेमाची गोष्टसुद्धां अशीच आहे. विवेकानंदांनीं त्यानंतर आपली अवस्था सावरून व्याख्यान दिलें. तें 'माय मास्टर' या पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहे. त्याचें मराठी भाषांतरही झालें आहे. गुरुभक्तांनीं तें जरूर वाचून पहावें. परमार्थमार्गांत गुरूची आवश्यकता सांगतांना ते म्हणाले —

"This quickening impulse cannot be derived from books. The soul can only receive impulses from another soul and from nothing else." etc.

'आध्यात्मिक जागृति ही पुस्तकी ज्ञानानें होणें शक्य नाहीं. चैतन्याचा बोध एका व्यक्तीला दुसऱ्या व्यक्तीकडूनच होणें शक्य आहे, नहून दुसऱ्या कोणत्याही साधनानें होणें शक्य नाहीं.' असें खास समजावें. (यापुढील विवेकानंदांचा विस्तृत मराठी उतारा मागें पृ. ८१।८२ वर आला आहे, तो पुन्हां हवा तर वाचून पहावा.) भौतिक विद्येचीं, इंद्रियविज्ञानशास्त्रादिकांचीं पुस्तकें काय थोडीं पडलीं आहेत ? शाळेंत व कॉलेजांत तींच पुस्तकें शिकविलीं जातात. परंतु तीं समजण्यास दुसऱ्या तज्ज्ञ माणसांच्या मदतीची जरूरी आहे. नुसतीं पुस्तकें वाचून ज्ञान झालें असतें तर शाळा व कॉलेजें इत्यादींची गरजच नव्हती. भौतिक ज्ञानाची जर ही कथा, तर अभौतिक, अतींद्रिय ज्ञानाची गोष्ट काय विचारावी ? 'साहेबासी लोटांगण' घालण्यास कमीपणा वाटत नसतो, पण एखाद्या सत्पुरुषाच्या समोर किंवा देवाच्या मूर्तीसमोर डोकें नमविण्यास मोठी लाज वाटते. कारण डोकें नमविण्यानें 'अहं' ला मोठा धक्का पोचतो, तो असह्य असल्यामुळें नको असतो ! शरीराला जबर दुखापत झाली तर ती सोसतां येते, पण 'अहं–' ला थोडीशी दुखापत झाली तर ती सोसवत नाहीं ! परंतु परमार्थांत ह्या अपूर्ण 'अहं' भावाला ठेचावेंच लागतें. किंबहुना त्याला ठेचल्याशिवाय परमार्थ साधतच नाहीं. या निसर्गनियमापुढें कोणाचें काय चालणार ? गुरु करण्यानें मात्र हें सहज साधतें.

**" तिळभरी राखोनि अभिमान । जरी मज रिघसी शरण ।**
**तरी माझी प्राप्ति नव्हे जाण । अभिमान विघ्नप्राप्तीसी ॥**
**यालागीं सांडोनि अभिमान । मज हृदयस्था रिघालिया शरण ।**
**तुज मी उद्धरीन जाण । देवकीची आण उद्धवा ॥ "**

यांतही अज्ञान्याचा अभिमान पुष्कळ बरा, कारण तो लवकर जातो; पण ज्ञान्याचा अभिमान फार वाईट, कारण तो जाण्यास फार कठीण असतो, असें पुढें

सांगितलें आहे. त्या दोघांच्या अभिमानांत म्हणजे 'अहं-' पणांतही सुंदर तारतम्य दृष्टान्तपुरःसर सांगितलें आहे, तें सत्साधकांनीं अवश्य लक्षांत ठेवावें.

**" अपक्व घटु तत्काळ गळे । तो पृथ्वीचा पृथ्वीस मिळे ।**
**भाजिलें खापर अतिकाळें । पृथ्वीस न मिळे कठिणत्वें ॥ ...**
**तेवीं अज्ञान अभिमान आहे । तो सर्वथा तत्काळ जाये ।**
**ज्ञानाभिमान कठिण पाहे । गोंविताहे मुक्तत्वें ॥ "** इत्यादि

— एकनाथी भागवत, अ. १२

तात्पर्य, 'अहं' चें गांठोडें सुटून व फुटून जाण्याकरितांच गुरुसेवा सांगितली आहे. 'गुरु कर' याचा गर्भितार्थ 'लघु हो' असा आहे. आणि 'लघु होणें' म्हणजेच 'अभिमान सोडणें' होय. हें तत्त्व न जाणतां हवी तेवढी हरिगुरुभक्ति केली तरी ती व्यर्थ जाते. मी एक मोठा 'हरिभक्त', मी एक मोठा 'गुरुभक्त' असा एक नवीन अभिमानाचा घोंडा उरावर बसण्याचा संभव असतो. हा नकळतच बसतो, पण बसतो खरा. हें जाणूनच कृपाळू संत श्रीनामदेवराय देवाकडे कळकळीनें मागणें मागतात कीं —

**" अहंकाराचा वारा न लागो राजसां ।**
**माझिया विष्णुदासां भाविकांसी ॥ "**

भजनी लोक हें मागणें भजनाच्या शेवटीं देवाकडे रोज मागतात, पण अर्थ लक्षांत घेत नाहींत ! साच भावानें गुरुभक्ति-गुरुसेवा करीत राहिली, कीं अहंकाराचा वारा सुद्धां लागत नाहीं आणि असें झालें म्हणजे अहंभावाचा अधिष्ठानरूप जो आत्मभाव अथवा ब्रह्मभाव तो उदय पावतो. गुरुभावाच्या पोटींच ब्रह्मभाव जन्म घेतो.

" **संगात्संजायते कामः**, कामात् **क्रोधोऽ**भिजायते, क्रोधात् भवति **संमोहः**, संमोहात् **स्मृतिविभ्रमः**, स्मृतिभ्रंशाद् **बुद्धिनाशः** " इत्यादि गीतावचनांमध्यें (दुधापासून दहीं म्हणजे दुधाच्या पोटीं दहीं, दह्याच्या पोटीं ताक, ताकाच्या पोटीं लोणी व लोण्याच्या पोटीं तूप, हे जसे एका पोटीं एक उत्पन्न होण्याचा निसर्गसिद्ध नियम आहे, त्याचप्रमाणें) एकाचे पोटीं दुसरा भाव कोणकोणता जन्मास येतो हें उघड करून सांगितलें आहे. याचप्रमाणें '**गुरुभावाच्या पोटीं ब्रह्मभाव जन्मास येतो**' हाही एक निसर्गनियमच आहे. अमुक भावाच्या पोटीं अमुक भाव असतो, ह्या निसर्गतः ठरलेल्या नियमांचा सूक्ष्म बुद्धीनें शोध

लावून जीवाच्या कल्याणाकरितां ते लिहून ठेवले, त्याचेंच नांव 'शास्त्र'. पण शास्त्रांतले नियम म्हणजे पुस्तकांतले नियम असें समजून त्यांची पुष्कळ लोक अवज्ञा करितात, ही मोठी चूक होते. राजानें प्रजेला घालून दिलेले नियम म्हणजे कायदे मोडले असतां राजाकडून जशी शिक्षा होते, तशी पुस्तकांत सांगितलेले नियम मोडले असतां पुस्तकाकडून शिक्षा होत नाहीं, अशी समजूत असल्यामुळें ते मोडण्याचा मोह मनुष्याला पडतो, व तो स्वार्थास आंचवतो! शास्त्राचे नियम हे शास्त्राचे म्हणजे पुस्तकाचे नसून सृष्टीचे म्हणजे निसर्गाचे नियम असल्यामुळें ते न पाळणाऱ्यास स्वार्थच्युतीची शिक्षा निसर्गाकडून होणें अपरिहार्य आहे. 'गुरुभावापासून ब्रह्मभाव' हा श्रुतीनें व संतांनीं जीवांच्या कल्याणासाठीं प्रगट केलेला निसर्गनियम लक्षांत न घेतल्यामुळें पुष्कळ शहाणे लोक निजस्वार्थाला आंचवितात, ही दुःखाची गोष्ट होय!

**"चराचरही चित्स्वरूप। परी जीव मानिती जडरूप।**
**रज्जु न कळोनि आरोप। साच मानिती सर्पाचा॥ ...**
**व्यतिरेक मात्र जाणती। अन्वयें जडही चैतन्य ऐसें नेणती॥**
**ते न समजोनि येथें म्हणती। कीं निर्गुणें घ्यावें सगुण हें न घडे॥**
**उगेंचि मानिती मिथ्या जग। परीं नगीं सुवर्ण देखोनि नग।**
**मिथ्या म्हणावी झगझग। अंतर्बाह्य कनकचि तें साच॥**
**दिसे सोन्याची झगझग। तेव्हां दिसे मिथ्या नग।**
**तैसें चैतन्य दिसोनि जग। मिथ्या म्हणती ते ज्ञानी॥**

—यथार्थदीपिका, अ. ८

असें हें ज्ञान अनुभवारूढ होणें हें काय मस्करीचें काम आहे? नाना युक्तीनें तें समजाविलें तरी, "**हें अवघें युक्तिजाळ। गुरुकृपेनेंचि होय सफळ**" या वचनाप्रमाणें अंतरांत याचा अर्थप्रकाश व्हावयाला गुरुकृपाच लागते, असें संतांचें व श्रुतीचें सांगणें आहे.

भोंदू गुरूंच्या साथीमुळें श्रद्धाळू लोकांचीं मनें कावरींबावरीं होतात, त्याचप्रमाणें परमेश्वरसाक्षात्काराला मध्यस्थाची (मीडियम्) गरज नाहीं असें म्हणणाऱ्या लोकांच्या वाणीनें व लेखणीनेंही सांप्रत काळीं सर्वसामान्य श्रद्धाळूंच्या मनाला मोठा धक्का पोंचतो व पोंचत आहे, हेंही तितकेंच वाईट आहे. मध्यस्थावांचून कोणाचें कार्य साधलें असल्यास असो. त्याचे अनुभव व प्रयास त्यालाच ठाऊक. पण सर्वसाधारण लोकांना तें शक्य नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे.

************************************************

"वाक्यांतील अर्थ वाक्यांतच असतो. बुद्धीच्या उन्नत अवस्थेनें आपण तो ग्रहण करून त्याचा उच्चारही करीत असतों. आपल्याला तो समजला, अगदीं पक्का समजला, अशी घमेंडही मारीत असतों. पण डोळा उघडून खरें अर्थरूप होणें हें काम गुरुपरंपरेशिवाय होणेंच नाहीं."

— गोविंदसुत

**"जिहीं आत्मबोधाचिया आवडीं। केली स्वर्गसंसाराची कुरोंडी।**
**तेवांचूनि येथींची गोडी। नेणती आणिक॥"**
**"परी हेचि आत्मसिद्धि। जो कोणी भाग्यनिधि।**
**श्रीगुरुकृपालब्धि–। काळीं पावे॥"**

— ज्ञानेश्वरी

श्रीएकनाथमहाराजांनीं तर "यमानभीक्ष्णं सेवेत नियमान् मत्परः क्वचित्। मदभिज्ञं गुरुं शान्तमुपासीत मदात्मकम्" (अ. १०, श्लो. ५) या श्लोकावर टीका करतांना गुरुभक्तीची कमाल केली आहे. ते म्हणतात —

**"होआवया वृत्तीचा उपरम। अहिंसासत्यादि धर्म।**
**आचरावे अविश्रम। बाह्य नेम अविरोधें॥**
**आचरिती अहिंसासत्यादिकांसी। तंव तंव दशा उजळे कैशी।**
**अति प्रीति गुरुभक्तीसी। अहर्निशीं गुरु चिंती॥**
**सद्गुरूविण ब्रह्मज्ञान। सर्वथा नव्हे नव्हे जाण।**
**हें उपनिषदर्थें प्रमाण। परमनिर्वाण सांगितलें॥ ...**
**नाव तारी हें साचार। माजीं बैसले थोर थोर।**
**परी तारकेंवीण पर पार। समर्थ नर न पावती॥ ...**
**तैसें निजस्वरूप आयतें। श्रद्धा सद्गुरूचेनि हातें।**
**खरें करूनियां ज्ञाते। निजसुखातें पावले॥**
**साधावया निजज्ञान। करितां सद्गुरूचें सेवन।**
**निवाले संतसज्जन। आनंदघन सद्गुरु॥**
**म्हणसी साधनें केलीं अनेक। तैसें सद्गुरुही साधन एक।**
**म्हणतां मुमुक्षु झाला मूर्ख। निजात्मसुख बुडालें॥**
**सद्गुरु केला तो साधन। त्याहून परतें साध्य आन।**
**म्हणतां आली नागवण। नागवला जाण सर्वस्वें॥"**

यांचें कारण अथवा उपपत्ति पुढील ओंवींत कशी सांगून देतात पहा —

**" जो चित्सुखें सदा संपन्न । चिद्रूपें ज्यासी समाधान ।**
**तो चिन्मात्राहोनि भिन्न । नव्हे जाण सर्वथा "**

— एकनाथी भागवत, अ. १०

ब्रह्मप्राप्तीकरितां — आत्मप्राप्तीकरितां, ईश्वरप्राप्तीकरितां सद्गुरु करावा असें श्रुतींत व इतरत्र इतरांनीं पुष्कळ सांगितलें आहे; हीं वचनें पाहिलीं असतां सद्गुरु हें 'साधन' व ब्रह्म, आत्मा किंवा ईश्वर हें 'साध्य' असें सहज भासतें; पण ही कल्पना (सद्गुरूच्या अत्यंतावश्यकतेची, ती शुभ व सर्वमान्य असली तरी) नाथांच्या कोमल अंतःकरणास सहन झाली नाहीं, म्हणूनच त्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें उद्गार काढले आहेत. ब्रह्म हें साध्य व सद्गुरु हें साधन हें त्यांना मुळींच पटत नाहीं. गुरु व ब्रह्म एकच, हें उपपत्ति सांगितल्याशिवाय पटणार नाहीं म्हणून शेवटच्या ओवींत त्यांनीं त्याची उपपत्तीही सांगितली आहे. दुसऱ्या एके ठिकाणीं तर ते याच्याही पुढें गेले आहेत. म्हणजे गुरु व ब्रह्म समान मानणें हें सुद्धां गौण आहे असें ते कारण देऊन सांगतात —

**" गुरु ब्रह्म दोन्ही समान । हेंही वचन दिसे गौण ॥** कारण —
**गुरुवाक्यें ब्रह्मा ब्रह्मपण । तेथें व्हावया समान भिन्नत्व नुरे ॥"**

— एकनाथी भागवत, अ. ३

ज्या ब्रह्माच्या प्राप्तीसाठीं एवढें अकांडतांडव करावयाचें, तें ब्रह्म तर सर्व जीवाच्या आंत-बाहेर सारखें व्यापून आहे, मग त्या जीवाचे इतके हाल कां बरे व्हावे? त्याचे जन्ममरणाचे गोते कां बरें चुकूं नयेत? अर्थात् ब्रह्म असें सर्वत्र असूनही त्याचा उपयोग होत नाहीं; कारण तें अज्ञात असतें. **ब्रह्मानें मोक्ष नाहीं, ब्रह्मज्ञानानें मोक्ष'**, आणि तें ज्ञान गुरु करून देतात. म्हणजे नाथांनीं वरील ओवींत म्हटल्याप्रमाणें ब्रह्माला ब्रह्मपण गुरु देतात; नसल्यास त्या ब्रह्माला कोणीं विचारलें असतें? म्हणून ब्रह्मापेक्षां गुरु श्रेष्ठ. ब्रह्म हें निर्गुण आणि गुरु म्हणजे सगुण. निर्गुण ब्रह्म सर्वत्र व्यापक आहे, पण तें जीवांचें दुःख नाशूं शकत नाहीं किंवा सुख देऊं शकत नाहीं. दुःखनाशपूर्वक सुखप्राप्ति किंवा पापनाशपूर्वक पुण्यप्राप्ति करून देण्याला सगुणाचीच आवश्यकता आहे व म्हणूनच तें ब्रह्म युगायुगीं सगुणरूपानें अवतरतें. सगुण हें निर्गुणाला सोडून नसतेंच, म्हणून दोन्ही

एकरूपानें पाहिलीं पाहिजेत, त्यांत न्यूनाधिक बुद्धि ठेवणें हा मोठा प्रमाद आहे; किंबहुना सगुणांत आधिक्यच मानलें पाहिजे आहे. यासंबंधानें नाथ म्हणतात —

**" निर्गुणाहूनि सगुण न्यून । म्हणे तो केवळ मूर्ख जाण ।**
**सगुण निर्गुण दोन्ही समान । न्यून पूर्ण असेना ॥**
**विघुरलें तें तूप होय । थिजलें त्यापरीस गोड आहे ।**
**निर्गुणापरीस सगुणीं पाहे । अति लवलाहें स्वानंदू ॥"**

— एकनाथी भागवत, अ. ११

असो, हा विषय लिहावा तितका थोडा आहे. ह्या पुस्तकाचे वाचक म्हणजे माझ्या गुरुदेवाच्याच विभूति समजतों. त्यांना डोळ्यांसमोर ठेवून लिहूं लागतों, तेव्हां प्रमेयाचे नवनवोन्मेष हृदयांत उठूं लागतात व लेखणी अनावर होते. पण **निर्गुण-सगुण** अथवा **ज्ञान** व **उपासना** हा विषय थोडा पुढें घ्यावयाचा आहे, म्हणून हा ओघ इतक्यावरच आवरून धरून, सांगतों कीं – भगवंताचे सगुण अवतार झाले तरी ते कार्यकारणापुरतेच असतात. ते सर्व काळ सर्व मुमुक्षु जीवांना कसे उपयोगी पडतील बरें? म्हणून ज्यांना गुरुप्राप्तीची खरी तळमळ लागते, त्यांना परमात्मा गुरुरूपानें भेटून त्यांचें कार्य करितो. ब्रह्मानुभवसंपन्न पुरुषाची तो गांठ घालून देतो, हेंच त्याचें गुरुरूपानें भेटणें होय. मात्र ' खरी प्रामाणिक तळमळ ' लागली पाहिजे. देव दूर नाहीं, आस्थेचीच मुख्यतः जरूरी आहे.

**" सद्गुरु भेटाया कारणें । हिंडे तीर्थें तपोवनें ।**
**गुरु न विसंबे मनें । नित्यविधीनें आचरितां ॥**
**सद्गुरु-प्राप्तीचिया काजा । लहानथोराची करी पूजा ।**
**अत्यादरें मानी द्विजा । गुरु मज माझा भेटावा ॥**
**गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे तहानभूक ।**
**विसरला देहगेहसुख । सदा संमुख परमार्थी ॥**
**ऐसी सद्गुरूची आवडी । ज्याची आस्था चढोवढी ।**
**त्यासी गुरुरूपें तांतडी । भेटी रोकडी मी देतों ॥**
**जंव जंव आस्था अधिक । तंव तंव भेटीची जवळीक ।**
**साधनांमाजी हें साधन मुख्य । आस्थाचि एक विशेष ॥ ...**
**छेदावया संसारबंधन । करावें सद्गुरुसेवन ।**
**सद्गुरुसेवा तें माझें भजन । गुरुआम्हां भिन्नभावो नाहीं ॥ ...**

एवं चिद्रूपाचें ज्यासी ज्ञान । तो चिद्रूपचि सत्यपूर्ण ।
गुरुब्रह्म अभिन्न जाण । ये अर्थी प्रमाण उपनिषद् ॥ ”

—एकनाथी भागवत, अ. १०

“ देवो पूजिल्या गुरु तोषे । गुरु पूजिल्या देवो संतोषे ।
दों नांवांचेनि हरुषें । स्वरूपें एके वर्तती ॥
सुवर्ण आणि कांकण । दों नांवीं एक सुवर्ण ।
तेवीं गुरुब्रह्मांमाजी जाण । भिन्नपण असेना ॥ ”

—एकनाथी भागवत, अ. ३

योगमार्गानें जातांना षट्चक्राचे पदर फोडतां फोडतां जेव्हां आज्ञाचक्रापर्यंत साधक पोंचतो, तेव्हां तेथून पुढें गुरुकृपेच्या साहाय्यावांचून ब्रह्मरंध्रांत आपल्या बळानें प्रवेश करण्याची काय बिशाद आहे? ही योगमार्गाची गोष्ट झाली. येथें ज्ञानमार्गातसुद्धां दृश्य निरसन करून केवळ दृक्स्थितींत अवस्थान साधण्याकरितां साधकाचे आत्म-प्रयत्न पंगूच पडतात.

“ दृश्य अवघें ओलांडिलें । अदृश्य शून्यत्वीं पडिलें ।
ब्रह्म म्हणोनि मुरडिलें । तेथूनिच मागें ॥
इकडे दृश्य तिकडे देव । मध्यें शून्यत्वाचा ठाव ।
तयास मंदबुद्धीस्तव । प्राणी ब्रह्म म्हणे ॥ ”

—दासबोध १०।८

अशी साधकाची दशा होते. पुष्कळ साधक शून्यांत जाऊन पडतात व तेथेंच समाधानही मानतात ! शून्य ओलांडून जाण्याला श्रीगुरुकृपेचाच ढकलधक्का (Push) पाहिजे. हें किती बोलावें ? ‘ जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे. ’ अस्तु.

श्रीगुरुदेवाच्या महिमानुवादांत बरीच पुनरुक्ति झाली आहे, याबद्दल वाचकांची क्षमाच मागावीशी वाटते. पण खात्री आहे कीं —

“ ज्यांसी गुरुचरणीं श्रद्धा गाढी । ज्यांसी गुरुभजनीं अति आवडी ।
जिहीं गुरुप्रेम जोडिलें जोडी । ते हे गोडी जाणती ॥ ”

—एकनाथी भागवत, अ. ९।४४२

असे गुरुप्रेमी लोक लेखकाला आशीर्वादच देतील अशी अशा आहे.



# ज्ञान व भक्ति अथवा निर्गुण व सगुण !

मागें शुभेच्छा, विचारणादि ज्ञानाच्या सात भूमिका सांगितल्या, त्याप्रमाणें भ्रमाच्या उत्पत्तीपासून अंतापर्यंत जीवाच्या सात अवस्था शास्त्रांत सांगितल्या आहेत, त्या खालीं लिहिल्याप्रमाणें —

१ **अज्ञान**, २ **आवरण**, ३ **विक्षेप**, ४ **परोक्षज्ञान**, ५ **अपरोक्षज्ञान**, ६ **शोक**निवृत्ति व ७ **निरं**कुशातृप्ति. पैकीं पहिल्या तीन ह्या बंधाला कारण व पुढच्या चार ह्या मोक्षाला कारण आहेत. ( मागील पृष्ठ १७३ वरील टीप पहा. )

मी कोण न जाणणें हें '**अज्ञान**'; ह्या अज्ञानामुळें आपण चिद्रूप, कूटस्थ, प्रत्यगात्मा, स्वप्रकाश असून तसें न भासणें हें '**आवरण**'; ह्या आवरणामुळें आत्मा (आपण) स्वप्रकाश चिद्रूप असतां विपरीतत्वानें जाणणें ( देहेंद्रियादिकांचा संघातच आपण, तसेंच मी कर्ता-भोक्ता, असें समजणें ) हा '**विक्षेप**', यानंतर पूर्वपुण्यपरिपाकवशात् परम आप्त अशा गुरुमुखांतून, तूं जड देह नसून चिद्रूप आत्मा आहेस, जन्ममरणाची शंका घेऊन उगीच घाबरूं नकोस, अशी अभय वाणी ऐकून श्रद्धेनें तसें मानणें हें '**परोक्षज्ञान**'; व तें चिद्रूप अनुभवारूढ करणें हें '**अपरोक्षज्ञान**'; ह्या अपरोक्षज्ञानानें आत्म्याचें अभानावरण नष्ट होतें ( असत्वावरण परोक्षज्ञानानेंच नष्ट झालेलें असतें ) व ह्या आवरणामुळें होणारा घोर संसाररूप शोक नाहींसा होतो, ही '**शोकनिवृत्ति**'; आणि तीमुळें होणारा अखंडानंद अथवा नित्यमुक्तत्वाची प्रतीति हीच '**निरंकुशा तृप्ति**' होय. ( विषयभोगांपासून होणाऱ्या तृप्तीसारखी ही इंद्रियजन्य नसल्यामुळें हिला कधींहि व कोणाकडूनहि प्रतिबंध होऊं शकत नाहीं; म्हणून या तृप्तीला 'निरंकुशा' म्हणतात. ) अशा ह्या सात अवस्था चिदाभासाच्या म्हणजे जीवाच्या होत.

वेदामध्यें **कर्म**कांड, **उपासना**कांड व **ज्ञान**कांड अशीं तीन कांडें जीवांच्या त्रिगुणांला अनुलक्षून केलेलीं आहेत. तमोगुणप्रधान लोकांसाठीं कर्मकांड, रजोगुण-प्रधान लोकांसाठीं उपासनाकांड व सत्त्वगुणप्रधान लोकांसाठीं ज्ञानकांड, अशी सुंदर व्यवस्था आहे. एकाच मनुष्यामध्येंहि तमोगुणाचें आधिक्य असतें, तेव्हां त्यास कर्मकांडाचा उपदेश करतात; कर्मकांडाप्रमाणें वागून चित्तशुद्धि झाल्यानंतर तो उपासनाकांडाचा अधिकारी होतो; उपासनेनें चित्ताचें चांचल्य म्हणजे रजोगुण क्षीण होतो व सत्त्वगुण वाढतो, तेव्हां तो ज्ञानकांडाचा अधिकारी होतो. याप्रमाणें

कर्म – उपासना – ज्ञानानें चित्ताचे **मल, विक्षेप** व **आवरण** हे दोष नाहींसे होऊन '**चित्ताचें चैतन्य**' होतें व साधक कृतार्थ होतो.

परंतु असें हें पुष्कळसें श्रवण केलं व त्याचें मननही केलें, तरी कांहींना ब्रह्मसाक्षात्कार होत नाहीं. याचें कारण ते 'अकृतोपासक' असतात. साधकांत 'कृतोपासक' व 'अकृतोपासक' असे दोन भेद आहेत. याचा थोडक्यांत अर्थ – उपासना केलेले व उपासना न केलेले, असा आहे. ज्यांना संत-सद्गुरु-मुखानें श्रवण-मनन करूनही ब्रह्मसाक्षात्कार होत नाहीं, त्यांची जन्मांतरींची उपासना कच्ची आहे असें समजून, त्यांनीं उपासनेचा अवलंब करावा. गुरुमुखानें उपासनेचीं अंगोपांगें विचारून घेऊन त्याप्रमाणें कायावाचामनानें अनुष्ठान करावें. म्हणजे अपरोक्षज्ञानोत्पत्तीचे सर्व प्रतिबंध नष्ट होऊन साक्षात्कार होईल.

आत्मज्ञानाच्या उदयाला **असंभावना** व **विपरीतभावना** हे जसे प्रतिबंध आहेत, तसेंच **१ भूत, २ भावी**, व ३ **वर्तमान** असे **तीन प्रतिबंध** आहेत. पैकीं भूत व भविष्यत् (भावी) प्रतिबंध हे साधारण मनुष्याच्या नजरेंत येण्यासारखे नसतात. पण वर्तमान प्रतिबंधाचा विचार करितां येतो.

**"प्रतीबंधो वर्तमानो विषयासक्तिलक्षणः।**
**प्रज्ञामांद्यं कुतर्कश्च विपर्ययदुराग्रहः॥"**

— पंचदशी, ध्यानदीप

**विषयासक्ति, बुद्धिमांद्य, कुतर्क** व **विपरीतभावनेविषयीं दुराग्रह** (आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्वादि धर्म आहेत असा आग्रह धरणें) हे वर्तमान प्रतिबंध आहेत. त्यांचें, शमदमादिसंपन्न होऊन श्रवणादिकें करून निवारण करावें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. उपासनाबलानें हें सर्व कांहीं सुलभ होतें; याकरितां साधकांनीं तो मार्ग बळकट धरला पाहिजे. आत्मानात्मविचारक्षम पुरुषांनीं जर तो धरला पाहिजे, तर विचारासमर्थ पुरुषांनीं तो अगोदर धरून उपासनाबल वाढविलें पाहिजे हें काय सांगावें?

*　　*　　*

**ज्ञान हें वस्तुतंत्र** व **उपासना ही कर्तृतंत्र** म्हणजे कर्त्याच्या आधीन असते. कर्त्याच्या भावनेवर ती अवलंबून असते. वस्तूच्या स्वरूपाचा विचार केला म्हणजे तिचें ज्ञान होतें, तें होऊं नये अशी इच्छा केली तरी झाल्याशिवाय रहात नाहीं. पण उपासना ही कर्त्याच्या इच्छेवर अवलंबून असते. ती करणें, न करणें

***************************************************

किंवा कशीतरी करणें हें पुरुषाच्या इच्छेप्रमाणें होऊं शकतें. असें ज्ञान व उपासना यांतील वैलक्षण्य आहे.

दुसरें, '**ज्ञान**' म्हणजे आहे तसें यथार्थत्वानें जाणणें ; आणि '**उपासना**' म्हणजे निकृष्टामध्यें उत्कृष्टबुद्धि अथवा अल्पामध्यें महद्‌बुद्धि करणें. उदाहरणार्थ, शालिग्रामशिळेंत विष्णुबुद्धि इत्यादि. उपासनेंतही निर्गुणोपासना व सगुणोपासना असे मुख्य दोन भेद आहेत. निर्गुणोपासनेस '**अहंग्रहोपासना**' व सगुणोपासनेस '**प्रतीकोपासना**' म्हणतात. ("एकंदर उपनिषदांत सांगितलेल्या गुणांवरून ज्याचा लक्षणावृत्तीनें बोध झाला आहे, असें 'अखंड एकरस ब्रह्मच मी आहें' अशी निरंतर भावना करणें हीच निर्गुण उपासना होय. हिलाच अहंग्रहोपासना म्हणतात." —बापटशास्त्रीकृत 'सुबोध पंचदशी,' ध्यानदीप.) निर्गुण ज्ञान व निर्गुणोपासना यांत भेद आहे. 'निर्गुण ज्ञान' म्हणजे अखंडैकरस सच्चिदानंदस्वरूपाचा एकदम साक्षात्कार, आत्मत्वानें त्याचें स्फुरण; व 'निर्गुण उपासना' म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें तशा गुणांचें ब्रह्म अथवा आत्मा मीच आहें अशी भावना करणें. निर्गुणोपासना ही ज्ञानाच्या समीप आहे. निर्गुणोपासना परिपक्व झाली कीं, तीच सविकल्प समाधि होते व पुढें तीच निर्विकल्प समाधि बनते. (याबद्दलचें विशेष विवरण जिज्ञासूंनीं पंचदशींत ध्यानदीप प्रकरणांत पाहून घ्यावें.)

उपासना ही मानीवच असल्यामुळें तिला यथार्थ ज्ञान म्हणतां येत नाहीं व जें ज्ञान यथार्थ नाहीं, अयथार्थ आहे, त्याला भ्रम म्हणतात. हा भ्रमही 'संवादी' व 'विसंवादी' अशा दोन प्रकारचा आहे. संवादी भ्रमानें प्रवृत्त झालेल्या मनुष्यास शेवटीं इष्ट वस्तूचा लाभ होतो; विसंवादी भ्रमानें तो होत नाहीं. उपासना ही संवादीभ्रम असल्यामुळें तिच्यापासून इष्ट वस्तूची प्राप्ति होते. ('संवादी – विसंवादी' इत्यादि शास्त्रीय परिभाषा सामान्य वाचकांना क्लिष्ट वाटेल. तरी त्यामुळें उगीच डोकेंफोड करून घेऊं नये. ती लक्षांत न राहिली म्हणून नुकसान नाहीं. पण शास्त्रपरिभाषा कानावरून गेलेली असावी. संशयोच्छेद होण्यास तिचा पुष्कळ वेळां उपयोग होतो. इतक्याच हेतूनें मुद्दाम दिली आहे असें समजावें.) असो.

* * *

वर ज्ञान व उपासना यांचें स्वरूप थोडक्यांत सांगितलें, तसेंच निर्गुणज्ञान व निर्गुण-उपासना यांचेंही तारतम्य दर्शविलें. आतां निर्गुण उपासनेच्या पुढें सगुण उपासना सांगावयाची; त्यापूर्वी **निर्गुण** व **सगुण** म्हणजे काय हें सांगितलें पाहिजे.

*********************************************

तें थोडक्यांत दृष्टान्त देऊन सांगतों, म्हणजे अल्पज्ञ मनुष्यासही त्याची कल्पना येईल. फूल हें सगुण व त्याचा वास हा निर्गुण; पेढा हा सगुण, त्याची गोडी ही निर्गुण. फूल व पेढा यांस आकार व रंग असतात, पण त्यांच्या वासास व गोडीस आकार वगैरे नसतो; पण त्यांस अस्तित्व असतें. हें वासाचें व गोडीचें अस्तित्व घ्राणेंद्रियानें व रसनेंद्रियानें जाणलें जातें. त्याप्रमाणें निर्गुण ब्रह्म अथवा निर्गुण परमात्मा हा निराकार असतो, त्याला विशिष्ट आकार नसतो; पण त्यास अस्तित्व असतें. हें अस्तित्व इतर पदार्थांच्या अस्तित्वाप्रमाणें जडरूप नसतें, चिद्रूप म्हणजे चैतन्यरूप व आनंदरूपही असतें. म्हणून त्यास 'सद्-चिद्-आनंद' असें म्हणतात. हें **परमात्म्याचें निर्गुण म्हणजे सच्चिदानंदस्वरूप** इतर कोणत्याही इंद्रियांनीं जाणलें न जातां, फक्त विशुद्ध अशा बुद्धीनेंच जाणलें जातें. '**बुद्धिग्राह्यम् अतीन्द्रियम्**' असें गीतेंत सांगितलें आहे. अशुद्ध बुद्धि व शुद्ध बुद्धि असे बुद्धीचे दोन भेद आहेत. यालाच 'अशुद्ध मन' व 'शुद्ध मन' असेंही म्हणतात. "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह; अवाङ्मनसगोचरम्" इत्यादि श्रुतिवचनांमध्यें आत्मा मनाला अगोचर म्हणून जें सांगितलें आहे, तें राजसतामस वृत्तीनें वृद्धि पावलेल्या स्थूल म्हणजे अशुद्ध मनाला, असें समजावें "**मनसैवानु-द्रष्टव्यम्, दृश्यते त्वग्रया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः**" हींही श्रुति-वचनेंच आहेत. यांचा अर्थ शुद्ध मनानें, शुद्ध व सूक्ष्म बुद्धीनें आत्मा जाणला जातो, असा आहे. (याबद्दलचें विशेष विवरण मागील पृष्ठ ९३।९४ वर पहावें.) सगुण परमात्मा अथवा सगुण ब्रह्म म्हणजे परमात्म्याचे राम–कृष्ण–दत्त इत्यादि अवतार. हे फूल किंवा पेढा यांप्रमाणें साकार असल्यामुळें नेत्रांस दिसूं शकतात; हस्तादिक त्यांना स्पर्श करूं शकतात. पण त्याचें निर्गुणरूप निराकार असल्यामुळें तें बाह्येंद्रियग्राह्य नसून वर सांगितल्याप्रमाणें बुद्धींद्रियग्राह्यच आहे.

निर्गुण–सगुणाबद्दल थोड्याशा शास्त्रीय भाषेंत बोलावयाचें म्हणजे, सगुण **अवतार** हें परमात्म्याचें 'तटस्थ लक्षण' असून **सच्चिदानंद** हें परमात्म्याचें 'स्वरूपलक्षण' आहे. स्वरूपलक्षणाचा वस्तूशीं केव्हांही वियोग नसतो, तें लक्षण वस्तूशीं निरंतर एकरूप असतें; आणि तटस्थ लक्षण हें तसें नसतें. तें स्वरूपाशीं संलग्न कधीं असतें, कधीं नसतें. म्हणून सच्चिदानंद हें परमात्म्याचें 'निजरूप' म्हणतात आणि अवतार हें 'मायिक रूप' म्हणतात. निजरूपसाक्षात्काराशिवाय मोक्ष नाहीं, आणि निजरूपाचा साक्षात्कार ज्ञानाशिवाय होत नाहीं. म्हणूनच अर्जुन व उद्धव यांच्याशीं सगुण रूप नेहमीं खेळत, बोलत, चालत होतें तरी,

***************************************************

त्या भक्तांना निजरूपाचा साक्षात्कार देण्याकरितां भगवंताला उरस्फोड करून गुरुरूपानें ज्ञानच सांगावें लागलें. ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. नामदेवाची गोष्टही अशीच झाली, हें सर्वांना माहीत आहेच. तात्पर्य, भगवंताचें **निर्गुणरूप म्हणजे सच्चिदानंद,** (निजानंद, स्वानंद, ब्रह्मानंद, इत्यादि त्याचींच नांवें) आणि **सगुणरूप म्हणजे** भक्तकार्याकरितां धारण केलेले विशिष्ट **अवतार.** रामकृष्णादि अवतारांप्रमाणेंच विश्व हेंही भगवंताचा अवतार आहे. याला 'विराट्' अवतार म्हणतात. "**तस्माद्विराड् अजायत, विराजो अधिपूरुषः**" (पुरुषसूक्त) या अवताराचें यथार्थ ज्ञान हेंच 'सर्वात्मज्ञान'; या अवताराची जी भक्ति तीच 'सर्वात्मभक्ति' होय.

**" ज्ञान याचेंचि नाम। ज्या ज्ञानें कळे चराचर ब्रह्म। जड जगीं पाहणें चैतन्य परम। तें ज्ञान, सोनें जैसें पाहणें अलंकारीं॥"...**
**" जैसे तरंगांचे कल्लोळ। पाहों जातां दिसे जळ।**
**तैसें दिसे आत्मत्व केवळ। ब्रह्मांडादि जड पदार्थ पाहतां॥**

— यथार्थदीपिका

**आचार्य** आपल्या 'अपरोक्षानुभूती-' मध्यें म्हणतात —

**यथा तरंगकल्लोलैर्जलमेव स्फुरत्यलम्।**
**पात्ररूपेण ताम्रं हि ब्रह्माण्डाद्यैस्तथात्मता॥**

लाटांच्या रूपानें जलच स्फुरतें, किंवा भांड्याच्या रूपानें तांबेंच स्फुरतें, तसें ब्रह्मांडाच्या रूपानें परमात्माच स्फुरतो.

**श्री**ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

**" हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तम। ऐसा जयाचा मनोधर्म"**
**" तैसें विश्व येणें नांवें। हें मीच पै आघवें॥"**
**" म्हणोनि विश्वपण जावें। मग तयीं मातें घेयावें।**
**तैसा नव्हे, आघवें। सगटचि मी॥"**

— ज्ञानेश्वरी

तात्पर्य, श्रीराम-कृष्णादि अवतारांप्रमाणें विश्व हें परमात्म्याचें सगुणरूप आहे, हें लक्षांत ठेवावें.

*   *   *

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

## उपासना व भक्ति यांतील तारतम्य !

परमात्म्याचें निर्गुणरूप म्हणजे सच्चिदानंद व सगुणरूप म्हणजे अवतारदेह. पैकीं निर्गुणरूप हें व्यापक व सगुणरूप हें एकदेशी आहे. अखंडैकरस चैतन्य जें अनंतकोटि ब्रह्मांडांना व्यापून पुनः अनंतत्वानें उरलें आहे, तें परमात्म्याचें निजरूप, निर्गुणरूप; त्याची ' इदं- 'त्वानें उपासना न करितां, ' अहं- 'त्वानें उपासना करावयाची, अर्थात् त्या ब्रह्मचैतन्याचा अंश जो आपल्या अंतःकरणांत नित्य स्फुरद्रूप आहे, त्याकडे वृत्ति फिरवावयाची. हिला निर्गुण भक्ति म्हणतात. " **स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते** " असें आचार्य आपल्या ' विवेकचूडामणी- ' मध्यें भक्तीचें लक्षण सांगतात. **चैतन्याकडे वृत्ति फिरविणें या नांवें भक्ति** " ही शिवरामस्वामींची भूपाळी तर सर्वांना माहितच आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चैतन्याचें अनुसंधान करणें ही निर्गुणभक्ति अथवा निर्गुण उपासना, आणि भगवंताच्या अनंत अवतारांपैकीं आपल्या आवडीनुसार कोणत्याही अवताररूपाचें ध्यान, अर्चन, वंदन, गुणगायन, इत्यादि करणें ही सगुण उपासना. **उप** म्हणजे जवळ आणि **आसन** म्हणजे बसणें; ही जी देवाच्या जवळ जाऊन बसण्याची युक्ति अथवा क्रिया हिला उपासना म्हणतात. उपासनेसच भक्ति म्हणण्याचा संप्रदाय आहे. आणि अशी भक्ति ' उत्कट ' रीतीनें झाली म्हणजे स्वप्रकाशज्ञानाचा उदय होतो. ह्या हेतूनेंच " **भक्ति ज्ञानाची माउली** " असें श्रीतुकाराममहाराज म्हणतात.

श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन हे भक्तीचे नऊ प्रकार सर्वश्रुत आहेतच. ह्यांचें वर्णन अथवा विवरण दासबोधादि ग्रथांतून वाचावयास मिळतेंच. श्रीनारदांनीं व शांडिल्यादिकांनींही ' भक्तिसूत्रें ' अथवा भक्तिशास्त्रावर ग्रंथ केलेले आहेत. त्यांमध्यें श्रीमद्भागवत हा व्यासप्रणीत ग्रंथ सर्वश्रेष्ठ मानला जातो. सर्वोपनिषदांचें सार गीता व गीतेचा विस्तार भागवत असें विद्वान लोक म्हणतात. भागवत हा पुराणग्रंथ आहे. तथापि इतर पुराणें हीं ' पंचलक्षणात्मक ' व भागवत ' दशलक्षणात्मक ' आहे; त्यामुळें इतर पुराणांपेक्षां भागवतास विशेष मान आहे. भागवत हें नुसतें पुराण नसून, भक्तीचें तें स्वतंत्र ' शास्त्र ' आहे; आणि नुसत्या व्युत्पत्तीनें म्हणजे पांडित्यानें तें समजणारें नसून भक्तीचा उत्कर्ष ज्याच्यामध्यें झाला असेल त्यासच तें लागणारें म्हणजे यथार्थत्वानें समजणारें आहे, ' भक्त्या भागवतं शास्त्रं ' असें तत्त्वज्ञ विद्वानांचें त्याबद्दल आदरयुक्त मत आहे. इतर ग्रंथांप्रमाणें भक्तीनें ज्ञान होतें असें यांत सांगितलें असलें

तरी, ज्ञानानंतरच निजभक्तीचा म्हणजे खऱ्या भक्तीचा अथवा 'पराभक्तीचा' उदय होतो, असें यांत प्रतिपादिलें आहे. ज्ञानापूर्वी करणेच्या भक्तीस 'साधनरूपा' भक्ति आणि ज्ञानानंतर करणेच्या भक्तीस 'फलरूपा' भक्ति म्हणतात. उपासना ही साधनरूपा भक्तींत मोडते. उपनिषदांत पंचविद्योपासना सांगितली आहे, पण पुढें ज्ञानकांडाच्या प्रसंगांत उपासनेचा त्यागही उघडपणें सांगितला आहे. परंतु भक्ति ही ज्ञानाचें फळ असल्यामुळें तिचा स्वीकारच तत्त्वज्ञ संतांनीं व ऋषींनीं पुरस्कारला आहे. भक्तीचा त्याग कुठेंच कोणीं सांगितला नाहीं. भागवतांतील खालील श्लोक हा फलरूपा भक्तीचा सर्वप्रसिद्ध आहे.

**आत्मारामाश्च मुनयो, निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ।**
**कुर्वंत्यहैतुकीं भक्तिं, इत्थंभूतगुणो हरिः ॥**

याचा अर्थ — आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं रममाण होऊन राहिलेले व ज्यांची चिदचिद्ग्रंथि तुटली आहे असे (ब्रह्मज्ञानी व ब्रह्मनिष्ठ) मुनिही भगवंताची अहैतुकी म्हणजे निष्कामभक्ति करीत असतात. कारण त्या सगुण श्रीहरीचे गुणच तसे दिव्य आहेत. (या श्लोकाचे श्रीगौरांगप्रभूंनीं ८१ अर्थ केले आहेत. असा हा महत्त्वाचा श्लोक आहे.)

**जन्मकर्म च मे दिव्यं एवं यो वेत्ति 'तत्त्वतः'।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥**

असें भगवंतच आपल्या मुखानें गीतेंत सांगतात. याचा अर्थ, भगवंताचे अवतार-देह व त्या देहांकडून होणारीं कर्में हीं खरोखरीच **दिव्य** असतात, हीं जन्मकर्में जो 'तत्त्वतः' जाणतो, त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं; तो भगवंतालाच जाऊन मिळतो, असा आहे. भगवंताचीं जन्मकर्में **दिव्य,** त्या उलट जीवांचीं जन्मकर्म **मलीन.** मलीन जन्मकर्मांचा नाश दिव्य जन्मकर्मांच्या ज्ञानानें होतो. असें भगवंताच्या सगुण अवताराचें महत्त्व आहे. म्हणूनच जीवन्मुक्त पुरुषसुद्धां त्याची निष्काम भक्ति करितात. राजसूय यज्ञाचे वेळीं भगवंतानें धर्माच्या घरीं काढलेल्या उष्टया पत्रावळींतील शितें **शुक** व **वाम**देव मुनींनीं (महामुक्त पुरुषांनीं) पक्ष्याच्या रूपानें येऊन खाल्लीं ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तसेंच गोपाळकाल्याच्या वेळीं इंद्रादिक देव उच्छिष्ट मिळण्याच्या आशेनें यमुनेंत मासे होऊन येऊन राहिले होते हीही गोष्ट प्रसिद्ध आहे. "**यं सर्वे देवा नमन्ति मुमुक्षवो ब्रह्मवादिनश्च** — अशी श्रुति आहे. तो ईश्वर सामर्थ्यवान आहे, म्हणून सर्व देव त्याला भजतात

व ज्ञानी त्याची भक्ति केवळ प्रेमानें करितात. ... मुक्तांना आत्मज्ञान होऊन ते पूर्ण झाल्यावरही भगवद्भक्तीच करीत राहतात. ” असें श्रीगुलाबरावमहाराज यांनीं आपल्या ‘ योगप्रभाव ’ ग्रंथांत सांगून ज्ञानोत्तर भक्तीची सुंदर मीमांसा केली आहे. इतर **संतांनीं** ज्ञानोत्तर भक्तीची आपल्या ग्रंथांत प्रशंसा केलेली आहे, पण गुलाबरावमहाराजांनीं आपल्या ग्रंथांत ज्ञानोत्तर भक्तीची मीमांसा केलेली आहे. ( ती जिज्ञासूंनीं त्यांच्या ग्रंथांतच पाहून घ्यावी. )

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥**

या गीताश्लोकावर (अ. १८।५४) त्यांचा फार कटाक्ष आहे. ब्रह्मज्ञानाच्या योगें ब्रह्मभाव प्राप्त झाल्यानंतरच त्याला पराभक्ति लाभते, असें त्यांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. या श्लोकावरील, तसेंच पुढील ६८ व्या श्लोकांतील ‘ भक्तिं मयि परां कृत्वा ’ यावरील श्रीवामनपंडितांची यथार्थदीपिकेंतील टीकाही गीताभक्तांनीं व भक्तिभक्तांनीं अवश्य वाचून पहावी. ( सगुण–निर्गुणाविषयींची सुविस्तृत व रहस्यमय चर्चा आमच्या ‘ श्रीरामचरित्ररहस्य ’ पुस्तकांत पाहून घ्यावी. )

अद्वैतांत ( भजक, भज्य व भजन या त्रिपुटीशून्य अवस्थेंत ) भक्ति कशी संभवते, ही गोष्ट शब्दांनीं सांगतां येण्यासारखी नसून अनुभवानेंच जाणावयाची आहे, असें श्रीज्ञानेश्वरमहाराज खालील ओवींत सांगतात —

**“ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे ।**
**हें अनुभवाचि जोगें, नोहे । बोला ऐसें ॥ ”**

—ज्ञानेश्वरी, अ. १८।११५१

ही ओवी ज्ञानोत्तर भक्तीच्या संबंधानें सर्वप्रसिद्ध आहे. भगवंतांनीं आपल्या भक्तांच्या चार कोटि सांगितल्या आहेत ( आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी ). या चारींमध्यें ज्ञानी भक्तच श्रेष्ठ म्हटलेला आहे. ‘ **ज्ञानी त्वात्मैव मे मतम्** ’ म्हणजे ज्ञानी भक्त हा माझा आत्मा व मी त्याचा देह असें भगवान् म्हणतात. यावरूनही ज्ञानोत्तर भक्ति सिद्ध होते. तात्पर्य, ज्ञान झाल्यानंतर स्वात्मरूपानें भगवंताला जाणून त्याची केली जाणारी भक्ति हिचेंच नांव खरी ‘ भक्ति ’; व त्यापूर्वींची भक्ति ही ‘ उपासना ’ होय असें जाणावें.

याप्रमाणें उपासना व भक्ति यांमध्यें तारतम्य आहे, त्याचें किंचित् दिग्दर्शन वर केलें आहे, त्यावरून भक्तीची कल्पना वाचकांच्या लक्षांत येईलच. पण अशी

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

ही निजभक्ति, पराभक्ति आपल्या आटोक्याच्या बाहेरची आहे असें वाटून घाबरून जाण्याचें कारण नाहीं. ही 'मुक्तीवरील भक्ति' खरोखरच 'शूळावरील पोळी' असली तरी, त्यापूर्वी होणारी उपासना अथवा साधनरूपा भक्ति ही कमी किंमतीची लेखूं नये. आपापल्या सांप्रदायानुसार, आपल्याला झेपेल तशा भावनेनें व कृतीनें मात्र अंतःकरणपुरःसर ती करीतच असावी. सर्वज्ञ भगवान् तशा आपल्या भक्ताला आपल्याकडे येण्याचा मार्ग दाखवून आपल्याकडे आकर्षून घेतोच. याबद्दल '**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते**' हें त्याचें आश्वासन अथवा अभिवचन प्रसिद्धच आहे. दुसरें, ज्ञानावांचून भक्ति केली तरी ती फुकट जात नाहीं. अंतकरणांत तसा दृढ विश्वास मात्र असला पाहिजे.

**"माझेनि भजनें कृतकृत्यता । दृढविश्वास धरोनि चित्ता ।**
**भजनीं प्रवर्तावें सर्वथा । अविश्रमतां अहर्निशीं ॥**
**माझ्या भजनाच्या आवडीं । नुरेचि आराणुकेसी वाडी ।**
**वायां जावों नेदी अर्ध घडी । भजन-परवडी या नांवु ॥**
**माझ्या भजनीं प्रेम अधिक । न सांडावें नित्य नैमित्तिक ।**
**वैदिक लौकिक दैहिक । भक्तांसी बाधक नव्हे कर्म ॥**
**आचरतां सकळ कर्म । न कल्पावा फळसंभ्रम ।**
**हेंचि भक्तीचें गुह्य वर्म । उत्तमोत्तम अधिकारु ॥"**

—एकनाथी भागवत

भगवंताच्या प्रीतीसाठीं कर्मे करावीं; दुसरी फळाशा धरूं नये. भगवंत अथवा भगवत्प्रीति हेंच फळ. याशिवाय दुसरें फळ मनांत धरलें, तर ती भक्ति भगवंताची होत नसून, त्या फळाची म्हणजे विषयाची झाली. भगवंत कोणीकडे आणि तदितर क्षुद्र फळ कोणीकडे ? याकरितां कर्मे करावयाचीं तीं भगवत्प्रीत्यर्थ केलीं म्हणजेच भगवद्भक्ति झाली आणि अशा शुद्ध भावानें केलेली भक्ति ही ज्ञानाचा देखील मुलाजा धरीत नाहीं. याबद्दल भगवान् भागवतांतच सांगतात—

**"माझें भजन करितां । न पडे ज्ञानाची पंगिस्तता ।**
**माझे भजनें नित्यमुक्तता । जाण मद्भक्तां सद्भावें ॥**
**ज्ञानेंवीण भक्ति न घडे । म्हणती तें शब्दज्ञान धडफुडें ।**
**भक्तीस्तव जाण रोकडें । ज्ञान जोडे अपरोक्ष ॥**
**यालागीं माझें भजन करितां । ज्ञानाचा पांगू न पडे भक्तां ।**
**देहगेहामाजीं वर्ततां । बंधन मद्भक्तां लागेना ॥**

**ज्याच्या मुखीं माझें नाम । ज्यासी माझा भजनसंभ्रम ।**
**ज्याच्या मनीं मी आत्माराम । त्याचें दासीकाम मुक्ति करी ॥**
**मुक्तीमाजीं विशेषु कायी । वृत्ति निर्विषय असे पाहीं ।**
**भक्तांसी सर्व कर्मांच्या ठायीं । स्फुरण नाहीं विषयाचें ॥**
**भक्तांचें विषयीं नाहीं चित्त । त्यांचा विषय तो मी भगवंत ।**
**ते सदा मजलागीं लोलुप्त । नित्यमुक्त यालागीं ॥**
**भक्त विषयो सेविती । ते ग्रासोग्रासीं मज अर्पिती ।**
**तेणेंचि त्यांसी वंदी मुक्ति । सर्वभूतीं मद्भावो ॥ "**

— एकनाथी भागवत

यापेक्षां भक्तीचें महिमान कोणत्या अधिक शब्दानें कोण सांगणार आहे? ( भक्तीचे **वैधी, रागा**त्मिका व **परा** असे भेद व त्यासंबंधींचें विशेष वर्णन मागें ' मंत्रयोगाचीं सोळा अंगें ' या लेखांत पृ. १७ ते ३९ पर्यंत केलेलें आहे, तें पुनः एकदां वाचकांनीं वाचून पहावें. )

भगवंताचीं सगुण चरित्रें वाचणें, ऐकणें, गाणें, जयंत्यादि उत्सव करणें, त्याच्या दिव्य **सगुणरूपाचें ध्यान करणें** व त्याच्या दिव्य **नामाचा जप करणें**, त्याच्या प्रतिमेची बाह्य पूजा व मानस पूजा करणें, तसेंच कोणाही भूताचा मत्सर न करितां सर्वांभूतीं त्याला पाहणें, हीं भक्तीचीं साधनें आहेत. भगवद्भक्तांची ( संतांची ) संगति व सेवा हेंही एक भक्तीचें उत्तम साधन असून, या साधनांत इतर सर्व साधनें सुलभ होऊन जातात. रूपध्यानाचें व नामस्मरणाचें वर्म सत्संगतींत उमगलें जाऊन शांति, क्षमा, दया वगैरे सर्व आनुषंगिक गुणांची सहज प्राप्ति होते व ' फलरूपा ' अथवा ' सिद्धिदशागत ' भक्तीचा उत्कर्ष त्याच्यांत होऊन तो ( साधक ) कृतार्थ होतो. श्रीतुकाराममहाराज म्हणतात —

**" भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति क्षमा दया ॥**
**अष्ट महासिद्धि वोळंगती द्वारीं । नवजती दुरी दवडितां ॥**
**तेथें दुष्ट गुण न मिळे निःशेष । चैतन्याचा वास जयामाजीं ॥**
**संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणांची ॥**
**तुका म्हणे येथें काय तो संदेह । आमुचें गौरव आम्ही करूं ॥ "**



# भावेवीण भक्ति

भक्ति म्हटली कीं तेथें भाव पाहिजे. भावावांचून भक्ति व्यर्थ आहे. भावावांचून भक्ति कशी करतां येईल, अशी सकृद्दर्शनीं शंका येते; पण व्यवहारांत तसा प्रकार दिसून येतो खरा, भावावांचून भक्ति ही कोरडी भक्ति होते आणि म्हणूनच संतांनीं तशा भक्तीवर कोरडे मारले आहेत. पण रामोशी चोरांप्रमाणें लोकांचीं मनें इतकीं निगरगट्ट झालीं आहेत कीं, असे कोरडे कितीही मारले तरी ते त्यांना लागतच नाहींत ! 'ज्ञानियांचा राजा' ज्ञानोबारायांचाच वरील कोरडा आहे. ते आपल्या हरिपाठाच्या अभंगांत म्हणतात—

> **" भावेंवीण भक्ति, भक्तीवीण मुक्ति ।**
> **बळेंवीण शक्ति, बोलूं नये ॥ "**
>
> —हरिपाठ, अ. ४ था।

भावावांचून भक्ति घडणें शक्य नाहीं व भक्तीवांचून मुक्ति मिळणें शक्य नाहीं, ही खूणगांठ बांधून ठेवावी. देव पाताळांत नाहीं, भूतळीं नाहीं व आकाशांतही नाहीं; त्याचप्रमाणें तो पाषाणांत नाहीं व तीर्थांतही नाहीं; तर फक्त आहे तो भावांत. '**भावेषु विद्यते देवः**' हें वचन प्रसिद्ध आहे. पण त्याकडे कोणी लक्ष देत नाहीं. श्रीकृष्ण पांडवांनाही दिसत होता, तसाच कौरवांना पण दिसत होता; पण पांडवांच्या ठिकाणीं 'भाव' होता, तो कौरवांमध्यें नव्हता. 'भावासारखा देव' अथवा 'भावनेसारखें फळ' ही म्हण प्रसिद्ध आहे. 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' हें गीतेंतील वचन त्याच अर्थाचें आहे. पांडवांना व प्रल्हादाला देव आपला रक्षणकर्ता आहे असा भाव होता, त्याप्रमाणें त्याचें फळ आलें. इतरांना विरुद्ध फळ आलें. प्रल्हादानें अग्नींत, समुद्रांत, पर्वतपाषाणांत, विषांत व लाकडाच्या खांबांतही देवाचा भाव धरला, त्याप्रमाणें देव त्याला तेथें तेथें भेटत गेला. रावणाला व कौरवांदिकांना रामाच्या व कृष्णाच्या ठिकाणीं मनुष्यभावना होती. त्यामुळें भगवान् प्रत्यक्ष सगुणरूपानें हजर असून तसा भाव नसल्यामुळें त्याचें प्रत्यक्ष दर्शनही व्यर्थ झालें ! देवाच्या साक्षात् अवताररूपांतही जर भावाचा अभाव असूं शकतो, तर मग देवाचे फोटो व प्रतिमा यांत देवभाव स्फुरला नाहीं, तर त्यांत काय आश्चर्य आहे ?

देवळांतील प्रतिमेंत पुजाऱ्यांचा जर देवभाव यथार्थ असता, तर देवाच्या अंगावरील दागिने चोरण्याची किंवा पूजोपचारांमध्यें लटपटपंची करण्याची बुद्धि

त्यांना कशी झाली असती ? देवाच्या गर्भकुडींत बसून बायकोला व मुलें वगैरेंना शिव्या देणें किंवा बाहेरच्या माणसांशीं व्यावहारिक कसल्या तरी गप्पा-गोष्टी करणें त्यांच्याकडून झालें नसतें ! असे प्रमाद, प्रतिमेच्या ठिकाणीं धारावाही देवभावना अर्चकांची नसल्यामुळें होत असतात.

'भाव' शब्दाचा धात्वर्थ 'असणें' असा आहे. (भू सत्तायां); अर्थात् 'अभाव' म्हणजे 'नसणें.' देवाचा भाव म्हणजे अस्तित्व मानितो तो आस्तिक व देवाचें अस्तित्व मानीत नाहीं तो नास्तिक, हें सहजच ठरतें. देवाच्या अस्तित्वाचा, गुणाचा, स्वरूपाचा व शक्तीचा विचार धर्मांत केलेला असतो, म्हणून धर्मानें वागणारा तो आस्तिक व त्या उलट वागणारा तो नास्तिक असें म्हणण्याचा अथवा मानण्याचा प्रघात आहे. आपल्या धर्मांचे आचार असे कांहीं बांधलेले आहेत कीं, त्यांचें समजून उमजून आचरण करणारा मनुष्य हळुहळू देवाच्या स्वरूपास जाऊन मिळालाच पाहिजे. 'नराचा नारायण' झालाच पाहिजे. हेंच मनुष्यजन्माचें अंतिम ध्येय होय. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, हें ध्येय गांठण्यासाठीं वाट चालत असतां ध्येयाच्या उंच निशाणाकडे नजर राखून न धरल्यामुळें दिशा चुकून पाय भलतीकडे जाऊं लागतात ! देवाचा वास सर्वत्र आहे; तो सर्वसाक्षी असून न्यायी आहे, असें जाणणारा माणूसही एकान्तांत चोरी, हिंसा, व्यभिचार, इत्यादि अधार्मिक कृत्यें करितो व लोकान्तांत असत्य भाषणादि करणेस भीत नाहीं. त्याला, मग तो कितीही धर्माचीं व भक्तीचीं बाह्य आचरणें करो, 'नास्तिक' म्हणणेस काय हरकत आहे ? देवाचें सर्वत्र असणारें 'अस्तित्व' विसरल्याशिवाय त्याच्याकडून तशीं अधार्मिक कृत्यें म्हणजे पापाचरण केव्हांही घडणें शक्य नाहीं. अर्थात् देवाचें अस्तित्व विसरून केली जाणारी जी भक्ति तीच '**भावावीण भक्ति**' होय; व देवाचें अस्तित्व अखंड स्मरून केली जाणारी भक्ति तीच '**भावयुक्त भक्ति**' होय. नसलेस —

> **" मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥**
> **तैसा भक्तिवाद काय । रंग बेगडीचा न्याय ॥ "**

असें होईल. श्रीतुकाराममहाराजांचा खालील अभंगही पहा —

> **" कासया पाषाण पूजिसी पितळ । अष्ट धातू खळ भावेंवीण ॥**
> **भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलिग्रेलें ॥**
> **काय करिल जपमाळा कंठमाळा । करिसि वेळोवेळां विषयजप ॥**

**काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥**
**काय करिशील कुशल गायन । अतंरीं मळीण कुबुद्धि ते ॥**
**तुका म्हणे भाव नाहीं, करी सेवा । तेणें काय देवा योग्य होसी ॥**"

या एकाच अभंगाच्या कसोटीवर आपलें जप, तप, पूजन, अर्चन, भजन, कीर्तन, इत्यादि लावून पाहावीं व निज कल्याणेच्छेनें उणीव असेल ती भरून काढावी. देवाची उपासना करण्यापेक्षां भावाची उपासना करावी. कारण **देव तारक नसून देवभाव तारक आहे. "भाव धरी तया तारील पाषाण"** असें श्रीतुकोबाराय म्हणतात. "भाव देवाचें उचित । **भाव तोचि भगवंत**" अशी वरील विधानाची उपपत्तिही ते देतात. त्यांच्या परमभक्त व शिष्या बहिणाबाई आपल्या अभंगांत म्हणतात —

"**बहिणी म्हणे भाव तोचि आम्हां देव । नाहीं या संदेह अणुमात्र**
**भाव तेथें भक्ति, भक्ति तेथें ज्ञान । ज्ञानें समाधान होय चित्ता**
**अशुद्ध तो भाव करी घात सर्व । अंगीं वसे गर्व तयाचिया**
**बहिणी म्हणे भाव इच्छाफळदानी । पाववी निर्वाणीं मोक्षपदा**"
"**गुळावीण कैंचो गोडी । जाणों येईल आवडी ॥**
**तैसा देव भावेवीण । कैसा जाणावा आपण ॥**" इत्यादि

तात्पर्य, भावावांचून भक्ति ही भक्ति नसून भक्तीची नुसती कवाईत अथवा नक्कल आहे. पूजे-अर्चेनें, स्तुतिस्तोत्रानें किंवा नामोच्चारणानें फार झालें तर कायिक व वाचिक तप थोडेंसें घडेल, पण मानस तप घडण्यास भावाचीच कास धरली पाहिजे. 'भावसंशुद्धि' झाली पाहिजे. (**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानस-मुच्यते**'–भ. गी.) 'भाव' शब्द गीतेंत पदार्थ, श्रद्धा, वृत्ति, स्वरूप व अस्तित्व, इत्यादि अर्थानें वापरला आहे. परंतु त्याचा धात्वर्थ अस्तित्व असा आहे. देवाच्या सर्वात्मभावाचा (**सर्वं खल्विदं ब्रह्म**) अभ्यास पचनीं पडण्याकरितां देवाच्या प्रतिष्ठित मूर्तींत प्रथम **देवाच्या अस्तित्वाच्या भानाचा अभ्यास** केला पाहिजे. ( Practise to feel the Presence of God ) प्रत्यक्ष आपले परमपूज्य धर्मगुरु शंकराचार्य स्वामी किंवा दुसरे कोणी थोर पुरुष आपल्या घरीं आले किंवा आपण त्यांच्या घरीं गेलों व त्यांच्या जवळ उभें राहिलों म्हणजे त्यांच्या अस्तित्वाचें भान आपल्या अंतःकरणांत कसें स्फुरतें व त्या स्फुरणामुळें आपण किती नम्र होतों व मर्यादेनें वागतों तें पहा; त्याचप्रमाणें देवाच्या प्रतिमेसंनिध असतांना देवाच्या

अस्तित्वाचें भान हृदयांत वागवून अगदीं नम्र व पूज्यभावनेनें मर्यादशीलपणानें वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तशा स्थळीं मौन धारण करणें किंवा कार्यपरत्वें अगदीं हळूं बोलण्याचा नियम ठेवणें हें देवाच्या अस्तित्वाच्या भानाभ्यासास फार उपयोगीं पडतें. आपल्या हिंदू लोकांपेक्षां ख्रिस्ती लोकांत मुलांना लहानपणापासून देवाचा 'भाव' शिकवितात. आम्ही हिंदूलोक देवाची 'भक्ति' म्हणजे स्तोत्रें, पूजा, श्लोक वगैरे म्हणण्यास शिकवितों; प्रदक्षिणा व नमस्कारही घालण्यास शिकवितों; पण भावाभ्यास शिकवीत नाहीं. त्यामुळें आमच्या देवळांत कथापुराणाच्या वेळीं मुलांचा कोलाहल किती माजतो आणि त्यांच्या (ख्रिस्ती) देवळांत पांचपांचशें लोक सामुदायिक उपासनेस, प्रार्थनेस किंवा उपन्यासास जमले असतां मोठ्यानें बोलणें तर राहो, पण शिंकणें खोकणेंही ऐकूं येत नाहीं, इतकी शांतता कशी पसरलेली असते, हें पाहाण्यासारखें आहे. भावाचा अभ्यास केला म्हणजे भक्तीचीं चिन्हें व उचित वर्तन आपोआप होऊं लागतें. तात्पर्य, **अंतरांतील भावावांचून बाहेरील भक्ति व्यर्थ होय !**

आतां देवप्रतिमेच्या ठिकाणीं भावाचा अभ्यास म्हणजे अस्तित्वाचें भान करूं लागलों कीं, मग हृदयांतील देवाचा भाव धरूं लागणें सोपें जातें. हृदयांतील देवाचें अस्तित्व बुद्धिवृत्तींत खेळूं लागलें अर्थात् अस्तित्वाचें भान होऊं लागलें, म्हणजे मग बाहेरील स्थिरचरात्मक जगांतही तें भान (चिद्भान) उमटूं लागतें. असें झालें म्हणजे सर्वात्मभाव प्रगट होतो व साधक पूर्णावस्थेस पोंचतो.

> **" सर्वात्मभक्तीचें दृढपण। तेंच ज्ञानपरिपाकाचें लक्षण।**
> **याचेंच नांव कमलेक्षण। निजप्राप्ति बोलतसे ॥ "**
>
> — यथार्थदीपिका

> **" भगवद्भाव सर्वांभूतीं। हेंच ज्ञान हेचि भक्ति ॥ "**
>
> — श्रीएकनाथ

आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगणेची राहिली, ती ही कीं, उपास्यदेवतेचे ठिकाणीं, नव्हे उपास्यदेवतेच्या मूर्तीच्या ठिकाणीं जसा देवभाव कल्पावयाचा, तसा आपल्या अंगाचे ठिकाणींही तोच भाव स्थापावयाचा असतो. वेदोक्त पूजेमधील षडंगन्यास (करन्यास व अंगन्यास) किंवा लघुरुद्राभिषेकादिकांचे वेळीं करावयाचा 'लघुन्यास' यांमध्यें आपल्या शरीराच्या प्रत्येक अंगावर (अवयवावर) निरनिराळ्या देवता किंवा एकाच देवतेचीं निरनिराळीं रूपें, अथवा जपावयाच्या मंत्रांमधील

निरनिराळीं पदें ( शब्द ) स्थापन करून आपण आपलें मनुजत्व विसरून देवतारूप किंवा मंत्ररूप व्हावयाचें असतें व नंतरच त्या देवतेची संकल्पित आराधना व संकल्पित मंत्राचा जप करावयाचा असतो; कारण त्या न्यासादिकांनीं आपलीही ' सगुण सजातीय काया ' झाल्याशिवाय त्या सगुण देवतेची पूजा किंवा तो मंत्रजप करावयाचा अधिकारच मुळीं प्राप्त होत नाहीं. **' शिवो भूत्वा शिवं यजेत् '** म्हणजे शिव होऊन शिवाला पूजावें अशी श्रुति आहे. मंत्रजपानुष्ठानाच्या वेळीं मंत्रांतील निरनिराळे शब्द अथवा अक्षरें यांचा आपल्या निरनिराळ्या अवयवांवर न्यास करण्याचा हेतु-देवता ह्या मंत्रमय असतात, त्यामुळें आपणही न्यासानें मंत्ररूप म्हणजे देवतारूप व्हावयाचें व नंतर मंत्राचा जप करावयाचा; असा सुंदर विधि शास्त्रांत सांगितला आहे. पण असा विधि करीत असतांना त्याचा भाव न जाणल्या-मुळें, म्हणजे आमच्या भाषेनें बोलावयाचें झाल्यास भाव न अभ्यासिल्यामुळें त्या करणीचा उपयोग व्हावा तसा होत नाहीं. तसा भावनाभ्यास अथवा तें भावोत्पादन न होण्याचें कारण संस्कृत भाषेचा अनभ्यास हें एक आहे. तेवढें एकच कारण म्हणावें, तर ज्यांना संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान आहे असे शास्त्री देखील त्या शब्दांतील भावाची उपेक्षाच नव्हे, तर कधीं कधीं थट्टाही करतांना आढळतात ! उदाहरणार्थ – पितृतर्पणाचे वेळीं **" ये के चास्मत्कुले जाता अपुत्रा गोत्रिणो मृताः । ते गृह्णन्तु मया दत्तं वस्त्रानिष्पीडनोदकम् ॥ "** हा मंत्र म्हणून वस्त्र अथवा यज्ञोपवीत पाण्यानें भिजवून पिळावयाचें असतें. या मंत्राचा अर्थ — आमच्या कुळामध्यें जे कोणी निपुत्रिक होऊन मेलेले असतील ते हें माझें वस्त्र पिळलेलें पाणी ग्रहण करोत असा आहे. किती उदात्त भावनेचा विश्वव्यापक प्रेमाभ्यासकारक हा मंत्र आहे. पण हा मंत्र म्हणून तर्पण करवितांना मुद्दाम आपलें ढुंगण खाजवून तरुण विद्यार्थ्यांसमोरही थट्टा करीत असणारे वैदिक शास्त्री आम्ही पाहिले आहेत ! त्या मंत्रांतील ' ये के चास्मत्**कुले** ' या शब्दोच्चाराचे वेळीं ' कुले ' ( म्हणजे आमच्या कुळांत ) शब्दाचा अर्थ, आपलें ढुंगण खाजवून दाखवून, कुला असा करितात ! गुरुजींच्या ह्या विनोदास पाहून शिष्यही हसूं लागतात. तसेंच, रुद्र म्हणत असतांना ' उभाभ्यामुतते नमो ' म्हणते वेळीं उभ्यानें मुततो असा बीभत्स अर्थ बोलून व हाताच्या बोटानें खुणा करून दर्शवून हशा पिकवितात व त्या योगें त्या कार्याचा गंभीरपणा घालवितात ! हें धार्मिक अनुष्ठान कीं देवधर्माची थट्टा ? हे सारे अमंगल, नीच, आत्मघातकी, अनार्य प्रकार पाहिले म्हणजे धर्मज्ञ लोकांस किती दुःख होईल व देवता आणि पितर तेथें अदृश्यरूपानें हजर असतील तर त्यांना

काय वाटेल, याची कल्पना समंजस वाचकांनींच करावी. वैदिक कर्माच्या अशा अनुष्ठानानें, नव्हे चेष्टेनें त्या कर्माचें शास्त्रोक्त फळ न मिळालें किंवा विपरीत फळ आलें, तर त्यांत काय आश्चर्य आहे? वैदिक धर्म सुधारक लोक बुडवितात म्हणण्यापेक्षां अशा अभाविक वैदिकांनींच तो बुडविला अथवा बुडवीत आहेत, असे म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे बरें? या सर्व प्रकारावरून एवढें स्पष्ट म्हणावेंसे वाटतें कीं, आमच्या इकडे '**भक्तीच्या शाळेंत भावाचें शिक्षण दिलें जात नाहीं**' त्याचा हा परिणाम होय.

वरील किळसवाणीं उदाहरणें वाचून सज्जन वाचकांच्या मनांत किळस उत्पन्न झाल्यावांचून राहाणार नाहीं. पण काय करावें? सांगितल्यावांचून राहवत नाही म्हणून सांगणें भाग पडलीं. अशा प्रसंगीं —

**" निंदावें हें जग। ऐसा भागा आला भाग॥ "**
**" होईल तैसें बळ। फजित करावे ते खळ।**
**तुका म्हणे त्यांचें। पाप नाहीं ताडणाचें॥ "**

असें श्रीतुकाराममहाराज म्हणतात. पण तो त्यांचा अधिकार त्यांच्याकडे. आम्ही अशा लोकांना 'खळ' म्हणण्यापेक्षां 'अज्ञान' असेंच म्हणूं. तथापि समाजांत या गोष्टींची चर्चा होऊन तशा गोष्टींबद्दल चीड उत्पन्न व्हावी व हे दोष सुधारावे, एवढ्याच शुद्ध हेतूनें तीं उदाहरणें दिलीं आहेत असें समजून, वाचक त्याबद्दल क्षमा करतील अशी आशा आहे.

## अर्थ समजून मंत्र म्हणावे!

फळ हें कर्मावर नव्हे, तर कर्म करणाऱ्याच्या भावावर अवलंबून असतें आणि इष्ट भाव उत्पन्न होण्याकरितां इष्ट मंत्राची योजना असते. पण मंत्रांचा अर्थ समजला तरच त्यांतील भाव हृदयांत उत्पन्न होतो आणि म्हणूनच अर्थ न समजतां मंत्र म्हणणाऱ्या ब्राह्मणास शास्त्रानें जड खांबासारखा भारवाही असें म्हटलें आहे. " साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं " अशा तऱ्हेचे टोले संतांनींही मारले आहेत. शब्दांचे अर्थ जाणूनही त्यांतील भावाकडे लक्ष न देणारे लोक अर्थज्ञ नसून अनर्थ उत्पन्न करणारे होत हें मागें दर्शविलेंच आहे! वेदांतील गूढ मंत्रांचे अर्थ सोडून द्या, पण पूजेसारख्या साध्या कर्मांतील अगदीं साधे मंत्रही अर्थाकडे लक्ष देऊन म्हणण्याची कोणी काळजी घेत नाहींत! उदाहरणार्थ —

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**" साज्यं त्रिवर्तिसंयुक्तं वन्हिना योजितं मया ।**
**दीपं गृहाण देवेश त्रैलोक्यतिमिरापह ॥**
**भक्त्या दीपं प्रयच्छामि देवाय परमात्मने ।**
**त्राहि मां नरकाद्घोराद्दीपोऽयं प्रतिगृह्यताम् ॥ "**

ह्या दीपाच्या मंत्रांत देवाला 'देवेश, त्रैलोक्यतिमिरापह, परमात्मन्' अशा गोड गोड विशेषणांनीं संबोधून, 'मला घोर नरकापासून तार' अशी प्रार्थना केली आहे. याचा योग्य भाव हृदयांत उमटला तर त्या पूजकाचें अंतःकरण किती नम्र होईल व किती प्रेमानें भरून जाईल बरें! तसेच प्रदक्षिणा, नमस्कार करतांना **" अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम। तस्मात्कारुण्यभावेन रक्ष मां परमेश्वर "** हा मंत्र म्हणतात. ( अर्थ सोपा आहे. ) हा म्हणत असतां यांतील ( या मंत्रांतील ) योग्य भाव अंतःकरणांत उठल्यास किती आनंद होईल बरें! पण अर्थाकडे लक्ष देऊन भावोत्पादनाची काळजी घेतो कोण? अर्थाकडे लक्ष नाहीं तें नाहींच, पण देवास ते ते उपचार अर्पण करते वेळीं ते तेच मंत्र म्हणण्याचीही काळजी घेत नाहींत! पुष्पाचा मंत्र म्हणून पुष्पें वाहात असतांच पुढील धूप-दीप-नैवेद्याचे मंत्र तोंडानें म्हणून पार होतात! मंत्रपुष्प वाहतांना हातांत फुलें घेऊन त्या मंत्रांनीं तीं अभिमंत्रित करून देवावर वहावयाचीं असतात; पण मंत्र म्हणण्यास लागणारीं एकदोन मिनिटें फुकट जातात असें वाटूनच जणूं, जवळपासची जागा केरसुणीनें साफसूफ करण्यांत किंवा आरशांत पाहून आपल्या कपाळास गंध लावून घेण्यांत वगैरे तो वेळ उपयोगांत आणतात व मंत्र म्हणून संपल्याबरोबर ताटांतील एक दोन फुलें देवाच्या अंगावर फेंकतात! 'भावविरहित भक्ति' ती हीच.

'रामरक्षा' ( म्हणजे रामाकडून केलें जाणारें रक्षण ) ह्या स्तोत्रांत आपल्या सर्वांगाचें रक्षण होण्याबद्दल रामाकडे प्रार्थना केलेली आहे. 'शिरो मे राघवः पातु' म्हणजे 'राघव' राम माझ्या शिराचें रक्षण करो; तसेंच पुढें 'दशरथात्मज' राम माझ्या भालाचें रक्षण करो, 'कौसल्यात्मज' राम माझ्या दोन्ही नेत्रांचें, 'विश्वामित्रप्रिय' राम माझ्या दोन्ही कर्णांचें, 'मखरक्षक' राम माझ्या नाकाचें, 'सौमित्रवत्सल' राम माझ्या मुखाचें, 'विद्यानिधि' राम माझ्या जिव्हेचें, 'भरतवंदित' राम माझ्या कंठाचें, 'दिव्यायुधधारी' राम माझ्या दोन्ही खांद्यांचें, 'शिवचापभञ्जक' राम माझ्या दोन्ही भुजांचें, 'सीतापति' राम माझ्या दोन्ही हातांचें रक्षण करो, असें हें रक्षण मस्तकापासून अगदीं पायापर्यंत प्रत्येक

अवयवाबद्दल मागितलेलें आहे. ह्या निरनिराळ्या अवयवाकरितां रामाला निरनिराळीं विशेषणें अथवा विशिष्ट संबोधनें कां दिलीं आहेत, त्याचा हेतु-हेतुमद्भाव लक्षांत घेऊन व त्या त्या अवयवाच्या उच्चाराबरोबर त्या अवयवावर लक्ष देऊन, रक्षणाच्या ‘ गंभीर भावनेनें ’ म्हणत चालल्यास, तें स्तोत्र ज्या शरीराच्या ( आपल्या अथवा दुसऱ्याच्या ) रक्षणासाठीं आपण म्हणतों, त्याच्या भोंवतीं, त्यांत सांगितल्याप्रमाणें तें खरोखरच ‘ वज्रकवच ’ होऊन बसेल. पण अशा रीतीनें किती ब्राह्मण हें म्हणत असतील बरें !

रोग्यास आरोग्य मिळण्याकरितां शिवकवचाचा पाठ घालण्याचा संप्रदाय आहे. यांतही रामरक्षेप्रमाणें अमुक अमुक स्वरूपाचा अथवा शक्तीचा शिव माझ्या अमुक अमुक अवयवांचें रक्षण करो, अमुक अमुक नामाचा शिव मला अमुक अमुक ठिकाणीं आंत-बाहेर, रानांत-वनांत, दिवसा-रात्रीं, खालीं-वर व सर्व बाजूंनीं माझें रक्षण करो ; चोरांपासून राखो, शत्रूपासून राखो, पिशाचांपासून राखो, राक्षसांपासून राखो, शाकिनीपासून राखो, डाकिनीपासून राखो, आधींपासून राखो, व्याधींपासून राखो, असें सर्व प्रकारचें रक्षण मागितलें असून, सर्व प्रकारचा अभ्युदय मागितला, आहे. कवचांतील ते ते शब्द उच्चारतांना अर्थमय मन करून सर्वेश्वर प्रभु शंकर त्या त्या प्रमाणें मला देत आहे, माझें सर्व बाजूनें रक्षण होत आहे, अशी भावना करीत करीत तें म्हणावयाचें असतें ; आणि असें (Self-assertion) केलें तरच योग्य फळ मिळत असतें. भावामध्यें शक्ति आहे, तशी शब्दामध्येंही आहे. पण शब्दशक्तींत भावशक्ति मिळवून अशीं कार्यें केलीं, तर त्याचें किती उत्तम फळ येईल बरें ! पण तितकी काळजी कोण घेतो ! अलीकडे ‘ हिप्नॉटिझम ’ नें – ‘ मानसोपचार ’ पद्धतीनें – रोग बरे करण्याचे प्रयोग पुष्कळ डॉक्टर व तज्ज्ञ लोक करीत असतात. ह्या शास्त्रावर इंग्रजींत व मराठींत मोठमोठे ग्रंथही निर्माण झाले आहेत. हें सर्व काय आहे ? तर ‘ भाव तैसें फळ ’ ह्या आपल्या जुन्या सिद्धान्ताचेंच आधुनिक म्हणजे नव्या सुधारलेल्या भाषेनें प्रतिपादन आहे.

आपल्यांतील मंत्र हे ध्वनिशास्त्र, मानसशास्त्र, योगशास्त्र, अध्यात्मशास्त्र, इत्यादि शास्त्रांस धरून रचलेले आहेत. त्यांचा अर्थ जाणून, त्या त्या ‘ भावारूढ ’ मन करून ते म्हटले असतां त्यांचें योग्य फल आलेंच पाहिजे. पण तसें न करितां नुसती कवाईत चालली आहे ! ‘ अन्यथा शरणं नास्ति० ’, काले वर्षतु पर्जन्यः०’, ‘ सर्वेऽपि सुखिनः सन्तु ’ इत्यादि प्रार्थनेचे सुंदर मंत्र म्हणत असतां देवासमोर हात जोडून उभें राहून, देव आपली ही प्रार्थना ऐकतो आहे व ती तो पूर्ण करणार आहे

( 'God hears the prayers and answers them' ) असा विश्वास, असा भाव हृदयांत उद्भवला पाहिजे. पण अशी काळजी न घेतां मंत्र तोंडानें म्हणावयाचे व हातानें देवाच्या खोलींतील कचरा केरसुणीनें काढीत रहावयाचें किंवा उपकरणीं घासण्यास टाकण्याकरितां गोळा करीत असावयाचें ( एकदां ह्या कर्मकटकटींतून केव्हां मोकळा होऊन बाहेर येईन या भावनेनें ) ! असें झाल्यास अर्थात् त्या त्या क्रियेच्या वेळीं त्या त्या मंत्रानुसार तो तो भाव हृदयांत न उठविल्यास, योग्य भावनेनें हृदय भरून अथवा भारून न टाकल्यास योग्य फळ कसें बरें मिळेल !

कित्येकदां असेंही होतें कीं, मूर्तींतील किंवा मंत्रांतील भावाचा अभाव करितात, याप्रमाणें पूजक किंवा भजक हे पूजन-भजन चालत असतां स्वतःचाही अभाव करून घेतात, त्यामुळेंही फलप्राप्तीत अंतर पडतें. ' स्वतःचा अभाव ' म्हटल्याबरोबर वाचक एकदम दचकून जातील व हा शब्दप्रयोग त्यांना ' वांझेचा मुलगा ' ह्या शब्दाप्रमाणें मिथ्यात्वाचा वाटेल ; पण तसें नाहीं. हातानें पूजा व तोंडानें मंत्र म्हणत असतां मनानें हा जर दुसरीकडे कोठें गेला, तर त्याचा येथें अभाव म्हणजे गैरहजिरीच नाहीं का झाली ? एक सत्पुरुष देवाची पूजा करीत बसले असतां दुसरे एक सत्पुरुष त्यांना भेटण्यास आले व ते पूजेंत बसलेले पाहून हे बाहेर बसले. पूजेंतून उठल्यानंतर बाहेर येऊन यांना पाहतांच, ' तुम्ही केव्हां आलां ' असें मोठ्या आदरानें त्यांनीं विचारलें, तेव्हां यांनीं लगेच उत्तर दिलें कीं, ' तुम्ही बागेंत जाऊन फुलझाडांस पाणी घालीत होतां तेव्हां. ' हें ऐकून मनोमन साक्ष पटून त्यांनीं यांचे पाय धरले, अशी एक कथा आहे. यावरून काय ठरतें ? तर मन बाहेर जाणें म्हणजे यानेंच बाहेर जाणें होय. याचेंच नांव ' स्वतःचा अभाव. ' हाही ' भावेवीण भक्ती- 'च्या सदरांत पडतो.

ही झाली ' संस्कृत ' वैदिक पूजादि कर्मांची कथा. पण ' प्राकृत ' भजनादिकांमध्यें देखील भावाकडे असेंच दुर्लक्ष असलेलें सर्वत्र दिसून येतें ! रूपाचे अभंग म्हणतांना त्या अभंगांत वर्णिलेलं भगवंताचें तें रूप कोण डोळ्यापुढें आणतो ! नव्हे, डोळ्यापुढें त्या रूपाची सुंदर प्रतिमा असली तरी तिजकडे डोळे भरून पाहण्याचीही कोणी तसदी घेत नाहींत. विणेकरी घेत नाहीं, टाळकरी घेत नाहींत, श्रोतेही बहुतेक तसेच. नामाचे अभंग म्हणतांना त्यांत वर्णिलेला तो नामाचा महिमा कोण हृदयांत भरून घेतो ! करुणापर अभंग म्हणतांना त्यांत वर्णिलेल्या अथवा उच्चारलेल्या भावाशीं कोण कितीसा तन्मय होतो ? उदाहरणार्थ एक अगदीं साधा अभंग —

**" सदा माझे डोळां जडो तुझी मूर्ति । रखुमाईच्या पति सोयरिया ॥**
**गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देई मज प्रेम सर्वकाळ ॥"** इत्यादि

यांत त्या भक्तवर्यानें म्हटल्याप्रमाणें—"हे सोयरिया सख्या पांडुरंगा! तुझी दिव्य मूर्ति माझ्या डोळ्यांस 'सदोदित' जडून राहू दे हो. कारण तुझें रूप गोड, तुझें नाम गोड; पण माझ्या ठिकाणीं असावें तितकें प्रेम नाहीं; तें दयाळा 'सर्वकाळ' म्हणजे अखंडित मला द्याहो" असें अंतरांतील कळवळ्यानें कोण मागतो बरें? हा अभंग बिहाग, मालकंस, भीमपलास वगैरे रागांत, तालसुरावर म्हणून भजनांत मोठा रंग उडवून देतात; पण त्यांतील भावाशीं कोण तन्मय होतात बरें? 'गोड तुझें रूप, गोड तुझें नाम' हें या अभंगाचें ध्रुवपद मान हालवून हालवून म्हणतात, पण म्हणतांना समोरच्या देवाच्या रूपाकडे पाहतील तर शपथ! उलट, रागदारी उठविण्याकरितां बहुतेक डोळे झाकलेले किंवा बाजूच्या म्हणणाऱ्यांकडे अथवा मृदंग्याकडे तालासाठीं पाहात असलेले दृष्टीस पडतात. क्वचित् जवळपास बसलेल्या श्रोत्यांकडे वाहवा (Response) मिळविण्याकरितां पाहत असतात! किती सुंदर हा अभंग! वेदान्तशास्त्रांत नामरूपाचा त्याग सांगितला आहे, पण भक्तिशास्त्रांत भगवंताच्या दिव्य सगुण रूपनामाचा स्वीकार अथवा जयजयकारच केला आहे. हा अभंग म्हणतांना समोरील देवाच्या मूर्तीवरून नजरच हालतां कामा नये. पण असें केव्हां होईल? तर अंतःकरण त्या शब्दांतील भावनेनें भरून जाईल व मूर्तीत देव आहे व तो आपली ही प्रार्थना ऐकत आहे असा भाव आणि ती तो पूर्ण करणार आहे असा विश्वास उत्पन्न होईल तेव्हां!

अभंग रचणाऱ्या संतांच्या हृदयांत प्रथम भाव प्रगट होतात, नंतर शब्द बाहेर येतात. अंतरांत जसा भाव तसे तोंडांतून शब्द, किंवा प्रथम विचार व नंतर उच्चार. अर्थात्, त्यांच्या भावावरून शब्द निघाले, आम्हांस त्या शब्दांवरून भावाकडे गेलें पाहिजे. अभ्यासानें आम्ही तसें करूं शकलों अर्थात् त्या संतांच्या त्या भावाशीं आमचें तादात्म्य झालें—म्हणजे त्या संतांवर झालेली भगवंताची कृपा आमच्यावर होण्यास वेळ नाहीं लागणार. हें तत्त्व भजनकर्त्यांनीं ध्यानांत घेऊन, तेवढ्याच कायिक व वाचिक श्रमांत मोठा फायदा करून घेण्याकडें लक्ष ठेवलें पाहिजे. नसल्यास

**" हांका मारी जाच्या नांवें । त्याचें गांवचि नाहीं ठावें ॥**
**काय गातो हें कळेना । राग आळवितो नाना ॥ "**

असें होईल. बहुतेक असें होतें! भजन करतांना वृत्ति तालसुरास व रागरागिणीस स्पर्श करते, तशी त्यांतील भावास स्पर्श करीत नाहीं. याचेंच नांव "**भावेवीण भक्ति!**"

*        *        *        *

मुसलमान लोक आपल्या मशिदीवरून हिंदूंच्या वाजंत्र्यांस वाजवीत जात असतां मनाई करितात, तसेंच ख्रिश्चन लोक येशूख्रिस्ताशिवाय तारक देव जगांत दुसरा नाहीं म्हणतात! तीं त्यांचीं मतें कशींही असोत, पण आपापल्या देवस्थानांत पूजाअर्चा किंवा प्रार्थना वगैरे करतांना ते लोक जे नियम पाळतात व लहानपणापासून आपल्या धर्माचें, नव्हे धार्मिक भावनेचें मुलांना शिक्षण देत असतां, त्या त्या स्थानाविषयीं, विधीविषयीं व दैवताविषयीं जो प्रेमादरभाव (Reverence) पद्धतशीर रीतीनें शिकवून त्यांच्या अंगवळणीं पाडतात, त्याचा तेवढ्यापुरता विचार लक्षांत घेतला असतां, '**भावेवीण भक्ति**' उपयोगी नाहीं, ही संतांची शिकवण आम्ही शिकत नाहीं व शिकवीत नाहीं असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें!

वेदान्ती लोक 'अहं ब्रह्मास्मि' अथवा 'सोऽहं' असें तोंडानें म्हणतात, त्या महावाक्याचा जपही करितात; पण मनानें ती भावना करीत नाहींत! शिमग्याच्या दिवसांत लहान मुलें शृंगार व बीभत्सरसोत्पादक शब्द तोंडानें बोलतात पण त्या शब्दांचा भाव त्यांच्या मनांत उमटत नाहीं. याप्रमाणेंच वेदान्ती लोक ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी तोंडानें खूप बोलतात, परन्तु ब्रह्मभाव चित्तांत उमटत नाहीं.

**'कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव'**

ह्या वचनाचा भावार्थ हाच आहे. कामकल्पना आणि कामभाव यांतही अंतर आहे. याबद्दल येथें विशेष सांगणेचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्मविषयक कल्पना आणि ब्रह्मभाव यांतही अंतर आहे. ४।५ वर्षांच्या मुलांना अथवा मुलींना कामकल्पनाही येणें शक्य नाहीं, मग कामभावना कोठून! कल्पनोदयानंतर भावनोदय. अधिकारी पुरुषाच्या मुखांतून शास्त्रश्रवण केल्यानें 'असंभावना' व 'संशयभावना' नष्ट होऊन आत्मा अथवा ब्रह्म याची यथार्थ कल्पना उत्पन्न झाली तरी कमी नाहीं. त्याला 'परोक्षज्ञान' असें म्हणतात. ह्या परोक्षज्ञानानंतर पुरुषप्रयत्नपूर्वक अभ्यासानें 'विपरीतभावना' नष्ट होऊन चित्तांत ब्रह्मभाव उदय पावतो. त्याला 'अपरोक्षज्ञान' म्हणतात. ह्या अपरोक्ष ज्ञानानेंच अविद्यावरणाचा

भंग व त्यायोगें मुक्तीचा लाभ. ह्या जन्मीं प्रतिबंधामुळें अपरोक्ष ज्ञान झालें नाहीं, पण शास्त्रश्रवणानें ब्रह्माचें परोक्षज्ञान तरी यथार्थपणें झालें, तर त्यायोगें ब्रह्मलोकप्राप्ति होते, असें शास्त्रांत सांगितलें आहे. पुष्कळांना प्रथम परोक्षज्ञानसुद्धां होत नाहीं, मग अपरोक्षज्ञान कोठून! इकडील तिकडील एकदोन वेदान्त ग्रंथ आपल्या आपणच वाचावयाचे, किंवा फावल्या वेळीं पुराण–कीर्तन ऐकावयाचें आणि त्यायोगें आपणास ज्ञान झालें असें मानावयाचें. पण हें ज्ञान नसून तो केवळ ज्ञानाभास आहे! हा ज्ञानाभास अविद्यानाशाला तर उपयोगी पडतच नाहीं, उलट आपण मोठा ज्ञानी असा गर्व मात्र उत्पन्न करितो. परोक्षज्ञान सुद्धां निःसंशय व्हावयास पाहिजे असेल, तर संत-सद्गुरुमुखानें पद्धतशीरपणें शास्त्राभ्यासच केला पाहिजे.

तथापि असेंही क्वचित् दिसून येतें कीं, शास्त्राभ्यास वगैरेचा फारसा संस्कार नसतांनाही, कित्येकांना थोड्याशा श्रवणानेंही अपरोक्षज्ञान होतें. त्यांना पूर्वजन्मींचा गुप्तसंस्कार असला पाहिजे असेंच म्हटलें पाहिजे. दुसरें, याच जन्मीं कायावाचामनानें 'उत्कट' भक्ति घडली, तर हरिगुरुप्रसादानें अपरोक्षज्ञानाचा उदय होतो व जीव कृतार्थ होतो. त्यानंतर तो शास्त्र वाचूं लागला तर आपलेच अनुभव शास्त्रांत सांगितलेले आहेत, असें त्यास आढळून येऊन आनंद होतो व धन्यता वाटते. प्रथम अनुभव व नंतर शास्त्रावलोकन, असें त्याचें होतें.

## प्रसादाचें म्हणजे कृपेचें अद्भुत सामर्थ्य

"फलप्राप्तीचें कारण त्या त्या विषयाचा पूर्वसंस्कार नसून सद्गुरु किंवा ईश्वर यांच्या प्रसादानेंच वाटेल त्या विषयाची श्रमावांचून एकदम अचानक प्राप्ति होते ...

**प्रसादे सति कीटो वा पतंगो वा नरोऽथवा ।**
**देवो वा दानवो वाऽपि लभते ज्ञानमुत्तमम् ॥**
**प्रसादस्य स्वरूपं तु मया नारायणेन च ।**
**रुद्रेणापि सुरा वक्तुं न शक्यं कल्पकोटिभिः ॥** इ.

—सूतसंहितांतर्गत ब्रह्मगीता

"**अर्थ :** ब्रह्मदेव म्हणतात, देवहो! ईशप्रसादाचें सामर्थ्य अद्भुत आहे. (प्रसाद म्हणजे प्रसन्नता.) प्रसादाचा महिमा शंकर, विष्णु किंवा मी ब्रह्मदेव, यांपैकीं कोणालाही वर्णन करितां येणें शक्य नाहीं. बरें! तो प्रसाद तरी अमुकच जातीच्या भक्तावर किंवा ब्राह्मणावरच होतो असाही नियम नाहीं. किडा, मुंगी

*******************************************

पतंग किंवा पशु-पक्षी वगैरे हीन जातीपैकीं कोणीही भक्त असो, अथवा मनुष्यांपैकीं, ब्राह्मण, शूद्र किंवा स्त्रियादि कोणीही असोत ; देव असो, दानव असो, ज्याच्यावर भगवत्प्रसाद झाला त्याला निःसंशय आत्मज्ञान प्राप्त होतें. ”

— सर्वमतखंडन – ब्रह्मविद्यारहस्य

‘ **मत्प्रसादात्तरिष्यसि** ’ असें गीतावचनही प्रसिद्ध आहे.

**“ न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवण सायास ।**
**प्रयत्नेंविण सौरस । सद्गुरुकृपा ॥ ”**

असें श्रीसमर्थ दासबोधांत सांगतात. ( ५।६।३५ )

हें सर्व खरें, पण असा कृपाप्रसाद काय वाटेवर पडला आहे ? त्याला भावयुक्त भक्तीच कारण आहे. अशा भक्तीनें —

**“ भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥**
**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ”**

— भगवद्गीता, अ. १८, ५५।५६

भगवान् म्हणतात — मी कसा आहें, केवढा आहें हें तो ( ज्ञानी भक्त ) तत्त्वतः म्हणजे रहस्यपूर्वक जाणतो ; आणि असें ‘ तत्त्वतः ’ जाणल्यानंतर माझ्यामध्यें तो प्रवेश करितो. माझा आश्रय घेऊन सर्वकाळ सर्व ( कायिक, वाचिक व मानसिक ) कर्में करीत असतांही माझ्या कृपाप्रसादानें शाश्वत व अव्यय असें पद पावतो.

आतां, ग्रंथांतील कृपा आणि प्रसाद वगैरे शब्द वाचून अथवा ऐकून, कांहीं लोक आळशीही बनलेले दिसून येतात. ‘ असेल माझा हरि, तर देईल खाटल्यावरी ’ असें म्हणून कर्तव्यकर्में सोडून आळसानें वागूं लागतात. प्रपंचाप्रमाणें परमार्थांतही आळस हा एक मोठा शत्रु आहे. ‘ ददामि बुद्धियोगं तं ’ ‘ मत्प्रसादात्तरिष्यसि ’ एवढीं अर्धवट वाक्येंच ते ऐकतात, पण त्या वाक्यांच्या मागचे शब्द ते लक्षांत घेत नाहींत. वरील दोन वचनांपुरताच विचार करूं — ‘ ददामि बुद्धियोगं तं ’ याच्या पाठीमागें, ‘ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ’ हे शब्द आहेत. तसेंच ‘ मत्प्रसादात्तरिष्यसि ’ याच्या पाठीमागें ‘ मच्चितः ’ इत्यादि शब्द आहेत. पुढील शब्दांचा फायदा करून घ्यावयाचा असेल, तर मागील

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

शब्दांतील लायकी म्हणजे पात्रता नको का मिळवायला? पण हें विसरतात! **सततयुक्तना व मच्चित्त**ना आपणामध्यें किती अंशानें बाणली आहें हें प्रथम पाहिलें पाहिजे व नंतर 'प्रसादा'ची अपेक्षा धरिली पाहिजे. कांहीं असो. भावावांचून भक्ति फोल आहे व भक्तीवांचून मुक्तीची आशा व्यर्थ आहे. हें लक्षांत घेऊन सत्साधकानें आपल्या अंतरांतील भावाची पहाणी करीत भक्तीचा मार्ग चोखाळला पाहिजे. भिल्लिणीचीं बोरें, सुदामाचे पोहे, विदुराच्या कण्या, चिमण्या गोपाळगड्यांच्या तोंडांतील उष्टें ताक भगवंतांनीं सेवन केलें. हें कशामुळें? याचा साधकांनीं विचार करावा व त्या प्रेमळ भक्तांच्या भावाशीं आपल्या भावाचा कस लावून पाहावा, म्हणजे आपल्यांतील उणीव समजून येईल व समजल्यानंतर सुधारतां येईल. उणीव समजल्यानंतर मन अनुतापानें भरेल, अनुताप अभिमानास जाळील व सद्भावास प्रसवेल; नव्हे, अभिमानाच्या बुडीं दडपलेला सहजसद्भाव वृत्तीवर खेळूं लागेल. एकदां हा भाव वृत्तीवर उमटला, म्हणजे त्यास श्रुतिस्मृतींचें ज्ञान असो नसो, त्याचा भवसागर व त्यांतील बुडणें मिथ्या होऊन जातें, प्रेमभक्ति उत्पन्न होते व त्या भक्तीनें भगवान संतुष्ट होऊन भक्ताला पदोपदीं सांभाळतो असा भावाचा पहिमा आहे.

**"येथ धरिला पुरे भावो। तैं बुडणेंचि होय वावो।**
**मग ठाकावा जो ठावो। तो स्वमेवो आपण होय॥ ...**
**श्रुतिस्मृति दोन्ही डोळे। येणेंवीण जे आंधळे।**
**तेही भजनीं धांवतां 'भावबळें'। पडे ना अडखुळे सप्रेमयोगें॥...**
**तैसा 'सप्रेम' जो भजे भक्तु। त्या भजनासवें भगवंतु।**
**भुलला चाले स्वानंदयुक्तु। स्वयें सांभाळितु पदोपदीं॥"**

—एकनाथी भागवत, अ. २ रा

**"तुका म्हणे मुख्य 'पाहिजे' हा भाव।**
**भावापाशीं देव, शीघ्र उभा॥"**



# प्रारब्ध व प्रयत्न !

प्रारब्ध श्रेष्ठ कीं प्रयत्न श्रेष्ठ, हा एक मोठा वाद लोकांत माजून राहिला आहे. आधुनिक शास्त्रज्ञ विद्वान् हे प्रारब्ध म्हणून कांहीं चीजच नाहीं म्हणतात. आळशी लोकांनीं आपल्या आळशी स्वभावावर पांघरूण घालण्याकरितां प्रारब्धाची कल्पना केलेली आहे असें ते सांगतात.

दुसरे कांहीं लोक म्हणतात, प्रयत्नानें जर सर्व साध्य झालें असतें, तर जगांत दुःखी व दरिद्री कोणी राहिलेंच नसतें. म्हणून प्रारब्धाच्या योगानेंच सर्व सुखदुःखें येतात व प्रयत्नास यश येणें हें देखील प्रारब्धावरच अवलंबून असतें; इत्यादि. त्यास ते ( प्रारब्धवादी ) ज्योतिषशास्त्राचा पुरावा देऊन सांगतात, कीं ज्योतिषशास्त्रानुसार एकाद्या मनुष्याची कुंडली योग्य रीतीनें करून मांडली, तर त्याचा मागचा जन्मसुद्धां सांगतां येतो, पुढील जन्मही कळतात, वर्तमान जन्मांतील बाल्यापासून मृत्यूपर्यंतचीं सर्व फळें सांगतां येतात व त्याचा अनुभवही येतो; इत्यादि.

त्यावर प्रयत्नवादी पुन्हा म्हणतात, प्रारब्धाप्रमाणेंच सर्व कांहीं होतें, प्रयत्नसुद्धां प्रारब्धामुळेंच होतो असें जर मानलें, तर मनुष्य म्हणजे सूत्रांतील एक जड बाहुलीच ठरेल व सर्व शास्त्रेंच व्यर्थ होऊन जातील. शास्त्रांत विधिनिषेध सांगितले आहेत. विधि-निषेध म्हणजे अमुक करावें, अमुक करूं नये असा उपदेश. मनुष्य जर जड बाहुलीप्रमाणें प्रारब्धसूत्रानें बद्ध झालेला अर्थात् अगदीं परतंत्र, म्हणजे सूत्रधार नाचवील त्याप्रमाणें नाचणारा असाच केवळ असेल, करणें न करणें जर त्याच्या स्वाधीनच नसेल, तर शास्त्राचा तसा उपदेश काय कामाचा ? आकाशांतील ग्रहांचा परिणाम पृथ्वीवरील पदार्थांवर व मनुष्याच्या जीवनावरही होऊं शकेल; पण त्यांतून म्हणजे ग्रहांच्या बाधेंतून सुटण्याकरितां ज्योतिषशास्त्रानेंही दान व जप इत्यादि उपाय अथवा प्रयत्न सांगितले आहेतच. निरनिराळ्या ग्रहांस निरनिराळीं दानें व निरनिराळ्या मंत्रांचा अमुक संख्या जप, अमुक रंगाचें रत्न अंगावर धारण करणें, अथवा कांहीं व्रतवैकल्यें व विशिष्ट देवतांची विशिष्ट तऱ्हेनें उपासना इत्यादि उपाय सांगितले आहेत, ते सर्व अरण्यरुदनाप्रमाणें व्यर्थ होऊन जातील; इत्यादि.

ह्याप्रमाणें थोडक्यांत दोन्ही पक्षांचीं मतें सांगितलीं. विस्तार करण्याचें हें स्थळ नव्हे. दोन्ही पक्षांच्या मताला पुष्टि देणारीं वचनेंहि शास्त्रांत सांपडतात. तसेंच नल-राम-युधिष्ठिरादिकांचीं उदाहरणें, प्रारब्ध ' अपरिहार्य ' आहे असें दर्शविणारीं; व सावित्री-सीमंतिनी-भद्रायु-मार्कंडेयादिकांचीं उदाहरणें प्रारब्ध ' परिहार्य ' आहे,

प्रयत्नच श्रेष्ठ आहे असें दर्शविणारीं, पुराणइतिहासादि ग्रंथांत मिळतात. ( ह्याबद्दल पहिल्या भागाच्या अगदीं आरंभींच्या लेखांत उल्लेख केलाच आहे. ) असें हें पाहिलें म्हणजे सामान्य लोकांच्या बुद्धीचा गोंधळ उडून जातो. त्यांस कोणताच निर्णय ठरवितां येत नाहीं. हें खरें कीं तें खरें असें त्यांस वाटूं लागतें. परंतु शास्त्रांनीं व संतांनीं ह्या गोष्टीचा सांगोपांग विचार करून पूर्वींच निर्णय केलेला आहे. आपण तो पाहिला मात्र पाहिजे.

कोणतेंही मत ठरविण्यापूर्वीं तें **श्रुति, युक्ति** व **अनुभव** ह्या तीन कसोट्यांवर लावून पाहिलें पाहिजे. श्रुति असें म्हणते, स्मृति असें सांगते, एवढेंच केवळ म्हटल्यानें जिज्ञासूचें म्हणजे चौकस बुद्धीच्या मनुष्याचें समाधान होत नाहीं. त्यास श्रुतीनें सांगितलेलें युक्तीनें पटविलें पाहिजे. युक्तिसिद्ध श्रुति असली म्हणजे तिच्याविषयीं आदर व विश्वास वाटतो व मग अनुभव घेण्याचा प्रयत्न तो जिज्ञासु करूं लागतो. श्रुति-युक्ति-अनुभवानें जी गोष्ट सिद्ध झाली, ती मग निर्विवादपणें सर्वमान्य होते. पूर्वाचार्यांनीं व संतांनीं असा प्रयत्न आमच्यासाठीं अगोदरच करून ठेविला आहे.

श्रीसमर्थांनीं ह्या प्रारब्धप्रयत्नवादाच्या निर्णयावर अभंगांचीं दोन शतकें सुंदर रीतीनें लिहिलेलीं आहेत. तीं प्रारब्धवादी व प्रयत्नवादी ह्या दोघांच्या संवादरूपानें रचिलीं आहेत. हा संवाद वाचीत असतां असें वाटूं लागतें, कीं आपण दोन बलाढ्य मल्लांची कुस्तीच पाहात आहों. तुल्यबल मल्ल विजयाच्या इच्छेनें जेव्हां एकमेकांशीं झटापट करूं लागतात, तेव्हां पहिला दुसऱ्याला व दुसरा पहिल्याला खालींवर पाडतो, तेव्हां प्रत्येक वेळीं प्रेक्षकास असें वाटतें, कीं आतां अमुकानें जिंकलेंच जिंकलें. इतक्यांत तो डाव बदलतो व खालचा वर आणि वरचा खालीं होतो. अशा वेळीं प्रेक्षकांचें कुतूहलही क्षणक्षणां पालटूं लागतें. शेवटीं ते पहिलवान सारख्याच शक्तीचे असल्यामुळें कुस्ती कांहीं लवकर संपत नाहीं व प्रेक्षकांना कंटाळा येऊन एकदाची ही कुस्ती लवकर संपली तर बरी, असें ते म्हणूं लागतात. इतक्यांत एकाची पाठ जमिनीस लागते व दुसरा उरावर बसतो आणि प्रेक्षकांत टाळ्यांचा कडकडाट होतो. समर्थांचें हें प्रकरण वाचतांना वाचकांची अवस्था दर कडव्याला अशीच कुतूहलजनक होते. * दोनशें कडव्यांचें हें प्रकरण येथें सर्वच्या

* 'समर्थांची कविता – प्रथम खंड' नांवाच्या पुस्तकांत हें प्रकरण रसिकांनीं वाचून पाहावें अशी आम्ही शिफारस करितों. हें पुस्तक धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें छापलें आहे.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

सर्व देतां येणें शक्य नाहीं. वादनिर्णय समजण्याच्या दृष्टीनें थोडासा भाग देतों. ( ह्यांतील जाड्या अक्षरांची ओळ प्रयत्नवादी ह्याची व बारीक अक्षरांची ओळ प्रारब्धवादी याची असें समजून वाचावें. )

**केलियानें होतें केलेंचि पाहिजे । जें मनीं धरिजे तेंचि होतें ॥**

होतो प्रेत्न खरा प्रारब्धासारिखा । कांहीं पूर्वरेखा पाहिजे ते.

**पाहिजे तो प्रेत्न आदरेंसीं केला । मग प्राप्तव्याला शब्द घडे ॥**

घडे तो प्रेत्न होणारासारिखा । नाहीं तरी देखा आठवेना.

**आठवेना तरी आलस्य नसावा । आलस्याचा हेवा करूं नये ॥**

करूं नये ऐसें बोलणें बोलावें । होणार स्वभावें होत जातें.

**होत जात परी प्रेत्नेंवीण नाहीं । आधीं प्रेत्न कांहीं पाहिजे तो ॥**

पाहिजे तो परी घडोनी येईना । मनाची वासना पूर्ण नव्हे.

**नव्हे समाधान साधनावांचून । वायां शब्दज्ञान वाउगेंचि ॥**

वाउगें साधन कासया करावें । स्वरूप स्वभावें सिद्ध आहे.

**सिद्ध आहे परी अंतरीं बाणेना । संशयो जाणेना निश्चयेंसी ॥**

निश्चयाचें ज्ञान विवेकें संपन्न । तया हें अज्ञान बाधी केवीं.

**प्रेत्न आहे थोर पहावा विचार । येणें पैलपार पाविजे तो ॥**

पाविजे तो पार प्रारब्धेंकरुनि । यत्न केल्या जनीं होत नाहीं.

**होत नाहीं प्रेत्नें ऐसें काय आहे । विचारूनि पाहें आलिया रे ॥**

आलिया रे प्रेत्न करितां फळेना । होणार टळेना कांहीं केल्या.

**कांहीं तरी केलें पाहिजे संसारीं । कांहींच न करी ऐसा कोण ? ॥**

ऐसा कोण आहे प्रारब्धावेगळा । होणाराची कळा वेगळी ते.

**सर्व कांहीं प्रेत्न केलियानें होतो । आळसी पडतो सावकाश ॥**

सावकाशें पडे तेथेंचि होईल । होणारें होईल पूर्वदत्तें.

**पूर्वदत्त केलें प्रेत्न करूनियां । वाउगेंचि वाया बोलतोसि ॥**

( पूर्वदत्त पूर्वदत्त म्हणायाचें तें यत्न केल्यानंतरच झालें ना ? )

कासयासी आतां वाउगें बोलणें । खाणें हो जेवणें पूर्वरेखा.

**पूर्वरेखा कोणीं लिहिली अदृष्टीं । हेचि एक गोष्टी बरी पाहें ॥**

***************************************************

पाहील कवण संचितावांचून । देह कर्माधीन चालतसे.

**चालतसे परी चालवावें लागे । कांहीं तरी मागे कोणी एक ॥**

कोणी एक मागे तो कैंचें देईल । होणार होईल निश्चयेंसीं.

**निश्चयेंसीं आतां होणार म्हणसी । कांहींच यत्नासी करूं नको ॥**

करूं नको ऐसें व्यर्थचि उत्तर । पूर्वीच होणार होऊन गेलें.

**होऊन गेलें आतां तरी कां करावें । उगेंचि रहावें पडोनियां ॥**

पडावें मरावें कपाळासारिखें । कपाळींचें चुके ऐसें नाहीं.

**आहे यत्न कर्म तोडावयालागीं । मुक्तीचे विभागी भक्तजन ॥**

भक्तजन दोन्ही प्रारब्धापासूनि । प्रारब्धावांचूनि थोर नाहीं.

**थोर नाहीं ऐसें कैसेंनि जाणावें । रूप ओळखावें उभयाचें ॥**

[ ह्याप्रमाणें हा तंटा मिटतच नाहीं असें पाहून समर्थांनीं एक तोड काढली व ती बिनतोड लागू पडली. ती तोड अशी, कीं जें अगोदर निर्माण झालें तें थोर व नंतर झालें तें लहान. ]

**" उभयतां कोण प्रारब्ध प्रयत्न । आधीं जें निर्माण तेंचि थोर "**

[ अशी युक्ति सांगून निराकार परब्रह्मापासून मूळमाया झाली, तिजपासून गुणमाया, तिच्यापासून सत्त्व-रज-तम हे तीन गुण, गुणांपासून पंचमहाभूतें, पंचभूतांपासून पुढें अमुक अमुक झालें असें सांगून 'प्रेत्न' म्हणजे **प्रयत्न हा पूर्वी झाला**, नंतर प्रारब्ध झालें. (प्रयत्नच प्रारब्धरूपांत परिणत झाला. **प्रारब्धाचें मूळरूप प्रयत्न**) अर्थात् **प्रयत्न हा वडील** व **प्रारब्ध हें धाकटें** म्हणजे **लहान** असा निर्णय करून त्या प्रकरणाचा उपसंहार केला आहे. ]

**" आहे निराकार निर्मळ निश्चळ । तेथून चंचळ प्रेत्न झाला ॥**
**प्रेत्न झाला आधीं म्हणूनियां थोर । प्रारब्धविचार ऐलीकडे ॥**
**ऐलीकडे कर्म[1] पाहतां भूतळीं । प्रेत्न अंतराळीं मूळारंभ ॥**
**आरंभापासूनि सर्वही शोधावें । कर्म पडे ठावें विवरतां ॥**
**विवरतां सर्व आशंका फिटली । जाण तया भली विवंचना ॥**
**दृश्य माया मिथ्या साच परब्रह्म । दास म्हणे भ्रम मावळला ॥**
**मावळला भ्रम रामगुण गातां । उपासना आतां सोडूं नये ॥ "** ३०

१ प्रारब्ध.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

ह्याप्रमाणें ‘ प्रारब्ध थोर कीं प्रयत्न थोर ’ हा वाद मिटला ; परंतु एवढ्यानें प्रारब्धप्रयत्नाचा विचार संपला असें मात्र होत नाहीं. शास्त्रयुक्तीनें अथवा शास्त्रसंमतीनें थोर कोण हें समजलें. थोराचेंच सेवन करावें हें त्याबरोबर व्यवहारप्राप्तही झालें. उदाहरणार्थ – बायकोपेक्षां नवरा थोर, प्रधानापेक्षां राजा थोर किंवा चाकरापेक्षां धनी थोर हें शास्त्रसिद्ध म्हणजे कायद्यास अनुसरून असतें. परंतु प्रत्यक्ष अनुभव मात्र केव्हां केव्हां अथवा बऱ्याच वेळां उलट येतो. ‘ नाकापेक्षां मोती जड ’ म्हणतात त्याप्रमाणें नवऱ्यापेक्षां बायको शिरजोर होते, तसेंच राजापेक्षां प्रधान व धन्यापेक्षां चाकर बलिष्ठ होऊन बसतात, किंबहुना त्यांच्या हातांतलीं ते बाहुलीं होऊन राहतात. त्याचप्रमाणें प्रारब्ध हें प्रयत्नापेक्षां लहान खरें, पण तें अत्यंत बलिष्ठ होऊन बसलेलें प्रत्ययास येतें ! दुसरें –

प्रारब्ध - प्रयत्नाचें सहोदरत्वाचें नातें सोडून, जन्यजनकत्वाच्या नात्यानेंही विचार केला असतां, **प्रारब्ध हें जन्य व जीव त्याचा जनक म्हणजे उत्पादक आहे हें अगदीं उघड दिसतें.** आणि शास्त्र म्हणजे कायद्याच्या दृष्टीनेंही जनकापेक्षां जन्य कनिष्ठ योग्यतेचें हें तितकेंच सत्य असतें ; पण प्रत्यक्ष व्यवहारांत पाहतां तें प्रारब्ध महत्तर बलिष्ठ होऊन बसलेलें आहे असा अनुभव येतो !

## प्रारब्धाचें स्वरूप

**प्रारब्ध म्हणजे पूर्वकृत ( पूर्वी केलेलें ) कर्म ; व कर्म म्हणजे प्रयत्न.** पूर्व जन्मीं केलेलें कर्म ह्या जन्मीं प्रारब्ध होऊन बसलें ; नव्हे, पूर्व वयीं केलेलें कर्म उत्तर वयाला प्रारब्ध ; काल केलेलें कर्म आजला प्रारब्ध ; सकाळचें कर्म दुपारला प्रारब्ध ; दुपारचें सायंकाळला ; पूर्व घटकेचें ह्या घटकेला आणि पूर्व क्षणाचें उत्तर क्षणाला प्रारब्ध होऊन बसतें व तें अपरिहार्य होतें असा अनुभव येतो ; तो नाकबूल करून कसें भागेल ? अनुभवापुढें शास्त्र व युक्ति लंगडीं पडतात !

सर्व संतांत श्रीसमर्थांसारखे प्रयत्नवादी दुसरे कोणीही नाहींत. ‘ अचूक यत्न ’ करवत नाहीं, म्हणूनच यश येत नाहीं, असें त्यांचें ठासून सांगणें आहे. श्रीशिवाजीमहाराजांवर औरंगजेबानें नानाप्रकारचीं लौकिक संकटें आणलीं, त्या सर्वांतून ते आपल्या बुद्धिबलानें पार पडले. हें पाहून औरंगजेबानें एका प्रवीण मांत्रिकास बोलावून आणून त्याजकडून शिवाजीराजावर अभिचारप्रयोग सुरू केला. त्यायोगें ते आपल्या राज्यांत फार आजारी पडले. नाना प्रकारचे उपाय केले, पण गुण कांहीं येईना. तेव्हां चांगल्या ज्योतिष्यास बोलावून आणून जन्मकुंडली

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

दाखविली. त्यांत गुरुग्रहाशिवाय बाकीचे सर्व ग्रह अत्यंत अनिष्ट होते. त्यांचा परिहार करणेचा प्रयत्नही शक्य तितक्या शास्त्रीय रीतीनें केला, पण गुण येईना. शक्ति क्षीण होत चालली. स्वतः त्यांची व लोकांचीही निराशा वाढत चालली. श्रीसमर्थांकडे गाऱ्हाणें पोंचलें. समर्थांनीं समाधि लावून अंतर्दृष्टीनें सर्व जाणलें व अभिचाराचा प्रतिकार करण्याबद्दल स्वतः कंबर बांधली. नवग्रहांस प्रत्यक्ष आव्हान करून आपल्यापुढें उभें केलें, ग्रहांनीं सांगावयाचें सांगितलें, समर्थांनीं करावयाचें केलें. औरंगजेबाच्या मांत्रिकाचे हातपाय लटपटूं लागले. त्याची ' भीक नको पण कुत्रा आवर ' अशी स्थिति होऊन, त्यानें बादशहास सांगितलें, ' माझ्यापेक्षां सवाई मांत्रिक तुझ्या शत्रूस भेटला आहे. त्याचे पुढें माझें कांहीं चालत नाहीं ; तूं जास्त कांहीं करशील तर तुझ्यावर उलटून भुजेल ; ' असें सांगून तो निघून गेला. इकडे शिवाजीमहाराजांना गुण पडत जाऊन ते थोड्या दिवसांत चांगले निवळले.

असें ज्या महापुरुषाचें सामर्थ्य, ते श्रीसमर्थ श्रीशिवाजीमहाराज क्षुल्लक अशा गुडघीच्या रोगानें आजारी पडून अकालीं वारले, ही बातमी समजतांच कित्येक दिवस विषण्ण चित्तानें भाषणादि वर्ज्य करून एकान्तांत बसून राहिले होते. अशी त्यांची आख्यायिका बखरींत लिहिली असल्याचें समजतें. स्वधर्मयुक्त स्वराज्यस्थापनेचें व त्यास स्थिरता देण्याचें काम अपुरें राहिलें. संभाजी राजांस समर्थांनीं राजकारणसंबंधांत नानापरीनें उपदेश केला, ( इतरांनींही केला ), पण त्याचा काडीमात्र उपयोग झाला नाहीं. काय, समर्थांचें सामर्थ्य व त्यांची ' अचुक यत्न ' करण्याची युक्ति नाहींशी झाली होती ? नाहीं. ही नियति किंवा अदृष्टशक्ति निराळीच आहे. ती देवादिकांसही अगम्य आहे. तिलाच ' प्रारब्ध ' म्हणतात.

जगज्जेता वीर नेपोलियन बोनापार्ट ; ' अशक्य ' हा शब्द त्याच्या कोशांतच नव्हता म्हणे ; वाटर्लूच्या लढाईंत त्याचा पराजय झाला. त्याचें कारण – त्यानें पराजयाच्या पूर्वरात्रीं जयोत्सव-मदानें धुंद होऊन रासक्रीडा ( बॉल डान्स ) महोत्सव केला व ब्रह्मचर्याचा ऱ्हास करून घेतला, असें श्रीस्वामी रामतीर्थ आपल्या एका व्याख्यानांत ब्रह्मचर्याचें महत्त्व वर्णन करितांना म्हणतात. हा कार्यकारणभाव खरा असेल, शास्त्रशुद्ध म्हणजे निसर्गनियमास अनुसरून असेल, पण त्यास तसें करण्याची बुद्धि कां व्हावी, ह्या प्रश्नाचें उत्तर देतांना मति कुंठितच होऊन जाईल. त्या बुद्धीचें कारण ' अदृष्ट ' म्हणजे न दिसणारें, न तर्कांत येणारें असें आहे. त्या गूढ शक्तीलाच ' प्रारब्ध ' अशी संज्ञा.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

श्रीकृष्णानें आपल्या गुरूचा पुत्र, ज्यास मरून १२ वर्षें झालीं होतीं, तो आणून दिला; कालिया सर्पाच्या विषानें मरून पडलेले गोप व गायी ज्यानें नुसत्या कृपादृष्टीनेंच उठविल्या, त्याच प्रभूनें देवकीमातेचे कंसानें मारलेले सहा पुत्र आणून दिले नाहींत; तसेंच सुभद्रासुत अभिमन्यूला त्यानें उठविलें नाहीं; महाभयंकर अशा ब्रह्मास्त्रापासून परिक्षितीचें ज्यानें गर्भांत रक्षण केलें, त्याला क्षुद्र सर्पदंशापासून त्याच परीक्षितीचें रक्षण करतां आलें नसतें काय? पण केलें नाहीं. इंद्राच्या कोपापासून गायीगोपाळांचें रक्षण करण्याकरितां ज्यानें ७ दिवस गोवर्धन पर्वत उचलून धरला, त्याला निजभक्त चोखामेळा ज्या किल्ल्याच्या भिंती ढांसळून मेला व ज्याचीं हाडें आणून आपल्या महाद्वारांत पुरा म्हणून सांगून आपलें भक्तप्रेम दाखविलें, त्याचें रक्षण करण्याकरितां त्या भिंती सांवरून धरतां आल्या नसत्या काय? अथवा उद्यां तो किल्ला ढांसळणार आहे, करितां तूं तेथें जाऊं नको असें त्यास आज सांगतां आलें नसतें काय? पण तसें केलें नाहीं. **देव किंवा साधु बहुधा मरण चुकवीत नाहींत, मरणाची भीति चुकवितात, आणि ह्यांतच जीवाचें खरें कल्याण असतें.** तात्पर्य, कर्माचे कायदे ज्यानें केले, तोच त्या कायद्यांचें उल्लंघन कसें करूं शकेल? राजानेंच कायदे पाळले नाहींत, तर प्रजा कशी पाळील? **कर्माचे कायदे म्हणज निसर्गाचे नियम. आणि हे ईश्वरकृत असल्यामुळें अनुल्लंघनीय होत.**

अमुक कर्माचें फळ अमुक, हें अगदीं ठरलेलें आहे. गुरुत्वाकर्षणाचा सिद्ध नियम सर ऐझाक न्यूटननें शोधून काढला, उत्पन्न केला नाहीं. त्याप्रमाणें आमच्या अतींद्रियदृष्ट्या ऋषींनीं कर्म व त्याचें फळ यांचे नियम शोधून काढले व लिहून ठेवले. त्याचें नांव शास्त्र. आकाशांतील ग्रह व त्यांच्या गति वगैरेंचे नियम पृथ्वीवरील ज्योतिष्यांनीं शोधून काढले. त्या नियमानुसार ते पंचांगें वर्तवितात. ज्योतिषी पंचांगें करितात, नहून ग्रह व त्यांच्या गति ते करीत नाहींत. त्या ईश्वरनिर्मित सिद्धच आहेत. इतर शास्त्रांपेक्षां ज्योतिष हें अगदीं 'प्रत्यक्ष शास्त्र' आहे, ('प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं०') त्याला सूर्य व चंद्र हे साक्षी आहेत. म्हणजे लाखों मैल दूर असलेल्या सूर्यचंद्रांला अमुक दिवशीं अमुक वेळेस ग्रहण लागणार हें ज्योतिषी आगाऊ सांगूं शकतो व त्याची साक्ष पटते. पुढच्या वर्षाचीं पंचांगें ह्या वर्षीं मिळतात हें सर्वांना माहीत आहेच. पुढच्या वर्षीं आकाशांतील ग्रहांची स्थितिगति अमुक तऱ्हेची असणार हें या वर्षीं ज्योतिषी गणित करून सांगूं शकतो. पुढच्या एकाच वर्षाचें नव्हे, तर दहा किंवा १०० वर्षांचेंही पंचांग आज करितां

येतें. पुढील दहाव्या किंवा शंभराव्या वर्षी चंद्रसूर्यांना अमुक महिन्यांत, अमुक तिथीस, अमुक वेळेस ग्रहण लागणार, तें अमुक देशांत अमुक तऱ्हेनें दिसणार, असें भविष्य सांगतां येतें. तितकें गणित मात्र केलें पाहिजे. इतके हे सृष्टीचे नियम सृष्टीच्या आरंभींच ठरलेले आहेत. चंद्रसूर्यादि ग्रहांप्रमाणेंच जीवांच्या गति-आगतिही ठरलेल्या आहेत.

वाल्मीकीनें रामापूर्वी रामायण करून ठेवलेली गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. वाल्मीकीनें लिहून ठेवल्याप्रमाणें ( त्याच्या वचनास मान देण्याकरितां ) राम वागले म्हणतात, ही गोष्ट खोटी. तर राम पुढें जसे वागणार होते तसें वाल्मीकीनें आगाऊच जाणून लिहून ठेवलें ही गोष्ट खरी आहे. नामस्मरणाच्या तपानें वाल्मीकीला त्रिकाळज्ञानाची दिव्य दृष्टि प्राप्त झालेली होती. श्रीवेदव्यासांनाही ती होती. त्यांनींही पांडवकौरवांचें भविष्य आगाऊच करून ठेवलेलें होतें. मनुष्याच्या जन्मकुंडलीवरून त्याच्या सबंध आयुष्यांतील घडामोडी सांगणारे ज्योतिषी आजही आहेत. प्रत्येक वर्षाचीं सामान्य फळें, नव्हे, प्रत्येक महिन्याचें व दिवसाचेंहि विशेष फळ वर्तवून सांगतां येतें. तितकें सूक्ष्म गणित मात्र केलें पाहिजे. तेवढी सूक्ष्म दृष्टि व त्या शास्त्राचें पक्कें ज्ञान असणारा मनुष्य पाहिजे. मुंबईतीलच घडलेली गोष्ट—‘ एका मुलाला अमुक दिवशीं पाण्यापासून धोका आहे, थोडें संभाळा हं ! ’ असें त्याच्या बापास त्याच्या मित्र-ज्योतिष्यानें प्रेमानें सांगून ठेवलें होतें. बापानें त्या दिवशीं मुलाला शाळेंत न पाठवितां घरींच ठेवून त्याजवर नजर ठेवण्यास त्याच्या आईला सांगून तो ऑफिसांत निघून गेला. इकडे संध्याकाळचे वेळीं त्या मुलाचे सोबती त्याला बोलवावयास आले व आईची नजर चुकवून तो त्यांच्याबरोबर गेला आणि रोजच्याप्रमाणें पोहण्याचा व्यायाम करीत असतां बुडून मेला ! ही गोष्ट दोन वर्षांखालीं ‘टाइम्स०’ पत्रामध्येंही प्रसिद्ध झालेली होती. तात्पर्य, चंद्रसूर्यांच्या स्थितिगतिप्रमाणें मनुष्यांच्याही स्थितिगति ठरलेल्या आहेत; त्या तें शास्त्र जाणणाऱ्यास समजतात. फलज्योतिषावरून हें जाणलें जातें. ज्योतिषी लोक गणित करून हें सांगूं शकतात; पण गणित वगैरे न करितां कांहीं सत्पुरुष – ज्यांना त्रिकाळज्ञानसिद्धि प्राप्त झालेली असते ते – मनुष्याला पाहतांच सांगूं शकतात. श्रीटेंबेस्वामीमहाराजांच्या अशा गोष्टी प्रसिद्ध आहेत. इतर साधूंच्याही तशा ऐकूं येतात. ( मात्र ह्यावरून असें समजतां कामा नये, कीं साधु किंवा ज्ञानी झाला म्हणजे त्यास त्रिकाळज्ञान असतें, अथवा त्रिकाळज्ञान ज्याला असतें — भूत-भविष्य-वर्तमान जो सांगूं शकतो — तो साधु किंवा ज्ञानी असतो. **त्रिकाळज्ञान ही एक क्षुद्र सिद्धि आहे.** तें ज्ञान्याचें किंवा भक्ताचें लक्षण

नव्हे. त्रिकाळज्ञानाप्रमाणें परांतर-ज्ञान ही एक सिद्धि आहे. ही मानसशास्त्राच्या थोड्याशा अभ्यासानेंही प्राप्त होते. मनांतली गोष्ट ओळखून सांगितली म्हणजे त्यास साधु मानण्याची प्रवृत्ति लोकांत आहे, ती चुकीची आहे. मेस्मेरिझम् , हिप्नॉटिझम् , वगैरे करणारे लोक ही गोष्ट करूं शकतात. त्याला क्लेयरव्हायन्स, क्लेयर व्हिजन, क्लेयर ऑडियन्स इत्यादि नांवें आहेत. थिएटरांतून तिकिटें लावून हे प्रयोग करून दाखविलेले पुष्कळांनीं पाहिले असतील. दुसऱ्याच्या मनांत चाललेले विचार समजणें यास इंग्रजींत ' थॉट रीडिंग ' म्हणतात. मनाची संवेदना एका अवस्थेपर्यंत पोंचविली म्हणजे हें सूक्ष्म ज्ञान प्राप्त होतें. पत्र लिहून लखोटा बंद करून ठेवला असतां त्या लखोट्यास हाताचा स्पर्श करून त्यांतील मजकूर सांगतां येतो. दुसऱ्या एखाद्यावर दृष्टिक्षेपानें किंवा हातवाऱ्याचे प्रयोग करून त्याला त्या अवस्थेंत पाठवितां येतें व त्याजकडून दुसऱ्याच्या मनांतील गुप्त गोष्टी किंवा खिशांतील पदार्थ सांगवितां येतात. येथें बसून जर्मनींत, अमेरिकेंत काय चाललें आहे, हें सांगतां किंवा सांगवितां येतें. टिट्यानिक बोट समुद्रांत बुडत असतांना त्याच वेळीं पाहून घाबरलेले व जवळच्या मनुष्यास सांगितलेले येथील लोक आमच्या ऐकिवांत आहेत. ती बातमी वर्तमानपत्रांतून मग दोन तीन दिवसांनीं प्रसिद्ध झाली.) याला दूरदर्शन किंवा दूरश्रवणसिद्धि म्हणतात. नाथभागवतांत १५ व्या अध्यायांत अष्टमहासिद्धि व दहा क्षुद्रसिद्धि व त्या प्राप्त करून घेण्याचे उपाय ह्यांची माहिती सांगितली असून भगवद्भक्त तिकडे थुंकूनही बघत नाहींत अथवा त्यांनीं बघूं नये अशी साधकांस सूचना दिली आहे. कारण त्या मोक्षाला अथवा आत्मज्ञानाला, भगवत्साक्षात्काराला प्रतिबंधक आहेत. तात्पर्य, जीवांचें पुढील भविष्य त्यांच्या मागील कर्माप्रमाणें ठरलेलें आहे. ही कर्मबंधाची शृंखला तोडून मन्ममरणाच्या फेऱ्या चुकविणें ह्यालाच मोक्ष मिळविणें म्हणतात. हाच खरा पुरुषार्थ होय. जीवाला नरदेहाची संधि परमेश्वरानें ह्याचसाठीं दिलेली आहे. ही योग्य रीतीनें साधून घेतो तोच खरा पुरुषार्थी पुरुष.

हें असो, पण वर सांगितल्याप्रमाणें जीवाचें भविष्य जर सूर्यचंद्रांच्या ग्रहणांप्रमाणें सृष्टिनियमानुसार अगदीं ठरलेलें आहे, हीं ग्रहणें जशीं कोणत्याही प्रयत्नानें बदलतां येणें शक्य नाहींत, तसेंच जर जीवांच्या सुखदुःखादि गति बदलतां येणें शक्य नसेल तर मग दुःखनिवृत्ति व सुखप्राप्तीबद्दल शास्त्रोक्त पुण्यकर्मे आणि ईश्वरभक्ति करून काय उपयोग आहे, भक्तीनें ईश्वर प्रसन्न होतो व तो

भक्तांचीं संकटें दूर करितो म्हणतात, हें तरी खरें कशावरून व खरें असेल तर हें कर्माच्या कायद्याबाहेर होत नाहीं काय, असे **प्रश्न** सहज उत्पन्न होतात.

ह्या प्रश्नांचें उत्तर असें, कीं ज्या शास्त्रानें हे कर्माचे कायदे सांगितले आहेत. त्याच शास्त्रानें त्या कर्मांतून सुटावें कसें, अथवा त्याची तीव्रता कमी कशी करावी, याबद्दलचे नियमही सांगितले आहेत; त्यावर विश्वास ठेवून चालावें, उगाच आपलें डोकें खाजवून घेण्याचें कारण नाहीं. कर्मांतून सुटणेची किंवा त्याची तीव्रता कमी करणेची शक्यता कशी, ह्याबलद्दची उपपत्ति जाणण्याची इच्छा असेल, तर तीही शास्त्रांत दिली आहे. जिज्ञासुबुद्धीनें पहाण्याचीच तसदी घेतली पाहिजे.

* * * *

## संचित, प्रारब्ध व क्रियमाण कर्म !

कर्माचीं हीं तीन रूपें आहेत. त्यांचें स्वरूप ध्यानांत येण्याकरितां थोडीशी माहिती सांगणें अवश्य वाटतें. जीवानें अनंतकालापासून अनंत जन्मांत करून ठेवलेल्या कर्मांचा जो संग्रह अथवा सांठा ( Store ) त्याला ' **संचित** ' म्हणतात. हें किती अनंत अपार असतें ह्याचा पत्ता नाहीं. त्या संचितामधून तूर्त भोगण्यासाठीं म्हणून निराळा काढून घेतलेला जो कर्माचा अंश त्याला ' **प्रारब्ध** ' म्हणतात. ह्या प्रारब्ध ( प्राक्–आरब्ध ) कर्माचा संबंध चालू देहापुरताच असतो. यानंतर चालू देहाच्या आयुष्यांत अहंकर्तृत्वबुद्धीनें ( मी कर्ता ह्या अहंभावनेनें ) केलेलें जें कर्म, जें देहाच्या पश्चात् संचित कर्मांत सामील होऊन रहावयाचें, त्यास ' **क्रियमाण** ' अथवा ' आगामी ' कर्म म्हणतात. उदाहरणानें हें लवकर ध्यानांत येईल. समजा, तुमच्या घरीं तिजोरींत एक लक्ष रुपये भांडवल आहे, त्यांतील व्यापार करण्याकरितां म्हणून १० हजार काढले व त्या मर्यादित ( Limited ) भांडवलावर पेढी स्थापन करून व्यापारास सुरुवात केली ; त्या व्यापारांत तुम्ही १० वर्षांत २५ हजार रु. नफा मिळविला. ह्यामध्यें तिजोरींतले एक लाख हें ' संचित ', त्यांतून व्यापाराकरितां म्हणून काढलेले १० हजार हें ' प्रारब्ध ' व त्यावर २५ हजार मिळविले हें ' क्रियमाण ' अथवा ' आगामी '. १० वर्षांनंतर पेढी बंद केलीत ( एका देहाचें आयुष्य संपविलें. ) तर मिळविलेला म्हणजे शिलकेंत टाकलेला नफा २५ हजार मूळच्या तिजोरींतील ९० हजारांत जाऊन पडतो व ही संचिताची बेरीज ११५ हजार ( १ लाख १५ हजार ) होते. असें हें संचित कर्म वाढतच राहातें. हें संपूर्ण नाहींसें झाल्याशिवाय मोक्ष मिळत

**

नाहीं. अर्थात् जन्ममरणाच्या फेऱ्या चुकत नाहींत. **एकएका योनीप्रती, कोटीकोटी फेरे होती.**' ही महादुःख-दायक कर्मकटकट सोसतां सोसतां पुरे वाट होऊन जाते. '**किती वेळां जन्मा यावें । किती व्हावें फजीत**' (तु.) असें त्याला वाटूं लागतें व ह्यांतून कायमचा कसा सुटेन म्हणून तो मार्ग शोधूं लागतो. '**मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा**' अशी तो देवाची करुणा भाकतो. असें तो तेव्हांच करूं लागतो, कीं जेव्हां विषयमदिरेचा अम्मल कमी झालेला असतो. मद्यपी मनुष्य मद्य प्राशन करून बेशुद्ध होऊन गटारांत पडतो; तेथील दगड लागून त्याचें डोकें फुटतें व रक्त येतें; पण हें दुःख त्या धुंदींत असतांना त्याला जाणवत नाहीं, धुंदी उतरल्यानंतर जाणवूं लागतें व नंतर तो औषधोपाय करूं लागतो. त्याचप्रमाणें हा मनुष्य आभासिक सुखाला भुलून विषयमद्यसेवन करितो, 'सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें' (तु.) ह्या वचनाप्रमाणें राईएवढ्या सुखाकरितां डोंगराएवढें दुःख सोशीत असतो! पण हें मी दुःख सोशीत आहें असें त्याला वाटतच नाहीं! दुःख हें दुःख वाटूं लागेल, तेव्हांच तो सुखाचा मार्ग शोधूं लागेल. त्या मार्गाविषयीं ह्याची तळमळ वाढूं लागली व तो दयाघन प्रभूची करुणा भाकूं लागला, म्हणजे तो करुणासागर व सुखसागर परमात्मा सुखाचा मार्ग दाखविणाऱ्या संतांची भेट करून देतो. संतमुखानें सच्छास्त्राचें 'श्रवण' झालें म्हणजे ह्याचे डोळे उघडतात. श्रवणाचें तो 'मनन' व नंतर 'निदिध्यासन' करूं लागतो. निदिध्यासानें साक्षात्कार घडतो. (पण "श्रवण-मनन-निदिध्यासानें साक्षात्कार होतो असें म्हणणारे 'असंप्रदायवित्' होत. श्रवणमनननिदिध्यासानें फक्त असंभावना, संशयभावना व विपरीत भावनारूप प्रतिबंध नष्ट होतात; हे प्रतिबंध नष्ट होण्यापुरताच श्रवणादि साधनांचा उपयोग; प्रतिबंध दूर झाले म्हणजे साक्षात्कार सहजसिद्ध आहे," ही गोष्ट सूक्ष्मदृष्टि साधकांनीं लक्षांत ठेविली पाहिजे.* ) ह्या साक्षात्कारालाच आत्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान म्हणतात. हें ज्ञान झालें म्हणजे अतिलंबायमान कर्मशृंखलेचें मागील संचित व पुढील क्रियमाण हे दुवे ताडकन् तुटून जातात; फक्त मधला प्रारब्ध-अंश शिल्लक राहतो. हा प्रारब्धांश भोगानेंच क्षय पावतो, ज्ञानानें पावत नाहीं. केळ किंवा कोणतेंहि झाड मुळांतून तोडलें तरी तत्काळ मरत नाहीं, त्यांतील ओलसरपणा कालांतरानें हळुहळूच नष्ट होतो, तसें प्रारब्धाचें आहे. ज्ञानोदय झाल्याबरोबर संचित व क्रियमाण नष्ट होतें, त्याप्रमाणें प्रारब्धही नष्ट

* श्रीसिद्धारूढबोधामृत (अप्रकाशित).

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

होईल तर, प्रारब्धाचाच बनलेला हा देह तात्काळ पडेल; व असें झालें म्हणजे ज्ञानाचा अनुभव सांगायला मग कोण उरेल? ज्ञानाची परंपराच नष्ट होऊन जाईल. करितां ज्ञानोदयानंतर प्रारब्ध शिल्लक राहातें व राहाणेंच अवश्य आहे, असें शास्त्रांचें व संतांचें मत आहे. ( नाथभागवतांत व इतरत्रही ह्याबद्दल अनेक प्रमाणें सांपडतात. ) पण कित्येकांच्या मतें ज्ञान होतांक्षणींच संचित, प्रारब्ध व क्रियमाण हीं तिन्हीं राहात नाहींत. ह्याबद्दल आचार्य आपल्या ' अपरोक्षानुभूति ' प्रकरणांत म्हणतात —

**रज्जुरूपे परिज्ञाते सर्पखंडं न तिष्ठति ।**
**अधिष्ठाने तथा ज्ञाते प्रपंचः शून्यतां गतः ॥ ९६ ॥**
**देहस्यापि प्रपंचत्वात् प्रारब्धावस्थितिः कुतः ।**
**अज्ञानजनबोधाय प्रारब्धं वक्ति वै श्रुतिः ॥ ९७ ॥**

( अर्थ ) रज्जूचें स्वरूप जाणलें म्हणजे ज्याप्रमाणें त्यावर भासणारा सर्प नाहींसा होतो, त्याप्रमाणें प्रपंचाचें अधिष्ठान ( ब्रह्म ) जाणलें म्हणजे प्रपंच नाहींसा होतो. देह हा प्रपंचच असल्यामुळें त्याला लागून असणारी प्रारब्धस्थिति कुठून राहणार? फक्त अज्ञान लोकांच्या समजुतीकरितां श्रुतीनें प्रारब्ध म्हणून म्हटलें आहे इतकेंच! ज्ञानानंतर देहच जिकडे मिथ्या ठरतो, तिकडे त्या देहाचें प्रारब्ध कसें सत्य उरणार? भक्तिमार्गी श्रीतुकाराममहाराजही ह्या त्रिविध कर्माविषयीं असेंच म्हणतात —

**" प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥**
**अवघा देवचि झाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥"** इत्यादि

पण असें म्हणण्याचा अधिकार त्यांचाच आहे कीं, **ज्यांनीं आपलें सर्वस्व देवाला वाहिलें आहे, देवावांचून आपण आपणपणानें जे शिल्लकच राहिले नाहींत**. पण असें न करितां आपल्या सुखाकरितां जे देवाला भजतात, त्यांचें ध्येय देव नसून आपलें, सुख आहे; अर्थात् देव अथवा देवाचें भजन हें साधन व आपलें सुख हें साध्य असें त्यांचें होतें. ते देवाचे भक्त नसून देहाचे भक्त होत. **ह्याचे उलट, देव हेंच ज्याचें ध्येय अथवा साध्य आणि आपण अथवा आपलें सुख हें त्याचें साधन, असें जो मानतो व त्या दृष्टीनें देवाचें भजन करीत राहतो, तोच देवाचा खरा भक्त होय.** अशा भक्ताचाच देव ऋणी होतो व त्याला कर्माकर्मांतून मुक्त करितो.

## ' बळी तो कान पिळी '

**पापाचें फळ दुःख** व **पुण्याचें फळ सुख** हा सिद्धान्त ठरलेला आहे. जेव्हां मनुष्यावर दुःख म्हणजे एखादी आपत्ति येते, तेव्हां तिचा परिहार प्रथम

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तो लौकिक उपायांनीं करूं लागतो. ते उपाय थकले म्हणजे मग शास्त्रीय उपाय शोधतो. शहाणा वैद्य रोग्यास औषध देण्यापूर्वीं रोगाची परीक्षा करितो. त्याप्रमाणें शास्त्रीय उपाय सांगणारा शास्त्री हा त्या आपत्तीच्या कारणाचा म्हणजे तज्जनक क्लिष्टकर्माचा सूक्ष्म दृष्टीनें प्रथम शोध करितो आणि मग तत्परिहारार्थ तद्विरोधी सुष्टकर्म करणेस सुचवितो. सुष्टकर्मानें दुष्टकर्माचा बोध होतो. धर्मशास्त्र व ज्योतिषशास्त्र ह्यांमध्यें ह्या गोष्टीचा विचार सांगितलेला आहे. व्याधिचिकित्सेवर जसें वैद्यकशास्त्र, तसें अदृष्ट आपत्तीच्या चिकित्सेवर ज्योतिष व धर्मशास्त्र प्रमाणभूत आहे. व्याधिचिकित्सेकरितां जसा प्रवीण वैद्यच पाहिजे, तसा कर्मचिकित्सेसाठींही प्रवीण शास्त्रीच पाहिजे. **पुण्यकर्मानें पापकर्माचा परिहार होतो.** पण हें तेव्हांच घडेल, कीं पापकर्म हें कोणत्या जातीचें व किती बळवान आहे हें यथावत् समजून, तद्विरोधी पुण्यकर्म कोणत्या प्रकारचें व किती बळाचें केलें पाहिजे हें बरोबर समजेल. ‘ यक्षानुरूपो बलिः ’ ही म्हण प्रसिद्ध आहे. यक्ष म्हणजे एखादें पिशाच, त्याला बलिदान देऊन शांत करावयाचें असतें ; पण त्याची भूक ओळखून ती शांत होईल इतका बलि दिला पाहिजे. त्याची भूक एक पायलीच्या अन्नाची असेल आणि त्याला तुम्ही पावशेर अन्नाचा बलि द्याल तर तें तृप्त होणार नाहीं. पुनः तुम्हांला छळणारच. त्याप्रमाणें पूर्वीचें **क्लिष्टकर्म म्हणजे प्रारब्ध, त्याचा परिहार आतांच्या पुण्यकर्मानें म्हणजे प्रयत्नानें करावयाचा, तर त्या प्रारब्धाची जात व त्याचें बळ समजलें पाहिजे, म्हणजे कोणत्या जातीचा व किती बळाचा प्रयत्न केला पाहिजे हें समजेल व त्या प्रारब्धाला हा प्रयत्न जिंकील. प्रारब्धापेक्षां प्रयत्न दुर्बळ होईल तर प्रारब्धाचा जय होईल व त्या प्रारब्धापेक्षां प्रयत्न प्रबळ होईल तर प्रयत्नाचा जय होईल.** ‘ बळी तो कान पिळी ’ हा नियम येथेंही लागू आहेच.

* * * *

## उपासना व उपासक !

आतां नाना प्रकारच्या व्याधींच्या परिहारार्थ जशीं नाना प्रकारचीं औषधें आहेत, तशीं नाना प्रकारच्या पापकर्मांच्या परिहारार्थ नाना प्रकारचीं पुण्यकर्में आहेत. ( त्यांची जात व बलाबल बरोबर जाणलें पाहिजे हें वर सांगितलेंच आहे. ) दान, व्रत, प्रायश्चित्त, यज्ञ, याग, तीर्थयात्रा, उपवास व उपासना इत्यादि पुण्यकर्में पापकर्मांच्या परिहारार्थ सांगितलीं जातात. ह्या सर्व कर्मांमध्यें देवाची उपासनाच

श्रेष्ठ आहे, कारण इतर पुण्यकर्में हीं कर्त्याला स्वतःच्या बळावर अवलंबून करावीं लागतात आणि कर्ता **जीव** तर अल्पशक्ति व अल्पज्ञानी असतो; पण देवाच्या उपासनेनें उपासनाकर्त्याला सर्वज्ञ व सर्वशक्तिमान देवाच्या शक्तीचें साहाय्य मिळतें, म्हणूनच इतर पुण्यकर्मांपेक्षां देवाची उपासनाच अधिक श्रेष्ठ आहे. पण ती यथायोग्य रीतीनें केली पाहिजे. नसलेस 'अडका दक्षिणा व लक्ष प्रदक्षिणा' ह्या म्हणींत सांगितल्याप्रमाणें व्हावयाचें.

**" रुका अडका दान केला । अतीतास टुकडा घातला ।**
**म्हणे माझा ढीग झाला । कोटी तुकड्यांचा ॥**
**तो मी खाईन पुढलिये जन्मीं । ऐसें कल्पी अंतर्यामीं ।**
**वासना गुंतली जन्मकर्मीं । प्राणियाची ॥ "**

—दासबोध, ८।७

जसा किंवा जितका भाव, तसें किंवा तितकेंच फळ, असा कांटेतोल हिशेब किंवा कायदा परमेश्वराच्या दरबारांत आहे. "ये यथा मां प्रपद्यन्ते ताँस्तथैव भजाम्यहम्" ('जो मातें भजतो जैसा, मी त्यातें भजतों तैसा') हें गीतावचन तर प्रसिद्धच आहे. संकट आलें म्हणजे देवापुढें एक फुटका नारळ ठेवावयाचा व तुटका नमस्कार घालावयाचा, अथवा ह्यापेक्षां कांहीं तरी मोठी सेवा म्हणून करावयाची आणि देवाकडे आपलें अमुक काम झालें पाहिजे म्हणून मागावयाचें आणि तसें कांहीं घडलें नाहीं म्हणजे देवास शिव्या द्यावयाच्या! जणूं देव म्हणजे आपला किंवा बाजारचा एक हमालच; त्यानें ह्यांचेकडून, देतील तें घेऊन, ह्यांचीं कामें करींत राहावीं! ह्याचें नांव उपासना किंवा भक्ति नव्हे. याचेपेक्षांही उच्च भावनेनें पण सकामबुद्धीनें सेवा केली, तर तीही भक्ति होऊं शकत नाहीं. देण्याघेण्याच्या मोबदल्याचा तो एक व्यापारच होईल. तशा भक्ताला शास्त्र 'न स भक्तः स वै वणिक्' म्हणजे तो भक्त नसून वाणी (बनिया व्यापारी) आहे, असें म्हणतें! असो.

* * * *

**" कांहीं पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥**
**मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ "**

असें श्रीतुकाराममहाराज म्हणतात. संकटाचे वेळेस हरीला आठवावें (हरीचा धांवा करावा) म्हणजे तो हांकेस पोंचतो व संकटनिवारण करितो, असें इतरही संत

******************************************

व शास्त्रें सांगतात. ह्यांत ' जडभारी ' म्हणजे संकट आलें असतां मदतीला हरीस हांक मारावी असें म्हटलें आहे हें खरें; पण अशी हांक कुणी मारावी ? ही हांक मारण्याचा हक्क कुणाला पोंचतो ? तर '**दासीं**' म्हणजे दासांनीं; तशी हांक मारण्याचा हक्क दासांलाच पोंचतो व त्यांच्या हांकेस हरि धांवून येतो, ही गोष्ट विचारवंतांनीं लक्षांत ठेवावी. दासांच्या दास्याचें म्हणजे सेवेचें ऋण हरीवर असतें, म्हणूनच तो धांवतो. ह्यावरून हें सहज सिद्ध होतें कीं, ज्यांनीं पूर्वी तसें दास्य करून दासांच्या पटांत ( यादींत ) नांव नोंदून ठेवलें नाहीं, म्हणजे जे ' दास ' होऊन राहिले नाहींत, त्यांना अर्थातच हांक मारण्याचा हक्क नाहीं व मारली तर त्यांच्या हांकेस तो ओ देत नाहीं. कारण ' ये यथा मां प्रपद्यन्ते० ' हें त्याचें ब्रीदवाक्य अथवा कायदाच आहे. गजेंद्राच्या हांकेसरशीं धांव घेतली म्हणतात, त्यास त्यानें पूर्वजन्मीं केलेलें महत्तप पदरांत होतें, हें प्राकृत लोक विसरतात. तसेंच अजामिळानें पुत्रमिषानें ' नारायण ' म्हणून हांक मारतांच विष्णुदूतांनीं येऊन त्याला यमदूतांच्या पाशांतून सोडविलें ही कथाही प्रसिद्ध आहे. पण तो मूळचा ब्राह्मणपुत्र असून, कर्मयोगानें चांडाळीच्या मोहपाशांत सांपडण्यापूर्वी मोठा कर्मनिष्ठ, तपस्वी व पितृभक्त होता; ऐन संकटाचे वेळीं विष्णुदूताचें आकर्षण होण्यास ' नारायण ' नामोच्चाराचे पाठीमागें त्याची दांडगी तपःशक्ति होती, हें सामान्य लोक लक्षांत घेत नाहींत व हरीला हांक मारतांच त्यानें धावून यावें अशी अपेक्षा करितात. फावल्या वेळांत भजनपूजन व थोडेंसें जपजाप्य करावयाचें आणि म्हणावयाचें, कीं आपणास यत्न करण्याचें कारण नाहीं, ईश्वर सर्व अर्थ पुरविणार आहे. अशा लोकांस उद्देशून श्रीगुलाबरावमहाराज म्हणतात —

> **" ईश्वर यांचा जावाई । कीं हे ईश्वराचे व्याही ।**
> **जे अंगीं प्रयत्न नाहीं । आणि शेषशायी अपेक्षिती ॥**
> **जेवावया पाहिजे सकाळीं । आणि सूपकार[1] व्हावा वनमाळी ।**
> **ऐशी आळसियाचि हृदयकमळीं । इच्छा सदा ॥ "**

आतां ईश्वरच सर्व करणारा आहे, आपणास यत्न करण्याचें कारण नाहीं, असें म्हणण्याचा अधिकार कोणास पोंचतो, ह्याबद्दल महाराज काय सांगतात पाहा —

> **" जो ईश्वरप्रेमें वेडा झाला । रात्रि दिवसाचा आठव निमाला[2] ।**
> **तेणें प्रभूवरी रुसवा धरिला । तरी तो शोभे ॥**

१ स्वैपाकी. २ नाहींसा झाला.

**सर्व आहे ईश्वरकर्ता । हें तयासचि शोभे बोलतां ।**
**जयाचा विषय सर्वथा । नारायण ॥**
**जयाचे हरिगुणावीण । रिते न होती पळभरही श्रवण ।**
**जयाचे पाहूं न शकती लोचन । हरिचरणावीण आणिका ॥**
**निंदा आणि स्तुति । या दोन्ही न रिघती हृदयप्रांतीं ।**
**एक परमात्मा सर्वांभूतीं । पाहतचि जो ॥**
**तयाचा सर्वकर्ता गोविंद । येथें अन्यथा नाहीं एक शब्द ।**
( परंतु ) **आमचा तव प्रबंध । याहूनि भिन्न ॥**
**आम्हां घडिभरी आवडे सगुण । घडिभरी आवडे निर्गुण ।**
**निंदितों भोळ्या भाविकांकारण । आणि स्त्रियांचे वचनीं दृढ श्रद्धा ॥**
**ऐकतां श्रीहरीचे गुण । प्रेमजळें न भरती नयन ।**
**मूर्ति पाहतों याचि कारण । शिल्पकार कैसा म्हणोनि ॥**
**निंदा आणि स्तुति । यांची चित्तांत सर्वदा वस्ती ।**
**आणि आळस द्वाड मात्र चित्तीं । जोडला एक ॥**
**जेवावयासी पाहिजे आधीं । कार्य करावया मत्सरी बुद्धि ।**
**ऐसियास कृपानिधि । नाहीं परमात्मा ॥** ”

—संप्रदाय-सुरतरु, अ. २०

परमात्मा अशा आळशी लोकांना कृपानिधि नाहीं, खऱ्या भक्तांकरितांच तो कृपाळू आहे, ही खूण वरील वचनांवरून लक्षांत घेऊन आपण त्याचे खरे भक्त होण्याची इच्छा धरावी. असे भक्त झाल्यानंतरच संकटाचे वेळीं देवाला हांक मारण्याचा आपणास हक्क पोंचतो व तो हांकेला धांवून येतो व कर्मबंधांतून मुक्त करितो.

* * * *

## देवकी-पांडवादिकांइतके तुम्ही भक्त नाहीं खास

कांहीं लोक प्रथम सकाम बुद्धीनें भक्ति करितात, कांहीं कामनेकरितां त्यांना देव आवडूं लागतो, मग कांहीं काळानें देवाची आवड धरण्याची चित्ताला संवय लागली म्हणजे कांहींच कामना नसतां आवडीमुळेंच देवाची भक्ति ते करूं लागतात. हिलाच निष्काम किंवा ‘देवासाठीं देवाची भक्ति’ म्हणतात. कोणी पूर्वसंस्कारामुळें

१ प्राकृत लोकांचा, केवळ प्रापंचिकांचा. २ परिपाट.

************************************************

प्रथमपासूनच निष्कामबुद्धीनें देवाची भक्ति करीत असतात. "**हरिगुणश्रवणें हरि आवडे।**" या वामनपंडितांच्या उक्तीप्रमाणें देवाच्या गुणलीलापर कथा ऐकून देवावर सहज प्रेम उत्पन्न होतें. अशा 'सहज' प्रेमानें जे देवाची भक्ति करितात, ते कांहीं संकट आलें असतां त्यांतून सुटका करण्याबद्दल देवाकडे प्रार्थना करीत नाहींत असें नाहीं. त्यांनीं ती आपत्ति निवारण करण्याचें संकट देवावर घातलें तरी ते अगदीं खालच्या पायरीवर गेले, देवाच्या प्रीतींतून उतरले, असें होत नाहीं. कारण देवानें त्यांचें तें संकट निवारण केलें नाहीं, त्यांची मागणी पुरविली नाहीं, तरी देवाविषयींची त्यांची भक्ति अथवा प्रेम बिलकुल कमी होत नाहीं. सकाम भक्ताची गोष्ट तशी नाहीं; त्याच्या इच्छेप्रमाणें झालें नाहीं, तर तो देवाचें नांवही घेणार नाहीं, उलट देवाला शिव्या देत राहील. खरा भक्त असतो तो, संकटाच्या वेळीं देव पोंचला नाहीं, तर देवास दोष न देतां आपल्या दैवासच देईल. आपलें प्रारब्धच हीन, त्यास देव काय करणार असेंच तो म्हणेल व देवावरील प्रेम यत्किंचितही कमी होऊं देणार नाहीं. देवाच्या भक्तावर संकटें येणार नाहींत किंवा येऊंच नयेत, असें तो कधींही मानणार नाहीं. कारण देवसुद्धां कर्माच्या नियमाप्रमाणेंच भक्तांशीं वागत असतो असें तो जाणतो व त्याबद्दल पुराणेतिहासांत दाखले असलेले तो पाहतो.

द्रौपदी म्हणजे कांहीं गरीबगुरीबाची मुलगी व बायको नव्हती, ती राजकन्या व राजपत्नी होती. तिचें पायाचें नखही उघड्या सूर्यकिरणांना दिसणें शक्य नव्हतें. अशा वैभवाची ती साध्वी; तिच्यावर एकवस्त्रानिशीं राजाच्या भरदरबारांत जाणेचा प्रसंग आला, तोही एका दांडगेश्वराकडून जुलमानें ओढून नेली जाण्याचा; एका घटकेपूर्वी जी व्याघ्रपत्नी (वाघीण) होती, ती दुसऱ्या घटकेला गरीब गाय बनली, आणि तिची अब्रू उघडी करण्याकरितां तिला विवस्त्र करण्याचा प्रसंग दुष्टांनीं आणला! यापेक्षां अब्रूदार स्त्रीवर दुसरें मोठें प्राणसंकट कोणतें? यापेक्षां अधिक दुःखतर आपत्ति कोणती? पण ती प्रारब्धानें आली! ती महान् साध्वी आणि भगवद्भक्त होती, तरी संकट आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यांतून ती भक्तिबळानें प्राप्त होणाऱ्या भगवत्कृपेनेंच पार पडली. भगवद्भक्तांवरही संकटें येतात, नाहीं असें नाहीं; पण डोंगराएवढें संकट असलें तरी तें फुलासारखें हलकें होऊन जातें, स्वप्नासारखें तुच्छ होतें. हाच तर भगवद्भक्तीचा गुण आहे. हा काय कमी झाला? साधूंच्या कृपेनेंही असा अनुभव येतो. ते आपल्या शक्तीनें नवीन प्रारब्ध निर्माण

करितात व भक्तांना दुष्प्रारब्धांतून मुक्त करितात. भगवद्भक्ति ही देखील कायावाचामनानें केलेलें कर्मच आहे ना? 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' या वचनासही यायोगें बाध आला असें होत नाहीं. कारण —

**दुःखभोगानें पापाचा क्षय व सुखभोगानें पुण्याचा क्षय** होतो, हा कर्मशास्त्रांचा सिद्धांत अथवा कायदाच आहे. पापप्रारब्ध फलोन्मुख होऊन तें दुःख देण्यास आरंभ होण्यापूर्वी आपण त्याची स्थितिगति ओळखून स्वखुषीनें दुःख सोसण्याची तयारी केली म्हणजे तें प्रारब्ध भोगून टाकल्यासारखेंच नाहीं कां होत? विशिष्टपापपरिहारार्थ सांगितलेलीं विशिष्ट प्रायश्चित्तें आचरीत असतां तनमनाला काय थोडे क्लेश होतात? अवश होऊन पापाचें प्रायश्चित्त भोगण्यापेक्षां स्ववश होऊन तत्तुल्य क्लेश भोगणें हें सुखाचें असतें. ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीनें जन्मकुंडलींतील ग्रहांवरून प्राचीन दुष्प्रारब्ध व त्यामुळें भोगावें लागणारें आगामी (पुढें प्राप्त होणारें) दुःख यांचें ज्ञान करून घेऊन तें शास्त्रीय प्रयत्नानें (दानव्रतजपादिकानें) टाळणेच्या कर्मानें शरीराला व मनाला होणारे क्लेश हे, कर्मनियमानुसार भोगावे लागणाऱ्या दुःखभोगाइतकेच प्रबळ असतात, यामुळें 'भोगादेव क्षयः' हा कायदा अमलांत आणल्यासारखाच किंवा आल्यासारखाच होतो, हें यांतील वर्म आहे.

आतां, पुण्यकर्मानें पापाचा परिहार होतो याचा अर्थ, आतांच्या पुण्यांत मागील पाप वजा होतें असा होतो खरा. पण तसा नेहमीं अनुभव येतोच असें नाहीं. आतांच्या जन्मांतील पाप आतांच्या पुण्यांत वजा व्हावें म्हणून कोणी ओळखून सवरून पुण्यकर्में करूं लागतात. त्याला 'प्रायश्चित्त कर्म' म्हणतात. (कर्मांत **नित्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त, काम्य** व **निषिद्ध** असे प्रकार आहेत. पैकीं मुमुक्षूंनीं काम्य व निषिद्ध सोडून देऊन बाकीचीं तिन्ही प्रकारचीं कर्में 'ईश्वरार्पणबुद्धीनें' करावीं असें मोक्षधर्मांत सांगितलें आहे.) परंतु वर सांगितलेली पुण्यपापाची वजाबाकी सामान्य जीवांच्या बाबतीत होऊं शकते, विशिष्ट ('आधिकारिक' कोटींतील) जीवांच्या बाबतींत हा नियम नाहीं म्हणतात. त्यांना पुण्याचें व पापाचें फळ (सुख व दुःख) 'निरनिराळेंच' भोगावें लागतें. यास उदाहरण-देवकीमातेच्या पुण्याचा महामेरु केवढा म्हणून सांगावा? जिच्या उदरीं प्रत्यक्ष कृष्णपरमात्मा अवतरले, तिच्या पुण्याची गणना कोण करील? परंतु ह्या पुण्यांत, तिनें पूर्वजन्मीं केलेल्या सवतीच्या सहा पुत्रवधाचें पाप-ज्या पापामुळें कर्माच्या अटळ नियमानुसार सहा पुत्रशोक तिला भोगावे लागले तें-वजा

*************************************************

झालें नाहीं. ( मागच्या जन्मीं ही एका राजाची राणी होती. त्या राजाला दुसरीही एक पत्नी होती. तिला एकामागून एक सहा पुत्र झाले व देवकीनें मत्सरबुद्धीनें ते एकामागून एक विषप्रयोग करून मारून टाकले. श्रीकृष्णानें मेलेला गुरुपुत्र आणून दिलेला समजतांक्षणींच देवकीनें आपल्या त्या सहा पुत्रांविषयीं प्रश्न केला, तेव्हां श्रीकृष्णानें तिच्या नेत्रांस स्पर्श करून मागील जन्म पहावयास सांगितलें, तेव्हां आपलें घोर कर्म तिच्या नजरेस आलें. ही कथा देवीभागवतांत आहे. ) तसेंच, महाभागवतोत्तम भीष्माचार्य अर्जुनाचे प्रखर बाण सर्वांगास लागून खालीं उलथून पडले, त्या शरपंजरावर असतां युद्धसमाप्तीनंतर श्रीकृष्ण पांडवांसहित त्यांना भेटण्यास गेले, तेव्हां श्रीकृष्णाला भीष्माचार्यांनीं प्रश्न केला कीं, ' देवाधिदेवा ! मला हें शरपंजराचें असह्य दुःख कशामुळें प्राप्त झालें आहे बरें ? साऱ्या जन्मांत मी कोणतेंही पाप केल्याचें मला आठवत नाहीं. ' त्यावर श्रीकृष्णांनीं त्यांच्या नेत्रांस स्पर्श करून मागील जन्मांत जाऊन पाहणेस सांगितलें. त्याप्रमाणें भीष्मांनीं मागील जन्माचें निरीक्षण केलें, त्यांतही पाप दिसलें नाहीं. ती गोष्ट श्रीकृष्णाला त्यांनीं सांगितली. श्रीकृष्णांनीं त्यांना त्याच्या मागचा जन्म पहा म्हटलें. पण त्याही जन्मांत त्यांना पाप दिसलें नाहीं. त्याच्या मागच्या, त्याच्या मागच्या, असें करितां करितां मागील शंभराव्या जन्मांत त्यांना आपलें पाप दिसून आलें. त्या जन्मांत आपण राजपुत्र असतांना शिकारीस जातेवेळीं गांवाबाहेरील रस्त्यावर एक सरडा पडला होता, त्यास, तो पायाखालीं तुडविला जाईल म्हणून धनुष्याच्या टोकानें उचलून बाजूच्या कुंपणावर फेकून दिलें, तेव्हां त्याच्या सर्वांगास त्या कांटेरी कुंपणाचे कांटे बोचले, हें दृश्य पाहतांच कृष्णाला निवेदन केलें व " तुझ्या सृष्टींत अन्याय नाहीं, तूं कर्मफळदाता असल्यामुळें जीवांना 'पापाचें फळ दुःख ' देत असतांनाही तुझा दयाळूपणा लोपत नाहीं, नैष्ठुर्य तुला शिवत नाहीं ; कारण त्या कर्मबंधनांतून जीवानें सुटावें अशीच तुझी मंगल इच्छा असते, " असें म्हणून त्यांनीं श्रीकृष्णाची पुष्कळ स्तुति केली व आभार मानले.

तात्पर्य, कर्मगति अनिवार व अचिंत्यही आहे. " किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । ...गहना कर्मणो गतिः " असें भगवंतानेंच खुद्द सांगितलें आहे. कित्येक प्रसंगीं असेंही घडून येतें कीं, पुण्य करतां करतां पाप होतें व पाप करीत असतां पुण्य होऊन बसतें. अशीं उदाहरणें पुराणांत आहेत व व्यवहारांतही अनुभवास येतात, त्याचा विस्तार करण्याचें हें स्थळ नव्हे. कर्मबंधन तोडणें हें तर कर्तव्य आहे, पण कर्मानेंच कर्म तोडलें जातें ; लोखंडाची बेडी पोलादाच्या शस्त्रानें तुटते,

तसें निकृष्ट कर्म उत्कृष्ट कर्मानें पराभूत होतें, हें वर्म जाणून उत्कृष्ट कर्माची कास कल्याणेच्छूनें धरली पाहिजे. तें उत्कृष्ट कर्महि तज्ज्ञाच्याच दृष्टीनें निवडलें पाहिजे. '**आपुल्या मतें उगिच चिखल कालवूं नको रे।**' ही संतांची शिकवण नेहमीं उराशीं बाळगून राहिलें पाहिजे. सर्व कर्मांत भगवदुपासना हा आपला धोपटमार्ग आहे; आणि उपासनांगांत भगवन्नामाचा जप हा 'बहात्तर रोगांवरील सार्सापरिला' आहे, हें कधींही विसरूं नये.

* * * *

## दुःखी व सुखी लोकांना पाहून शहाण्यांनीं काय अनुमान करावें?

कर्मांप्रमाणें फळ हें तर ठरलेलेंच आहे; पण कोणत्या कर्माचें कोणतें फळ आहे हें सर्वसामान्य लोकांना कळणें अगदीं अशक्य आहे. सर्व तपशील जरी नाहीं कळला, तरी विचारवंतांना ठोकळ अनुमान काढतां येतें. हें अनुमान कसें काढावें, हें देवीभागवतांत एका ठिकाणीं फारच सुंदर रीतीनें सांगितलें आहे.

**" अनुमानमिदं राजन् कर्तव्यं सर्वथा बुधैः**
**दृष्ट्वा रोगयुतान् दीनान् क्षुधितान् निर्धनान् शठान् ॥**
**जनानार्तांस्तथा मूर्खान् पीडितान्वैरिभिः सदा।**
**दासानाज्ञाकरान्क्षुद्रान्विकलान्विव्हलानथ ॥**
**अतृप्तान् भोजने भोगे सदार्तानजितेंद्रियान्।**
**तृष्णाधिकानशक्तांश्च सदाधिपरिपीडितान् ॥**
**तथा विभवसंपन्नान्पुत्रपौत्रविवर्धनान्।**
**पुष्टदेहांश्च संभोगैः संयुतान्वेदवादिनः ॥**
**राजलक्ष्म्यायुतान्शूरान्वशीकृतजनानथ।**
**स्वजनैरवियुक्तांश्च सर्वलक्षणलक्षितान् ॥**
**व्यतिरेकान्वयाभ्यां च विचेतव्यं विचक्षणैः।**
**एभिर्न पूजिता देवी सर्वार्थफलदा शिवा ॥**
**समाराधिता च तथा नृभिरेभिः सदाम्बिका।**
**यतोऽमी सुखिनः सर्वे संसारेऽस्मिन्न संशयः ॥ "**

—देवीभागवत, तृ. स्कं. अ. ११

अर्थ सोपा आहे, पण थोडक्यांत सांगतों—रोगी, दीन, क्षुधित, निर्धन, शठ, मूर्ख, सदोदित वैऱ्यांनीं पीडिलेले, भोजन व इतर भोग यांत अतृप्त, अजितेंद्रिय, महालोभी, अशक्त व सदोदित मानसिक चिंतेनें ग्रस्त इत्यादि लोक; याचे उलट, वैभवसंपन्न, पुत्रपौत्रवान्, धष्टपुष्ट शरीराचे, नानाप्रकारच्या संभोगांनीं संपन्न, वेदवेदांग जाणणारे व सांगणारे, राजलक्ष्मीनें युक्त, शूर, सर्व जनांना वशीकृत करणारे, स्वजनांचा कधींच वियोग नसणारे व सर्व लक्षणांनीं संपन्न अशा लोकांना पाहून ज्ञानी लोकांनीं असें अनुमान काढावें कीं, पहिले (दुःखी) लोक यांनीं सर्वार्थ देणारी जगदंबिका शिवा हिचें आराधन केलेलें नाहीं व दुसरे (सुखी) लोक यांनीं तिचें उत्तम आराधन केलेलें आहे आणि म्हणूनच या संसारांत ते सुखी आहेत, यांत संशय नाहीं. इत्यादि "फुलावरून झाड ओळखावें, बोलावरून अंतर पारखावें व या जन्मींच्या भोगावरून त्याचें मागील जन्मींचें कर्म जाणावें" असें ज्ञानेश्वरींतही एके ठिकाणीं म्हटलें आहे.

हें समजून घेऊन आतां आम्हीं काय ठरवावें? तर सुखाची इच्छा असणारांनीं निरंतर सत्कर्माकडेच प्रवृत्ति ठेवावी, स्वतःच्या व वशंजांच्या कल्याणाकरितां कायावाचामनानेंही असत्कर्म वर्ज्य करावें. परंतु याप्रमाणें दानधर्मादि पुण्यकर्में करीत असतां द्रव्यशुद्धि व पात्रशुद्धि इत्यादिकांचा विचार मात्र अवश्य केला पाहिजे. स्वकष्टार्जित शुद्ध द्रव्यानेंच पुण्यकर्म केलें पाहिजे. अन्यायोपार्जित द्रव्यानें केलेलें सुकृत व्यर्थ होतें, इहलोकांतही त्याची कीर्ति होत नाहीं व परलोकींही त्याचें फळ मिळत नाहीं. यासाठीं **न्यायार्जित द्रव्यानेंच नेहमीं सुकृत करीत असावें.** त्यायोगें या **लोकांत कीर्ति** व **परलोकांत सुख प्राप्त होतें.** ("अन्यायोपार्जितेनैव द्रव्येण सुकृतं कृतं। न कीर्तिरिहलोकेच परलोके न तत्फलम्॥ तस्मान्न्यायार्जितेनैव कर्तव्यं सुकृतं सदा। यशसे परलोकाय भवत्येव सुखाय च॥") असें सांगून देवीभागवतांत (तृ. स्कं.) त्यापुढें जन्मेजय राजाला वैशंपायनानें असा प्रश्न केला आहे कीं, हे राजा, पांडवांनीं 'राजसूय' नांवाचा मोठा यज्ञ केला. त्यांत अन्नदानदक्षिणादिकांची कांहींच कमतरता पडूं दिली नाहीं; प्रत्यक्ष श्रीकृष्णपरमात्मा जेथें हजर होते, यज्ञविद्या पूर्णपणें जाणणारे भारद्वाजांसारखे महामुनि ज्या यज्ञाचें काम चालवीत होते, तशा त्या यज्ञाच्या समाप्तीनंतर एका महिन्यांतच पांडवांना किती महत्तर कष्ट प्राप्त झाले! तो घोर वनवास, द्रौपदीची ती विटंबना, द्यूतांत पराजय, वनवासानंतर महत्कष्टतर अज्ञातवास, त्या समयीं विराटराजाचें पांचही महावीरांनीं केलेलें दास्य, महासती तेजस्वी

**********************************************
द्रौपदीचा कीचकाकडून झालेला छळ, इत्यादि केवढी बरें आपत्ति प्राप्त झाली ? राजसूय यज्ञाचे वेळचे ते ब्राह्मणश्रेष्ठांचे आशीर्वाद कुठें गेले ? वासुदेवाची भक्ति त्या संकटांत कुठें दडून बसली ? इत्यादि उद्गार काढून, त्यांत मुख्यतः द्रव्यशुद्धि नव्हती ( देशोदेशींच्या राजांना जिंकून त्यांजकडून बलात्कारानें करभार आणलेला होता ) त्यामुळेंच एवढ्या अट्टाहासानें केलेलें सुकृत व्यर्थ झालें, असें प्रतिपादन केलें आहे ! ही गोष्ट कल्याणेच्छूंनीं चांगली लक्षांत ठेवावी. †

एकदां हुबळीस श्रीसिद्धारूढस्वामींकडे त्यांची कीर्ति ऐकून व श्रीनरसोबावाडीस दृष्टांत झाल्यावरूनही, उत्तर हिंदुस्थानचे एक मोठे श्रीमान् जहागिरदार व सरदार ब्राह्मण गृहस्थ आलेले होते. त्यांनीं आपल्या गांवीं एक श्रीरामाचें देवालय बांधून, रामोपासना कडक रीतीनें चालविली होती. आनंदरामायणांत सांगितलेल्या विधीप्रमाणें, तेरा कोटी रामनाम कागदांवर लिहवून प्रत्येक नाम कापून तें कणकीच्या लहान गोळींत लपेटून तशा गोळ्यांच्या पेट्यांच्या पेट्या भरून हरिद्वारांतील गंगेच्या माशांना खावयास घातल्या होत्या. अशीं अनेक धर्मकृत्यें त्यांनीं केलेलीं होतीं. त्यांच्या त्या धर्मकृत्यांची वाखाणणी त्या वेळीं एका वर्तमान-पत्रामधून झालेली पुष्कळांच्या वाचण्यांत आहे. परंतु ‘ अंदरकी बात राम जाने ’ म्हणतात त्याप्रमाणें त्यांना नित्य होत असलेली ब्रह्मपिशाचाची बाधा दूर झालेली नव्हती ! त्यांनीं आपणास होत असलेली भयंकर बाधा स्वामींस थोडक्यांत निवेदन करून, मला यांतून मुक्त करावें अशी प्रार्थना करून स्वामींच्यापुढें १०० रुपये ठेवून नमस्कार केला. त्या वेळीं आम्ही तेथें हजर होतों. ते गृहस्थ एक दिवस मठांत राहिले होते. त्यांच्याबरोबर असलेल्या परिचारक मंडळींकडून त्यांची दानधर्माची वर लिहिलेली माहिती ऐकण्यांत आली. त्यापूर्वी वर्तमानपत्रामधून ती आम्हीं वाचलेलीच होती, त्यामुळें त्या गृहस्थांविषयींचें आमचें कुतूहल जास्त वाढलें. त्यांची ती भक्ति व तो दानधर्म अगदीं कामनिक होता, हें आम्हांस ते हुबळीस आल्यानंतर समजून आलें. परिचारक लोकांकडून कळलें व स्वामी महाराजांकडूनही दुसऱ्या दिवशीं अधिक समजून आलें. त्यांना स्वामींनीं थोडे दिवस

---

† न्यायोपार्जित द्रव्यानें दानधर्म करणें उत्तम; पण अन्यायोपार्जित द्रव्यानें मुळींच करूं नये असा त्याचा अर्थ नाहीं. तशा द्रव्यानें दानधर्म केल्यास पापाचा अंश थोडा तरी कमी होईल यांत संशय नाहीं.

मठांत राहणेस सांगितलें. पण कसचे राहतात ? त्यांना त्यांच्या प्रारब्धानें तेथें राहूं दिलें नाहीं. शंभर रुपयांत स्वामींची पुण्याई उचलून घेईन किंवा कृपा खरेदी करीन व आपलें सर्व पीडापाप त्यांना देईन असें त्यांना वाटलें होतें वाटतें ! जणूं तो एक दुकानदाराचा जड पदार्थांचा सौदाच !!

नरसोबाच्या वाडीस हुबळींत जाण्याबद्दल दृष्टांत झाल्याप्रमाणें आपण येथें मोठ्या श्रद्धेनें आलों आहों, असें ते म्हणाले. पण तसें जर आहे, तर स्वामींनीं तेथून जा म्हणेपर्यंत त्यांनीं निर्धारानें तेथें राहिलें पाहिजे होतें. पण तसें त्यांनीं केलें नाहीं ! देवाकडूनही न होणाऱ्या गोष्टी साधूंनीं केल्या असल्याबद्दल पुराणांतरीं व भक्तविजयादि ग्रंथांत दाखले मिळतात. श्रीसिद्धारूढस्वामींचे तसे प्रत्यय अनेकांना आलेले होते. पण वचनावर निर्धार आणि विश्वास नसेल त्यांस तो प्रत्यय कसा येईल ? असो. ते गृहस्थ जास्त दिवस राहाणेची सवड नाहीं म्हणून सांगून निघून गेले ! याचेंच नांव ' अदृष्ट ' म्हणजे प्रारब्ध.

दुसऱ्या दिवशींच्या प्रवचनाच्या वेळीं त्या गृहस्थाच्या गोष्टीवरून श्रीस्वामींनीं कर्मगतीवर पुष्कळ सुंदर चर्चा केली. ते म्हणाले, प्रारब्धही कर्म व प्रयत्नही कर्मच ; कर्मानेंच कर्म हटविलें पाहिजे व हटतें. पण तसें तें उत्कटतेनें केलें पाहिजे. ' **अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते** ' म्हणजे अत्युत्कट भावनेनें केलेलें पुण्य किंवा पाप या लोकींचें या लोकींच फळतें. त्याला दुसऱ्या जन्माची वाट पहावी लागत नाहीं. मंदभावनेनें केलेलें पुण्य व पाप मंदगतीनें फळास येतें. कोणतें कर्म कधीं फलोन्मुख होईल हें सांगतां येत नाहीं. कृष्णमाता देवकी हिनें पूर्वजन्मीं केलेल्या सहा बालहत्या पुढच्या जन्मींच फळास आल्या. भीष्मानें एका सख्यास दुखविलेलें कर्म फलोन्मुख होण्यास शंभर जन्मांचा अवधि लागला. द्रुपदराजानें द्रोणाचार्यांचा सूड घेण्याकरितां सकाम यज्ञ केला, तें उत्कट भावनेचें कर्म तात्काळच फळास आलें. द्रौपदी व धृष्टद्युम्न हीं मुलें ' अयोनिज ' अशीं यज्ञकुंडांतूनच उत्पन्न झालीं. दशरथ राजानें केलेला पुत्रकामेष्टि यज्ञ त्याच जन्मांत थोड्याच वर्षांत फळास आला. एका पुत्रासाठीं यज्ञ केला त्यास चार पुत्र झाले. अर्थात् इच्छेपेक्षां अधिक चांगलें फळ आलें. तोच पांडवांनीं राजसूय यज्ञ केला. त्यास इच्छेविरुद्ध वाईट फळ आलें ! कर्माची कृति करीत असतां कर्त्या यजमानाचा किंवा करवित्या पुरोहिताचा, तसेंच त्यांत वापरल्या जाणाऱ्या द्रव्याचा दोष असेल तर त्यापासून विपरीत फळ येतें. अनिच्छेनेंही कांहीं

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

बरीं अथवा वाईट कर्में घडतात, त्यांचें फळ कर्माच्या कायद्याप्रमाणें बरें व वाईट येतेंच. उदाहरणार्थ, अजामिळानें 'नारायण' नामोच्चार सहज पुत्रमिषानें केला. **अनिच्छेनेंच** त्याच्या तोंडून तें निघालें. सौमिनी नांवाची ब्राह्मणकन्या (हिची गोष्ट शिवलीलामृतांत अध्याय ३ मध्यें व गुरुचरित्रांत अध्याय ७ मध्यें आहे.) हिनें विधवापणांत व्यभिचार केला, त्याचें फळ ती पुढच्या जन्मांत दरिद्री आईबापांच्या पोटीं जन्मास आली व जन्मतांच आंधळी व कुष्टी झाली. लहानपणींच आईबाप मेले. कोणी पोषिंदा नसल्यामुळें ती भिक्षा मागूं लागली. पण पूर्व जन्मीं आईबापांनीं टाकून दिल्यानंतर एका वैश्याची स्त्री होऊन राहिली असतां, मद्यपानानें धुंद होऊन तिनें त्या धुंदींत मेषाच्या ऐवजीं गाईचें वासरूं मारलें व धुंदी उतरल्यावर चूक लक्षांत येऊन तिच्या तोंडून अनुतापानें 'शिवशिव' असा सहज उच्चार झाला. त्याचें फळ पुढच्या जन्मीं गोकर्णक्षेत्रांत तिला मृत्यु आला. त्या वेळीं यमदूतांचा पराभव करून शिवदूतांनीं तिला विमानांतून कैलासास नेलें. (गोकर्णांत त्या दिवशीं तिला शिवरात्रीचा उपवास 'सहज'च घडला.) मांडव्य ऋषीनें लहानपणीं एका पतंगास गुदद्वारीं कांटा टोंचला, त्याचें फळ त्याला शूळावरील शिक्षा उगीच्या उगीच मिळाली. तात्पर्य, कर्माचें फळ हें भोगल्यावांचून सुटत नाहीं आणि मृत्युलोक ही 'कर्मभूमि' असून, स्वर्गादि लोक हे 'भोगभूमि' आहेत. त्याचप्रमाणें मनुष्ययोनि ही कर्मयोनि असून इतर पशुपक्षी किंवा देवयोनि सुद्धां 'भोगयोनि' आहेत. देवांना स्वर्गवास झाला तरी ती सोन्याची बेडीच. बेडी म्हणजे बंधन. हें कर्मबंधन तोडून मोक्ष मिळविण्याचें साधन स्वर्गस्थ देवांना करितां येत नाहीं. म्हणून स्वर्गींचे देव देखील मृत्युलोकीं मानवयोनींत जन्म मिळण्याची इच्छा करितात. ("स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा। मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां॥" तुकाराम.) तात्पर्य, हा मृत्युलोक असला तरी कर्मभूमि म्हणजे कर्म करण्याचा अधिकार येथें असल्यामुळें स्वर्गापेक्षांही श्रेष्ठ आहे. 'कर्म हें भोगल्यावांचून सुटत नाहीं' ही घोषणा ऐकून **पापी मनुष्यास धडकी भरते** व **पुण्यवंतास उत्साह चढतो.** पुण्यवान म्हणतो, कर्माचें फळ जर चुकत नाहीं (येतेंच येतें), तर ही गोष्ट किती चांगली आहे बरें? मी पुण्यच करीन व सुखाचें बीज पेरून ठेवीन. त्या बीजाचा वृक्ष होऊन यथाकालीं त्याचें फळ सौख्य हें मला मिळेलच मिळेल. असो.

**ऋण, वैर व हत्या जन्मोजन्मीं चुकत नाहीं.** कोणाचें ऋण घेतलें असल्यास तें फेडल्याशिवाय राहूं नये. या जन्मीं न फिटल्यास त्याला धनकोच्य

घरीं गाईबैलाचा किंवा दुसरा कसला तरी जन्म घेऊन तें फेडावें लागतें. (या कर्मसिद्धांतावर स्वामींनीं त्या दिवशीं एकदोन गोष्टी अगदीं अनुभवाच्या सांगितल्या.) तसेंच कोणाशीं वैरभाव धरूं नये व हत्या करूं नये. ज्याची हा हत्या करितो तो पिशाच होऊन याला व याच्या कुळालाही छळीत असतो. (याबद्दलही स्वामींनीं कांहीं ज्ञात अशा कुटुंबांचीं उदाहरणें दिलीं.) असा छळ सुरू झाला म्हणजे मग हा मनुष्य देवाला शरण जाऊन ती पीडा दूर करण्याबद्दल प्रार्थना करितो. परंतु देव तरी कर्मोप्रमाणेंच फळदाता असल्यामुळें पिशाचाचें निवारण जुलमानें तात्काळ कसें करणार? पिशाचें सुद्धां देवाकडे अगदीं न्यायानें भांडत असतात. ही गंमत नरसोबाच्या वाडींत व इतरत्रही पुष्कळ पहावयास सांपडते. तशा स्थानीं राहून देवाची सेवा म्हणजे प्रदक्षिणा, जप, उपवास, दान, वगैरे पुण्यकर्म तो करीत असतो. हें त्यानें केलेलें पुण्यकर्म पिशाचाला देऊन देव त्यास सद्गति देतो व याला पीडामुक्त करतो. कांहीं पिशाचें हट्टी असतात. तीं हिशेबाबाहेर छळतात. तेव्हां देव त्यांना शिक्षा देतो. पिशाचपीडित मनुष्याचें कारणकर्म जितकें कमी अधिक बलवत्तर असेल, तितके कमीअधिक दिवस त्याला सुधारावयास लागतात. पिशाचपीडा असो किंवा रोगपीडा असो, कर्मानेंच कर्माचा परिहार करावयाचा असल्यामुळें, म्हणजे प्रयत्नानेंच प्रारब्ध हटवावयाचें असल्यामुळें, पूर्व कर्म म्हणजे प्रारब्ध व आतांचें कर्म म्हणजे प्रयत्न यांचें बलाबल असेल तसें यशापयश व तेंहीं कमीअधिक दिवसांनीं येत असतें.

व्याधिही दोन प्रकारच्या असतात. **दोषजन्य व्याधि** (शरीरांतील कफवातपित्त ह्या त्रिदोषांच्या प्रकोपामुळें – बिघाडामुळें झालेल्या व्याधि) औषधानें बऱ्या होतात. **कर्मजन्य व्याधि** (दमा, कुष्ट, पोटशूळ वगैरे दुर्धर अशा पूर्वकर्मानें प्राप्त झालेल्या) औषधानें बऱ्या होत नाहींत. त्या तप, दान, देवसेवा व साधुसेवा इत्यादि पुण्यकर्मानेंच हटतात.

तात्पर्य – **प्रारब्धापेक्षां प्रयत्न श्रेष्ठ आहे,** यांत संशय नाहीं. योगवासिष्ठांत श्रीराम प्रारब्धाचें प्रबळत्व सिद्ध करीत होते, तें वसिष्ठ गुरूंनीं खोडून काढून 'पुरुषप्रयत्न' च श्रेष्ठ असें नाना युक्तीनें प्रतिपादन केलें आहे. पण हा **प्रयत्न परमार्थाकरितां केला पाहिजे व प्रपंच प्रारब्धावर टाकला पाहिजे.** पण असें न करितां लोक प्रपंचासाठीं प्रयत्नाची पराकाष्ठा करितात आणि परमार्थ प्रारब्धावर अवलंबून ठेवतात. प्रपंचाच्या प्रयत्नाप्रमाणें, नव्हे त्याच्या एकशतांशही

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

प्रयत्न जर मनुष्य परमार्थासाठीं प्रामाणिकपणें करील, तर तो साध्य झाल्यावांचून रहाणार नाहीं इत्यादि. श्रीसिद्धारूढांनीं सांगितलेली ही सार गोष्ट मुमुक्षूंनीं व साधकांनीं जरूर लक्षांत ठेवावी.

*　　　*　　　*

## पुण्यबीज पापकर्म, पुण्यबीज पुण्यकर्म, पापबीज पुण्यकर्म व पापबीज पापकर्म

असे कर्मांचे पुन्हा चार प्रकार शास्त्रांत सांगितले आहेत. हा सूक्ष्म विचार फारच लक्षांत घेण्यासारखा आहे. यांत फळभोगावरून बीजाचें अनुमान करावयाचें असतें. ( १ ) 'पुण्यबीज व पापकर्म' असणारा मनुष्य पुण्यशील व सदाचरणी असतो, पण बाह्य परिस्थितीनें दुःखी व दरिद्री राहतो. ( २ ) 'पुण्यबीज पुण्यकर्म' वाला मनुष्य पुण्यशील व सदाचरणाचा असून बाह्य परिस्थितीनेंही सुखी व संपन्न असतो. हें परम भाग्याचें लक्षण होय. ( ३ ) 'पापबीज पुण्यकर्मी' मनुष्य अंतरांतून पापशील व दुराचरणी असून बाह्य परिस्थितीनें सुखी असतो किंवा दिसतो. आणि ( ४ ) 'पापबीज पापकर्म' असणारा मनुष्य अंतरांतूनही पापशील व दुराचरणी असून बाहेरूनही दुःखी व दरिद्रीच राहतो.

जगांत पुण्याचरणी मनुष्य दुःखी व दरिद्री आणि पापाचरणी मनुष्य सुखी व संपन्न असलेले विपरीत दृश्य पुष्कळ वेळां दृष्टीस पडतें. तेव्हां त्याचें कारण वर लिहिल्याप्रमाणें समजावें आणि वाईट परिस्थितीबद्दल देवावर किंवा दैवावर न रागावतां, हें सर्व कर्मभूमीवरील कायद्याप्रमाणेंच घडत आहे असा निश्चय करावा व प्राप्त परिस्थितींत समाधान मानून आपलें सदाचरण व शील न बिघडूं देण्याबद्दल अत्यंत खबरदार असावें. पांडव व हरिश्चंद्र इत्यादिकांचीं उदाहरणें तितिक्षा ( सहनशीलता ) व शीलरक्षण यांबद्दल डोळ्यांपुढें ठेवावीं. संकटें आलीं असतां डगमगून जाऊं नये. **दुःखाच्या भोगानें तितका पापक्षय झाला याबद्दल संतोष मानावा व सुखाच्या भोगानें तितका पुण्यक्षय होतो म्हणून उदासीन असावें.**

'दुःखानें पापक्षय व सुखानें पुण्यक्षय' हें कर्म जो जाणतो तो दुःखाचे वेळीं खेद व सुखाचे वेळीं हर्ष मानीत नाहीं.

**" जैशी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥**
**सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥**
**एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश झाला ॥ "**

हें नाथांचें वचन लक्षांत घेऊन अत्यंत आवडीनें व सद्भावानें हरिनामस्मरण-परायण रहावें. मात्र देवाच्या भक्तींत वेळ जास्त घालविणें, नामजपाची संख्या जास्त करणें यापेक्षां, अंतरांतील दुर्गुण ओळखून ते दूर करण्याकडे जास्त लक्ष देणें **हें खऱ्या तपोवृद्धीचें लक्षण** आहे, याबद्दल निश्चय असूं द्यावा. दुर्गुण दूर करून सद्गुण वाढविणें याचा अर्थ, शास्त्राच्या भाषेंत बोलावयाचा म्हणजे, रज-तम दूर करून सत्त्ववृद्धि करणें असा समजावा.

**" तुका म्हणे येथें सत्त्वाचें सामर्थ्य । करावा परमार्थ अहर्निशीं ॥ "**

ज्याला परमार्थ खराखुरा साधावयाचा आहे, त्यानें ही गोष्ट जरूर लक्षांत ठेविली पाहिजे. ' येथें सत्त्वाचें बळ 'च प्रमाण आहे. रजोगुण व तमोगुण ही ' आसुरी संपत्ति ' असून सत्त्वगुण ही ' दैवी संपत्ति ' आहे आणि दैवी संपत्ति ही मोक्षाला व आसुरी संपत्ति ही बंधाला कारण आहे. " दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता " हें गीतावचन प्रसिद्ध आहे. गीतेंतील १६ व्या अध्यायांत दैवी व आसुरी संपत्तीचें सुविस्तृत वर्णन आहे; तें लक्षपूर्वक वाचून मुमुक्षूंनीं व साधकांनीं आपल्या अंतरांतील गुणावगुणांची छानगी करावी व वर सांगितलेल्या चार प्रकारच्या कर्मांपैकीं ' पापबीज पापकर्म ' म्हणजे पापवासनायुक्त पापकर्म हातून कधींहि न घडूं देण्याबद्दल व ' पुण्यबीज पुण्यकर्म ' घडण्याबद्दल डोळ्यांत तेल घालून सावधगिरीचा प्रयत्न करावा. अशी सद्बुद्धि देण्याबद्दल (' धियो यो नः प्रचोदयात् ') परमेश्वराची अनन्यभावें प्रार्थना करावी. अशा प्रार्थनेनें व नवविधा भक्तींपैकीं कोणत्या तरी एका अथवा अधिक भक्तीच्या निर्मळ आचरणानें ' नूतन प्रारब्ध ' निर्माण होतें व तें मागील दुष्प्रारब्धाचा पराभव करितें, असा हृदयांत विश्वास बाळगावा.

* * * *

## स्वर्गांतून आलेले जीव व नरकांतून आलेले जीव कसे ओळखावे ?

मनुष्ययोनि म्हणजे एक जंक्शनस्टेशन आहे. ह्या स्टेशनवरून एक लाईन स्वर्गाकडे व दुसरी लाईन नरकाकडे जाते. जंक्शनस्टेशनवरील रेल्वेचा कुठला

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

फाटा कुठल्या बाजूस जातो ह्याचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे किंवा करून घेतलें पाहिजे व आपणास इष्ट त्या दिशेच्या डब्यांत जाऊन बसलें पाहिजे. नसल्यास थोडीशी चूकभूल झाली तर मोठा घोटाळा होतो; हें प्रवासी लोकांना माहीत असतेंच. तिकिटें तपासणारे अधिकारी लोकही उतारूंचीं तिकिटें तपासूनच बहुधा त्या त्या दिशेकडे सोडीत असतात. पण आपणही ती काळजी घेतली पाहिजे. मानवी तिकिट-कलेक्टराकडून चूक होण्याचा संभव असतो, परंतु सृष्टिदेवतेचे दैवी तिकिट-कलेक्टर यांजकडून तशी चूक कधींही होत नसते. ते तिकिट तपासूनच ज्याचें तिकिट ज्या दिशेचें असेल त्या दिशेकडेच त्याची रवानगी करितात. परंतु भिन्न भिन्न दिशेकडून येणाऱ्या उतारूंना मात्र ते एकाच स्टेशनावर उतरूं देतात. हे लोक वेटिंग रूममध्यें थोडा वेळ बसावयाचें झालें असतां आपापल्या दर्ज्याप्रमाणें बसतात. पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या वर्गाच्या वेटिंग रूम्स (विश्रांतिस्थळें) निरनिराळ्या असतात. तेथील सुखसोयीही निरनिराळ्या असतात. हें तारतम्य तेथें पाळलें जातेंच. परंतु स्टेशन मात्र एकच असल्यामुळें कुठला उतारू कुठून आलेला आहे हें समजणें कठीण असतें. तथापि ही ओळखण्याचीहि एक दृष्टि आहे. एक दुर्बिण आहे. त्या दुर्बिणीमधून पाहिलें कीं, कुठला उतारू कुठून आलेला आहे हें तात्काळ जाणतां येतें. पूर्वकर्मा नुसार स्वर्गांत गेलेले व नरकांत गेलेले जीवही तिकडील मुदत संपली म्हणजे या मृत्यु लोकांत केव्हां केव्हां मनुष्यजन्मास येतात. त्यांना कसें ओळखावें असा प्रश्न परीक्षितीनें शुकाचार्यास केलेला आहे. त्याचें उत्तर शुकाचार्यांनीं दिलेलें आहे. तें मोठें मार्मिक आणि युक्तीला व अनुभवाला धरून आहे. श्रेयोभिलाषी लोकांनीं त्याचा विचार करून दुसऱ्यांच्या विचाराबरोबर आपण सुद्धां कुठून आलों असावेत याचाही विचार करावा. या विचाराचें तरी कारण काय? तर पुनः नरकाकडे जाणेचें टळावें म्हणून. नरकाला अधोगति अथवा अवनति म्हणतात व स्वर्गाला ऊर्ध्वगति अथवा उन्नति म्हणतात. आपला आपण अधःपात करून घेऊं नये. तसें करणारा ज्याचा तो वैरी होतो. 'नात्मानं अवसादयेत्,' 'आत्मैव रिपुरात्मनः' हीं गीतावचनें अज्ञ जीवांना हेंच सुचवितात. कल्याणेच्छूंनीं याकडे डोळेझांक करितां कामा नये.

स्वर्गीय जीव व नारकी जीव ओळखण्याचा विचार फारसा कठिण नाहीं. ज्या लोकांची प्रवृत्ति नेहमीं सदाचाराकडे असते, जे मोठ्याशा लाभाकरितां लहानसेंहि पाप करण्यास तयार नसतात ते स्वर्गांतून आलेले जीव समजावे. आणि ज्यांची प्रवृत्ति दुराचाराकडे असते, जे थोड्याशा लाभाकरितां मोठेंसेंहि पाप करण्यास तयार

होतात, ते नरकांतून आलेले जीव म्हणून समजावें. असे हे जीवांचे प्रकार आपल्या नेहमीं दृष्टीस पडत असतात. पण आपण त्याचा सूक्ष्म बुद्धीनें विचार करीत नाहीं. मोठा थोरला लाभ म्हणजे या काळीं पुष्कळसा पैसा, मग तो प्रत्यक्ष द्रव्यरूपानें असो अगर अमोल वस्त्रालंकार किंवा भूमि इत्यादि रूपानें असो, सहज पदरांत पडत आहे, त्यास फक्त कोर्टांत जाऊन खोटी साक्ष दिली म्हणजे पुरे, तरी तेवढें करण्यास स्वर्गीय जीव तयार नसतो. दहा हजार रुपये देतों, एवढेंसें खोटें बोला, खोटी साक्ष द्या असें सांगितलें असतां, स्वतः गरीब असूनही तसें करण्यास तयार नसणारे धीरवीर पुरुष आज समाजांत आढळतात आणि आपल्या थोड्याशा फायद्यासाठीं दुसऱ्याचा प्राण घेणारे लोकही दृष्टीस पडतात! थोड्या वर्षांखालीं एका पोस्ट-रनरला वाटेवर त्याच्या प्रत्यक्ष मामानें मारून त्याच्या हातांतली पोस्टाची पिशवी हिसकून घेऊन तिच्यांतील २००।३०० रुपयांच्या दागिन्यांची बगी लांबविली! कर्नाटक प्रांतांत एका स्टेशनवर एका ५–७ वर्षांच्या मुलाला त्याच्या हातांतील चांदीचे कडीतोडे काढून घेऊन मारून विहिरींत टाकलें! त्या चोऱ्या सरकारनें पकडून गुन्हेगारांस योग्य शिक्षा दिल्या. या गोष्टी आम्हीं स्वतः पाहिलेल्या व वर्तमानपत्रांमधून प्रसिद्ध झालेल्या आहेत आणि अशा किंवा याहीपेक्षां भयंकर गोष्टी प्रत्यहीं घडत असलेल्या ऐकूं येतातच. असें होण्याचें कारण काय? दहा हजार रुपये बिनश्रमानें व गुपचिप पदरांत पडत असले तरी त्याचा धिक्कार करून खोटें न बोलण्याचें धैर्य करणारे पुरुष आणि दोनतीनशें किंवा दहाबारा रुपयांकरितां दुसऱ्या निरपराध गरीब मनुष्याचा प्राण घेण्याचें महापाप करणारे मनुष्य यांत जमीन–अस्मानाचें अंतर नाहीं काय? हें जमीन–अस्मान म्हणजेच नरक व स्वर्ग होत. पण उभयतांत अशी परस्परविरुद्ध बुद्धि उठण्याचें कारण काय, हाच येथें विचार कर्तव्य आहे.

हा विचार असा कीं, स्वर्गांतील जीव तेथील दिव्य सुखें भोगून आलेले असतात आणि नरकांतील जीव तेथील महादुःखें भोगून आलेले असतात. नरकांत जीवाला सुखाचा लेशही मिळत नसतो, त्यामुळें ते सुखाकरितां नेहमीं हपापलेले असतात. या कारणानें अगदीं क्षुल्लक सुखही त्यांना मोठें दिसतें व तें प्राप्त करून घेण्यास कसलेंही कर्म करण्यास ते तयार होतात. ‘बुभुक्षितः किं न करोति पापं’ या वचनाप्रमाणें त्याला पापपुण्याचा विचारच सुचत नाहीं. याचे उलट, स्वर्गांतून आलेले जीव सुखभोग भोगून आलेले असल्यामुळें आणि ते देवभोग म्हणजे

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

पृथ्वीवरील भोगांपेक्षां दिव्य (उच्च) भोग असल्यामुळें, या पृथ्वीवरील अदिव्य (हलक्या) सुखाकरितां ते हपापत नाहींत. इकडील सुखानें त्यांना मोह पडत नाहीं. इकडील मोठीं सुखें त्यांना क्षुल्लकच दिसतात. रोज पंचपक्वान्नें खाणाऱ्या मनुष्याला वाळलेला भाकरीचा तुकडा पाहून कधीं लाळ सुटेल का? तशीच ही गोष्ट आहे.

तात्पर्य, ज्याला नरकगति चुकवावयाची आहे, त्यानें तो मार्ग अजीबात सोडून दिला पाहिजे. नारकी जीव ओळखून त्यांची संगतही टाळली पाहिजे. कारण संगतीनुसार मनुष्य बिघडतो व सुधारतो. कित्येक 'पुण्यबीज—' संस्काराचे जीव दुःसंगतीमुळें इंद्रियनिग्रह व मनोनिग्रहशून्य होऊन पापाचरणास प्रवृत्त होतात. त्यांचें आंतलें बीज शुद्ध असलेमुळें मागाहून त्यांना पश्चात्ताप होतो. 'पश्चात्' चा ताप हा देखील वाईट नव्हे. पण तो पुरापुरा झाला पाहिजे. अर्धवट होऊन उपयोग नाहीं. खऱ्या पश्चात्तापानें जे योग्य प्रयश्चित्त किंवा ईश्वरशरणागति करितात, ते त्या पापापासून मुक्त होतात. तसें न केल्यास, मागें सांगितल्याप्रमाणें ते 'पुण्यबीज-पापकर्म-' वान् मनुष्य होऊन जन्मतःत व त्याचीं फळें या जन्मांत दुःख व दारिद्ररूपानें भोगण्यास पात्र होतात! यासाठीं **दुःसंगति सर्वथैव टाकून दिली पाहिजे.** श्रीतुकाराममहाराज याबद्दल काय सांगतात पाहा—

**"दुर्जनाचें अंग अवघेंचि सकळ। नर्काचा कोथळ सांठवण॥**
**खाय अमंगळ बोले अमंगळ। उठवी कपाळ सघष्टणें॥...**

**दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग। बोलिलासे त्याग देशाचा त्या॥**
**तुका म्हणे किती सांगावें पृथक्। अंग कुंभीपाक दुर्जनाचें॥"** इ.

असे हे नरकरूप असणारे बाहेरचे दुर्जन त्यागावेच. पण त्यापेक्षां अंतरांतील दुर्जन ओळखून त्यांनाही त्यागावें. त्यांचीही संगत न करण्याबद्दल फार सावध असावें. अंतरांतील दुर्जन म्हणजे दुर्गुण; अथवा विजातीय म्हणजे रजतमात्मक वृत्ति. त्यांचा स्पर्श न होऊं देण्याबद्दल फार दक्ष रहावें. रजतमात्मक वृत्ति ह्या नरकास नेणाऱ्या व सात्त्विक वृत्ति ह्या स्वर्गास पोंचविणाऱ्या आहेत. करितां रज व तम हे गुण क्षीण करून सत्त्वगुण वाढवावा. हा अभ्यास वाढत गेला म्हणजे सत्त्वगुण शुद्धसत्त्वांत परिणाम पावतो व नंतर गुणातीत अवस्थेस जीव पोंचतो.

**********************************************

**सत्त्व वाढवूनि सुखाडें। जैं रजतम निःशेष झडे।**
**तैं सद्विद्या हाता चढे। सत्त्वाची वाढी मोडे निजसत्त्वें[1]करूनि॥**

इत्यादि.

दुसरी खूण अशी कीं, अमुक नको, तमुक नको म्हणत राहिल्यानें त्याचेंच चिंतन अधिक होतें, त्यापेक्षां जें पाहिजे त्याचेंच चिंतन अधिक करावें म्हणजे जें नको तें आपोआपच निघून जातें. निष्कामभक्ति, सावधगिरीचें निष्काम नामस्मरण यानें ही गुणातीतता म्हणजे मोक्ष सहज साध्य होतो.

* * * *

## ज्ञानदृष्टींत प्रारब्ध व प्रयत्न दोन्ही नाहींत !

सूर्य उगवतो त्या दिशेला आपण पूर्व म्हणतों व मावळतो त्या दिशेला पश्चिम म्हणतों. पण सूर्यास पूर्व व पश्चिम कांहींच नाहीं. तसेंच दिवस आहे, म्हणून रात्रीला रात्र म्हणतों व रात्र आहे म्हणून दिवसाला दिवस म्हणतों. सूर्याला रात्रच माहीत नाहीं, मग दिवस कुठून ? हीं सर्व आपल्या कल्पनेचीं नांवें आहेत. तसेंच देहाच्या दृष्टीनें प्रारब्ध व प्रयत्न सत्य आहेत ; पण स्वरूपाचे ठिकाणीं दोन्ही मिथ्या आहेत. देहच मिथ्या, तिकडे देहाचें प्रारब्ध कसें सत्य ? कालाचा विचारही असाच. तो अखंडदंडायमान आहे. देहाच्या दृष्टीनें त्यास भूत, वर्तमान व भविष्य अशीं नावें पडलीं आहेत. देहाच्या पूर्वीं, देह असतांना, व देहानंतर याप्रमाणें ' पूर्वीं ', ' आतां ' व ' नंतर ' हीं नांवें कालाला देहाच्या उपाधीनें आलेलीं आहेत. तसेंच प्रारब्ध-प्रयत्नांचें.

" या देहाच्या पूर्वीं जें कर्म तें ' प्रारब्ध, ' व देहाकडून हल्लीं जें कर्म होत आहे तो ' प्रयत्न ' अशीं नांवें देहाच्या उपाधीनेंच आलीं आहेत. वस्तुतः चालला आहे हा प्रकृतीचा स्वभावच होय....कर्माला विवेकानें ज्ञानाग्नींत जाळून टाकून आपण मोकळें व्हावयाचें नाहीं काय ? प्रारब्धालाच प्राक्तन म्हणतात. प्राक्तन म्हणजे पूर्वींचा यत्न. म्हणजे जन्माच्या पोटांत जसा मृत्यु, तसा प्रारब्धाच्या पोटांतच प्रयत्न. अशा रीतीनें प्रारब्धाचा व प्रयत्नाचा एकमेकांत संबंध आहे. तसा त्यांचा आपल्याशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध आहे का ? मग त्यांवर ममत्व ( माझेंपणा ) ठेवून मिरविण्याचें आपल्यास काय कारण आहे ? प्रारब्धालाच ' दैव ' म्हणतात, मग दैवानें केलेलें ते आपलें कसें म्हणतां येईल ? याला ' अदृष्ट ' म्हणतात, मग जें

१ शुद्धसत्त्वानें अथवा स्वस्वरूपबोधानें.

आपल्या दृष्टीच्या आड आहे तें आपल्या दृष्टींत आणून त्याचें सव्यापसव्य करण्यांत व बळें आपल्यावर ओढून घेण्यांत काय अर्थ आहे? याला 'ब्रह्मलिखित' म्हणतात, मग ब्रह्मदेवानें लिहिलेलें आपणास पुसण्याचा काय अधिकार? याला 'विधि' म्हणतात, मग त्याचा आपण निषेध करून आपल्यास काय कर्तव्य आहे! आलें तसें जाईल, म्हणून त्याचा विधिनिषेधच नको. यालाच 'कर्मरेषा,' 'कर्ममर्यादा' म्हणतात; मग आपलें स्थान सोडून आपण कर्माच्या मर्यादेंत कशाला जा! ... ... सारांश, या पूर्वप्रारब्धानें आपल्याशीं जो अपूर्व संबंध जोडला आहे व आपल्याला पुढें करून आपण मागें राहिलें आहे, त्याला विचाराच्या चव्हाट्यावर आणलें तर झट्‌दिशीं त्याचा निकाल लागतो. तो असा कीं, प्रारब्ध म्हणजे पूर्वी आरंभिलेलें. पूर्वी कधीं? अर्थात् जगदुत्पत्तीच्याही पूर्वी, जगच्चालकाचा जो 'एकोऽहं बहुःस्याम्' असा संकल्प उत्पन्न झाला, त्याच वेळीं! अमुक काळांत अमुक गोष्टी घडावयाच्या, अशा प्रकारचें बीज जगदीशाच्या संकल्पांत उत्पन्न झालेलें आहे. तेंच वृक्षरूपानें पुढें फळाला येत असतें. तें बीज वृक्षरूपानें व्यक्तीला आलें म्हणजे प्रयत्नरूपानें चमकतें अव्यक्तांत लीन असलें म्हणजे प्रारब्धरूपानें अदृष्ट स्थितींत असतें. अव्यक्तापर्यंत आपल्या अज्ञानी जीवाची मति पोंचत नाहीं, यामुळें अदृष्टांत काय आहे तें काहीं आपल्याला कळत नाहीं. परंतु वासना, जन्म, लाभ, हानि, मृत्यु याशिवाय त्यांत कांहीं नसतें. एवंच आपल्याला मिळालेलें तन, मन, धन, हींच जर जगदीशाच्या सृष्टींतून मिळालीं आहेत व त्यांत आपला यत्किंचितही संबंध नाहीं, तर प्रारब्ध-प्रयत्न हीं देखील जगदीशाच्याच सृष्टींतून देहांत आलेलीं आहेत, म्हणून देहच ज्ञानाग्नींत जाळून परमेश्वराला वाहून टाकला तर —

> **'जाळिलें संचित समुळीं, ज्ञानाग्नीमाजीं निगुतीं।**
> **क्रियमाण पूर्वप्रवाहें, विधिपूर्वक कर्में घडती।**
> **प्रारब्ध कलेवर भोगी, साक्षी हा ईश्वरमूर्ती॥**

ही स्थिति आपल्यास प्राप्त होऊन या कर्मकचाटींतून आपण परमात्मपदीं अनन्य भावानें लीन होण्यास अधिकारी होऊं. पण या प्रारब्ध-प्रयत्नासकट अखिल विश्वाकार कर्माचा कर्ता हुडकून काढून त्याचें कर्म त्याच्या स्वाधीन केल्याशिवाय सुटका नाहीं."

— गोविंदसुतकृत परमार्थविचारमाला

* * * *

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

## प्रारब्ध चुकविण्याबद्दल ईश्वराचें स्वातंत्र्य अथवा ईश्वरभक्तीचें लोकोत्तर सामर्थ्य !

आतांपर्यंत **प्रारब्धप्रयत्नाचा** बलाबलविचार, **प्रारब्धाचें स्वरूप, संचित-प्रारब्ध-क्रियमाण** नामक कर्माचे तीन भेद, **पाप**पुण्याची **व**जाबाकी कुठें होते व कुठें होत नाहीं, **उपासनेचें** व उपासकाचें स्वरूप, **कर्माप्रमाणें फल देण्याचा ईश्वराचा कांटेतोल स्वभाव**, दासाच्या हाकेलाच देव कसा व कां पोंचतो, '**कर्मा**चा भोगानेंच क्षय' या सिद्धान्ताची व्याप्ति कोठपर्यंत, **स्वर्गीय व नारकी** जीव कसे ओळखावे, **अधःपात** टाळण्याचा कसा प्रयत्न करावा, **ज्ञान**दृष्टीनें प्रारब्ध व प्रयत्न दोन्ही मिथ्या कसे ? इत्यादि गोष्टींचा विचार शास्त्राच्या व संतांच्या मतानें यथाशक्ति व यथामति केला. आतां दुर्भेद्य अशा या कर्माच्या तटबंदींतून, जन्मठेप सक्तमजुरीच्या भयंकर शिक्षेंतून गरीब जीवाला मुक्त होण्याचा सुखसाध्य असा कांहीं मार्ग आहे कीं नाहीं, असेल तर तो कोणता, याचा विचार करून हें प्रकरण संपवायचें आहे. उगीच मोठमोठ्या गोष्टी सांगून लेखकाला आपलें पांडित्य दाखवायचें नाहीं, किंवा वाचकांनाही पंडित बनवायचें नाहीं. उलट "**पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्**" या श्रुतिवचनाप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावयाचा आहे. कारण केवळ पांडित्यानें अंतःकरणाला शांति प्राप्त होत नाहीं. निर्मळ व सरळ बालभावामध्येंच शांति असते. मात्र हा बालभाव ज्ञानपूर्वक असला पाहिजे. जडत्वाचा उपयोगी नाहीं, म्हणून थोडेंसें शास्त्रज्ञान असलें पाहिजे, एवढ्याकरितांच या विषयाचा इतका विस्तार केला असें समजावें.

प्रारब्ध-प्रयत्नाचा विचार अनेक विद्वानांनीं आपापल्या मतानुसार केलेला आहे, तो अनेकांना यापूर्वीच ज्ञात आहे. तथापि श्रीगुलाबरावमहाराजांनीं आपल्या '**संप्रदाय-सुरतरु**' नामक खरोखरच कल्पतरूपम ग्रंथांत जितका व ज्या तऱ्हेनें विचार केलेला आहे, तितका व त्या तऱ्हेचा विचार, अन्य कोणत्याहि ग्रंथांत आम्हांस सांपडला नाहीं. म्हणून आमच्या वाचकांसाठीं त्याचें सार येथें देण्याचा विचार केला आहे. त्या योगानें बुद्धीचा निष्कर्ष करण्यास त्यांना सोपें जाऊन, एक निश्चित ध्येय त्यांच्या डोळ्यांपुढें राहील अशी आम्हांस आशा आहे.

या प्रारब्धकर्माची शक्ति इतकी बलवत्तर आहे कीं सामान्य मनुष्य तर सोडूनच द्या, परंतु अवतारी देव व स्वर्गस्थ देव यांनाही तें सुटलें नाहीं व सुटत नाहीं ! हिरण्यकश्यपूचा बडगा किंवा रावणाचा बंदीखाना हें देवांचें प्रारब्ध नव्हे काय ?

## ज्ञान्याला कर्म बाधत नाहीं याचा अर्थ काय ?

तर ज्ञानी हा ज्ञानावस्थेंत म्हणजे समाधिअवस्थेंत किंवा चिन्मयवृत्तींत असल्या वेळीं त्या कर्मांचा परिणाम त्याचेवर होऊं शकत नाहीं. व्यतिरेकसमाधि सोडून अन्वय-समाधींत राहिला तर त्यास सुखदुःखाचे भोग ( सृष्टिधर्मानुसार ते होतच असतात, पण ) चिन्मय दृष्टीमुळें चिन्मयच भासूं लागतात. भगवद्भक्तांना ते भोग म्हणजे तीं सुखदुःखें भगवद्रूप दिसतात.

**" ज्यातें म्हणती महादुःख । तें भक्तांसी भगवद्रूप देख ।**
**ज्यातें म्हणती परम सुख । तेंही आवश्यक भगवंत ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. २१।१२१

यावरून काय ठरतें ? तर भोग बदलत नाहींत, भावना बदलूं शकते. अज्ञान्यांना सुखदुःखें प्राप्त होतात तशीं तीं ज्ञान्यांलाही होतातच. **अज्ञानी मनुष्य देहदृष्टीमुळें त्यांचें तादात्म्य घेतो, ज्ञानी त्यांचें ( सुखदुःखांचें ) तादात्म्य घेत नाहीं, इतकेंच. इंद्रचंद्रादि देव अपरोक्षज्ञानी; पण त्यांनाही अहल्या–तारादिकांच्या अशास्त्रीय संगाचें प्रायश्चित्त भोगावें लागलें, याबद्दल पुराणेंच साक्ष देतात.** अंतःकरण व इंद्रियें उत्पन्न झालीं कीं, त्याबरोबर कर्म उत्पन्न झालेंच. कर्म उत्पन्न झालें कीं त्याबरोबर फळ आलेंच. मग कर्म करणारा तो देव असो कीं दानव असो, अथवा मानव असो; कर्मांचें चक्र जीवांच्या मागें लागतेंच किंवा सृष्ट्युत्पत्तीपासून लागलेलेंच आहे. त्यांतून ह्या **भवचक्रांतून सोडवणूक करून घेणें हाच पुरुषार्थ होय.**

ज्ञान झाल्यानंतर कर्म हें कर्मरूपानें राहत नसून ब्रह्मरूपच होऊन जातें. ही ज्ञानाची सहजशक्ति अथवा युक्ति आहे. करून अकर्ता राहणें हें ज्ञानानेंच साधतें. कर्माकर्म जाळून टाकण्याची शक्ति ज्ञानाग्नींत आहे. असें ज्ञान जो प्राप्त करून घेतो त्यालाच सुज्ञ लोक **पंडित** म्हणतात. **" ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः "** असें गीता सांगते. त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या द्रव्ययज्ञांपेक्षां ( द्रव्यसाध्य, आत्मेतर म्हणजे जड पदार्थांनीं साध्य होणाऱ्या यज्ञांपेक्षां ) ज्ञानयज्ञ श्रेष्ठ, कारण सर्व यज्ञकर्मांचें ज्ञानांत पर्यवसान होतें. ( ' सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ' ), ज्ञानरूप नौकेनेंच सर्व पातकांचा समुद्र तरून जातां येतो. ( ' सर्वं ज्ञानप्लवेनेव वृजिनं संतरिष्यसि ' ), सर्व जगांत ज्ञानासारखें पवित्र दुसरें कांहींच नाहीं. ( ' न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ' ), असें हें ज्ञान श्रद्धावान, तीव्र

************************************************

जिज्ञासु व जितेंद्रिय पुरुषाला प्राप्त होतें आणि हें झालें म्हणजे त्याला तात्काळ पूर्ण शांति लाभते. ('श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः। ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति') अशी ज्ञानाची महती गीतेंत गायिली आहे. (अध्याय ४)

परंतु असें हें ज्ञान प्रारब्धपरिहार करूं शकत नाहीं आणि चालू देहांतील 'दृष्टदुःख' निवारण करण्याकरितां प्रारब्ध तर जिंकलें पाहिजे. त्यास उपाय कोणता? त्यास उपाय फक्त 'पुरुषप्रयत्न.' योग्य अशा **पुरुष प्रयत्नानें प्रारब्ध जिंकलें जातें.**

> **"अतः पुरुषयत्नेन यतितव्यं यथा तथा।**
> **पुंसां तंत्रेण सद्योगाद्येनाश्वद्यतनो जयेत्॥ ६॥**
> **तावत्तावत्प्रयत्नेन यतितव्यं सुपौरुषम्।**
> **प्राक्तनं पुरुषं यावदशुभं शाम्यति स्वयम्॥ ७॥"**

—वासिष्ठ, मुमुक्षुप्रकरण, अ. ५

आळस टाकून प्रयत्न केला असतां फळ आपल्या हातचें आहे. प्रारब्धपराजय होईपर्यंत यत्न करीत असावा. असें 'मुमुक्षु-' प्रकरणांत वसिष्ठांनीं श्रीरामास सांगितलें आहे. येथें वसिष्ठांनीं प्रारब्धास मागें लोटून प्रयत्नवादाची शिकस्त केली आहे. परंतु शेवटीं 'निर्वाण' प्रकरणांत उत्तरार्धांत व्याधाख्यान सांगतांना प्रयत्नानें प्रारब्ध टळत नाहीं असेंच प्रतिपादिलें आहे.

> **"अवश्यं भवितव्योऽर्थो न कदाचन केनचित्।**
> **विधातुमन्यथा शक्यस्तन्न क्षरति यत्नतः॥ ५४॥**

—वासिष्ठ, नि. प्र. उ. अ. १५५

हा परस्परविरोध आला. तो श्रीगुलाबरावमहाराजांनीं त्रिपुरारहस्याच्या आधारें —

**कोणतें प्रारब्ध टळतें व कोणतें टळत नाहीं?**

हें सांगून उत्तम प्रकारें दूर केला आहे. प्रारब्ध अथवा दैव दोन प्रकारचें आहे. एक '**जन्मांतरभोगद**' व दुसरें '**कल्पांतरभोगद.**' पहिल्यास **प्रारब्ध** व दुसऱ्यास **नियति** म्हणतात. फलोन्मुख कर्म तें प्रारब्ध आणि ईश्वरसंकल्प ती नियति. हा ईशसंकल्प सृष्टीच्या नियमनाकरितां सर्गाच्या पूर्वींच निर्माण झाला आहे. नियति अनुकूल असेल तर पुरुषप्रयत्नानें प्रारब्धजय होतो. नियति प्रतिकूल असेल तर

प्रारब्धजय होत नाहीं. मुमुक्षुप्रकरणांत जो ‘ पुरुषप्रयत्न ’ म्हणून सांगितला आहे, तो व्यष्टिदैवपराजयाचें कारण व निर्वाणप्रकरणांत ‘ दैव प्रधान ’ म्हणून सांगितलें आहे, तें नियतिरूप म्हणून समजावें.

**“ श्रीगुरु म्हणती ऐक वचन । दैव तेचि द्विविध जाण ।**
**एक जन्मांतरभोगद पूर्ण । आन कल्पांतर-भोगदायी ॥**
**पहिल्या प्रारब्ध म्हणती । आणि दुसऱ्यास म्हणती नियती ।**
**याचा पर्यायरीति । लक्षण ऐके ॥**
**फलोन्मुख कर्म तें प्रारब्ध जाण । ईश्वरसंकल्प ती नियति पूर्ण ।**
**सर्गाआधीं झाला उत्पन्न । सकल जन नियमावया ॥**
**जेवीं नदींत जलचर । आपुलिया वेगें फिरती समग्र ।**
**परी नदीवेगेंहि साचार । आलिया पूर वाहवती ॥**
**तैसें आपआपल्या प्रारब्धेंकरून । प्राणी वर्तती संपूर्ण ।**
**कल्पाद्युत्थ नियतिसंज्ञक भगवत्संकल्पेंकरोन ।**
**प्रवाहापन्न इव भोगिती फळें ॥**
**जरी प्राणिकर्मसापेक्षेंकरून । सर्गादि भगवत्संकल्प होय उत्पन्न ।**
**तथापि समष्टिभावें करून । करी उपमर्दन व्यष्टिजीव-यत्नाचें ॥**
**यास्तव ‘ मुमुक्षु-प्रकरणीं ’ जो बोलिला यत्न ।**
**तो व्यष्टिदैवपराजयाचें कारण । आणि ‘ निर्वाणप्रकरणीं ’ जें बोलिलें दैव प्रधान । तें नियतीरूप म्हणोनी ॥**
**नियति अनुकूल असतां । तरी पुरुषयत्नें प्रारब्धजय होय तत्वतां ।**
**नियति प्रतिकूल असतां । तरी प्रारब्धजय न होय ॥ ”**

—संप्रदायसुरतरु, अ. १३, ओं. ८६ – ९३

प्रारब्धप्रयत्नवादाचा इतका खुलासा आमच्या तरी पाहण्यांत दुसरीकडे कुठें नाहीं. वरील प्रारब्ध व नियति यांच्याबद्दल सांगतांना नदींतील जलचर प्राणी आपल्या वेगानें फिरतात आणि नदीवेगानेंही वाहवतात, तसे प्राणी आपापल्या प्रारब्धानें वर्ततात व नियतिसंज्ञक भगवत्संकल्पानेंही प्रवाहपतिताप्रमाणें फळें भोगतात, हा दृष्टान्तद्राष्टान्त फारच मार्मिकपणें सांगितलेला आहे, तो वाचकांनीं तितक्याच मार्मिक बुद्धीनें लक्षांत घ्यावा.

जीवशक्तीपेक्षां भगवत्संकल्प प्रबळ आहे, हें सांगण्याचें कारण नाहीं. जीवाला परमेश्वरानें ‘ किंचित् ’ स्वातंत्र्य दिलें आहे. त्यास ‘ दत्तस्वातंत्र्य ’ अशी शास्त्रांत

********************************************

संज्ञा आहे. या दत्तस्वातंत्र्यास अनुलक्षूनच शास्त्रांत विधिनिषेध सांगितले आहेत. जीव अगदींच परतंत्र असता, तर शास्त्राचा उपदेश निरर्थक झाला असता, असें जें मागें सांगितलें आहे, त्यांतील वर्म हें आहे. ईश्वरानें त्याला स्वातंत्र्य दिलें आहे, पण तें बोलून चालून 'किंचित्' आहे. अधिक देण्यास जीव पात्र नाहींत. ते जीव आपल्या अंगीं पात्रता आणतात, त्यांस ईश्वर अधिक स्वातंत्र्य, 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' शक्ति देत असतो. ती देखील मर्यादित असते आणि असें करण्यांत जीवाच्या कल्याणाचाच हेतु परमेश्वराच्या मनांत असतो, हें विसरतां कामा नये. असो.

आतां प्रारब्ध किंवा नियति बलवत्तर आहे, ती मनुष्यशक्तीच्या बाहेरची आहे, हें समजलें; पण या समजण्याचा फायदा काय? यानें आपला जुना प्रारब्धवादच सिद्ध झाला, शिरला अंगांत आळस, गेली यत्न करण्याची बुद्धि वितळून! प्रारब्ध हे प्रयत्नानें जिंकतां तरी येतें, नियति जिंकण्याचा कांहीं उपाय सांगाल तर त्याचा उपयोग, असें वादी म्हणतील; त्यांस महाराजांनीं त्रिपुरारहस्य–ज्ञानकांडांतील हेमचूड व हेमलेखा या राजाराणीचा संवाद सांगितला आहे. (हें सर्वच आख्यान फार गोड व फार मोठें आहे. तें 'श्रीदत्तभार्गवसंवादांत' वाचकांनीं–वेदान्त-जिज्ञासूंनीं–वाचून पहावें. येथें चालू विषयापुरता मूळ ग्रंथांतील भाग 'संप्रदायसुरतरू' मध्यें असलेला रसिक व जिज्ञासु वाचकांची तृषा शमविण्याकरितां उद्धृत करितों.) वाचक त्याचें प्रेमानें मनन व आस्थेनें आचरण करून कृतार्थ होतील अशी आम्हांस आशा आहे.

**"तेव्हां वादी म्हणे नियति जिंकावया उपाय कवण। सिद्धान्ती म्हणे भगवत्प्रसादचि एक कारण। वादी म्हणे यास काय प्रमाण। सिद्धान्ती म्हणे 'त्रिपुरारहस्य' वचन ऐके॥ ...**

**जो या अचिंत्य जगाचा कर्ता। तो कृपें सकळां जीवां उद्धरता।**
**तयाचीच करावी आस्था। आन अनास्था करोनि॥ ...**
**म्हणोनि सर्वभावें करून। तूं परमेश्वरा जाई शरण।**
**कीं फळ न दे परमात्मा कर्मावीण। इत्यादि शंका करूं नको॥**

**'निदर्शनं तेऽभिधास्ये श्रुणु प्रत्ययकारणम्॥**
**मितेश्वरोऽप्यत्र लोके चाकापट्यात्प्रसादितः॥ ४४॥**
**सर्वात्मना योजयति स्वेष्टार्थैः श्रेयसे नरं।**
**एष लोकेश्वरो देवः समग्येन प्रसादितः॥ ४५॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तस्मै किं न दिशेद् ब्रूहि भक्तलोकैकवत्सलः ।
पुरुषाहीश्वरा लोके चानवस्था अवत्सलाः ॥ ४६ ॥
निर्दयाश्च कृतघ्नाश्च तस्मात्तत्फलमस्थिरम् ।
परमेशो दयासिंधुः कृतज्ञः सुव्यस्थितः ॥ ४७ ॥
अन्यथाऽनादि संसारे कुतोऽनिंद्यत्वमाप्नुयात् ।
व्यवस्थिता जगद्यात्रा चापि वा स्यात्कथं वद ॥ ४८ ॥
अनवस्थस्य राज्यं तु नष्टमालोक्यते यतः ।
तस्मादेष दयासिंधुः सुव्यवस्थश्च कीर्तितः ॥ ४९ ॥
तमेव सर्वभावेन भक्त्याशु शरणीकुरु ।
श्रेयसि त्वां नियोजयेत्सत्वं तत्परतां व्रज ॥ ५० ॥ '

" अल्प ऐश्वर्य जयाच्या पदरीं । तयाचीही निष्कपट करितां चाकरी ।
आपणासमान लेखिती तरी । मग सर्वैश्वरी काय शंका ॥
हा अनादि संसार ( जगत् ) व्यवस्थित । यास्तव व्यवस्थापक
बुद्धिमंत । तो भक्तवत्सल कृपावंत । उपेक्षील कैसा तुजलागीं ॥
म्हणोनि सर्वभावेंकरून । तूं सोडूनि मोक्षाचा प्रयत्न ।
स्वयें भजे नारायण । करुणानिधान जगद्गुरु ॥
कां पक्षियाचीं पिलीं । खावयाचें नेणती वहिलीं ।
तरी चारा आणोनि घाली । मायचि तयां ॥
तेवीं जीवाचें आघवें हित । स्वयें जाणे भगवंत ।
यालागीं तो तुज यथार्थ । कृपें कळवील सर्व कांहीं ॥ "

' उपासनं बहुविधमार्त्यार्थार्थित्वतोऽपि च ।
निर्हेतुकं तु क्वाचित्कं तत्सत्योपासनं भवेत् ॥ ५१ – ५४ ॥'

" सकाम निष्काम भेदेंकरून । द्विविध असे उपासन ॥
त्यांत सकाम उपासन । बहुप्रकार असे ॥
एक रोगें पीडिती । मग परमेश्वरातें धांव म्हणती ।
कोणी आठविती धनार्थी । कोणी पुत्रार्थी पूजिती ॥
परी निष्काम जे होती । तयांचीच यथार्थ भक्ति ।
ये विषयीं दृष्टान्तोक्ति । ऐक तुजप्रति सांगेन ॥
मोलानें चाकरी करितां । तरीच चाकर म्हणती तत्त्वतां
न घेतां चाकरी करितां । तरी उपकारक म्हणती जन ॥

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

...जे मोल घेऊनि दास्य करिता । चुकतां शिक्षा तयांप्रती ।
जे निष्काम सेवा संपादिती । स्वामीहि अधीन होय त्यांच्या ॥
तैसे निष्काम भगवद्भक्त । स्वयेंचि होती भगवंत ।
स्वेच्छेंकरूनि यथार्थ । दास्य घेती म्हणोनियां ॥
निष्काम दास्य वाढे जंव जंव । आपुलेपण वाढे तंव तंव ।
म्हणोनि निष्काम भक्ता भगवद्भावो । सर्वथा स्वयमेवो उपपन्न ॥
परी [1]इतरांचे निष्काम भक्त होती । काळ[2] लागे तयांच्या परीक्षेप्रति ।
परी संकल्प उठतांचि कळे भगवंतीं । हें सांगे पुढती हेमलेखा ॥"

'निर्हेतुकत्वज्ञानाय चिरं स्यादज्ञभावतः ।
एष सर्वेश्वरो देवो हृदयेशोऽखिलस्य तु ॥ ...
ज्ञात्वा सर्वात्मना तस्य योगक्षेमवहो भवेत् ।
अप्रतीक्ष्य कर्मपाकं नियतिं स्वां विधूय च ॥'

"सर्वांतर्यामी परमेश्वर । तो जाणतसे समग्र ।
सकामासि कर्मपाकानुसार । फलदायी होतसे ॥
जैसी असे आपुली नियति । तैसाचि तरी कृपामूर्ति ।
परी निष्काम भक्ताप्रति । कर्मफळ निश्चितीं न पाहे ॥
भगवद्भिन्न जे जे पदार्थ । तेचि कर्मसंपाद्य समस्त ।
कर्माकर्मातीत भगवंत । निष्काम भक्तार्थ स्वतंत्र ॥
पोहे घेतल्यावीण । नाहीं दिधलें सुदामिया धन ।
परी मी शस्त्र न धरीं ही प्रतिज्ञा भंगोन । धांवे चक्र घेवोन भीष्मावरी ॥
अनन्य भक्ताचा योगक्षेम । मी स्वयेंचि चालवी पुरुषोत्तम ।
ऐसें बोलिले मेघश्याम । गीतेंत नवमाध्यायीं[3] ॥

'तत्साधनं संप्रसाध्य द्रुतं संयोजयेत्फले ।
एतदेव महेशत्वं स्वातंत्र्यं महतं तु यत् ॥ ५९ ॥
(टीका) तस्य निष्कामिनो यत्साधनं तद्विघ्नापनयेन सम्यक्
प्रसाध्य । ननु नियतिः सर्वथानुल्लंघनीयेति चेदाह ।
एतदेवेति । नियत्यादेरुल्लंघनमेवेत्यर्थः ॥ ५९ ॥

---

१ इतर देवांचे किंवा मनुष्यांचे. २ उशीर. ३ 'अनन्याश्चिंतयंतो मां०' हा गीताश्लोक. अ. ९–२२.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

(ओंव्या)" तयाच्या निष्कामोपासनेचें विघ्न। स्वयेंचि वारी नारायण।
स्वयेंचि पूर्ण करी साधन। फलदानासवेंचि तें॥
येथें म्हणती टीकाकार। कीं दैव नियति नाशोनि समग्र॥
फल द्यावया स्वतंत्र। परमेश्वर, हा मूलार्थु॥

'प्रारब्धं नियतिर्वापि महेशविमुखे भवेत्।
एतन्मृकंडुतनयेऽत्यंतमीश्वरतत्परे॥ ६०॥

(ओं.) म्हणोनि प्रारब्ध आणि नियति। हे भगवद्भक्तिरहिता स्थिति।
महामृत्यु मार्कंडेय जिंकिति। परमेश्वरीं मति अर्पोनि॥

'सर्वैर्ज्ञातं महेशस्य नियत्यारब्धलंघनम्।
अत्रोपपत्तिं ते वक्ष्ये श्रुणु प्राणप्रिये हि ताम्॥ ६१॥
यद्यप्यनुलंघनीये प्रारब्धनियती खलु।
तथाप्यपौरुषाणां तत् प्रारब्धमनपोहनम्॥ ६२॥
अतएव प्राणयमैः प्रारब्धं परिजीयते।
न तान्दृष्टेषु दुःखेषु प्रारब्धं योजयेत्फलम्॥ ६३॥
प्रारब्धाहिनिगीर्णास्ते ये पौरुषपराङ्मुखाः।
एतं नियतिसंक्लृप्तं तथैवानुभवान्न तु॥ ६४॥
नियातिःस्यादीशशक्तिः संकल्पैकस्वरूपिणी।
सत्यसंकल्प एवेशोऽनुलंघ्या ह्यत एव सा॥ ६५॥
कुंठिता सापि भवति परमेशपरायणे।
अकुंठितापि भवति यतः सा तादृशी भवेत्॥ ६६॥
तस्मात्कुतर्कं संत्यज्य महेशं शरणीकुरु।
अहेतुकतया स त्वां नियोजयति श्रेयसि॥ ६७॥

"(भावार्थ)— येच विषयीं तुजप्रति। राया सांगतों एक युक्ति।
प्रारब्धातें योगी जिंकिती। प्राणायामबळें करूनि॥
दैवाहून योगाभ्यास प्रबळ। ऐसे विद्यारण्यही बोलिले केवळ।
तोंहि या श्लोकेंचि केवळ। उपपन्न होय॥
द्वितीयासमास-खट्वारूढ (?)। तेथाचि प्रारब्धबीज रूढ।
म्हणोनि नियति अनुकूल दृढ। योगी जिंकिती प्रारब्धा॥
भगवत्संकल्परूप नियति। म्हणोनि लंघितां नये कवणाप्रति।
परी भगवद्भक्ताप्रति सामर्थ्य न चाले तियेचें॥

**किंवा कर्मानुरूप प्राणिया फळ । हा भगवत्संकल्पचि केवळ ।**
**आणि 'न मे भक्तः प्रणश्यति' । हा सकळ । भगवत्संकल्पचि ॥**
**'इदं विश्वं मदधीनं' । स्वयेंचि म्हणे नारायण ।**
**'अहं भक्तपराधीनः' । स्वयेंचि नारायण म्हणे ॥**
**यास्तव नियति अनुकूल असतां । तरी योगिया दैवनाश ये करितां ।**
**आणि नियति ही भगवद्भक्ता — पुढें कुंठित स्वस्वभावें ॥**
**अभक्तापुढें अकुंठित । हा नियतिस्वभाव यथार्थ ।**
**परी भक्तापुढें होणें कुंठित । हाही नियतिस्वभावचि ॥**
**स्वभावापुढें कांहीं । शंका कराया अवकाश नाहीं ॥** " इत्यादि.

— संप्रदाय-सुरतरु, अ. १३

तात्पर्य, ईशप्रसादाचें सामर्थ्य विलक्षण आहे. 'कर्मानुरूप फळ' हा ईश्वरी कायदा, तसाच 'न मे भक्तः प्रणश्यति' हाही ईश्वरी कायदाच. प्रारब्ध व नियति ही अभक्तांना बाधक, भगवद्भक्तांना नाहीं. मार्कंडेयाचें उदाहरण हें, 'उत्कट' भगवद्भक्तीनें नियतीचेंहि उल्लंघन करितां येतें याबद्दल निजकल्याणेच्छु पुरुषांनीं नेहमीं लक्षांत वागविण्यासारखें आहे. आतां, सकाम भक्त हा खरा भक्त नव्हे; निष्काम भक्त तोच खरा भक्त आहे, असें जरी सांगण्यांत येतें, तरी भक्तीमध्यें भगवंताला आकर्षण करण्याची शक्ति असल्यामुळें, मार्कंडेय जरी प्रथम सकाम भक्त होता, तरी त्यानें 'उत्कट' भावनेनें व 'अढळ' श्रद्धेनें केलेल्या भक्तीनें भगवान् शंकर प्रसन्न होऊन, त्यांनीं आपला पूर्वसंकल्प मागें घेतला व यमधर्मास परतून लावलें. शिक्षा करणें आणि ती माफ करणें हें स्वातंत्र्य राजालाच असूं शकतें आणि त्याचा फायदा भक्तांलाच मिळूं शकतो. **तो कसा हें भक्त होऊनच पाहिलें पाहिजे.**

**" काम पुरवूनि द्यावया मुक्ति । काय माझे गांठीं नाहीं शक्ति ।**
**मी भक्त कैवारी श्रीपति । त्यासी अधोगति कदा न घडे ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. २९, ६२८

सारांश, आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी सकाम हे असले तरी भक्तच आहेत. कारण आर्त म्हणजे रोगी अथवा संकटग्रस्त झाला तरी तो आर्ति (पीडा) निवारण्याकरितां भगवंताला शरण जातोच असें कुठें आहे? शरीराला रोग झाला तर डॉक्टरला व औषधाला पांचशें रुपये खर्चीन, पण देवाला फुटका नारळही नाहीं ठेवणार, असें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

म्हणणारे काय थोडे आहेत ! जिज्ञासु म्हणजे ज्ञानाची इच्छा करणारा हा ज्ञानप्राप्तीकरितां शंभर ग्रंथ उलथेपालथे करील, व्युत्पत्तीचे श्रम हवे तेवढे सोशील, पण त्याच हेतूनें भगवंताला शरण जाईल असें थोडेंच आहे ? अर्थार्थीचेंहि असेंच. कोणत्याही कामनेनें कां होईना, भगवंताला अनन्य शरण जाण्याची बुद्धि 'पूर्वजन्म-प्रकृष्ट-पुण्यवशात्' च होत असते, भलत्यालाच व्हावयाची नाहीं. भक्तिरूप व्यापार करण्यास लागणारें पुण्यरूप भांडवल सर्वांच्या पदरीं थोडेंच असणार.

**'बहुत सुकृताची जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी'**

असें श्रीज्ञानोबाराय म्हणतात तें याच दृष्टीनें. नामस्मरण हें सुलभ साधन खरें. कानीं कपाळीं ओरडून वेदशास्त्राची ग्वाही देऊन संत सांगत असतात; पण किती जण त्या मार्गास निष्ठेनें लागतात बरें ?

**"हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥"**

असें तोंडानें म्हणतात मात्र. पण मुखानें असें नाम म्हणण्यांत ते कितीसा वेळ खर्चितात बरें ? **श्रद्धा असते, पण निष्ठा नसते**, असें होण्याचें कारण काय ? तर वर सांगितल्याप्रमाणें 'पूर्वजन्मप्रकृष्टपुण्यवशता' त्यांच्यांत नसतें हेंच.

**"जें जन्मसहस्त्रीं वोळगिजे । एकवेळ यावया ॥"** अथवा

**"जन्मजन्मांतरीं असेल पुण्यसामुग्री ।**
**तरीच नाम जिव्हाग्रीं येईल श्रीरामाचें ॥"**

या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वचनावरूनही हेंच सिद्ध होतें कीं नाहीं पहा.

नामानें सकल पातक जातें, नव्हे, पातक गेलेलें असतें तेव्हांच नाम मुखांत येतें, असें श्रीगौरांगप्रभूच्या चरित्रांत एके ठिकाणीं म्हटलेलें आहे. तात्पर्य, भगवंताच्या ठिकाणीं प्रेमा उत्पन्न होण्यास पदरीं पुण्यच लागतें आणि म्हणूनच आर्त, जिज्ञासू व अर्थार्थी यांना भगवंतांनीं 'उदाराः सर्व एवैते' असें स्वमुखानें म्हटलें आहे. ('उदाराः' म्हणजे 'उत्कृष्टाः') सकाम भक्ति झाली तरी इतर देवतांची करण्यापेक्षां भगवंताचीच करावी. कारण दोन्हींकडे आयास सारखेच; पण भगवद्भक्तीचें फळ शाश्वत व मोठें आणि अन्य देवताभक्तीचें फळ अशाश्वत व अल्प[1]. सकाम भक्ताची कामना पूर्ण करण्याचें आणि मोक्षही देण्याचें सामर्थ्य भगवंतांत

१ भाष्य—'समानेऽप्यायासे मामेव न भजन्ते अज्ञानात्तेन ते अल्पफलभाजो भवन्तीत्यर्थः'—भगवद्गीता अध्याय ९१ श्लोक २५

आहे. अन्य देवता कामना कदाचित् पूर्ण करतील पण मोक्ष देण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नाहीं. दुसरें, अन्य देवता फळ देतील तें अगदीं कांटेतोल, पण भगवान् बिंदु घेऊन सिंधु देणारा हें तारतम्य लक्षांत ठेवलें पाहिजे. यास उदाहरण— द्रौपदीचें भाजीचें पान खाऊन तिला साठ हजार खंडींचें अन्न खाऊन अगदीं अपरात्रीं पुरविलें व दुर्वासशापभयापासून वांचविलें. तसेंच प्रथम फाटकी चिंधी घेऊन तिच्या वस्त्रहरणाचे वेळीं तिला अनंत वस्त्रें पुरविलीं. सुदाम्याची गोष्ट तर प्रसिद्धच आहे. मूठभर पोहे घेऊन त्याच्या व्याजांत सुवर्णनगरी दिली व मुदलांत मुक्ति दिली. याबद्दल मोरोपंत आपल्या आर्येंत म्हणतात—

**" ऋणतरी मुष्टी पोहे, तीच्या व्याजांत हेमनगरी ती।**
**मुद्लांत मुक्ति देणें, हे कोणे सावकारिची रीती ॥ "**

मागें ईश्वर देखील कांटेतोल कर्मफळ देतो असें म्हटलें आहे आणि येथें बिंदु घेऊन सिंधु देतो म्हटलें आहे, हें म्हणणें परस्पर विरोधी वाटेल. याचें समाधान असें कीं, फक्त फळाकरितांच कर्म करणाऱ्या कर्मी लोकांकरितां तो नियम आहे, भक्तांकरितां बिंदुसिधुचा नियम. त्याचप्रमाणें प्रारब्ध व नियति हीं दोन्ही मागें सारून भक्तांवर अनपेक्षित दयेचा वर्षाव करणें हा त्या सर्वतंत्रस्वतंत्र महेश्वराचा कायदा अथवा स्वभाव आहे असें समजावें. एकेक कोटि नामजपानें जन्मकुंडलींतील एकेक स्थानाची शुद्धि व **अखंड नामस्मरणानें ज्ञानाचीही प्राप्ति** ही त्या स्वतंत्र परमेश्वराच्या भक्तीचीच शक्ति होय. परमेश्वर जसा स्वतंत्र शक्तिमान, तसेंच त्याचें नामही स्वतंत्र शक्तिमान आहे. भगवंतानें आपली सर्व शक्ति आपल्या नामामध्यें ठेविली आहे. श्रीगौरांगप्रभु म्हणतात—

**" नाम्नामकारि बहुता, निजसर्वशक्ति—**
**स्तत्रार्पिता, नियमितः स्मरणे न कालः। "**

श्रीशंकराचार्यही आपल्या श्रीविष्णुसहस्रनामभाष्यांत म्हणतात—

" ...इत्यादिवचनैः श्रद्धाभक्त्योरभावेऽपि नामसंकीर्तनं समस्तं दुरितं नाशयतीत्युक्तम्। किमुत श्रद्धादिपूर्वकं सहस्रनामसंकीर्तनं नाशयतीति। "

भावार्थ—

**इत्यादि वचनीं श्रद्धाभक्तिरहित। बोलिले कीं नामें तरती पतित ॥**
**आन सकळ स्पष्टभाष्यार्थ। संस्कृतवेत्ते जाणती ॥**

**...आचार्यंचि पुन्हा म्हणती । उदाहरण घेउनी श्रुति ॥**
**नामस्मरणेंचि ज्ञानप्राप्ति । आनुषंगिक ॥**

" तथा च ऋग्वेदे—' आस्य जानंतो नाम चिद्विवक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे " इत्यादिवाक्यैर्विष्णोः **नामसंकीर्तनेन सम्यक् ज्ञानप्राप्तिर्विहिता ॥** " इत्यादि.

—संप्रदाय सुरतरु अ. २०.

सारांश – प्रारब्ध व नियति मागें सारण्याची स्वतंत्र शक्ति भगवंतांत आहे आणि भगवंतास वश करण्याची शक्ति त्याच्या भक्तींत आहे, असें जाणून कल्याणेच्छु मनुष्यांनीं भक्तिपरायण होण्याची मंगल इच्छा धारण करावी व तशी भक्ति करून कर्माकर्मातीत व्हावें.

## परमेश्वर कांहीं कर्माचें फळ नव्हे !

कर्म हें जड असल्यामुळें स्वतः फल देऊं शकत नाहीं. फल देणारा कोणी चेतनच पाहिजे आणि तोच परमेश्वर होय. तो कर्मानुरूप फलसंयोग करितो. जीवाला इतर फळाची कामना असेल तेव्हां परमेश्वर कर्माची अपेक्षा करितो आणि जेव्हां जीव इतर कामना सोडून परमेश्वराचीच कामना धरितो तेव्हां परमेश्वर त्याच्या कर्माची अपेक्षा करीत नाहीं. कारण आपण कोणत्याहि कर्माचें फल नव्हें हें तो जाणतो व निजभक्ताला पावतो. प्रारब्ध किंवा नियति याची अपेक्षा न करितां त्याचा योगक्षेम वाहतो. **भगवंताला भगवंताकरितांच अनन्यभावानें भजणें** हाच खरा धर्म होय. या धर्माचरणानें भगवान् प्रसन्न होऊन भक्ताची ती इच्छा पूर्ण करितो.

**" जयाचें फळ ब्रह्मज्ञान । तोचि गा धर्म जाण ॥**
**जो आचरितां नारायण- । चरणरति उपजे तो धर्मु ॥...**
**तैसें पाहिजे स्वर्गफळ । कीं जया वैकुंठादि लोकीं आवडी प्रबळ ॥**
**ते कर्मावीण प्रबळ । न दे परमेश्वरु ॥**
**परी परमेश्वरचि इच्छितां । तरी कर्मापेक्षा नलगे भगवंता ॥**
**परमेश्वरचि जाणें तत्त्वतां । कीं मी कर्मफळ नाहीं म्हणोनि ॥**
**अथवा लेकुराचें रोदन । मातेचिया धावणिया साधन ॥**
**तैसें धर्मआदिक संपूर्ण । हरिचिंतन हरिभेटी ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**...एर्‍हवीं जे सर्वदा निष्काम । जयांचा भगवत्पदींच प्रेम ॥**
**तयांचे धर्माधर्म । पुरुषोत्तम अपेक्षीना ॥ ...**
**यालागीं कर्माचें फळ । भक्तासाठीं नापेक्षी घननीळ ।**
**येथ प्रमाण आहे सबळ । त्रिपुरारहस्यवचन ॥—**
**ज्ञात्वा सर्वात्मना तस्य योगक्षेमवहो भवेत् ।**
**अप्रतीक्ष्य कर्मपाकं नियतिं स्वां विधूय च ॥**
**तया सर्वात्मकाचा योगक्षेम । स्वयें चालवी पुरुषोत्तम ।**
**न पाळी प्रारब्धाचा नियम । कीं स्वनियति परम अपेक्षीना ॥ "**

—संप्रदाय सुरतरु, अ. १३

" जीवाचें दैव अनंत असल्यामुळें एका जन्माच्या प्रयत्नानें तें दूर करतां येणें शक्य नाहीं. हें सर्वथा प्रयत्नवाद मानणाऱ्या वशिष्ठाचार्यांना देखोल संमत आहे. **परमात्मा सर्वकर्मसाक्षी असल्यामुळें थोड्याशा प्रयत्नानें देखील तो मिळतो.** याविषयीं तात ( श्रीज्ञानेश्वर ) म्हणतात—

**आणि जेव्हांचि कां भक्तीं । दिधली आपली चित्तवृत्ति ।**
**तेव्हांचि मज सूति । त्यांचिये नाटीं ॥**

—श्रीज्ञानेश्वरी, अ. १२

समर्थही स्वतः म्हणतात—

**' उपेक्षा कदा रामरूपीं असेना । जिवा मानवा निश्चयो तो वसेना ॥**
**सदा सर्वदा देव सन्नीध आहे । कृपाळूपणें अल्पधारिष्ट पाहे ॥ ' इ.**
**सांडोनि एका वासुदेवा । आना देवतांची करितां सेवा ।**
**तरी क्षणोक्षणीं गोवा । प्रमादांचा ॥ ...**
**तैसा परमेश्वर नव्हे । जो सर्वसंपन्न आहे ।**
**परी प्रेमाचीच पाहे । वाट एक ॥ "**

—संप्रदाय सुरतरु, अ. २०

अशा सर्वसंपन्न परमेश्वराच्या दयाळुतेवर विश्वास ठेवून जीवानें त्याची सप्रेम भक्ति करावी, हेंच त्याच्या कल्याणाचें आहे.

**" येर्‍हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ।**
**काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ...**

भवसिंधूचेनि माजें । कवणासी धाक नुपजे ।
तेथ जरी कीं माझे[1] । बिहितीं[2] हन ॥
म्हणोनि गा पांडवा । मूर्तींचा मेळावा[3] ।
करुनि त्यांचिया गांवा । धांवत आलों ॥
नामाचेया सहस्रवरी । नावां इयां अवधारीं ।
सजूनिया संसारीं । तारूं जाहलों ॥ ...
म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ।
तयांतें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ”

—श्रीज्ञानेश्वरी, अ. १२



१ माझे भक्त. २ भितील. ३ अवतारांचा समुदाय.

# साधकांसाठीं खास सूचना

**" अवघाचि संसार सुखाचा करीन ।**
**आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ "**

— श्रीज्ञानेश्वर

या पूर्वीचे लेख म्हणजे साधकांना सर्व सूचनाच आहेत. त्यांत ' साधकांच्या अडचणी व कांहीं सूचना ' ( पृष्ठ ८३ ) या प्रकरणांत तर पुष्कळच आहेत. तथापि त्या सर्वसामान्य आहेत. या लेखांत कांहीं खास म्हणजे वैय्यक्तिक विशिष्ट सूचना कराव्याशा वाटत असल्यामुळें करीत आहें. त्यांचा आपापल्या परिस्थितीप्रमाणें विचार करून परमार्थाची बैठक ज्याची त्यानें ( आपली आपण ) बसवावी. अंतःकरणांत खरी तळमळ असेल व ती तीव्र असेल, तर ही बैठक कशी बसवावी याबद्दल अंतरांत दिव्य स्फूर्ति आपोआप होईल व परमार्थातील सर्व क्लेश नाहींसे होऊन जीव सुखावेल.

बद्धदशेनंतरची मुमुक्षुदशा व त्यानंतरची साधक दशा. मुमुक्षुदशेंत विचार करण्यांतच फार वेळ जातो, प्रत्यक्ष कृति अशी कांहीं घडत नाहीं. साधक दशेंत कृतीला आरंभ होतो. मार्ग चालण्यास सुरुवात होते. मार्ग चालूं लागतो तो मुक्कामास पोचलाच पाहिजे. आतां ही चाल मंद अथवा तीव्र ज्याची जशी असेल, त्याप्रमाणें तो पांथस्थ उशिरा अथवा लवकर पोचेल, याबद्दल सांगणें नकोच. काळजी एवढीच घ्यावयाची कीं, मार्ग चालत असतां आडमार्गांत पाऊल पडूं नये.

साधक वर्गातही दोन प्रकार सांगितले आहेत. एक ' निःस्पृह ' व दुसरा ' संसारी. ' निस्पृह म्हणजे सर्वसंगपरित्याग करून ( घरदार सोडून ) परमार्थसाधनाकरितां दूर देशीं जाऊन एकान्तवास करणारे. ( पण असे लोक फार थोडे. त्यांच्याकरितां सूचना करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण त्यांच्या हातांत हें आमचें पुस्तक पडेलच कशावरून ? ) संसारी साधक म्हणजे संसारांत राहून परमार्थाचें साधन करणारे लोक व हेच जास्त असणार. अर्थात् त्यांच्याकरितांच ह्या सूचना आहेत असें समजावें.

संसारी आणि साधक हे दोन शब्द सकृद्दर्शनीं परस्पर विरोधी दिसतील. पण तसें मानणें चुकीचें आहे. हरिदास-पुराणिकादि उपदेशकांकडून परमार्थाच्या स्तुतीबरोबर संसाराची निंदाच बहुतेक ऐकूं येत असल्यामुळें संसार हा परमार्थाचा विरोधी आहे

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

असेंच सामान्यतः सर्वांना वाटत असतें आणि परमार्थाची तर मनापासून चाड व संसार तर सोडवत नाहीं, असें झाल्यामुळें मनाची फार कुचंबणा होते. संसाराची निंदा करणारे उपदेशकही संसार सोडीत नाहींत व ऐकणाऱ्याचा तर सुटतच नाहीं, असें सर्वत्र आढळून येतें. मग नुसती निंदा काय कामाची बरें ? दुसरें असेंही होतें कीं, संसाराची निंदाच वरचेवर कानीं पडत असल्यामुळें, परमार्थप्राप्ति करून घेण्यास संसाराचा त्याग करावा लागतो अशा कल्पनेनें कित्येक लोक त्या परमार्थास दुरूनच नमस्कार असो असें म्हणतात ! वंशाच्या पुण्याईनें कोणी सत्पुत्र पोटीं येऊन पुराणकीर्तनास जाऊं लागला, संतसंगांत रमूं लागला, गीता-ज्ञानेश्वरी वाचूं लागला, तर आईबापांना वाईट वाटतें. संसारांतून ह्या मुलाचें मन उठेल व तो बैरागी होऊन पुढें तरी जाईल, या भीतीनें संसारी आईबाप त्यास विरोध करितात. उपदेशकांच्या चुकीच्या पद्धतीचा हा परिणाम होय !

प्रपंचांत राहून परमार्थ साधतां येतो ; आणि असें करितो त्याचीच वाहवा होय.

**‘ प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ ज्यानें केला ।**
**तो नर भला भला रे भला ॥ ’**

असा साधूंचा उपदेश आहे. याचे उलट —

**“ प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं न घडे त्यासी ॥**
**दोहीं पेवांवरी ठेवूं जातां हात । शेवटीं अपघात शरीराचा ॥**
**तुका म्हणे तया दोहींकडे धका । शेवटीं तो नरकामाजीं पडे ॥ ”**

“ Sitting between too stools comes to the ground. ” ( ही इंग्रजी म्हण वरच्या अर्थाचीच आहे. ) याप्रमाणें परस्परविरोधी संतांचीं वचनें सांपडतात. हीं दोन्हीं मतें पण खरीं आहेत. हें विधानही वाचकांस थोडें चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे, पण त्यास उपाय नाहीं. हीं दोन्हीं खरीं कशीं याचा विचार केला पाहिजे म्हणजे हें कोडें उलगडेल.

‘ अधिकारिभेदाच्छास्त्रभेदः ’ या वचनास अनुसरूनच ‘ अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तैसें देऊं ’ असें श्रीतुकाराममहाराजांचें वचन आहे. अधिकारप्रमाणें उपदेशांत बदल होतो व तसा होणेंच इष्ट आहे आणि इतर धर्मांहून आमच्या धर्माचें वैशिष्ट्य हेंच इष्ट आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अधिकार-तारतम्यप्रामाणें उपदेशतारतम्य दुसऱ्या धर्मांत क्वचितच दृष्टीस पडतें. सर्व लोकांना मिळून एकच उपदेश असतो असा धर्म व्यवहारक्षम ( Practical ) होऊं शकत

नाहीं. आमच्यांत वर्णाश्रमविभाग असल्यामुळें धर्मविभागही केलेले आहेत. म्हणून आमचा धर्म व्यवहारक्षम होऊं शकतो. पण सूक्ष्म विचार करणेची सवय मोडल्यामुळें सर्व पारडें उलट फिरलें आहे! आमच्या धर्मांतही **प्रवृत्तिधर्म** व **निवृत्तिधर्म** असे दोन भाग कल्पिलेले आहेत. याचेही अधिकारी निरनिराळे आहेत. पण याची जास्त चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. परमार्थाचा साधक म्हणजे निवृत्तिमार्गांतला असें धरूनच येथें बोलावयाचें आहे. ( बाकी **प्रवृत्ति व निवृत्ति दोन नाहींत** हा संतांचा शेवटचा सिद्धान्त आहे. )

ज्यास प्रपंचांत राहून परमार्थ साधण्यांत अडचण वाटणार नाहीं, त्यानें प्रपंचांत राहूनच परमार्थ साधावा. ज्यास तशी अडचण वाटेल, त्यानें खुशाल 'सुखालागिं आरण्य सेवीत जावें,' त्यांत पाप नाहीं. पण हें अरण्यसेवन विवेकयुक्त वैराग्याचें पाहिजे. वैतागाचें उपयोगी नाहीं. घरांत बायकोमुलांचें पटत नाहीं किंवा पटवून घेतां येत नाहीं, म्हणून डोक्यांत राख घालून घेऊन जाणारे पुष्कळ आहेत. तें खरें वैराग्य नव्हे, तो वैताग होय. वैतागानें परमार्थ साधणार नाहीं. त्यास खरें वैराग्यच पाहिजे; वैराग्यावांचून ज्ञानाचा टिकावच लागणार नाहीं. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> **" तरी तया ज्ञानालागीं । कवणा पां योग्यता अंगीं ।**
> **हें पाहतां जगीं । देखिला एक ॥ ...**
> **तरी विरक्तीवांचूनि कांहीं । ज्ञानासि तगणें नाहीं ।**
> **हें विचारूनि ठायीं । ठेविलें देवें ॥ "**

— ज्ञानेश्वरी, अ. १५

पण वैराग्याचा खरा अर्थ लक्षांत न घेतां वैराग्य म्हणजे 'प्रपंचाचा त्याग' एवढाच सामान्यतः अर्थ घेतात व परमार्थास भितात! 'राग' हा संस्कृत शब्द आहे. त्याचा अर्थ प्रीति, आसक्ति अथवा वासना असा होतो. विराग म्हणजे रागविरहितपणा. विरागाचा भाव तें वैराग्य. अर्थात् वैराग्य म्हणजे अप्रीति, अनासक्ति, निर्वासनता. या दृष्टीनें 'वैराग्य' शब्दचा अर्थ पाहिला असतां विषयाची 'अनासक्ति' असाच होतो.

**विषय सोडणें हें वैराग्य नव्हे, विषयाची आसक्ति सोडणें हें वैराग्य होय.** देह असेपर्यंत विषय सर्वथा सोडणें कधींच शक्य नाहीं. कारण विषयदानावांचून देह मुळीं जगणेंच अशक्य आहे. ( वैराग्य अथवा 'विषयत्यागाची

लक्षणें ' मागें पृष्ठ १३१–३२ वर सांगितलीं आहेत तीं वाचकांनीं पुनः वाचून पहावीं. ) आसक्ति न सोडतां अथवा सुटतां घरदार सोडून हिमालयाच्या गुहेंत जाऊन राहिला तरी तेथेंही विषयाचें स्मरण होणारच. **विषय बाधक नाहीं** पण **विषयाचें चिंतन बाधक आहे.** आसक्ति असल्याशिवाय चिंतन होणार नाहीं. करितां आसक्ति सोडून, ' यदृच्छालाभसंतुष्ट ' राहून विषयाचें सेवन करावें, म्हणजे ते बाधत नाहींत. इंद्रियांची विषयांच्या ठिकाणीं प्रीति व अप्रीति म्हणजे रागद्वेष ठरलेले आहेत. तेच परमार्थमार्गांत वाटपाडे ( चोर ) आहेत. त्यांच्या आहारीं आपण जाऊं नये. ( गीता अ. ३, श्लोक ३४ पहा. ). रागद्वेषविरहित होत्साता इंद्रियांनीं विषय सेवावे. त्यायोगें चित्तांत प्रसाद म्हणजे प्रसन्नता उत्पन्न होते व असा प्रसाद झाला असतां सर्व दुःखांचा नाश होऊन बुद्धि स्वरूपाच्या ठिकाणीं स्थिरता पावते ( गीता अ. २, श्लोक ६४।६५ ). रागद्वेष ( प्रीति – अप्रीति ) मनांतून गेल्यानंतर मग इंद्रियें विषयांत रमलीं तरी बाधक नाहीं. श्रीज्ञानोबाराय म्हणतात —

> **" म्हणोनि विषय आघवे । सर्वथा मनौनि सांडावे ।**
> **मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥**
> **पार्था आणीकही एक । जरि नाशिले हे रागद्वेष ।**
> **तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ॥ "**
>
> — ज्ञानेश्वरी, अ. २

* * *

पण हे रागद्वेष कसे जातील ? आसक्ति कशी सुटेल ? तर प्रथम त्यांच्या ठिकाणीं दोषदृष्टि करावी व नंतर ब्रह्मदृष्टि करावी. दोषदृष्टीनें आसक्ति तुटते व ब्रह्मदृष्टीनें रागद्वेष निमतात. यास उदाहरण – रंगीत लाकडी फळफळावर वगैरे पदार्थ जाणता बापही पाहतो व त्याच्या कडेवरील त्याचा नेणता ( २।३ वर्षांचा ) मुलगाही पाहतो. तीं सुंदर केळीं, आंबे, उसाचीं कांडीं, इत्यादि पाहून मुलाला राग म्हणजे प्रीति उत्पन्न होते व मिर्ची, सर्प, वगैरे पाहून द्वेष म्हणजे अप्रीति उत्पन्न होते. बापाची तत्त्वदृष्टि असल्यामुळें म्हणजे त्या पदार्थांचें मूलतत्त्व म्हणजे लाकूड हें तो जाणत असल्यामुळें त्याला रागद्वेषाची बाधा मुळींच होत नाहीं. नामरूप दोघांना सारखेंच दिसत असतें. पण मुलाला त्या पदार्थांचें तत्त्व म्हणजे निजस्वरूप माहीत नसल्यामुळें नामरूपाला तो सत्य मानितो, **याचें नांव ' प्रपंच ';** आणि बापाला त्या पदार्थांचें अधिष्ठानतत्त्व म्हणजे निजरूप लाकूड आहे हें माहीत असल्यामुळें त्यावर भासणारें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

नामरूप मिथ्या आहे असें तो जाणतो, **याचें नांव 'परमार्थ'.** जगताचें अधिष्ठान ब्रह्म आहे असें एकदां निश्चयानें जाणलें, म्हणजे त्यावर भासणारें जगत् म्हणजे नामरूप मिथ्या आहे हें ओघानेंच प्राप्त होतें. वरील दृष्टान्तांतील आंबा नसून लाकूड आहे, तसें जग हें जग नसून ब्रह्म आहे असें जाणणें, एतद्रूप जो परमार्थ, हा साधायला कांहीं सांडीमांडी करण्याचें कारण नाहीं.

> **" ब्रह्म आहे कारण । जगत्कार्य नाहीं भिन्न ।**
> **ऐसी जाणावी ते खूण । ब्रह्मदृष्टि पाहण्याची ॥**
> **जेव्हां चित्तें चंचल व्हावें । नामरूपीं धांवावें ।**
> **आपण तेथें पहावें । आधीं ब्रह्मस्वरूप ॥**
> **लोकीं जेवीं जारिणीतें । भर्ता टपतो जेथें तेथें ।**
> **तेवीं किंचित् स्मरतां चित्तें । ब्रह्मभावें झडपावें ॥**
> **ऐसा कल्पनेचा मारा । करितां विरती दृश्यगारा ।**
> **जैसा वितळे पसारा । प्रचंड पवनें मेघाचा ॥ "**

— श्रीनारायणमहाराज जालवणकरकृत 'शांतिसागर'

**'जग मिथ्या' याचा अर्थ** सशाच्या शृंगाप्रमाणें किंवा वंध्यासुताप्रमाणें मिथ्या नव्हे. तर नामरूप मिथ्या व अधिष्ठान सत्य. अलंकार मिथ्या, सुवर्ण सत्य. वरील दृष्टान्तांतील आंबा, केळीं, इत्यादि मिथ्या, लाकूड सत्य. अधिष्ठानाकडे दृष्टि पोचवून विषयसेवन केलें, म्हणजे तें विषयसेवन नसून आत्मरसाचेंच सेवन होय. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> **" तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न ।**
> **जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥**
> **तरी विषयांतही कांहीं । आपणपें[1] वांचूनि नाहीं ।**
> **मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ "**

— ज्ञानेश्वरी, अ. ३

याला दृष्टान्तही कसे सुंदर देतात पहा —

> **" जरी उदकीं उदकें बुडिजे । कां अग्नि आगीं पोळिजे ।**
> **तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्ण तो ॥**

---

१ आत्म्यावांचून (आपणावांचून).

**ऐसा आपणचि केवळ। होऊनि असे निखळ[1]।**
**तयाची प्रज्ञा[2] अचळ। निभ्रांत मानी॥"**

—ज्ञानेश्वरी, अ. ३

याप्रमाणें प्रपंच आणि परमार्थ यांचें स्वरूप समजलें; पण उमजलें पाहिजे आणि हें उमजणें पदरांत पडण्यासाठीं मतिमांद्यामुळें जर कांहीं अभ्यास करावयाचा असेल, तर त्यास **प्रपंचच उत्तम शाळा आहे.** 'विजातीयवृत्तितिरस्कारपूर्वक सजातीयवृत्तिप्रवाहीकरण' करण्याला या शाळेसारखी दुसरी शाळा नाहीं. अरण्यसेवन ही शाळा कोणी पसंत करितात, ती, ती सोपी व तिची फी फार कमी म्हणून पसंत करितात असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या शाळेंत फी कमी असण्याचें कारण, तेथें वस्तुपाठ देण्याची सोय नसते, शिवाय शिक्षकही कमी पगाराचे अथवा स्वयंप्रेरित (ऑनररी) असतात म्हणून. तसेंच शाळेस लागणाऱ्या इमारतीचा किंवा इमारतीच्या भाड्याचा, वगैरे खर्च नसतो. पण प्रपंचरूप शाळा तशी सोपी नाहीं. फार महाग आहे. कारण या शाळेंतील शिक्षण प्रत्यक्ष वस्तुपाठात्मक (किंडर-गार्डन पद्धतीचें) असतें; शिवाय शिक्षकही भारी पगाराचे, चोवीस तास मुलांवर पहारा करणारे व अगदीं गोडीगुलाबीनें हसत-खेळत शिकविणारे असतात; मुलांकरितां बोर्डिंगें (वसतिगृहें) यांचीहि तेथें सोय आहे. अशी ही शाळा जास्त खर्चाची म्हणजे अधिक फी द्यावी लागणारी असल्यावांचून कशी राहील? भाग्यवान, श्रीमान अशांचींच मुलें या शाळेंत राहून अभ्यास करूं शकतील.

प्रपंचरूपी शाळेंत बायकामुलें हेच शिक्षक; हे काय मोफत शिकवितील? बिनपगारी काम करतील? नेहमीं येणारे बरेवाईट प्रसंग हे वस्तुपाठ. हे काय अरण्यांतील शाळेंत मिळतील? बिनपगारी शिक्षक हे पगारी शिक्षकांप्रमाणें चोवीस तास पहारा करून कधीं शिकवीत राहतील? आणि वस्तुपाठाशिवाय दिलेलें शिक्षण हें कधीं भक्कम म्हणजे व्यवहारक्षम होऊं शकेल? कदापि नाहीं. म्हणून, लवकर व पक्के शहाणे होऊं इच्छिणाऱ्यांनीं या शाळेंतच राहून अभ्यासक्रम पुरा करण्याचा निश्चय केला पाहिजे. या शाळेंतील वर सांगितलेले प्रेमाचे गोड शिक्षक खरोखरच प्रेमानें व गोडीगुलाबीनें शिकवीत असतात व हेंच शिक्षण पक्कें होतें. तसें अरण्यशाळेंत होत नाहीं. कच्चेपक्केपणाची परीक्षाच मुळीं तेथें होत नसते, परीक्षेवांचून नुसतें शिकतच राहिल्यास शिक्षण बरोबर झालें कीं नाहीं

---

१ सर्व. २ बुद्धि. [ही स्थितप्रज्ञाचीं लक्षणें होत.]

हें कसें समजणार ? प्रपंचशाळेंतच ही परीक्षा दररोज द्यावी लागते. ही प्रपंचशाळा चारी वर्णरूपी इमारतींत आहे. पण परीक्षेचें केंद्र ( सेंटर ) मात्र गृहस्थाश्रम आहे. उत्तम शाळा पण तेथेंच आहे. ब्रह्मचर्यादि इतर तीन आश्रमांतही शाळा आहेत. पण गृहस्थाश्रमांतील शाळेइतक्या शिक्षणाच्या सोयी त्या शाळेंत नाहींत. म्हणून '**धन्यो गृहस्थाश्रमः ।**'

"गृहस्थाश्रमाचें महत्त्व कमी नाहीं. त्यांतील कर्तव्येंही सामान्य नाहींत. इतर ( ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्यास ) आश्रमांत जसें कडकडीत वैराग्य पाळावें लागतें, तसें गृहस्थाश्रमांत नाहीं. येथें थोड्याशा सुखोपभोगाला सवड ठेवली आहे ... इतर थोर आश्रमांतील थोर माणसें उत्तम प्रकारचा बोध करतील आणि त्यांचे अंगीं ज्ञाननिष्ठा, कर्तव्यतत्परता व वैराग्य भरपूर दिसून येईल. परंतु व्यवहारांत राहून प्रसंगाप्रमाणें वागून प्रसंगावर सरशी करीत आणि धर्माला साधीत कसें वागावें याचा अनुभव गृहस्थाश्रमांत येतो व गृहस्थापासूनच तो शिकतांही येतो. त्याचे अनुयायी पुष्कळ असल्यामुळें नित्याच्या व्यवहारांत राहून सत्याला, सदाचरणाला आणि धर्माला कसें साधावें हें शिकण्याची जागा गृहस्थाश्रम होय. निर्जन अरण्यांत राहून सत्य, अस्तेय[1] इत्यादि[2] नियमांचें पालन करणें सोपें आहे ; परंतु सुस्वभावाच्या परीक्षेचे जेथें मोठे बिकट प्रसंग येतात, अशा व्यवहारांत राहून सुस्वभाव कधीं बिघडूं न देतां गृहस्थानें चतुर्विध पुरुषार्थ साधावे हेंच फार कठिण आहे. आधीं सद्धर्माच्या तत्त्वाला अनुसरून वागणेंच फार बिकट आहे, त्यांतून मतिभ्रंश करणाऱ्या व्यवहारांत आपलें ब्रीद कायम राखून, प्रभूला मान्य होईल अशा रीतीनें जीवयात्रा करणें फारच कठिण आहे. ती कठिण गोष्ट अभ्यासानें गृहस्थाला सुकर होते ... ( अरण्यवासी ) तपस्व्याला शीतोष्णादि स्वैष्टिक आपत्तींचीच थोप सहन करावी लागते, गृहस्थाला ती साहून आणखी माणसांच्या विचित्र स्वभावांनीं विचित्र झालेल्या व्यवहारांतील अनेक कृत्रिम आपत्तींचाही समाचार घ्यावा लागतो. त्यामुळें सहनशक्ति वाढविण्याचा गुण गृहस्थाश्रमांत विशेष आला आहे. येथें घसरण्याचे प्रसंग अधिक येतात."

"तपस्वी पांच[3] प्रकारचे क्लेश उत्पन्न न होऊं देण्याची युक्ति करीत असतो. गृहस्थ त्यांच्याशीं लीलेनें खेळत असतो."

---

१ चोरी न करणें. २ अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे ( यमनियमांपैकीं ) पांच 'यम' होत. ३ अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश हे पंचक्लेश ( पतञ्जलि ).

तपस्वी धर्मरूपी राष्ट्राच्या जीवाचें संरक्षण करितो. गृहस्थ ( तशा ) तपस्व्याला साह्याय्य करून, धर्मचैतन्याचें शरीर जें राष्ट्र त्याचेंही रक्षण करितो.

तपस्वी स्वतःच्या उद्धाराच्या यत्नांत निमग्न असतो. गृहांत राहणाऱ्या तपस्व्याला स्वतःचा परमार्थ सांभाळून आप्तस्नेह्यांचा उद्धारही साधावा लागतो.

तपस्वी आपल्या कायेभोंवतीं पांच अग्नि पेटवून पंचाग्निसाधन करितो व तितिक्षा वाढवीत असतो; गृहस्थाच्या कायेभोंवतीं पांच अग्नि असून त्याच्या मनाभोंवतींही प्रापंचिक क्लेशांचे दहा अग्नि भडकलेले असतात. त्यामुळें त्याची सहनशक्ति पराकाष्ठेची वाढते.

तपस्वी वैराग्याच्या योगानें जगाला जिंकितो; गृहस्थ जगाला वेसण घालून आपल्या तंत्रानें वर्तवितो.

तपस्वी गुहेंत राहून ब्रह्मचर्य संपादन करितो; गृहस्थ गोकुळांत राहून ब्रह्मचर्य पालन करितो.

तपस्वी बाहेर राहून अलिप्त राहतो. गृहस्थाश्रमी योगी सर्वांत राहून अलिप्त राहूं शकतो.

तपस्व्याच्या अंतःकरणांत बीजरूपानें मनोवृत्ति गुप्त राहतात; गृहस्थाच्या वृत्ति नियंत्रित उपभोगानें, आत्मसंयमनानें आणि पश्चात्तापानें शुद्ध होऊन ज्ञानाला साह्याय्य करितात. नानाप्रकारच्या साधनांचा संग्रह करून गृहस्थाला ज्ञान आणि बल संपादन करितां येतें.

(तात्पर्य) **सद्गुणांच्या अभिवृद्धीला गृहस्थाश्रमासारखी दुसरी सोइस्कर जागा नाहीं. प्रेम** उत्पन्न करण्याला त्याजपाशीं प्रेमाचे आप्त असतात, **करुणा** उत्पन्न करण्याला दीन जन असतात, **धैर्य** वाढविण्याला संकटाचे अनेक प्रसंग असतात. सर्वजण मिळून त्याची **क्षमा** आणि **शांति** वाढवीत असतात व त्याच्या **सत्याचा, न्यायाचा, नीतीचा** आणि **स्वातंत्र्याचा उत्कर्ष** करीत असतात. त्यास **ऐहिक** पूर्णपणें साधून देऊन त्याच्या **परमार्थाची** वाट मोकळी करीत असतात. जग जसें असतें तसेंच घेऊन त्याला चालावें लागतें, त्यामुळें शुद्ध ( केवळ ) ‘कल्पनेच्या नादीं’ लागून होणारे अनर्थ टळतात. राष्ट्रागीं गृहस्थाचा निकट संबंध असल्यामुळें आत्म्याच्या सद्गतीसाठीं स्वराज्याचे संरक्षणाची जोखीम त्याजवर असते व त्यालाच ती सांभाळतांही येते ... तेव्हां

**धन्य असा जो गृहस्थाश्रम तो पुष्कळांनीं यथासांग संपादन केला पाहिजे व त्यास आवश्यक अशा ब्रह्मचर्यआश्रमांतील कर्तव्यही आस्थेनें पाळलें पाहिजे.**

"गृहस्थाश्रमांतील आपलें **कर्तव्य आटपल्यानंतर** ( निजहिताकरितां ) आपल्या कुटुंबसंस्थानाचा कारभार आपल्या ज्येष्ठ पुत्राच्या स्वाधीन करून गृहस्थानें वानप्रस्थ आश्रम धारण केला पाहिजे. वनांत जाऊन राहण्याची ज्याची योग्यता नसेल त्यानें घरांतच राहावें ; परंतु पंचवीस वर्षें प्रपंचाचा गाडा हांकल्यानंतर त्याचीं **सूत्रें तरुण मुलाच्या स्वाधीन केलींच पाहिजेत.** कारण एक तर पुत्राला स्वतंत्रपणें कारभार करितां आला पाहिजे ; **दुसरें** – स्वतःला थकवा आल्यानंतर पूर्वीप्रमाणें स्वतःकडून कामही नीट होणेचा संभव नसतो ; **तिसरें** – उतारवयांत आपण दिलेल्या शिक्षणाला अनुसरून पुत्राचें हातून कारभार होत असलेला पाहण्यांतच फार संतोष आहे ; **चौथें** – आजपर्यंत केलेल्या श्रमानंतर योग्य विश्रांतीची आवश्यकता वाटते ; **पांचवें** – प्रपंचाच्या मोहांतून बाहेर पडून **भावी मृत्यूला संतोषानें सामोरें जाण्याची तयारी** करायची असते आणि **सहावें** कारण असें आहे कीं – स्वतःच्या ( कुटुंबरूप ) संस्थानाचा कारभार योग्य रीतीनें चालवून पुढें तो तशाच रीतीनें चालविण्याकरतां योग्य शिक्षणानें तयार केलेल्या आपल्या पुत्राच्या स्वाधीन केल्यानंतर सामाजिक कार्यासाठीं स्वतःला मोकळें करून घेणें भाग असतें ... **अधिक योग्यतेचे सद्गुण उत्पन्न होणें माणसाच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार आवश्यक आहे. ते सद्गुण मोठ्या सामाजिक कर्तव्याला निरपेक्षबुद्धीनें तयार झाल्यावांचून मिळूं शकत नाहींत ...** गृहस्थाश्रम यथासांग संपादन केल्यानंतर आप्तांची परवानगी घेऊन विशेषेंकरून बुद्धिमान पुरुषांनीं वानप्रस्थ आश्रम धारण केला पाहिजे. आपल्या पत्नीची इच्छा असल्यास तिलाही आपल्याबरोबर नेण्यास हरकत नाहीं ... समाजाचें व राष्ट्राचें हित अहर्निश पाहिलें पाहिजे व साधून दिलें पाहिजे व त्यासाठीं उत्तम माणसें तयार केलीं पाहिजेत. राष्ट्रीय अपकर्षाचा दूर दृष्टीनें प्रतीकार केला पाहिजे व त्याच्या उत्कर्षाची, **धर्माचें साहाय्य घेऊन,** नेहमीं सज्ज तयारी ठेवली पाहिजे. ब्रह्मचर्यआश्रमांतील विद्या आणि गृहस्थाश्रमांतील अनुभव या दोहींची ज्यापाशीं भरपूर तयारी आहे अशा वानप्रस्थावांचून हें राष्ट्रीय कार्य कोणासही साधणार नाहीं. " इत्यादि.

— द. के. दामलेकृत, 'गृहस्थाश्रम,' भाग १ ला

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आमचे परम देशभक्त, ईशभक्त व गुरुभक्त मित्र कै. दामले यांनीं 'गृहस्थाश्रम' नांवाचें फारच सुंदर पुस्तक लिहिलें आहे. तें प्रत्येक देशभक्त व ईशभक्त साधकांनीं एकदां तरी वाचून पहावें अशी आम्ही आग्रहानें सूचना करितों. प्रपंचच परमार्थरूप करावा, मृत्युलोकच स्वर्ग कसा बनवावा, याबद्दलच्या सूचना त्या पुस्तकांत मिळतील तशा इतरत्र कोठेंही मिळणार नाहींत अशी आमची समजूत आहे. हीं पुस्तकें हल्लीं दुर्मिळ आहेत. कुठल्यातरी जुन्या ग्रंथालयांत जिज्ञासूंनीं चौकशी करावी. असो.

ईशभक्ति करीत असतां देशभक्ति आड येते व देशभक्ति करीत असतां ईशभक्ति आड येते असें मानणें चुकीचें आहे. ईशभक्ति करणारे पुरुष आपल्या प्रपंचाकडे कांहीं सर्वथैव दुर्लक्ष करीत नाहींत. मग व्यक्तीचा प्रपंच ज्या राष्ट्रप्रपंचाच्या सुस्थितीवर अवलंबून असतो, त्याकडे दुर्लक्ष करणें कसें योग्य होईल ? व्यष्टि ही समष्टीचा एक अवयव आहे (झाड ही व्यष्टि व अरण्य ही समष्टि) असें जो पक्केपणानें जाणतो, तो समष्टीच्या सुखस्वास्थ्याकडे लक्ष देणें हें आपलें कर्तव्यच समजेल. आपल्या धर्मातील उपासना बहुतेक समष्टिधर्मास धरूनच आहेत. हें उपासनेंतील मंत्रांचा ज्यांना अर्थ समजतो, त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या मुख्य गायत्री मंत्रांतच पहा — 'धीमहि' हें क्रियापद व 'नः प्रचोदयात्' ही प्रार्थना (व्याकरणदृष्टीनें) बहुवचनात्मक आहे. तसेंच आपल्या पूजेंतील राष्ट्रीय प्रार्थना 'काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी । देशोऽयं क्षोभरहितो०' इत्यादि ही सामुदायिक हिताबद्दलचीच आहे, हें अर्थज्ञांस सांगण्याचें कारण नाहीं. भगवद्गीतेंतील भक्तांच्या, योग्यांच्या अथवा ज्ञान्यांच्या लक्षणांत — 'सर्वभूतानि चात्मनि', 'सर्वत्रसमदर्शनः', 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं०', '**सर्वभूतहिते रताः**' या वचनांनीं सामुदायिक हिताचीच दृष्टि सांगितलेली आढळते. ही गोष्ट विचारवंतांनीं लक्षांत ठेवली पाहिजे.

परंतु ही गोष्टही तितकीच लक्षांत घेतली पहिजे कीं सामुदायिक हिताकडे लक्ष देतांना आपलें व्यक्तिसामर्थ्य हीन अथवा उणें न झालें पाहिजे. कारण व्यक्ति ही समुदायाचें एक अंगच आहे. तें लुलें ठेवून कसें चालेल ? आपलें पारमार्थिक हित पूर्णपणें साधण्यास बाह्य उपाधि आड न येतील तर खुशाल त्या उपाधि सांभाळाव्या. बाह्य उपाधि बाधक न होण्याचें सामर्थ्य येईपर्यंत अथवा तसें सामर्थ्य येण्याकरितांच कांहीं दिवस 'विविक्तदेशसेवित्वं', 'असक्तिरनभि-

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

ष्वंगः पुत्रदारगृहादिषु ' ( गीता, अ. १३ ), इत्यादि पथ्यें सांभाळलीं पाहिजेत. त्याशिवाय तें ज्ञान-बल-क्रियासामर्थ्य कदापि प्राप्त होणार नाहीं. जुन्या भाषेंत सांगावयाचें, तर पूर्ण असा अन्वय साधण्याकरितां प्रथम शुद्ध व्यतिरेक साध्य केला पाहिजे. तो साधण्यास हवा तो त्याग करण्यास तयार असलें पाहिजे.

*  *  *  *

' प्रपंच करून परमार्थ करावा ' असें सांगण्यास सगळे साधुसंत केव्हां शहाणे झाले ? तर प्रथम त्यांनीं प्रपंचाचा त्यागच करून परमार्थाची बैठक चांगली बसविली तेव्हां ! ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. सर्व संतांत उत्तम प्रापंचिक संत आपले एकनाथमहाराज. हे तर वयाच्या ८ व्या वर्षीच आपल्या वृद्ध आजाआजींस सोडून पळून जाऊन गुरुगृहीं १२ वर्षें राहिले होते ! श्रीसमर्थ ' सुमुहूर्त सावधान ' म्हणण्याच्या वेळेस पळून गेलेली गोष्ट सर्वत्रांना माहीतच आहे. श्रीतुकाराममहाराजांनीं व्यापारधंद्याचें वाटोळें करून भंडाऱ्या डोंगरावर जाऊन बैठक मांडली होती, तेव्हां बिचाऱ्या बायकोस भर उन्हांत तो डोंगर चढून नवऱ्याला अन्न नेऊन पोंचवितां पोंचवितां नाकीं नव येत, ही गोष्टही प्रसिद्धच आहे. ह्या मागच्या गोष्टी कशाला ? हल्लींचे साधु श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांनीं आपल्या प्रपंचाचें काय केलें हें आधुनिक विद्वानही जाणतातच. तें असो, पण आधुनिक उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची रीत पाहिली तरी काय दिसून येतें ? कॉलेजांत राहणें म्हणजे घरादाराचा त्याग करून गुरुगृहांत राहणें नव्हे काय ? लौकिक विद्येसाठीं सुद्धां जर प्रपंचाचा म्हणजे बाह्य अथवा तदितर कार्यांचा किंवा उपाधींचा इतका त्याग करणें अवश्य आहे, तर ' आत्यंतिक क्षेम ' प्राप्त करून देणाऱ्या ब्रह्मविद्येच्या प्राप्तीसाठीं केवढा त्याग करणें जरूर आहे बरें ! या गोष्टीचा विचार करावा तेवढा थोडा आहे. " न कर्मणा न प्रजया धनेन **त्यागेनैके अमृतत्वमानशुः** " अशी श्रुतीचीही गर्जना आहे.

तर मग —

**' घरदार वोखटें त्यजूं म्हणसी जरी । शरीराएवढें जाड० ';**
**न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ';**
**' नलगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरी ',**
**' संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधि न सांडितां ।**
**जनामधें सार्थकता । विचारेंचि होय ॥ '**

************************************************

इत्यादि संतवचनांत त्यागाची निंदा नसली तरी अनावश्यकता सांगितली आहे हें कसें ? अशी शंका येण्याचा संभव आहे. असा बोध करणाऱ्या संतांनीं स्वतः प्रथम त्यागच केलेला होता आणि लोकांस असा अत्याग कां सांगतात ? ही त्यांची फसवणूक तर नसेल ना ? असें वाटणें शक्य आहे. त्याचें समाधान असें कीं, सामान्य जीवांना त्यांच्या इतके त्यागाचे कष्ट सहन होणें शक्य नाहीं, हें जाणून हृदयांतील अत्यंत कळवळ्यानें त्यांनीं सुखसंपादनीय असा परमार्थप्राप्तीचा सुलभ मार्ग सांगून दिला. किंवा असेंही समजण्यास हरकत नाहीं कीं, स्वतः कष्ट सोसून पाहिल्यानंतर तितक्या कष्टाचें कारण नाहीं असा त्यांना अनुभव आला व तो त्यांनीं जगास अनुकंपेनें सांगितला. कोलंबसानें अमेरिका शोधून काढण्यास जें साहस केलें, किंवा वास्को-दि-गामानें हिंदुस्थान गांठण्याचा ज्या मार्गाचा अवलंब केला, तेंच साहस, तोच मार्ग किंवा तितकेंच कष्ट तिकडे जाण्यास आतांही लोकांनीं करावें असें कोठें आहे ? इष्ट स्थळीं जाऊन आलेल्या लोकांनी अनुभवाचा दुसरा सुलभ मार्ग सांगितला, तर त्याचा स्वार्थेच्छु लोकांनीं स्वीकार कां करूं नये ? जाऊन व पाहून आलेल्या सत्यवादी लोकांच्या वचनांवर विश्वास ठेवून तसें करणें श्रेयस्करच होईल. संत हे जीवांचे परम आप्त, निर्निमित्त सुहृद्, म्हणजे '**ऐसी कळवळ्याची जाति। लाभावीण करी प्रीति**' अशी ममता करणारे मायबाप आहेत. त्यांच्या वचनांवर विश्वास ठेवून चालणें हें आम्हां लेंकरांचें कर्तव्य आहे. तें आमचें परम कल्याणाचें आहे.

*   *   *   *

( वर सांगितलेली समर्थांची ओंवी – )

**" संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधि न सांडितां ।**
**जनामधें सार्थकता । विचारेंचि होय ॥ "**

हें बोलणें उगीच कांहीं तरी अनुमानाचें नसून प्रचीतीचें असल्याबद्दल तेच पुढें किती जोरानें सांगतात तें पहा —

**" हें प्रचीतीचें बोलणें । विवेकें प्रचीत पहाणें ।**
**प्रचीत पाहे तें शहाणें । अन्यथा नव्हे ॥**
**पुढें जन्मांतरीं होणार ! हा तों अवघाच उधार ।**
**तैसा नव्हे सारासार[१] । तत्काळ लाभे ॥**

---

१. सारासार विचारानें परमार्थ 'रोकडा' लाभतो, यज्ञादिकांनीं प्राप्त होणाऱ्या स्वर्गाप्रमाणें तो 'उधार' राहात नाहीं.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**तत्काळचि लाभ होतो । प्राणी संसारीं सुटतो ।**
**संशय अवघाचि तुटतो । जन्ममरणाचा ॥**
**याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होइजे निराळें ।**
**मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥**
**ये गोष्टीस करी अनुमान । तो सिद्धचि पावेल पतन ।**
**मिथ्या वदे त्यास आण । उपासनेची ॥"**

(या शेवटच्या ओंवींत तर समर्थांनीं आत्मविश्वासाची कमाल केली आहे. आपण सांगितलेल्या वरील शिद्धान्तांत जर कोणी संशय घेईल, तर तो निःसंशय पतन पावेल; जर कोणी हें माझें म्हणणें खोटें म्हणेल तर त्यास त्याच्या उपास्यदेवतेची शपथ आहे; हवें तर माझें म्हणणें त्यानें खोटें करून द्यावें ! इत्यादि.) पुढें पुनः म्हणतात —

**"हें यथार्थचि आहे बोलणें । विवेकें शीघ्रचि मुक्त होणें ।**
**असोनि कांहींच नसणें । जनामधें ॥...**
**देहींच विदेह होणें । करून कांहींच न करणें ।**
**जीवनमुक्तांचीं लक्षणें । जीवन्मुक्त जाणे ॥"**

— दासबोध, दशक ६, समास ९

तात्पर्य — प्रपंचउपाधि न सांडतां त्यांतच राहून परमार्थ साधतां येतो, फक्त आत्मानात्म-विवेक व सारासारविचार करावा म्हणजे पुरे, असें समर्थ अगदीं प्रतिज्ञेनें सांगतात. यापेक्षां आणखी काय पाहिजे ? येथें जो आळस करील तो आपल्या हितास नागवेल. असार प्रपंचालाच सार म्हणून मिठी मारून बसेल, तो पतनच पावेल. (मनुष्ययोनींतून पश्वादि योनींत जाईल). बरें, प्रपंच असार समजल्यानंतर —

**" येकाग्र करूनियां मन । बळेंचि धरावें साधन ।**
**यत्नीं आळसाचें दर्शन । होऊंच नये ॥"**

असें न करील तोही पतन पावेल. कारण —

**" आळसाचें संरक्षण । परमार्थाची बुडवण ।"**

हा अगदीं सिद्धान्त आहे. आळस, बहुनिद्रा, खादाडपणा, इत्यादि हीं करंटलक्षणें होत. हीं सोडलीं पाहिजेत. सत्संगांत हे सर्व अवगुण आपोआप पालटतात. करितां नेहमीं सत्संग करावा.

**“ रायाचे सन्निध होतां । सहजाचि लाभे श्रीमंतता ।
तैसा हा सत्संग धरितां । सद्वस्तु लाभे ॥ ...
न करितां वित्पत्तीचा श्रम । सकळ शास्त्रार्थ होय सुगम ।
सत्समागमाचें वर्म । तें हें ऐसें असे ॥ ”** — दासबोध

हा सत्संग प्रपंचांत राहून साधतां येतो. ‘ संतमुखानेंच सच्छास्त्राचें श्रवण केलें पाहिजे. ’ आपल्याच बुद्धीनें ग्रंथ वाचून उपयोग होणार नाहीं. मी अमुक वाचलें, तमुक वाचलें, असा अभिमान मात्र उत्पन्न होईल. अभिमान म्हणजे मीपणा प्रपंचांतसुद्धां उपयोगीं नाहीं, तर परमार्थात कोठून ?

**“ मीपण कोणासीच न साहे । तें भगवंतीं कैसेनि साहे ।
म्हणोनि मीपण सांडूनि राहे । तोचि समाधानी ॥ ”**

— दासबोध ७–७–५०

**“ मीपणें वस्तु नाकळे । मीपणें भक्ति मावळे ।
मीपणें शक्ति गळे । वैराग्याची ॥ ”** — दासबोध ७–४–६

हें ‘ मीपण ’ जसें बाधक, तसे ‘ माझेंपण ’ ही बाधकच. साडेतीन हात देह तो ‘ मी ’ असें मानल्यानंतर, देहाचे संबंधी बायको, मुलें, इत्यादि हीं ‘ माझीं ’ असें सहज वाटूं लागतें. प्रपंचदृष्टीनें विचार केला तरीसुद्धां, ज्यांना आपण ‘ माझी ’ म्हणून म्हणतों, तीं सर्व आपापल्या सुखाचीं असतात. त्यांच्या सुखाच्या आड आपण जोंपर्यंत येत नाहीं, तोंपर्यंतच सर्व ठीक असतें. हा अनुभव प्रत्येकाला येतो ; पण मोहांधतेनें तो विसरला जातो आणि त्यामुळें आपण आपल्या स्वार्थास आंचवतों. आपण आपल्या बायकामुलांवर जितके आणे प्रीति करतों, तितके आणे प्रीति त्यांची आपल्यावर असते काय, हें नेहमीं तपासीत असावें, म्हणजे त्यांच्याविषयींचा मोह कमी होईल, सुखाचे वांटेकरी सर्व आहेत, पण दुःखाचे थोडेच ! दुखण्याबाण्यांत औषधोपचाराची खटपट करतील, तीहि स्वतःच्या सुखाची दृष्टि पोटांत ठेवून. निस्वार्थ प्रेमानें अशी खटपट करणारे सज्जन नाहींत असें नाहीं. दुःखितांचीं दुःखें कमी करण्याकरितां लाखों रुपये धर्मार्थ देऊन हॉस्पिटलें, धर्मशाळा, पाणपोया, अन्नछत्रें, वगैरे संस्था उभारणारे भाग्यवान लोक जगांत आहेत. [ पण त्यांच्या हेतूप्रमाणें त्या संस्थेचीं कामें पगार खाऊनही नीट न करणारीं अभागी माणसेंही तेथेंच दृष्टीस पडतात ! मागें सांगितल्याप्रमाणें ( पृष्ठ २५१-५४ )

हे जीव नरकांतून आलेले व पुनः तेथेंच जाण्याची तयारी करणारे व तशा परोपकारी संस्था उभारणारे हे स्वर्गांतून आलेले व पुनः तेथेंच जाणारे असें समजावें. ] तें असो. पण आपला पोटशूळ, आपला दमा किंवा मूळव्याध असे रोग ते आपले जिवलग वांटून घेऊं शकतील काय? असें मुळीं करतांच येत नाहीं. मृत्युमुखांतून सोडविणें तर कोणाच्याच हातीं नाहीं. मग अशा माणसांना माझें, माझीं म्हणून कवटाळण्यांत काय अर्थ बरें? श्रीतुकाराममहाराज म्हणतात —

**" वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥**
**कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ "**
**" काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥**
**कां हें आवडलें प्रिया पुत्र धन । काय कामा कोण कोणा आलें ॥**
**कां हें जन्म वांया घातलें उत्तम । कां हें रामनाम न म्हणती ॥**
**काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥**
**काय करिती हे बांधिलिया काळें । तुका म्हणे बळें वज्रपाशीं ॥ "**

हा विचार म्हणजे कांहीं मोठा वेदान्त नव्हे. हा अगदीं उघड रोजचा व्यवहार आहे. हा शिकून घेण्यास दुसऱ्या कोठल्या शाळेंत जाण्याचें कारण नाहीं कीं कोणतीं पुस्तकें अथवा ग्रंथ वाचण्यचेंही कारण नाहीं. थोडेसे डोळे उघडून सृष्टिप्रवाहाकडे पाहिलें कीं पुरे. तसें पाहाणारांस हीं बायकामुलें व इतर आप्तजिवलग हे

**' तुका म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोयरें '**

असें वाटल्यावांचून राहणार नाहीं ! पण थांबा, घाई नको या चोरांकडे पाहण्याची.

## संतांची एक सुंदर नवी दृष्टि आहे

त्या दृष्टीनें, त्या चष्म्यानें अथवा दुर्बिणीनें पाहिल्यास तुम्हांस एकदम ' ट्रान्स्फर सीन ' ( अकस्मात् बदललेला देखावा ) दिसेल व तुमच्या चित्तांत परम शांतीचा उदय होईल. परंतु हें तेव्हांच घडेल कीं जेव्हां वरील तुकारामश्रुतीचा भावनाभ्यास अधिक होईल. शरीर सुंदर तेजोबलवीर्यसंपन्न तेव्हांच होईल कीं जेव्हां तें सूर्यनमस्कारादि व्यायामाचा, अंगांतून घामाच्या धारा सुटेपर्यंत, पुष्कळ दिवस अभ्यास करील. हा चष्मा किंवा ही दृष्टि म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून – **' संपत्तीचा मालक ईश्वर, आपण फक्त वहिवाटदार '** आहोंत या बुद्धीनें संपत्ति वापरणें; तसेंच आपल्या परिवारांतील स्त्रीपुत्रादि सर्व जीव परमेश्वराचीं लेंकरें असून आपणांस

त्यानें ( परमेश्वरानें ) त्यांचें ( त्या लेंकरांचें ) जिम्मेदार नेमलें आहे. आपण त्यांचे मालक नसून फक्त पालक आहोंत. आपल्या त्या प्रभूचें – धन्याचें प्रिय करण्यासाठीं आपल्या जिम्मेवर सोंपविलेल्या त्याच्या लेंकरांवर आपण प्रेम केलें पाहिजे, त्यांचें पालनपोषण नव्हे, त्यांची सेवा केली पाहिजे. कारण धन्याच्या इच्छेप्रमाणें त्याच्या लेंकरांची सेवा करणें ही धन्याचीच सेवा होय. धन्याचीं लहानमोठीं लेंकरें त्याच्या घरांत, त्याच्या आंगणांत मनसोक्त नाचूं–उडूं लागलीं म्हणजे तीं पडतील, हातपाय मोडून घेतील, म्हणून त्यांचेवर पूर्ण नजर ठेवून क्वचित् थोडेंसें रागवावें लागेल तर रागावलेंही पाहिजे. पण हा राग पोटांतून नसून ओंठांतलाच आहे कीं नाहीं, हें धनी नीट पाहात आहे, इतक्या सावधगिरीनें धन्याच्या समोर त्या मुलांवर राग दर्शविला पाहिजे. अल्प ऐश्वर्यवान धन्यापेक्षां महत् ऐश्वर्यवान व सत्तावान राजा असेल, तर त्याच्या पुत्रकन्यांचें संगोपन करण्याकरितां ठेवलेले नोकर कसे वागत असतील, राजप्रीतीकरितां त्याच्या मुलांची ते कशी सेवा करीत असतील, याची कल्पना करून त्याप्रमाणें आपण आपल्या मुलांबाळांशीं वागावें. त्याचेवर आपण खूप **प्रेम करावें,** पण **ममता करूं नये.** ममता करण्यास आपणांस काय हक्क आहे बरें! मम-ता म्हणजे माझे–पणा. राजाच्या मुलांवर नोकरांना ' माझेपणाचा ' हक्क सांगतां येईल काय ? केव्हांच नाहीं. बरें, एखाद्या मुलास राजा एकाच्या तैनातींतून काढून घेऊन दुसऱ्याच्या तैनातींत देतो, तेव्हां तो नोकर शोक करीत बसतो काय ? नाहीं. याचें कारण तो मुलगा आपला नव्हे असें तो मनापासून जाणतो. आपलेपणाची बुद्धि असेल तर शोक होईल. आपलेपणाची बुद्धि म्हणजेच ' मम-ता. ' ती नसेल तिकडे शोकास अवसर नाहीं. असेच आपल्या मुलामाणसांच्या संयोगवियोगप्रसंगीं आपलें चित्त राखावें. ज्यानें दिलें त्यानें नेलें, तेथें आपलें काय गेलें ? त्याच्या म्हणजे राजाच्या किंवा धन्याच्या मर्जीप्रमाणें वागण्यास तोच स्वतः मुखत्यार आहे, आपली त्याच्यावर सत्ता नाहीं. (' कोण धन्याला मना करी । मना मानिलें तेंचि करी ') हें अगदीं उघड व्यवहारज्ञान आहे. हें जाणून आपण त्याच्या मर्जीला मान देऊन ( Thy will be done म्हणून ) वागावें, म्हणजे त्याची आपल्यावर प्रीति राहील. त्याची प्रीति संपादन करणें हेंच आपलें सेवकांचें ध्येय अथवा कर्तव्य असतें. हें साधण्यास आपण तत्पर राहिलें म्हणजे तो आपणांस कधींही अंतर देणार नाहीं.

तात्पर्य, साधकानें आपल्या कुटुंबांत वागतांना ' मी यांचा कोण नव्हे व हीं माझीं कोणी नव्हेत ' अशी दृष्टि ठेवून, भगवंताचें नियोजित कर्तव्य म्हणून

त्यांजवर प्रेम करीत अथवा प्रेम दाखवीत राहून, हवा तेवढा संसार करावा ; म्हणजे तो त्याला बाधणार नाहीं. कुटुंबाची सेवा म्हणजे त्या विश्वकुटुंबी भगवंताची सेवा असें मानून करीत राहिलें म्हणजे चित्त कसें समाधान व अलिप्त राहतें तें पहावें. हा अनुभव किती गोड असतो, हें तसें होऊन घेणारासच कळेल. 'पाण्यांत नाव असावी पण नावेंत पाणी नसावें, त्याप्रमाणें **संसारांत साधकानें रहावें, पण साधकांत संसार राहूं नये**' असें श्रीरामकृष्ण-परमहंस आपल्या शिष्यांस वारंवार सांगत. असो.

वरील दृष्टीपेक्षां दुसरी एक सुंदर दृष्टि 'स्त्रीसाधकांसाठीं' पुढील प्रकरणांत सांगण्यांत येईल, तिचाही पुरुषांनीं विचार करावा.

* * * *

## संसारांतील सुस्थिति ही परमार्थाच्या प्राप्तीला मोठी साहाय्यकारी असते

याकरितां ही सुस्थिति संपादन करण्यासाठीं साधकांनीं पहिल्यापासून सावधगिरी राखावी. संसाराच्या गोडीनें संसाराच्या सुस्थितीचा प्रयत्न हा बंधाला कारण असून, परमार्थाच्या गोडीनें संसाराच्या सुस्थितीचा प्रयत्न हा मोक्षाला कारण आहे असें समजावें. ह्या दृष्टीनें आपल्या संसाराची आपण काळजी घ्यावी, म्हणजे आपला संसारही चांगला होईल व परमार्थही उत्तम साधेल. संसारसुस्थिति संपादण्याकरितां संसारांतील म्हणजे व्यवहारांतील नियम बरोबर रीतीनें पाळणें हें क्रमप्राप्तच झालें.

सर्वांत प्रथम '**शरीराचें आरोग्य**' सांभाळण्याचा बुद्धिपुरस्सर व लक्षपूर्वक प्रयत्न झाला पाहिजे. ज्याचें त्यानें आरोग्य सांभाळलें म्हणजे जगावर उपकार आहेत. शरीराचें आरोग्य हें प्रपंचाप्रमाणें परमार्थालाही अत्यंत अवश्य आहे. अष्टांगयोगामधील तिसरें अंग जें 'आसन' तें योग्याच्या आरोग्याकरितांच ठरविलेलें आहे. (अलीकडे योगासनांच्या व्यायामाचीं सुंदर पुस्तकेंही निघालीं आहेत.) सूर्यनमस्कारांचा व्यायाम हा तर इतर व्यायामांमध्यें सोपा व उत्कृष्ट व्यायाम असून ६०।७० वर्षांच्या म्हाताऱ्यांनाही तो सुसंपाद्य आहे. आरोग्याची देवताच सूर्य आहे. ('आरोग्यं भास्करादिच्छेत्'). तसेंच बुद्धि सुप्रभ करून अध्यात्मउन्नतिही सूर्यनमस्कार साधून देतात.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

'**सात्त्विक आहार**' हा आरोग्यालाही साधक असून, 'रसात्मिका बुद्धि' असल्यामुळें त्याच्या रसानें बुद्धीची शुद्धि होते, म्हणून परमार्थालाही तो साहाय्यक आहे. झणझणित मसाले, चहा, सोडावॉटर, इत्यादि पेयें, फार काय, अशुद्ध अशी परदेशी साखर व तशाच अशुद्ध परदेशी बिस्किटें वगैरे वस्तु यांपासूनही पारमार्थिक बुद्धिभ्रंश होण्याचा संभव असतो. करितां साधकांनीं त्यांपासून अलिप्त असावें. सात्त्विक आहार झाला तरी तो **मिताहार** पाहिजे. नसलेस जिभेच्या रुचीसाठीं जास्त खाल्लेस तोच तामस होतो. हें वर्म लक्षांत ठेवून सात्त्विक आहार झाला तरी तो मिताहार करावा.

मिताहारासंबंधानें सुप्रसिद्ध निसर्गचिकित्सक डॉक्टर एच्. लिंडलार यांनीं आपल्या पुष्कळ वर्षांच्या प्रॅक्टिसच्या अनुभवानें असा सिद्धान्त ठरविला आहे कीं, "आपण जो आहार सेवन करितों, त्यापैकीं $\frac{1}{3}$ भाग आमच्या शरीराच्या पोषणाच्या उपयोगी येतो, बाकी $\frac{2}{3}$ भाग डॉक्टरांच्या पोषणाकडे ( बिलांच्या रूपानें ) जातो." इत्यादि. तात्पर्य, प्रपंचांतही मिताहार जर आवश्यक आहे, तर परमार्थांत तो अवश्य आहे हें सांगण्याची गरजच नाहीं. "**युक्ताहार**-विहारस्य." हें गीतेंतील वचन हेंच तत्त्व सांगतें.

पण नुसता मिताहार हाही एक रोग्याचें पथ्य होईल, करितां तो नामस्मरणपूर्वक करावा. म्हणजे तो अन्नरस हा भगवद्रस – ब्रह्मरस होऊन पोटांत उतरेल व कर्मादिकांनीं न साधणारी हृदयबुद्धि लीलेनें होईल.

**"ग्रासोग्रासीं ब्रह्मार्पण । त्या नांव परिमित भोजन ।**
**युक्तीवीण अल्प भोजन । तें पथ्य जाण रोग्याचें ॥"**

— एकनाथी भागवत, अ. १३

**"हरीचिंतनें अन्न सेवीत जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥"**

— श्रीसमर्थ

'**ब्रह्मचर्य**' ( पूर्ण अथवा मितकामसेवन ) हें आरोग्याला तर साधक आहेच, पण परमार्थालाही आवश्यक आहे. "**यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरन्ति,** तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ।" असें भगवद्गीता सांगते. कित्येक भक्तिमार्गी संसारी साधक हा नेम पाळावा तसा पाळीत नाहींत. जितेंद्रियत्व, जितमनस्कत्व या गोष्टी ज्ञान्यांनीं हव्या तर पाळाव्या, भक्तिमार्गाच्या लोकांना त्यांची गरज नाहीं असें ते म्हणतात!

*********************************************

ही त्यांची लपंडावी किंवा आत्मवंचना आहे! कारण, परमार्थापेक्षां प्रपंचालाच या गोष्टीची प्रथम फार जरूरी आहे. कामाच्या अतिरेकानें वीर्यक्षयाबरोबर शक्तीचा क्षय होतो, संततिही बलहीन व कुरूप निपजते. ज्यांना आपल्या वंशवृद्धीकरितां व वंशकीर्तीकरितां आरोग्यवान्, आयुष्यवान्, बुद्धिमान् व कीर्तिमान् संतति निपजावी अशी इच्छा असेल, त्यांनीं स्वस्त्रीकाम सुद्धां नियमित सेवन केला पाहिजे. साधकांनीं आपल्या संततीविषयीं बेफिकीर राहूं नये. आपलीं मुलें सुंदर, रूपवान, कांतिमान, गुणवान, बुद्धिमान, भाग्यवान, भक्तिमान व लोकमान्य असावीं,

**"पुत्र व्हावा ऐसा गुंडा। ज्याचा तिहीं लोकीं झेंडा॥"**

अशी इच्छा धारण करणें, हें जगदुत्पत्ति करणाऱ्या परमेश्वराच्या संकल्पास साहाय्यक असल्यामुळें भगवद्भक्तीला विरोधी नसून पोषकच आहे. आपल्या कुळांत 'अब्रह्मवित्' म्हणजे ब्रह्मज्ञानी नव्हे, अशी संतति उत्पन्न होऊं नये अशी काळजी उपनिषत्कालीन ऋषि घेत असत. तशीं त्यांचीं वचनें उपनिषदांत आढळतात. किती सुंदर महत्त्वाकांक्षा आहे बरें ही? समाजधारणेलासुद्धां ही कितीतरी आवश्यक आहे. या गोष्टीचा विचार करून साधकांनीं आपली कामासक्ति नियंत्रित करावी.

**योग**मार्ग हा शरीराला व **ज्ञान**मार्ग हा बुद्धीला अत्यंत दुर्धर्ष आहे, पण **भक्ति**मार्ग हा तसा नव्हे. योगमार्गांत इंद्रियांचा कोंडमारा व ज्ञानमार्गांत मनाचा कोंडमारा करावा लागतो. अविरक्त व अज्ञान जीवाला हें मोठें प्राणसंकट होतें. अशा लोकांनाही भवसागर तरतां यावा म्हणून भगवंतानें निजभक्तीचा मार्ग प्रकट केला आहे.

**"न करितां वेदशास्त्राची व्युत्पत्ति। ऐशिया अज्ञानां निजात्मप्राप्ति।**
**सुगम जोडे ब्रह्मस्थिति। यालागीं हरिभक्ति प्रकाशली देवें॥...**
**न करितां नाना व्युत्पत्ति। सुगमोपायें ब्रह्मप्राप्ति।**
**अबळें तारावया निश्चितीं। भगवंतें निजभक्ति प्रगट केली॥...**
**येथ पव्हणियावीण तरणें। प्रयासेंवीण प्राप्ति घेणें।**
**सुखोपायें ब्रह्म पावणें। यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ति॥"**

असा हरिभक्तीचा महिमा असून सौलभ्यही तसेंच आहे. कारण येथें—

**"इंद्रियें कोंडावीं न लगतीं। सहजें राहे विषयासक्ति।**
**एवढें सामर्थ्य हरिभक्तीं। जाण निश्चितीं नृपवर्या॥**

**योगी इंद्रियें कोंडिती । तीं भक्त लाविती भगवद्भक्तीं ।**
**योगी विषय जे त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवंतीं ॥ "**

—एकनाथी भागवत, अ. ३

**अशी** ही भक्तिमार्गाचीं सुलभता सांगितली आहे. पण भक्तिमार्गी म्हणविणारे लोक या सवलतीचा भलताच फायदा घेतात ; 'बोट दाखविलें म्हणजे हात गिळतात ' या म्हणीप्रमाणें वागतात. ' इंद्रियें कोंडावीं न लगती ' हे शब्द त्यांच्या डोळ्यांपुढें नाचूं लागतात, पण त्यांपुढील शब्द 'सहज राहे विषयासक्ति ' हे त्यांच्या बुद्धीपुढें उभे राहत नाहींत. विषयासक्तीचा अनादरच भगवंताला व संतांना अपेक्षित आहे, हें त्यांना उमगत नाहीं. शास्त्रांनीं व संतांनीं कामाचा निषेध केला नाहीं, कामासक्तीचा निषेध केला आहे. इतर इंद्रियांपेक्षां जिव्हा व उपस्थ या दोन इंद्रियांचाच जय करण्याबद्दल साधकांना सर्वत्र आग्रहाचा उपदेश आहे. गृहस्थसाधकांना नाथ-तुकारामादिकांनीं स्त्रियांच्या संगतीपासून अलिप्त राहण्याबद्दल कळकळीनें उपदेशिलें आहे.

**" नको नको स्त्रियांचा सांगात । नको नको स्त्रियांचा एकांत ।**
**नको नको स्त्रियांचा परमार्थ । करिती आघात पुरुषासी ॥ "**

[ अशा वचनांत संतांनीं स्त्रियांचा अपमान ( Insult ) केला आहे असें कित्येक शहाणे म्हणतात ! तें या उपदेशाचा हेतु न समजल्यामुळें होय. स्त्रिया या अनाथ व अबला आहेत, त्यांचा कैवार संतांनीं, शास्त्रांनीं व देवानेंही जेवढा घेतला आहे, तेवढा पुरुषांचा घेतलेला नाहीं, हें सूक्ष्म व निर्विकार बुद्धीनें पाहणाऱ्याच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. याविषयीं जास्त लिहिणेचें हें स्थळ नव्हे. पण वाचकांचा गैरसमज होऊं नये म्हणून उगीच ध्वनित केलें आहे. असो. ] स्त्रियांपासून परमार्थाला जर असा धोका आहे तर गृहस्थसाधकांनीं स्त्रिया सोडून जावें काय असा प्रश्न उद्भूत करून त्याचें उत्तर श्रीएकनाथ देतात, तें साधकांनीं नेहमीं लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागणें अवश्य आहे.

**" तरी स्वस्त्रीवांचोनी । नातळावी अन्य कामिनी ।**
**कोणे स्त्रियेसी सन्निध वाणी । आश्रयो झणीं नेदावा ॥ "**

**परस्त्रीबद्दल** अशा तऱ्हेचा कटाक्ष तर नेहमींचा असतो. कारण त्यासारखें अधःपतन व कुलनाशाचें साधन दुसरें नाहीं. पण स्वस्त्रीबद्दल सुद्धां काय सांगतात तें पहा —

**“स्वस्त्रियेसही कार्यापुरतें । बोलावें स्पर्शावें निरुतें ।**
**परी आसक्त होऊनि तेथें । सर्वथा संतें न गुंतावें ॥**
**नरनारीं सूश्रुषा करिती । भक्तिममता उपजविती ।**
**परी शुद्ध जो परमार्थी । तो स्त्रियांचे संगतीं न बैसे ॥”**

——श्रीएकनाथकृत ‘ **चिरंजीवपद** ’

तारुण्यांतील वीर्यक्षय हा म्हातारपणीं फार जाचक होतो. बडे भक्त किंवा मोठे ज्ञानी झाले तरी निसर्गाचे नियम त्यांना उल्लंघन करतां येणार नाहींत. अनियमित अधिक खाल्ल्यानें जसें अजीर्ण होणें चुकणार नाहीं, तसें अनियमित अथवा अमर्यादित कामसेवनानें तेज, बल व आयुष्य क्षीण झाल्यावांचून राहणार नाहीं. पशुपक्षी हे मनुष्यापेक्षां अधिक निरोगी कां असतात, याचें कारण त्यांचा आहार व विहार नियमित म्ह० नियंत्रित असतो. तोच मनुष्यांचा अनियंत्रित असतो. मनुष्याची ही करणी पाहिली म्हणजे तो पशूपेक्षांही नीच ठरतो. नाथमहाराज भागवतांत म्हणतात —

**“साधीना देहीं ब्रह्मज्ञान[1] । तो श्वानसूकरासमान ।**
**अथवा त्याहोनि हीन । तें विवेचन परियेसी ॥**
**पशूसी ऋतुकाळीं मैथुन । मग स्त्रियेसी नातळी आपण ।**
**पुरुषासी नित्य स्त्रीसेवन । गरोदरही जाण न सोडी ॥**
**गर्भ संभवल्यापाठीं । श्वानही स्त्रीभोगासी नुठी ।**
**पुरुषाची अभिनव गोष्टी । गरोदर गोमटी भोगिती ॥”**
**“जरी प्रसूतिकाळ निकट । गाड्याएवढें वाढलें पोट ।**
**तरी कामचारी विवेकनष्ट । रमताति दुष्ट स्त्रियांसी ॥”**

— एकनाथी भागवत, अ. ९ व १३

निसर्गाच्या नियमाप्रमाणें पशुपक्षी वागतात आणि त्यामुळें सुखी असतात. मनुष्य ते नियम पाळीत नाहींत. परमेश्वरानें दिलेल्या सारासारविचारज्ञानाचा उपयोग, ते नियम मोडण्याकडे व त्या वृत्तीचें अथवा कृतीचें समर्थन करण्याकडे करितात. ( त्यामुळें निसर्गाच्या नियमाप्रमाणें दुःखी होतात. ) याकरितां पशूपेक्षांही ते हीन होत. पशूंचें विषयसेवन देहरक्षणापुरतें म्हणजे मर्यादित असतें. त्यांचें आपल्या मुलांवरील प्रेम अथवा ममतासुद्धां अगदीं थोडा काळ असते. पशूला संग्रहाचा

**१ हें शाब्दिक ब्रह्मज्ञान नव्हे, अनुभविक ब्रह्मज्ञान.**

लोभ नसतो. मनुष्याचें सर्व याच्या उलट असतें ! असा मनुष्य पशूपेक्षांही हं
नव्हे तर काय ?

**" अमित असतां धन गांठीं । तरी चिंता अनिवार मोठी ।**
**नाथिलेंचि भय घे पोटीं । अविश्वासी सृष्टीं नरदेही ॥**
**जरी मरों टेकलें शरीर । तरी व्यवहारीं साधीं वृत्ति-क्षेत्र ।**
**पाया शोधोनि बांधी घर । पुत्रपौत्र नांदावया ॥**
**न साधितां आत्मज्ञान । केवळ जे विषयी जन ।**
**ते श्वानसूकरांपरीस हीन । माणुसपण त्यां नाहीं ॥ "**

याचें कारण पुढील ओंवींत सांगतात —

**" मनुष्यदेहावांचूनि । पशुपक्ष्यादि नाना योनी ।**
**त्या विषयभोगालागूनि । विषयच्छेदनीं नरदेह ॥ "**

— एकनाथी भागवत, अ.

भक्तिमार्गांत, सर्व भोग भगवदर्पण करावे म्हणजे ते बाधत नाहींत, ह
सांगितलें आहे ; यामुळें तो सर्वांत सुलभ असें वाटणें साहजिक आहे ; पण वि
भगवदर्पण म्हणजे काय याचा सूक्ष्म विचार न करितां, विषयभोगास भक्तिमार्ग
आडकाठी नाहीं अशा समजुतीनें हे लोक सैसाल वागतात, ही त्यांची आत्मवंच
आहे. **" विषय तो त्यांचा झाला नारायण "** याचें वर्म ते जा
नाहींत. या वचनाचा अर्थ व्यतिरेक व अन्वय या दोन्ही दृष्टीनें करि
येतो. व्यतिरेकदृष्टि म्हणजे एका नारायणावांचून दुसरा विषय ते जाणत नाहींत, स
विषय तुच्छ मानतात, असा अर्थ व अन्वयदृष्टि म्हणजे विषयांस विषयबुद्धीनें
पाहतां नारायणबुद्धीनें पाहणें असा अर्थ. विषय भोगीत असतां ' विषयाकार बुद्धि
झाली तर ज्ञानी व अज्ञानी यांमध्यें काय फरक राहिला ? विषयाकार वृत्ति हा प्रपं
किंवा हें अज्ञान आणि ब्रह्माकार अथवा भगवदाकार वृत्ति हें ज्ञान अथ
भक्ति होय. अशी भक्ति बाणल्यानंतर चित्तानें विषयाला विसरलेंच पाहिजे.

**" जे रंगले भगवत्पथा । त्यांचें चित्त विसरलें विषयावस्था[2] ॥ ..**
**कायिक वाचिक मानासिक । मदर्पण करी स्वाभाविक ।**
**मजवेगळा आणिक । भावार्थ देख स्फुरेना ॥ ...**

---

१ शेतभात वगैरे. २ विषयावस्था म्हणजे विषयाकार बुद्धि.

**पावल्या माझी स्वरूपता । देवबळें विषयो देतां ।**
**चित्तासी नुपजे विषयावस्था । स्वभावतां अलिप्त ॥ "**

— एकनाथी भागवत, अ. १३

इत्यादि वचनांवरून पाहतां काय सिद्ध होतें तें पहावें. ( विषयावस्था चित्तांत उपजली कीं, चुकलें म्हणून समजावें. )

'**ब्रह्मरूप सृष्टि पाहावी, सृष्टिरूप ब्रह्म पाहूं नये**' या वचनाचा अथवा या वृत्तीचा अभ्यास आपणास कितपत साधला आहे तो आपला आपण पहावा. भलतींच मतें बोलून अथवा ऐकून लोकांची व आपली फसवणूक करूं नये. सत्यज्ञानाकरितां भगवंतास शरण जावें, म्हणजे तो कृपा केल्यांवाचून राहणार नाहीं.

अत्यंत आर्त, अत्यंत जिज्ञासु व अत्यंत अर्थार्थीच विधिपूर्ण अनुष्ठानास अथवा उत्कट भक्तीस प्रवृत्त होईल. खऱ्या जिज्ञासेच्या व प्रभूस शरणागत झालेल्या साधकास गुरु शोधीत येतात. त्यांना गुरूचा शोध करण्यास जाण्याची गरज पडत नाहीं. ते तशा शिष्याच्या घरीं येऊन बोधामृत प्राशवून जातात. गुरुकृपेनें बुद्धि ही बोधावर आरूढ झाल्यानंतर त्याचें द्वैतभान मोडून जातें व तसें झालें म्हणजे '**विषय तो त्यांचा झाला नारायण**' हा अधिकार प्राप्त होतो. प्रारब्धनामक एक अचिंत्य शक्ति आहे, त्या शक्तीनें जो जो भोग त्या पुरुषाला घडतो, तो तो ब्रह्मरूपच होतो. विषय हे विषयरूपानें राहत नाहींत.

**मुळीं आत्मा आत्मीं नाहीं जाणा । यालागी स्त्रीपुरुषभावना ।**
**त्यासी सर्वत्र आठवेना । दैवें अंगना तो भोगी ॥ ...**
**एवं स्त्रीपुरुषविकारप्राप्तीं । त्याची न मोडे आत्मस्थिति ।**
**दैवें जाहलिया संतति । आत्मप्रतीति तेथेंही ॥ "**

मुक्तांना स्त्रीसंगांत आसक्ति नसण्याचें दुसरें कारण असें कीं,—

**"स्त्रीसंभोगीं जें होय सुख । तें सुख मुक्तांसी सदा देख ।**
**त्यालागीं स्त्रीकाम-अभिलाख । नाहीं विशेष मुक्तांसी ॥ "—**

— एकनाथी भागवत, अ. ११

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

मुक्तांची अथवा सिद्धांचीं जीं स्वाभाविक लक्षणें तीं साधकांचीं ज्ञानसाधनें असतात. करितां साधकांनीं तशा दृष्टीनें विषयोपसेवन करावें, म्हणजे अभ्यासानें व हरिगुरुकृपेनें ही स्थिति साध्य होईल. (मागील पृष्ठें ११६-१७ या वेळीं पुनः वाचून पाहावीं). हाच एक विषय नव्हे, तर इतर विषय सुद्धां, रागद्वेषबुद्धि टाकून ब्रह्मदृष्टीनें सेवन करावेत. मुक्त लोक दहाही इंद्रियांचे विषय कसे सेवन करितात याचें वर्णन एकनाथी भागवतांत ११ व्या अध्यायामध्यें जसें दिलें आहे तसें इतरत्र कुठल्याही ग्रंथांत सांपडणार नाहीं. करितां साधकांनीं तो अध्याय मुद्दाम वाचून त्याचें मनन करावें. असो. ब्रह्मचर्य हा विषय लिहितां लिहितां फारच वाढला, त्याबद्दल वाचक क्षमा करितील अशी आशा आहे. संसारसुस्थिति साधण्याकरितां आरोग्य, मिताहार व ब्रह्मचर्य यांप्रमाणेंच —

'**मितव्यय**' म्ह. काटकसरही साधकांनीं अवश्य अवलंबिली पाहिजे. 'ऋण काढून सण' कधींही करितां कामा नये. देवादिकांचे उत्सव अथवा तशींच इतर धार्मिक कृत्यें हीं कर्ज काढून करूं नयेत. 'देवाचें देव फेडणार' असें म्हणून कांहीं लोक आपल्या शक्तीच्या बाहेर खर्च करितात, त्यांना मागाहून पश्चात्ताप झालेलीं पुष्कळ उदाहरणें आहेत. दामाजीपंतासारखीं उदाहरणें फार क्वचित्! पण दामाजीपंतासारखी स्वार्थशून्य परोपकारशीलता असणाऱ्या व्यक्ति तरी किती सांपडतील? देवाला आमच्या उत्सवाची गरज नाहीं. आमच्याकरितांच आम्ही ते करावयाचे असतात. तरी शक्तीच्या बाहेर किंवा कर्ज काढून न करितां, यथाशक्ति, किंवा नाथभागवतांत सांगितल्याप्रमाणें दैवी संपत्तिवान उदार धनिकाकडून वर्गणी (अगाऊ) जमवून उत्सवाचा आनंद करावा. तात्पर्य, देवाच्या उत्सवाला अथवा घरच्या लग्नकार्याकरितांही कर्ज न काढण्याचेंच धोरण ठेवावें. कर्जापासून चित्ताला फारच व्यथा उत्पन्न होते आणि अशी व्यथा अथवा उपाधि साधकास फारच बाधक होते. पैशाच्या काटकसरीबरोबर वेळेचीही काटकसर जरूर साधली पाहिजे. स्वतःच्या वेळेबरोबर दुसऱ्याचाही वेळ व्यर्थ घालवूं नये. कारण वेळ म्हणजे आयुष्य हें अमोलिक आहे. गेलेला एक क्षण 'न लभ्यं हेमकोटिभिः' म्हणजे कोटि सुवर्णाच्या मोहरांनींही परत मिळणार नाहीं. पैसे खर्चिण्यांत **काटकसरी असावें, पण कृपण असूं नये**; तथापि वेळ खर्चण्यांत कृपणच असावें.

'**सत्य व मधुर भाषण**' अथवा भाषणाचें पथ्य जें परमार्थाकरितां सांगितलें आहे, तें परमार्थापेक्षां प्रपंचालाच फार उपयोगी आहे, असें विचारांतीं मनास पटल्यावांचून राहत नाहीं. 'वाक्पारुष्यात् सर्वलोकाप्रियत्वं, वाङ्माधुर्यात्सर्वलोकप्रियत्वम्'

****************************************************

म्हणजे कटु कठोर वाणीनें सर्व लोकांची अप्रीति, तसेंच मधुर वाणीनें सर्व लोकांची प्रीति सहज संपादन होते. 'परांतरास ढका' न लागेल अशा काळजीनें बोलणें बोलावें. आपण कोणास हलका शब्द बोलूं नये, लोकांनीं बोलल्यास सोसावा.

**"धके चपेटे सोसावे। नीच शब्द साहत जावे।**
**प्रस्तावोन परावे। आपुले होती॥"**

— दासबोध

कटु अथवा कठोर भाषणानें पंचवीस वर्षांचाही स्नेह एका क्षणांत तुटून जातो.

**"समाधानें समाधान वाढे। मैत्रीनें मैत्री जोडे।**
**मोडितां क्षणमात्र मोडे। बरेंपण॥...**
**आपण एकाएकीं एकला। सृष्टींत भांडत चालिला।**
**बहुतांमध्यें एकल्याला। यश कैचें॥...**
**वेड्यास वेडे म्हणों नये। वर्म कदापि बोलों नये॥"**

— दासबोध

अशा सावधगिरीनें बोलत चालत राहिलें पाहिजे. केलेले पुष्कळसे उपकारही कटु, कठोर भाषणानें नाहींसे होऊन जातात. 'याचे उपकारही नकोत व बोलणेंही नको' असें उपकृत मनुष्यें म्हणूं लागतात. करितां **उपकाराबरोबर शब्दही गोड पाहिजे**, हें नेहमीं लक्षांत ठेवावें. 'सत्य पण अप्रिय असेल तरी बोलूं नये व प्रिय पण असत्य असेल तरी बोलूं नये; तर सत्य व प्रिय असेल तेंच बोलावें हा सनातन धर्म होय.' (मनुस्मृति) 'मी खरें बोलणार, मला कोणाच्या बापाची भीति नाहीं' असा उर्मटपणाही कधीं धरूं नये. कित्येक वडील मनुष्यांना वडीलपणाच्या जोरावर घरांत लहानांकडे बोलतांना नेहमीं गुरगुरून तुच्छतेनें बोलण्याची सवय असते, त्यामुळें त्यांचे उपकार विसरून जाऊन सर्वांच्या मनांत त्यांच्याबद्दल अप्रीति मात्र उत्पन्न होते! 'सत्यं प्रियहितं च यत्' आणि 'अनुद्वेगकर' वाक्य हें वाङ्मय तप होय, असें गीता सांगते. पुष्कळ शास्त्री, वेदान्ती व भक्त म्हणविणारे लोक असत्य बोलतांना आढळतात! त्यांना सत्याचें महत्त्व माहीत नसतें असें नाहीं, पण मोहामुळें त्यांच्याकडून असत्य भाषण व असत्याचरण होत असतें. त्यायोगें आपल्या पुण्यसंपत्तीची किती हानि होते याची

त्यांना कल्पना नसते! श्रीएकनाथमहाराज म्हणतात

> **" सत्यवादियां ब्रह्मादि वंदिती। असत्या होय अधोगति ।**
> **ऐसें व्याख्यान जे करिती। तेही वदती असत्य ॥...**
> **सत्यापरतें नाहीं तप। सत्यापरता नाहीं जप।**
> **सत्यें पाविजे सद्रूप। सत्यें निष्पाप साधक होती॥ "** इत्यादि.

हीं वचनें साधकांनीं लक्षांत ठेवून मस्करीनें देखील खोटें बोलणार नाहीं असा निश्चय केला पाहिजे. कारण '**नानृतात्पातकं परम्**' (असत्य भाषणासारखें दुसरें पाप नाहीं) असें शास्त्रांत सांगितलें आहे.

तसा प्रसंगच आला तर समर्थांच्या शिकवणीप्रमाणें '**खोटें बोलूं नये, खरें सांगूं नये**' असें धोरण ठेवावें, किंवा मी या बाबतींत कांहीं बोलूं इच्छीत नाहीं, असें स्पष्ट सांगण्याचें धैर्य करावें. दुसरा एक सूक्ष्म विचार असा आहे कीं, " सत्यें अधर्म जोडे, सत्य नव्हे तें असत्य जाणावें। धर्म असत्यें जोडे, तरी सुज्ञें तें सुसत्यचि गणावें " ही महाभारती नीति प्रज्ञावंतांनीं लक्षांत ठेवावी. तात्पर्य, धर्मसंग्रहाकरितां व समाजधारणेकरितांही सत्य भाषणाची फार जरूरी आहे. साधकांनीं आपण स्वतः तसें वागून आपल्या मुलांना लहानपणापासून सत्याची कडक दीक्षा द्यावी, पण कडक शिक्षा मात्र करूं नये. लहानपणीं मुलांच्या मनांत सत्याची प्रीति दृढ होईल, तर तीं पुढें मोठीं करारी, धैर्यवान व कर्तृत्ववान निपजतील व होतां होतां त्रिकालाबाधित सत्य जो परमात्मा त्याच्या प्राप्तीचा मार्ग त्यांना सुलभ होईल.

'**मौन**' – या गुणाचाही साधकांनीं अवश्य अभ्यास केला पाहिजे. वाङ्मौन इंद्रियमौन, काष्ठमौन, सुषुप्तिमौन, इत्यादि मौनांपेक्षां **मनोमौन** हेंच सर्वांत श्रेष्ठ आहे. तथापि हें मौन (वृत्तिशून्य अवस्था) साधण्याकरितां वाङ्मौनाचाच प्रथम अभ्यास केला पाहिजे. हा फारच हितकारक आहे. बारा वर्षें वाङ्मौन साधणाऱ्यास वाक्सिद्धि प्राप्त होते असें शास्त्रांत सांगितलें आहे. संसारी साधकांस हें अशक्य आहे. तथापि 'मौनं च मितभाषणं' या वचनाप्रमाणें त्यानें मितभाषणी असण्याचा प्रयत्न करावा. प्रत्येक शब्द अगदीं तोलून बोलावा. निरुपयोगी म्हणजे ज्यावांचून कांहीं अडलें नाहीं अथवा अडणार नाहीं असें भाषण कधींही करूं नये. अशा भाषणानें अंतरांतील शक्तीचा व्यर्थ अपव्यय होतो. (Energy is wasted.) आजारी मनुष्याला डॉक्टर बोलूं देत नाहींत; त्याला त्रास होईल

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

म्हणून त्याच्याजवळ इतरांसही बोलण्याची मनाई करितात. कारण त्यायोगें वातावरणांतील शांतता बिघडते. संसारी साधकांनीं दिवसांतून दोन किंवा तीन तास तरी मौनाचा अभ्यास करावा. याला संख्यायुक्त नामजपाचें व्यसन फार उपयोगी पडतें; त्याचप्रमाणें नामजपालाही मौन उपयोगी पडतें. गरजेपुरतें बोलावें, पण तेंही मृदु, मधुर व हळू बोलावें. शक्य असेल तर (महात्मा गांधीजींप्रमाणें) आठवड्यांतून एक दिवस अखंड मौनाचा नियम धरावा. अशा मौनाच्या नियमानें प्रपंच व परमार्थाला फार उपयोग होतो.

"Energy is wasted in too much talking, loose thinking, unnecessary worry and vain fear. Gossiping & tall talk should be given up entirely. A real Sadhak is a man of few words, to the point and that too on spiritual matters only. Sadhaks should always remain alone. Maun is a great desideratum."

— *Shree Swami Shivanand Saraswati*

'**स्वाध्याय**' म्हणजे पवित्र ग्रंथांचें मननपूर्वक **वाचन** करण्याचा रोजचा नियम धरावा. वर्तमानपत्रादिक वाचण्याचें कमी करावें "Blessed are those who do not read newspapers." (जे वर्तमानपत्रें वाचीत नाहींत ते धन्य होत) असें स्वामी रामतीर्थ म्हणतात. आपल्या शास्त्रांत सप्त व्यसनें सांगितलीं आहेत. त्या काळीं वर्तमानपत्रें नव्हतीं. हल्लीं लोकांना हें एक आठवें व्यसनच लागलें आहे म्हणण्यास हरकत नाहीं. अभ्यासू विद्यार्थ्यांप्रमाणें कांहीं लोक पायखान्यांतसुद्धां वर्तमानपत्रें वाचण्याकरितां घेऊन गेलेले दृष्टीस पडतात! वर्तमानपत्रेंच काय, पण साधकांनीं शास्त्रग्रंथसुद्धां वाचण्याचें कमी केलें पाहिजे.

**ग्रंथमभ्यस्य मेधावी ज्ञानविज्ञानतत्परः ।**
**पलालमिव धान्यार्थी त्यजेद् ग्रंथमशेषतः ॥**

अशी उत्तरगीतेंत भगवंतांनीं अर्जुनास सूचना दिली आहे. या श्लोकाचा अर्थ असा कीं, मेधावी म्हणजे बुद्धिमान साधकानें श्रवणादिकांनीं वेदान्तग्रंथांचा अभ्यास करून ज्ञानविज्ञानतत्पर होत्साता, धान्यार्थी ज्याप्रमाणें धान्याचे कण घेऊन त्यांवरील कोंडा टाकून देतो, त्याप्रमाणें ग्रंथांचा 'अशेष' त्याग करावा. मुमुक्षूला सद्ग्रंथांचें वाचन साधक आहे, पण साधकाला तें बाधक आहे. कारण वाचनानें वृत्ति बहिर्मुख होत असते आणि साधकाला तर अंतर्मुखवृत्तीचा अभ्यास करावयाचा असतो. या दृष्टीनें वरील सूचना अगदीं विचार करण्यासारखी आहे.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**'ध्यानसाक्षात्कार'**—कांहीं साधकांना ध्यानावस्था लवकर साध्य होते. उपास्यमूर्तीच्या ध्यानांत किंवा नामजपांत चित्त अधिक एकाग्र होऊं लागलें म्हणजे श्रोत्रेंद्रिय व नेत्रेंद्रिय यांची शक्ति तीव्र होते ( वाढते ) व फार दूरचे शब्द अगदीं जवळ ऐकल्याप्रमाणें व फार दूरचें दृश्य अगदीं प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें दिसूं लागतें. थोडेंसें भविष्यही डोळ्यांसमोर चमकतें. हस्तस्पर्शानें किंवा पाण्यानें अथवा हाताच्या अंगाऱ्यानें रोग बरे करण्याची शक्ति येते. असें झालें म्हणजे आपणास एक मोठी सिद्धि प्राप्त झाली असें समजून साधक धन्यता मानतात व मिरवितातही. त्यायोगें त्यांची प्रगति खुंटून ते खालच्या पायरीवर येतात व आत्मसाक्षात्कारास मुकतात, हें त्यांना कळत नाहीं! असे लोक शेवटपर्यंत कच्चेच राहतात. वरील क्षुद्र सिद्धि सोडून द्या, पण यापेक्षांही मोठ्या सिद्धि, उदाहरणार्थ—मुंबईत गुप्त होऊन काशींत प्रगट होणें, षट्चक्रभेदन करून ब्रह्मरंध्रांत प्राण नेणें, तोंडानें बोलेल तें खरें होणें, इत्यादि–प्राप्त झाल्या तरी तो कच्चाच समजावा. गुरूचा खरा बच्चा नव्हे. मच्छेंद्रनाथ म्हणतात—

**"सोही कच्चा बे कच्चा बे। नही गुरूका बच्चा ॥ ध्रु० ॥**
**गुपत होकर परगट होवे, जावे मथुरा काशी।**
**ब्रह्मरंध्रसे प्रान निकाले, सत्यलोकका बासी ॥ सोही कच्चा बे० ॥...**
**कुंडलिनीको खूब चढावे, ब्रह्मरंध्रमो जावे।**
**चलताहै पानीके उपर मुख बोले सो होवे ॥ सोही कच्चा बे० ॥...**
**कहे मछिंदर सुन रे गोरख, तीनो ऊपर जाना।**
**कृपा भई जब सद्गुरुजीकी, आपआपकू चिन्हा ॥**
**सोही सच्चा बे सच्चा बे। ओहि गुरूका बच्चा ॥"** इत्यादि.

यावरून कच्चेपणाची व्याप्ति कुठवर पोंचेते ती पहावी व साधकांनीं अल्प तृप्त न राहण्याची म्हणजे आत्मलाभास न मुकण्याची खबरदारी घ्यावी.

**'उपवास'**—आहाराच्या संबंधानें मागें सूचना केल्या आहेत, त्या अत्यंत उपयोगाच्या आहेत. तथापि असा आहार घेत असतांही आठवड्यांतून किंवा पंधरवड्यांतून निराहार ( फक्त पाणी, लिंबाचा रस अथवा सरबत घेऊन ) उपवास करण्याचा नियम ठेवावा. अलीकडे राजकारणी लोकही असे उपवास करितात, पण

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आमचे वेदान्ती ' नाम घेतां ग्रासोग्रासी । तो नर जेविला उपवासी ' अशा वचनाचा आधार घेऊन ( त्यांतील रहस्य न जाणतां ) एकादशीसही चापून जेवतात, अथवा ' एकादशी दुप्पट खाशी ' या म्हणीप्रमाणें जेवणापेक्षां दुप्पट फराळ करितात ! हें त्यांचें मनोदौर्बल्य म्हणा किंवा इंद्रियलोभ झाकण्याची लपंडावी म्हणा, एक प्रकारची आत्मवंचना होय. उपवासाचें महत्त्व प्रत्येक धर्मांत सांगितलेलें आहे. मुसलमान लोक चाळीस चाळीस दिवस ' रोजा ' नांवाचा उपवास पाळतात. जैनांतही नऊ नऊ दिवस कडक उपवास पाळतात.

स्वर्गादि लोकप्राप्तीकरितां मोठमोठे यज्ञ सांगितले आहेत आणि ते यज्ञ मोठे कष्टसाध्य व द्रव्यसाध्य आहेत. पण असे कष्ट सोसण्याची किंवा द्रव्य खर्चण्याची ज्यांना शक्ति नाहीं, अशा दुर्बल व निर्धन लोकांनीं काय करावें, ते त्या पुण्यलोकप्राप्तीस आंचवले काय, असा प्रश्न परम कळवळ्यानें युधिष्ठिरानें भीष्माचार्यांस केला आहे. त्याचें उत्तर तितक्याच कळवळ्यानें ( म. भा. शांतिपर्वांत ) भीष्मांनीं दिलेलें आहे. त्यांत निरनिराळ्या उपवासानें निरनिराळ्या यज्ञाचें फळ मिळतें असें सांगितलें आहे. ' नाम घेतां ग्रासोग्रासीं । तो तर जेविला उपवासी ' याचा अर्थ हा आहे. उपवासानें रोग बरे करण्याचें शास्त्र अमेरिकेंतील एका विद्वानानें लिहिलें आहे तें पहावें व शारीर-आरोग्यासाटीं तरी निदान उपवासाचा नियम धरावा.

आरोग्यासाठीं उपवास करावा हें ठीक, परंतु तो मधल्या कोणत्याही तिथीस न करितां त्यास एकादशीतिथिच आमच्या निसर्गनियमज्ञ शास्त्रकारांनीं कां ठरविली आहे, याची शास्त्रीय मीमांसा, ' **पुरुषार्थ** ' कार पं. सातवळेकर यांनीं ' **एकादशीचा उपवास** ' ह्या पुस्तकांत सांगितली आहे. ती त्याच पुस्तकांत पाहण्याविषयीं आम्ही वाचकांना शिफारस करितों. ज्यांना संतवचनावर विश्वास आहे त्यांनीं पुढील वचनें प्रेमपुरःपुर पहावीं —

**" जे पर्वणी प्रिय चक्रपाणी । जे सकळ कल्याणाची श्रेणी ।**
**उभयपक्षां तारिणी । वैष्णव जननी एकादशी ॥**
**जो एकादशीचा व्रतधारी । मी नित्य नांदे त्याच्या घरीं ।**
**सर्व पर्वकाळांच्या शिरीं । एकादशी खरी पैं माझी । "**

— एकनाथी भागवत, अ. ११

**********************************************

श्रीतुकाराममहाराज म्हणतात —

**" पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ।**
**काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥"**
**" तयां दंडी यमदूत । जाले तयांचे अंकित ।**
**तुका म्हणे व्रत । एकादशी चुकलिया ॥ "** इत्यादि

भोळ्याभाविक लोकांपेक्षां पुष्कळ वेदान्ती लोक देहाचे चोचले करतांना दृष्टीस पडतात. देशभक्त लोकही जेवढी देहाची पर्वा करीत नाहींत, तेवढी देवभक्त व वेदान्ती लोक करितात, हें त्यांचें मनोदौर्बल्य आहे ! साधकांनीं हें दौर्बल्य झुगारून दिलें पाहिजे

**अहिंसा**, **सत्य**, **अस्तेय** ( म्हणजे दुसऱ्याची काडीचीही चोरी न करणें ), **निर्लोभता**, **दया**, **क्षमा**, **शांति**, **उद्योगप्रियता**, **निरालस्य**, **प्रिय** व **नम्रतेचें भाषण**, **अदंभित्व**, **निष्कपटपणा**, **विश्वास**, **धैर्य**, **लज्जा** ( एकांतांतही असत्कर्म करण्याबद्दल लाज वाटणें ), **कुलाचार** पाळणें, **श्राद्धादि** नैमित्तिक कर्में श्रद्धेनें करणें, आपल्यापेक्षां श्रेष्ठ ( वयानें, विद्येनें वा गुणानें ) माणसांना योग्य **मान** देणें, **तेज**, **बल**, **निर्भयता**, **निःस्पृहता** ( निष्ठुरता नव्हे ), **निर्मत्सरता**, **कृपालुत्व**, **प्रेम**, ( सज्जनांशीं ) **मैत्री** ( दीन जनाची ), **करुणा** ( पुण्यवान लोक पाहून ), **मुदिता** म्हणजे मोद अथवा आनंद, आणि ( पापी लोकांबद्दल ) **उपेक्षा** म्हणजे उदासीनता, इत्यादि इत्यादि दिव्य गुणांचा अभ्यास साधकांनीं करावा. हे गुण परमार्थाच्या पुस्तकांत दिले आहेत, म्हणून ते परमार्थाच्याच उपयोगी असें समजूं नये; प्रपंचसुद्धां सुखाचा, आनंदाचा असावा असें ज्यांना वाटतें, त्यांनीं या गुणांचा अभ्यास केला पाहिजे. किंबहुना हे परमार्थाचे गुण प्रपंच चांगला होण्याकरितांच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरील गुणांच्या उलट असत्य, चोरी, भय, अधैर्य, कपट, दंभ, मत्सर, इत्यादि अवगुण अंगीं असणाऱ्याचा प्रपंच कधीं चांगला होईल काय, याचा विचार करावा. तसेंच ज्या घरांत एकमेकांशीं प्रेम, विश्वास, शांति सहिष्णुता, इत्यादि नांदणार नाहींत, त्या घरांत गजान्तलक्ष्मी असली तरी सुख लाभेल काय? केव्हांच नाहीं. उलट, प्रारब्धानें गरीबी असली, एक वेळ जेवण, एक वेळ उपवास करण्यासारखी परिस्थिति असली, पण एकमेकांविषयीं प्रेम, विश्वास व सहिष्णुता असली, तर त्या घरास सुख आणि शांतीचें साम्राज्य लाभल्यावांचून राहणार नाहीं. तात्पर्य **परमार्थमार्गांतील गुण हे प्रापंचिक सुखालाच अधिक**

**कारणीभूत आहेत**, यांत बिलकूल संशय धरूं नये. आणि मागें सांगितल्या-प्रमाणें ह्या दिव्य गुणांचा प्रपंचांतच राहून चांगला अभ्यास करितां येतो, अर्थात् **प्रपंच हा परमार्थाची तालीम आहे** असें समजावें व तो उत्तम रीतीनें करावा.

**'दानधर्म'** — प्रपंचांत आज कोणास जें सुख व ऐश्वर्य प्राप्त झालेलें दिसतें, तें पूर्वदत्ताचें फळ असल्यामुळें, आतांही भाग्यवंतांनीं यथाशक्ति दानधर्म करीत असलें पाहिजे. निर्धन असून अतपस्क व धनिक असून अदाता असेल त्यास नदींत बुडवावें असें विदुरनीतींत सांगितलें आहे. लक्ष्मीपिता असण्यापेक्षां लक्ष्मीपुत्र किंवा लक्ष्मीपति व्हावें. नानाप्रकारचे कष्ट करून पोटालाही न खातां जो द्रव्य मिळव मिळव मिळवीत असतो, तो **लक्ष्मीपिता** होय; त्याला या जन्मांतही भोग नाहीं, व दान न केल्यामुळें पुढील जन्म दरिद्राचा येतो; आप्त, इष्ट, देव व पितर हे त्यास विन्मुख होतात, त्यांच्या अवकृपेस हा पात्र होतो! आतां जो मनुष्य परोपकाराकरितां द्रव्य न वेंचतां आपण व आपलीं बायकामुलें यांच्याकरितांच संपत्तीचा व्यय करितो तो **लक्ष्मीपुत्र** होय, त्याचा इहलोक सुखाचा होतो, पण दानाची पेरणी करून न ठेवल्यामुळें परलोक व पुढील जन्म सुखाचा होत नाहीं आणि जो मनुष्य आपल्या स्वतःच्या व कुटुंबाच्या सुखाकरितां पैसे खर्च करून दीन जनांच्या कल्याणाकरितां व अडलेल्यांच्या उपयोगाकरितां, तसेंच दयापात्राप्रमाणें दानपात्र मनुष्याकरितां द्रव्याचें दान करितो, तो **लक्ष्मीपति** होय. अशा मनुष्याचा इहलोक सुखाचा व कीर्तीचा होऊन, परलोकांतही त्याची खुर्ची 'रिझर्व' करून ठेवलेली असते. धन हें अनेक अनर्थांचें मूळ आहे, तसेंच सर्व सुखाचें उगमस्थानही आहे, ( Money is the root of all evils & source of all happiness ).

धनाचे **दान**, **भोग** व **नाश** असे तीन परिणाम शास्त्रांत सांगितले आहेत. जो दान करीत नाहीं व भोगही भोगीत नाहीं, त्याचा 'नाश' हा तिसरा परिणाम ठरलेला असतो. दान हा सात्विक, भोग हा राजस आणि नाश हा तामस परिणाम होय. दानधर्मांत खर्च केलेलें धन हें बीजरूपानें आपल्याबरोबर मरणोत्तरही येतें. तीच आपली खरी जिंदगी होय. स्वतःच्या सुखाकरितां अथवा चैनीकरितां उडविलेले पैसे किंवा मुलांबाळांकरितां ठेवलेले पैसे ही आपली जिंदगी खास नव्हे, ती इकडच्या इकडेच राहणारी होय. करितां धनिकांनीं आपला खरा स्वार्थ साधण्याकरितां यथाशक्ति दानतत्पर असणेंच योग्य आहे. पण कुटुंबास किंवा स्वतःसही उपवास पाडून दान करणें हा एक अधर्म होय असें भागवतांत सांगितलें आहे.

************************************************

करितां असें न करितां दैवानें धनप्राप्ति झाली असल्यास त्याचा उपयोग कुटुंबरक्षण करून, पंचमहायज्ञ, देवपूजा, महोत्साह, तीर्थयात्रा, अतिथिपूजन, इत्यादि सत्कर्मे करण्याकडे करावा. नाथभागवतांत याबद्दल फारच सुंदर सूचना दिली आहे —

"दैवें जोडलिया धन । आचरावे पंचमहायज्ञ ।
करावें भगवत्पूजन । उल्हासें जाण महोत्सावो ॥...
जित्या पितरां त्रिकाळीं नमन । कदां न करावें हेळण ।
त्यांची अवज्ञा आपण । प्राणांतीं जाण न करावी ॥
त्यांसी गौरवूनि आपण । यथारुचि द्यावें अन्न ।
यथाशक्ति द्यावें धन । सेवेनें संपूर्ण सुखी करावीं ॥...
ज्याचे सेवेनें सुखी पितर । तेंचि पितृतर्पण साचार ।
जितां अवज्ञा तो अनाचार । मेल्या श्राद्धविचार तो लौकिक ॥...
बंधु स्वगोत्र स्वजन । त्यांची दरिद्रपीडा दारुण ।
निरसावी देऊनि धन । हा मुख्य धर्म जाण श्रेष्ठत्वें ॥
कुटुंब पीडूनि आपण । अन्यत्रां द्यावें अन्नधन ।
तोचि अधर्म परिपूर्ण । शुद्ध पुण्य तें नव्हे ॥
कुटुंबासी यथोचित । सुखी करूनि समस्त ।
याहूनि उरला जो अर्थ । तो श्रेयार्थ वेंचावा ॥ ...
कुटुंब सुखी करी आपण । स्वेच्छा दे दीनभोजन[1] ।
परी कदर्थवी[2] जो निजप्राण । तोही दारुण अधर्म ॥
जैसें कीजे दीनतर्पण[3] । त्यांत आपणही एक दीन ।
येथ न करूनि अधिक न्यून । करावें भोजन समभागें ॥ ...
धनाचा सद्व्ययो खरा । द्यावें अनाथप्रेतसंस्कारा ।
अर्पावें दीनांच्या उद्धारा । धाडावें घरा अयाचितांच्यां[4] ॥
अंध पंगू मुके दीन । यांसी संरक्षी जो आपण ।
त्याचेंचि सार्थक धन । शुद्ध पुण्य तयाचें ॥
साधु सज्जनां विचंबू[5] अडी । तो विचंबू जो सधन तोडी ।
त्याच्या निजधर्माची गुडी । उभारे रोकडी वैकुंठीं ॥

---

१ गरिबांस भोजन. २ कष्टवितो. ३ तृप्ति. ४ गरज असते, पण तोंड पसरून मागूं शकत नाहीं, अशांच्या घराला मुद्दाम पोंचवावें. ५ कुचंबणा, अडचण.

दुर्बळ जो कां भगवद्भक्त। त्यासी संरक्षी जो धनवंत।
तेणें तुष्टला भगवंत। त्यातें उद्धरति भक्ताआधीं॥...
जो चढत्या वाढत्या भगवद्भक्तीं। गुरूसी अर्पी निजसंपत्ति।
त्यातें अंगीकारूनि लक्ष्मीपति। आपुली निजभक्ति त्यासी दे॥...
दैवें जोडिली संपत्ति। ते वेंचोनि ऐशी निगुति।
अर्थें परमार्थप्राप्ति। सभाग्य लाहती निजनिष्ठा॥" ...

— एकनाथी भागवत, अ. २३, श्लो. २४ टीक

"जया धनाचेनि पांगें। हा धर्मचि आलासे निजांगें।
जेवीं पायाळाचेनि योगें। महानिधि वेगें आतुडे हातीं॥...
जेवीं एकादशीव्रतयोगें। जागरीं गीतनृत्यपांगें।
तुष्टला देवो लागवेगें। आतुडे धनयोगें निजभक्तां करीं॥
तेवीं धनाचिये पाठोपाठीं। परमधर्मासी पडे गांठीं।
धर्म तेथ उठाउठीं। ज्ञानाची भेटी विज्ञानेंसीं॥"

— एकनाथी भागवत, अ. ५, श्लो. १२

असा धनाचा उपयोग करणारास उत्तम गति प्राप्त होते. तसें न करितां जो लोभानें धनाचा संग्रह करितो, त्यास उलट म्हणजे निरयगति प्राप्त होते.

धनाचे चार वांटेकरी आहेत.

"चत्वारो धनदायादा धर्माग्निनृपतस्कराः।
तस्यां ज्येष्ठावमानेन त्रयः कुप्यन्ति बांधवाः॥"

(अर्थ) धनाचे **धर्म, अग्नि, नृप व तस्कर** (म्हणजे चोर) असे चार दायाद आहेत. त्यांपैकीं ज्येष्ठाचा अपमान झाला कीं, तिन्ही बंधु रागावतात. अर्थात् धनाचा उपयोग धर्मार्थ केला नाहीं, तर याच्या घरास वगैरे आग लागते; कसल्या तरी कारणानें राजदंड भरणें प्राप्त होतें, अथवा चोर चोरी करून घेऊन जातो. (डॉक्टरची किंवा वकिलाची फी ही तिसऱ्या सदरांत येते). तात्पर्य, पूर्वदत्ताप्रमाणें मिळालेलें धन सत्कार्यीं अथवा सत्पात्रीं दान करून ईश्वराच्या सेव्हिंग बँकेंत जमा करून ठेवणें हें कल्याणकारक आहे. ही सेव्हिंग बँक एका जन्माची नसून जन्मोजन्मीं कल्याण पुरविणारी आहे.

निर्धनानें सुद्धां यथाशक्ति दानतत्पर राहावें. कारण पूर्वजन्मीं दान न केल्यामुळें 'नादत्तमुपतिष्ठति' (न दिलेलें मिळत नाहीं), 'पेरल्याशिवाय उगवत नाहीं' या

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

सृष्टिनियमाप्रमाणें या जन्मीं धन मिळालेलें नाहीं, हें लक्षांत आणावें आणि ही चूक भरून काढण्याकरितां या जन्मीं देत राहावें. जेवणास बसण्यापूर्वी कावळ्याकुत्र्यास (काकबलि) अन्न बाहेर घातल्याशिवाय जेवूं नये. त्यापूर्वी भातांत चांगलें तूप मिसळून तें अग्निनारायणास अर्पण करण्याचो वहिवाट ठेवावी. अन्न दान केल्याशिवाय ग्रहण करूं नये. ब्राह्मणाच्या घरीं देवपूजा, नैवेद्य, वैश्वदेव, बलिहरण, वगैरे करण्याची वहिवाट याच हेतूनें आहे. इतकें विधियुक्त रीतीनें होत नसलें तर वर लिहिल्याप्रमाणें अमंत्रक पण श्रद्धायुक्त अंतःकरणानें करीत असावें. हा नियम धनिकांनींही ठेवावाच. निर्धनांनीं शनिवारीं, मंगळवारीं अश्वत्थ, औदुंबर, वगैरे पुण्यवृक्षाखालीं मुंग्यांना थोडीशी साखर तरी घालण्याचा नेम धरावा. धनिकांनीं 'असाक्षिभोजन' न करणेचा (पंक्तीस कोणास तरी घेतल्याशिवाय न जेवण्याचा) नियम धरावा. तसेंच देवानें घरांत नोकरचाकर दिले असल्यास त्यांना उर्मटपणानें दुरुत्तरें बोलूं नयेत. प्रेमानें वागवावें. जशी त्यांना पैशाची गरज असते तशीच तुम्हांस त्यांच्या कामाची गरज असते. या दृष्टीनें आपण दोघेही सारखेच गरजू आहों असें जाणावें. त्यांच्यावांचून आपलें अडणार नाहीं असें वाटलें तरी, आपल्यावांचून त्यांचेंही अडणार नाहीं, असें पक्कें जाणून नोकरचाकरांकडे प्रेमानें वागावें. त्यांच्या कुटुंबाची प्रेमपुरःसर काळजी घ्यावी. त्यांचें वेतन वेळच्या वेळीं द्यावें. वेतनासाठीं त्यांना तोंड पसरणेस लावूं नये. ते लोक फुकट पैसे घेत नाहींत, कामाचा मोबदला तुम्हांस देऊन तुमच्याकडून पैसे घेतात. पण हक्काचे पैसे झाले तरी मागण्यास किती जड वाटतें हें त्यांचें त्यांनाच माहीत! करितां त्यांना त्यांचें वेतन, फुकटचे शाप न घेण्यासाठीं, अगदीं वेळेवर देत जाऊन त्यांचे मूक आशीर्वाद घ्यावे. त्याचप्रमाणें तुमच्या घरीं ईश्वरकृपेनें गोधन असेल, तर त्यांची शुश्रूषा नोकरावरच न सोपवितां, स्वतः थोडीशी करीत राहावी. गायीला पेंढेबर्फी चारण्यापेक्षां स्वतः तिच्याजवळ जाऊन तिच्या पाठीवरून तुम्ही तुमचा प्रेमाचा हात फिरविला, तिचें अंग कुरवाळलें (खाजविलें) तर तिला जें सुख होईल व तिच्या अंतरात्म्याचे जे आशीर्वाद मिळतील, ते दुसऱ्या कशानेंही मिळणार नाहींत हें लक्षांत ठेवावें. घरांत गोपालन करावें. निदान म्हशीचें दूध न घेतां गायीचें दूध घेत असावें. गायीचें दूध शरीराच्या व मनाच्याही आरोग्यास फार उपयोगी आहे.

'**मुलांचें शिक्षण**' करण्यासाठीं त्यांना शाळेंत घालून घरींही शिकविण्यास शिक्षक नेमल्यानें तुमचें कर्तव्य संपत नाहीं. हातांत पैसे झाले म्हणजे, 'देवाला भट व मुलाला मास्तर' लावून पुष्कळ आईबाप मोकळे होतात! नंतर देवाकडेही पाहत

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

नाहींत व मुलांकडेहि लक्ष देत नाहींत, ही मोठी चूक आहे! मुलांस सुसंस्कार लागण्याकरितां योग्य शाळेंत घालणें व घरांतही योग्य शिक्षक नेमणें व तो काय शिकवितो, कसें शिकवितो हें पाहाणें तुमचें कर्तव्य आहे. मुलांच्या शिक्षणास शाळेंत घातल्यानंतर सुरुवात होते, असें समजणें चुकीचें आहे. लहान मूल डोळ्यांस डोळे लावून पाहूं लागलें कीं त्या वेळेपासून त्याच्या शिक्षणास सुरवात होते. आईनें व बापानें त्या वेळेपासून त्याच्याकडे हेतुपुरःसर पाहून ( मोहानें पाहून नव्हे ) दृष्टीच्या किरणांनीं त्यास शिकवीत राहिलें पाहिजे, अभ्युदयाचे शुद्ध व उत्तम विचार दृष्टीमधून त्याच्या दृष्टींत व दृष्टींतून हृदयांत ओतीत राहिले पाहिजेत, असें एका पाश्चात्य विद्वानाचें मत आहे. आमच्या जुन्या शास्त्रानें तर याच्यापेक्षांही सूक्ष्म विचार केलेला आहे. मुलास शिक्षण, तें गर्भांत असतांनाच देऊं लागलें पाहिजे. मूल ज्या तऱ्हेचें निपजावें अशी आपली इच्छा असेल, त्या तऱ्हेचें शिक्षण गर्भिणी मातेला देऊं लागावें. मूल उत्तम गवयी व्हावें अशी इच्छा असेल तर गर्भिणाला गायन शिकवावें ; मूल शूरवीर निपजावें असें वाटत असेल तर गर्भिणीला चांगल्या शूरवीरांच्या गोष्टी सांगत राहावें ; मूल भगवद्भक्त निपजावें असें वाटत असेल तर गर्भिणीला भक्तीच्या व भक्तांच्या गोष्टी सांगत असाव्या, इत्यादि. हा विचार मानसशास्त्राला धरून असल्यामुळें पाश्चात्यांनींही त्याचा स्वीकार केला आहे. आपल्या पुराणांत सती मदालसा हिनें आपल्या पुत्रांना पाळण्यांतच वैराग्याचा व ज्ञानाचा उपदेश केलेला प्रसिद्ध आहे. प्रल्हादाची माता कयाधू हिला तर श्रीनारद देवर्षींनीं ती गर्भिणी असतांनाच भागवत धर्माचा उपदेश केला होता तोच मग प्रल्हादांत उमटला. ही गोष्टही प्रसिद्ध आहे. तेव्हां अशी सुसंतति आपल्या कुळांत उत्पन्न व्हावी म्हणून पित्यानें कुलीन, सुशील व सुविद्य पत्नीशीं विवाह करण्याची काळजी प्रथमपासून घेतली पाहिजे आणि अशा सुसंततीची व तिच्या शिक्षणाची वर सांगितलेल्या दृष्टीनें काळजी घेणें, हें सृष्टिकर्त्या परमेश्वराच्या संकल्पास अनुसरून आणि साहाय्यकही असल्यामुळें ही एक परमेश्वराची सेवाच होय, हें विसरतां कामा नये. मुलाला नुसतें पुस्तकी शिक्षण न देतां, कुलाच्या व समाजाच्या इभ्रतीप्रमाणें प्रपंचभार घेऊन तो चालविण्यास त्यानें समर्थ व्हावें अशा तऱ्हेचें व अशा धोरणानें त्याला शिक्षण देण्याची काळजी घ्यावी व आपल्या ५० व्या किंवा ६० व्या वर्षीं तरी निदान, त्या मुलानें 'तुम्ही खुशाल परमार्थ साधण्यास हवे तिकडे जा अथवा हवे तसे राहा' असें सांगण्याइतकें कुवतवान व्हावें, अशी इच्छा करावी. ( असें घडून येण्यास आपल्या वयाच्या ३० व्या वर्षीं तरी निदान पुत्रोत्पादन झालें पाहिजे. ) असा पुत्र प्रपंचभार घेण्यास समर्थ झाल्यानंतर

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

मागें सांगितल्याप्रमाणें कुटुंबसंस्थेचा भार त्याजवर घालून आपण साधल्यास कर्तव्यबुद्धीनें व परोपकारबुद्धीनें समाजकार्य, किंवा ' शुद्ध परमार्थ ' साध्य करण्यासाठीं दुसरीकडे कोठेंही अथवा घरीं एकांतवासांत राहण्याची तयारी करावी. घरांतच अतिथिवत् राहून परमार्थसाधन होत असल्यास, घर मोडून बाहेर कोठें जाण्याचें कारण नाहीं. पण मुलें मोठीं झालीं व त्यांच्या हातांत कारभार आला म्हणजे तीं आपल्या मनाप्रमाणें वागूं लागतात, वडिलांचें सांगणें ऐकत नाहींत, त्या वेळीं राग येण्याचा संभव असतो. पण राग आवरण्याचाही तोच समय अथवा संधि असते, हें जाणून सर्वांचें सोशीत गेलें पाहिजे. आपले ' विलायतेस ' जाण्याचे दिवस जवळ आलेले असतात, तेव्हां सर्वांशीं गोडीगुलाबीनें वागून, आपल्या प्रवासाची तयारी ( वाटेवर लागणारें पाथेय म्हणजे फराळ सामान वगैरे ; लाडू, कडबोळीं नव्हेत, तर धर्मसाधनसंचय ) करण्यास त्यांची मदत घेऊन, येथील मुदत संपल्याबरोबर तोंड वांकडे न करितां आनंदानें जाणें बरें नव्हे काय ? आपल्या कामाचा चार्ज ( व्यवस्थेचा बोजा ) दुसऱ्याकडे दिल्यानंतर ( कर्मभूमीच्या कायद्याप्रमाणें केव्हां तरी दिलाच पाहिजे ) उगीच पुनः तिकडे लक्ष देऊन आपली शक्ति ( Energy ) फुकट कां खर्च करावी ? ती शक्ति पुढील प्रवास ( हा फारच मोठा असतो ) सुखकर होण्यासाठीं खर्चीत राहणें हिताचें नव्हे काय ? मुलांची विरुद्ध वागणूक सहन होत नसेल, त्यांच्या वर्तनानें आपलें समाधान बिघडत असेल, तर सुखासमाधानानें देशांतर करणेंच बरें.

**" दुसऱ्याचें अभीष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें ।**
**न सोसे तरी जावें । दिगंतराप्रति ॥ "** — दासबोध

याप्रमाणें बोटीचें तिकिट अगोदरच काढून ठेवावें. म्हणजे बोट येतांक्षणींच चढणेंस बरें पडतें. नसलेस फार गोंधळ उडतो.

पूर्वींच्या राजर्षींची पद्धत अशीच होती. ते आपल्या पुत्रांस योग्य शिक्षण देऊन तयार करीत व त्याला राज्याभिषेक करून आपण तपोवनांत निघून जात आणि तेथें अंतकालपर्यंत शांतपणें योग्य तऱ्हेनें तपश्चर्या करीत राहत. हल्लींही अनेक पुण्यवान साधक म्हातारपणीं काशी, हरिद्वार, हृषीकेश, मथुरा-वृंदावन, वगैरे पुण्यक्षेत्रांत जाऊन आयुष्याचा शेवटचा भाग तेथें देवसेवेंत व सत्संगांत घालविण्याचा निश्चय करून आनंदांत राहिलेले दृष्टीस पडतात. घराकडून दर महिन्यास खर्चापुरतें पेनशनचे किंवा खाजगींतील रुपये मागवितात. घरांतील बऱ्यावाईट गोष्टींचें

वर्तमानही न कळविण्याबद्दल मुलांला ताकीद दिलेली असते; फक्त "तुम्ही खुशाल, आम्ही खुशाल' एवढेंच पत्र लिहावयाचें, असे ठरविलेलें असतें. याचें कारण, कालगतीस अनुसरून केव्हां तरी सर्वांना सोडून जावयाचें असतें, मोह धरून कांहीं चालत नाहीं, तेव्हां कालानें जबरीनें मोहांतून सोडविण्यापेक्षां, आपण जाणून बुजून तो आधींच सोडलेला सुखाचा नाहीं काय? असा विचार करून देहरक्षणापुरती अन्नवस्त्राची तरतूद करून ते सत्संगांत आनंदानें काळ घालवीत राहतात. कित्येक तर आपल्या साध्वी पत्नीसहित राहिलेले आढळतात.

निर्धन साधकांना अन्नवस्त्राची काळजी पडूं नये म्हणून हृषीकेश वगैरे क्षेत्रांमध्यें पुण्यवंतांनीं अन्नछत्रें ठेवलीं आहेत. अशी सोय आपल्या हिंदुस्थानावांचून इतर देशांत पहावयासही मिळणार नाहीं. (याचा फायदा कांहीं लबाड लोकही घेतात, त्यास उपाय नाहीं). घरदाराचा त्याग करून केवळ परमार्थसाधनासाठीं अशा क्षेत्रीं येऊन राहिलेल्या साधकांना अन्नवस्त्राच्या दानाबरोबर, आजारीपणांत औषधोपचार व शुश्रूषा करण्यासाठीं पुण्यवंतांनीं मोठमोठीं रुग्णालयें (हॉस्पिटलें) ही स्थापन केलेलीं आहेत. हरिद्वाराजवळ कनखळ नांवाच्या क्षेत्रांत तसलें रुग्णालय श्रीरामकृष्णपरमहंस-मठाच्या संस्थेनें उत्तम रीतीनें चालविलेलें दृष्टीस पडतें. तेथें रोग्यांची शुश्रूषा करणारे स्वयंसेवक संन्यासीच आहेत! (साधक भगवत्प्राप्तीच्या तीव्र इच्छेनें घरदार सोडून बाहेर पडल्यास त्याचा योक्षमोक्ष भगवान चालवितो, याचा प्रत्यय आल्यावांचून राहत नाहीं. आधुनिक संत स्वामी विवेकानंद, रामतीर्थ, वगैरे यांनींही हें तत्त्व आपल्या उदाहरणानें जगाच्या निदर्शनास आणून दिलें आहे.) उत्तर हिंदुस्थानांत असे साधकाश्रम अनेक आहेत. तसे अनेक प्रांतांत असणें जरूर आहे. अशा साधकाश्रमांत म्हातारपणीं चिरकाल नसलें तरी वर्षांतून कांहीं महिने तरी शुद्ध साधकावस्थेंत—साधनाभ्यासांत—निरुपाधिकपणें राहण्याची प्रथा पाडली पाहिजे. ही सोय त्या संस्थेच्या खर्चानें होणें शक्य नसेल, तर स्वतःच्या खर्चानें करून घ्यावी. पण वर्षांतून कांहीं दिवस तरी घरांतल्या उपाधि अगदीं सोडून देऊन राहण्याची साधकांनीं मनाला सवय लावून घेतली पाहिजे. पंढरीच्या आषाढकार्तिकीच्या वाऱ्या व इतर क्षेत्रांतील अथवा पुण्यस्थलांतील तशा प्रकारचे उत्सव हे याच उद्देश्यानें पुण्यपुरुषांनीं नियोजित केलेले आहेत. संतस्थानांतील किंवा गुरुस्थानांतील वार्षिक उत्सव याच उद्देशाचे असतात. पण कित्येक ठिकाणीं तशा प्रसंगीं जेवणखाण्याच्या गर्दीत व भजनाच्या अथवा पालखी मिरवणुकीच्या धांगडधिंग्यांतच (?) भक्त-

जनांचा सारा वेळ गेलेला दिसून येतो ! इतर करमणुकीपेक्षां ही सात्त्विक करमणूक बरी; परंतु यापेक्षांही रजाचा लेश नसलेली 'शुद्धसात्त्विक' वृत्ति उत्पन्न होण्याचे कार्यक्रम होतील तर अधिक बरे. याचा विचार साधकांनीं करावा. आपल्या परिस्थितीस जुळतील असे सुखावह नियम आपणच ठरवावे व त्याप्रमाणें वागावें. त्यांनीं आपली दिनचर्याच अशी आंखावी कीं त्यायोगें मनाला इकडे तिकडे भटकण्यास वावच मिळूं नये. रात्रौ हवें तर लवकर निजून पहाटे तीन किंवा चार वाजतां उठावें. या कालास 'ब्राह्मी मुहूर्त' म्हणतात. साधनाच्या सिद्धीला हा काल फारच अनुकूल असतो. ध्यान, धारणा, नामजप, वगैरे गुरूक्त साधनांचा अभ्यास याच वेळीं करणें इष्ट आहे. साधकांनीं एकाच बैठकीवर निदान एक प्रहर बसून नामस्मरण करावें. नामस्मरणाचे तीन-चार प्रकार पुढें '**नामयोग-रहस्य**' प्रकरणांत सांगितले जातील. त्यांतील आपल्या बुद्धीस तोलेल तो एक किंवा अनेकही धरण्यास हरकत नाहीं. प्रातःस्नानाचा अभ्यास ठेवावा. आपापल्या ज्ञातिधर्माप्रमाणें तिलकधारण,[१] संध्या, पूजा, गीतादि पवित्र ग्रंथांचें पारायण, इत्यादि नियम सकाळपासून संध्याकाळपर्यंत शरीराला व मनाला लावून घ्यावे. ( मथुरावृंदावनादि क्षेत्रांत सत्संगामध्यें राहिल्यास साधकाच्या वृत्तीस अनुकूल असे नियम आपोआप लागतात. ) विजातीय वृत्ति उठण्यास मनाला फुरसतच मिळूं देऊं नये. घरांतील स्त्रियांस व बालकांसही मान देऊन वागावें. बालकांलासुद्धां आपला अभिमान ( Self-respect ) म्हणून कांहीं असतोच. त्याला धक्का न लागेल असें आपलें बोलणें-चालणें असावें. स्त्रिया तर गृहलक्ष्मीच होत. नवरेबाजीच्या तोऱ्यांत त्यांचा अपमान न करितां व विषयमोहानेंही त्यांकडे न पाहतां, कर्तव्यबुद्धीनें त्यांच्या धर्म्य अशा इच्छा पुरविण्यानें, त्यांना सन्मानानें वागविण्यानें ( युरोपियनांचा सन्मान नव्हे, तर धर्मसन्मान देऊन वागविण्यानें ) त्यांचें चित्त प्रसन्न राहतें. धर्मानुकूल प्रसन्न चित्तानें राहणाऱ्या स्त्रियांच्या कुटुंबांत

---

१ तिलकधारणादि बाह्य चिन्हांचा फार उपयोग सांगितला आहे. सरकारचे पोलीस व लष्करी कामदार वगैरेंच्या पोषाखावर त्यांचे दर्जे दर्शविणारे सरकारी बिल्ले वगैरेंच्या खुणा असतात, त्या पाहून सामान्य लोक जसे त्यांना वचकून वागतात, त्याप्रमाणें धार्मिकांच्या अंगावरील भस्माचे त्रिपुंड्र अथवा तिलकमुद्रादि बाह्य चिन्हें पाहून पारमार्थिक उन्नतीला विघ्न करणारे भूतप्रेतपिशाचादि 'विघ्नकर्तार' दुष्ट जीव दूर राहतात. याबद्दलचें विशेष व सोपपत्तिक विवेचन जिज्ञासूंनीं श्रीगुलाबराव-महाराजांच्या संप्रदाय-सुरतरु' ग्रंथांत पाहावें.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

देवदेवताही आपल्या कल्याणकारक शक्तीनें वास करितात. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' या मनुवाक्याचें तात्पर्य हेंच आहे. असो. सुवासिनी स्त्रियांप्रमाणें विधवांनाही मानानें वागवावें. त्यांची त्यागवृत्ति संन्याशाच्या त्यागवृत्ती-इतकीच सन्माननीय लेखली पाहिजे. (पण समाज तसें लेखीत नाहीं ही मोठी चूक आहे. हें पाप आहे.) घरच्या वडिलांस, बाहेरच्याही श्रेष्ठांस, विद्वानांस, साधुसंत संन्यासी यांस योग्य मान द्यावा. आरोग्याकरितां सकाळ-संध्याकाळ मोकळ्या हवेंत फिरावयास जावें. सकाळचा वेळ प्रातःस्नान करून आन्हिकांत गुंतला असेल त्यांनीं संध्याकाळींच फिरावयास जावें. पण एकटेंच फिरावयास जाणेची वहिवाट ठेवावी. दुसऱ्याच्या संगतीवांचून आपणा स्वतांतच रममाण होण्याचा अभ्यास करावा. 'अरतिर्जनसंसदि' म्हणजे प्राकृत (संसारी) लोकांच्या संपर्का-पासून अलिप्त असावें. सृष्टिसौंदर्य पाहून भगवंताच्या सौंदर्यगुणाची उपासना करावी. विश्वांत विश्वेश्वर पाहण्याचा अभ्यास एकाकी फिरत असतां चांगला होतो, अथवा तो मुद्दाम करावा. 'विश्वांत विश्वेश्वर' म्हणजे दुधांत साखर अशा रीतीनें नव्हे तर मागें (पृष्ठ १५२ ते ५७) सांगितल्याप्रमाणें अलंकारांत सुवर्ण या दृष्टीनें अर्थात् 'विश्वरूपानें विश्वेश्वर' पाहण्याचा अभ्यास करावा. **'चैतन्याचें अन्यथा भान । तें हें जाण चराचर'** या वचनाचा निदिध्यास लावून घ्यावा. एकांतांत बसल्या वेळीं मागें सांगितल्याप्रमाणें (पृष्ठ १५६) षट्समाधी-पैकीं अंतर्दृश्यानुविद्ध व अंतःशब्दानुविद्ध समाधीचा अभ्यास करावा आणि बाहेर फिरावयास गेल्या वेळीं बाह्य शब्दानुविद्ध आणि बाह्य दृश्यानुविद्ध समाधीचा अभ्यास करावा. म्हणजे अंतर्निर्विकल्प समाधि व बाह्य निर्विकल्प समाधि साधतील. रात्रौ पवित्र ग्रंथांचें वाचन व भजन यांचा नेम ठेवावा. भजनांतील अभंग अथवा पदें उगीच भलतीं सलतीं न निवडतां आपल्या अंतःकरणाच्या चालू परिस्थितीस योग्य असतील तींच निवडावीं. भजनरंगांत रंगलेल्या मनानेंच भगवच्चिंतन करीत झोपीं जावें. तरुण साधकांनीं 'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ' (धर्माला अविरुद्ध असलेला काम मी आहें – गीता अ. ७।११) या भगवद्वचनाचें स्मरण करून कामसेवन करावें. स्वस्त्री निकट असतांना इंद्रियांना विकार होऊ न देण्याचा, अथवा झाला तरी तो "**ब्रह्मैवाहं अहं ब्रह्म न चाहं ब्रह्मणः पृथक् । नाहं देहो न मे देहः केवलोऽहं सनातनः**" इत्यादि वचनांचें स्मरण व उच्चारण करून वृत्तीनें देहभाव सोडून ब्रह्मभाव अवलंबावा व इंद्रियें लगेंच निर्विकार (निश्चेतन) करावीं. याच दृष्टीनें मागें (पृ. १३०) 'बायको ही काम जिंकण्याकरितां' साधन असल्याचें दर्शविलें

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आहे. ( मागील पृ. २८८ ते २९३ वरील 'ब्रह्मचर्य' हा विषयही पुनः वाचून मनन करावा ). तात्पर्य, आनंदानें प्रपंच करून परमार्थही आनंदानें साधण्याचे नियम आपले आपण बसविले पाहिजेत.

**परमार्थांत तीव्रता असावी, पण उतावीळता नसावी,** ही गोष्ट साधकांनीं लक्षांत वागवावी. कित्येक साधक गुरूक्त साधन करीत असतां, 'अजून कांहींच अनुभव येत नाहीं,' असें म्हणून खिन्न अथवा क्षुब्ध होतात. गुरुभक्त व देवभक्त साधक अशा वेळीं गुरूवर व देवावरही रागावलेले दृष्टीस पडतात. कित्येक तर प्राणत्यागापर्यंत मजल नेतात! पण हें योग्य नाहीं. अशा करण्यानें आपण परमेश्वराच्या दयालुत्वावर व सर्वज्ञत्वावर अविश्वास करितों, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. परमेश्वर आपल्या सर्व कृति जाणतो आहे, तो आपला उद्धार करीलच करील, आपल्यामध्यें कांहीं उणीव असेल, अपक्वता असेल, ती भरून निघण्याकरितांच अजून कृपा दर्शवीत नाहीं, झाडावरचा अगदीं कच्चा आंबा काढून तो गवतांत पिकत घातला असतां तो त्वचेनें पालटेल, पण रसानें पक्व होणार नाहीं, तसा तो झाडावरच चांगला जून होण्यापर्यंत आपण दम धरला पाहिजे, या दृष्टीनें परमेश्वर माझ्या पक्वतेची वाट पाहात असेल, मला अधिक शक्तिसंपन्न करण्याची त्याची इच्छा असेल, त्याचे नियम अढळ आहेत, इत्यादि विचार मनांत आणून आपण दम धरला पाहिजे. "**तुका म्हणे येथें न चाले तातडी। प्राप्तकाळ घडी आल्यावीण ॥**" हें वचन याच अर्थाचें आहे. सद्गुरूची भेट होऊन त्यांनीं कांहीं चोरून न ठेवतां गुह्य सांगून दिलें तरी, क्रमाक्रमानेंच त्याची प्राप्ति व्हावयाची, याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज काय म्हणतात पहा :

**"आणि तेचि समयीं। सद्गुरु भेटले पाही।**
**तेवींचि तिहीं कांहीं। वंचिजेना[1] ॥**
**परी वोखद घेतखेंवो। काय लाभे आपला ठावो[2]।**
**कीं उदयजितांचि दिवो[3]। मध्यान्ह होय ? ॥**
**सुक्षेत्रीं[4] आणि वोलटें[5]। बीजही पेरिलें गोमटें।**
**तरी अलोट[6] फळ भेटे। परी वेळे[7] कीं गा ॥ ...**

१ चोरून ठेवलें नाहीं. २ पूर्व प्रकृति. ३ दिवस अथवा सूर्य. ४ चांगल्या जमिनींत. ५ ओलसर भूमींत. ६ पुष्कळसें. ७ योग्य वेळीं.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तैसा वैराग्यलाभ झाला । वरी सद्गुरुही भेटला ।
जीवीं अंकुर फुटला । विवेकाचा ॥
तेणें ब्रह्म एक आथी । येर अवघीचि भ्रांति ।
हेही कीर प्रतीति । गाढ[1] केली ॥...
तिये ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें ।
तें क्रमेंचि करूनि तेणें । पाविजे पैं ॥
भुकेलियापाशीं । वोगरिलें[2] षड्रसीं[2] ।
तो तृप्ति प्रतिग्रासीं । लाहे जेवीं ॥ " इत्यादि.

— ज्ञानेश्वरी, अ. १८

तात्पर्य, दम धरला पाहिजे. उतावीळपणानें नुकसान होण्याचा संभव असतो. " शनैःशनैरुपरमेद् बुद्धया धृतिगृहीतया " असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे. हळुहळूच अभ्यास करावा असा त्याचा अर्थ आहे. " याच देहीं याच डोळां " मुक्तीचा सोहळा भोगीन, अशी अंतरांत तीव्रता असावीच. पण अशी इच्छा पुरी होण्याला चांगल्या गुरूचें संनिधान व वैराग्यपूर्वक अभ्यासाची संतत धारा असावी लागते. अंतरांत खरी तळमळ असली व सगुण भक्तीचा आश्रय धरला, म्हणजे **पारमार्थिक योगक्षेम** भगवंतच वाहतो. ' योग ' म्हणजे नसलेलें देणें व ' क्षेम ' म्हणजे दिलेलें सांभाळणें, ही अनुकूलता भगवंतच करून देतो. ती तो कशी करील याचा आपणास पत्ताही लागणार नाहीं. पण अशा अनन्य भक्ताला भगवंताच्या ' योगक्षेमं वहाम्यहं ' या वचनाचा अनुभव आल्यावांचून राहात नाहीं एवढें मात्र खास आहे.

**योगक्षेम ' याचा अर्थ** — अन्नवस्त्राचा पुरवठा असा पुष्कळ लोक करितात ; पण तें योग्य नाहीं. कारण, भगवंताचे सगळेच भक्त कांहीं भिकारी ( निर्धन ) नसतात. पिढ्यानपिढ्या अन्नवस्त्राची काळजी नसलेले भाग्यवान भक्त पुष्कळ आहेत. हेही भगवच्चरणीं अनन्य भक्ति करणारे असतात. त्यांचा योगक्षेम म्हणजे काय ? तर परमार्थसाधनास, परमार्थउन्नतीस अवश्य असणाऱ्या वृत्ति, भगवान त्यांना अंतर्यामांतून पुरवितो. ( ' ददामि बुद्धियोगं तं ' याचा अर्थ हाच आहे. ) आणि बाहेरून सत्समागम देऊन त्या सांभाळतो. ( मल्ल लोक शरीर कमावतात, तशी साधकांनीं वृत्ति कमावली पाहिजे, हें लक्षांत ठेवावें. ) असा श्रीमंत भक्त

१ बळकट. २ षड्रसान्न वाढलें.

विरक्त होऊन आपल्या वैभवावर लाथ मारून गेला, तर त्यास भगवान तसलेंच अन्न पुरवितो कीं त्याच्या शरीरास ज्याची संवय आहे किंवा संवय नसलेलें जाडेंभरडें अन्न देऊन तें पचविण्याची त्याच्या कोठ्याला शक्ति देतो. सारांश, त्याचा परमार्थ सिद्धीस नेण्यास त्याला हरएक प्रकारें साहाय्य करितो. साधकाच्या अपक्व अवस्थेंत सद्गुरूचें देहावसान झालें, (साधन पूर्ण होई तों सद्गुरुसंनिधान लाभणें फार कठिण असतें, सर्वांचें भाग्य तसें नसतें.) तर भगवान त्याला संतसंग गांठ घालून देतो. "**गुरुमुखें श्रवण। संतमुखें दृढीकरण**" (श्रीरमावल्लभदास) असाच प्रसंग बहुतेकांस येतो. कित्येक गुरु म्हणविणारे असे असतात कीं दुसऱ्या गुरूचा शिष्य आल्यास त्याच्याकडे कांहीं सुद्धां बोलत नाहींत. विचारलेल्या प्रश्नाचें उत्तरही देत नाहींत. त्यानें आपल्या संप्रदायांत शिरून विधिपुरःसर अनुग्रह घ्यावा, अशी ते इच्छा करितात व आपल्या गुरुत्वाचा शिक्का त्याच्यावर मारूं पाहातात. अशा वेळीं साधकाचें मन व्यभिचारशंकेनें व्याकुळ होतें. कित्येक संत उदारबुद्धीचे असतात. दुसऱ्या गुरूचे शिष्य त्यांजकडे गेले असतां त्यांना अधिक प्रेम येतें. ज्याप्रमाणें आई मेलेल्या पोरक्या मुलांची काळजी मावशी अधिक घेते, स्वतःच्या मुलांच्या आधीं त्या पोरक्या मुलाच्या तोंडांत ती घास घालिते, मला आई म्हणशील तरच तुला वाढीन असें ती म्हणत नाहीं, मावशीपणाच्या मानावरच ती तृप्त असते, त्याप्रमाणें त्या संतांचें असतें. असे दयाळु व उदार मनाचे संत मेघवृष्टिन्यायानें उपदेश करीत असतात. ईश्वरकृपेनें साधकांना असा संतसंग लाभत असतो. करितां साधकांनीं गुरुभक्ति करावीच, पण ईश्वरभक्तिही सोडूं नये. कारण —

**"लागलें बद्धतेचें बंधन। न करवे कर्मपाशच्छेदन।**
**त्याच्या उद्धारालागीं जाण। ज्ञानदाता सर्वज्ञ ईश्वर॥**
**गुरुद्वारा पाविजे ज्ञान। तेथें ईश्वराचा आभार कोण।**
**(तरी) येथ ईश्वरकृपेवीण। सद्गुरु जाण भेटेना॥ ...**
**गुरूंनीं सांगितली ज्ञानस्थिति। ते ईश्वरकृपेवीण चित्तीं।**
**ठसावेना साधकांप्रति। जाण निश्चिती उद्धवा॥"**

— एकनाथी भागवत, अ. २२

सद्गुरु व संत या बाबतींत पहिल्या भागांत '**संत, गुरु व सद्गुरु**' या प्रकरणांत (आवृत्ति चौथी, पृ. ७४ ते ८६) सूचना दिल्या आहेत त्या पुनः वाचून

**************************************************

पाहाव्या. तात्पर्य, भगवान अशा भक्तसाधकांचा हरएकप्रकारें योगक्षेम वहातो, याबद्दल संशय नसावा.

*　　　*　　　*

या एका जन्मांतच मी मुक्ति साधून घेईन अशी इच्छा असणें उत्तम; पण ती पूर्णच होईल हें कोणीही सांगूं शकणार नाहीं आणि नाहीं झाली म्हणून तरी त्यांत काय बिघडलें ? केलेले प्रयत्न फुकट गेले असें मानण्याचें कारण नाहीं. प्रपंच सोडून परमार्थाच्या नादीं लागला, पण योग्य यत्नाच्या अभावीं तो मरेपर्यंत साध्य झाला नाहीं, तर तो कोणाच्या गतीस जातो; 'ना प्रपंच ना परमार्थ' असा उभयभ्रष्ट होऊन तो शरदृतूंतील अभ्राच्या ठिगळाप्रमाणें मधल्यामध्यें नष्टच होऊन जातो काय ? असा अर्जुनानें मोठ्या कळकळीनें प्रश्न केला, (गीता अ. ६, श्लोक ३७-३८), त्यास भगवंतानें तितक्याच कळवळ्यानें उत्तर देऊन सांगितलें आहे कीं त्याचा नाश इह किंवा परलोकीं कधींच होत नाहीं. अश्वमेधयज्ञादि मोठमोठीं पुण्यकर्में करणारे पुरुष ज्या दिव्यलोकांस जातात तेथेंच हाही जातो व तिकडे पुष्कळ वर्षें राहून दिव्य भोग भोगून पुनः या भूलोकावर शुचिर्भूत अशा श्रीमंतांच्या कुळांत जन्म घेतो; किंवा विवेकी अशा योग्यांच्या कुळांत जन्म घेतो. अशा सत्कुळांत जन्म लाभणें परम दुर्लभ होय. (गीता अ. ६-४१,४२). **हे योगभ्रष्टही दोन प्रकारचे आहेत**; एक-योगमार्गाला (परमार्थमार्गाला) लागल्यानंतर वासनेमुळें पुनः विषयांकित होऊन तो मार्ग सोडणारा किंवा ढिला करणारा, आणि दुसरा-निर्वासन चित्तानें योगमार्गास लागलेला, पण मुक्काम गांठण्यापूर्वी आयुष्यरवि अस्ताला गेल्यामुळें योग अपूर्ण राहिलेला. दोघेही पुण्यलोकाला जाऊन परत येतात, त्यांत पहिला वासनायुक्त असल्यामुळें शुचिर्भूत श्रीमंतांच्या कुळांत जन्मास येतो आणि दुसरा निर्वासन असल्यामुळें ज्ञान्यांच्याच कुळांत जन्म घेऊन त्यांच्या संगतींत आपलें साधन पूर्ण करून जीवन्मुक्ति मिळवितो. वर '**शुचिर्भूत** श्रीमंतांच्या कुळांत' ('शुचीनां श्रीमतां गेहे') असें कां म्हटलें ? 'श्रीमंता' च्या मागें 'शुचिर्भूत' असें विशेषण कां लाविलें ? तर श्रीमंत झाले तरी बाटल्या उडविणारे काय थोडे आहेत ? अशा अशुचि (अपवित्र) श्रीमंतांच्या कुळांत त्या पुण्यजीवाचा जन्म कसा होईल ? श्रीमंत असून शुचिर्भूत, म्हणजे ज्यांच्या घरीं देवधर्म, भजन-पूजन, अतिथिसत्कार, सच्छास्त्रश्रवण, वगैरे दैवीसंपत्तीस पोषक असे कार्यक्रम चालत असतात, तेथेंच या

परमार्थेच्छु जीवाला परमार्थसाधन सुलभ जातें. आईबाप त्याच आवडीचे असल्यामुळें मुलाला त्यांचेकडून अडथळा न होतां उत्तेजन मिळतें. आणि 'श्रीमंत' असें कां म्हटलें ? तर श्रीमंतीमुळें विषयभोगाची वासनाही तेथें पूर्ण होण्याची संधि मिळते. आतां दुसऱ्या जातीचा म्हणजे निर्वासन योगभ्रष्ट, यानें आपली वासना आधींच निर्मूल केली असल्यामुळें, ज्ञानी योग्यांच्या कुळांतच ('धीमतां योगिनामेव कुले') जन्म झाल्यानें तशा वडिलांच्या संगतींत निमित्तमात्र श्रवणमनानें त्याचें कार्य पुरें होतें. तात्पर्य, अशा पुरुषांचे —

## पुनर्जन्म हे गुणविकासाकरितां असतात.

ही परमेश्वराची योजना जीवाच्या कल्याणासाठींच आहे. याकरितां साधकांनीं निराश व उतावीळ होतां कामा नये. आपला सर्वकाळ भगवच्चिंतनांत घालविण्याची मात्र काळजी त्यानें घ्यावी. '**तद्विस्मरणे परमव्याकुलता**' वाटली पाहिजे. जिवंतपणीं चित्ताला जो ध्यास लागलेला असतो, तोच अंतकाळच्या वेळीं उभा राहतो आणि अंतकाळीं जसा भाव उद्भवतो तशी त्याला मरणोत्तर गति प्राप्त होते, हा शास्त्राचा अबाधित सिद्धान्त म्हणजे निसर्गाचा नियम आहे असें समजावें आणि याकरितांच भगवान म्हणतात —

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥**

— भगवद्गीता, अ. ८।७

याचा अर्थ — 'वरील सिद्धान्त लक्षांत घेऊन, तूं सर्वकाळ म्हणजे अखंड माझें स्मरण कर व युद्ध म्हणजे प्रारब्धप्राप्त कर्मेंही कर ; याप्रमाणें माझ्या ठिकाणीं मन व बुद्धि अर्पण करून वागलास म्हणजे निःसंशय मलाच प्राप्त होशील, ही माझी भाक घे.' किती भगवंतांचें दयालुत्व हें ! जीवाच्या स्मरणावांचून व भक्तीवांचून त्याचें काय अडलें आहे ? पण जीवाच्या कल्याणाकरितांच त्यांचें तसें सांगणें आहे. यावर श्रीज्ञानेश्वर-महाराज आपल्या भाष्यांत काय म्हणतात पहा —

**"तेवीं जितेनि[1] अवसरें[1] । जें आवडोनि जीवीं[2] उरे ।**
**तेंचि मरणाचिये[3] मेरे[3] । फार[4] हों लागे ॥**

१ जिवंत असते वेळीं. २ हृदयांत राहतें. ३ अंतसमयीं. ४ वृद्धिंगत.

**आणि मरणीं जया जे आठवे। तो तेचि गतीतें पावे।**
**म्हणोनि सदा स्मरावें। मातेंचि तुवां॥**

( स्मरणाचें सुंदर स्वरूप पुढें कसें सांगतात पहा ) –

**डोळां जें 'देखावें'। का कानीं हन 'ऐकावें'।**
**मनीं जें 'भावावें'। 'बोलावें' वाचे॥**
**तें आंतबाहेरी आघवें। मीचि करूनि घालावें।**
**मग सर्वीं काळीं स्वभावें। मीचि आहें॥**
**अर्जुना ऐसें जहालिया। मग न मरिजे देह गेलिया।**
**मा संग्राम केलिया। भय काय तुज॥**
**तूं मनबुद्धि साचेंसी। जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी।**
**तरी मातेंचि गा पावसी। हे माझी भाक॥** इत्यादि

—ज्ञानेश्वरी, अ. ८, श्लो. ७ ची टीका

अशा तऱ्हेचें चिंतन व ध्यान ( नामस्मरण हाच यास उत्तम उपाय आहे. ) घडूं लागलें म्हणजे अंतकाळीं स्मरण करण्याचा बोजा भक्तावर न ठेवतां, दयाळू भगवान ऋण उत्तीर्ण होण्याकरितां आपण होऊन भक्ताच्या सेवेकरितां त्या वेळीं येऊन उभा राहतो. भक्तीनें स्मरण करावें मग आपण यावें, अशी वाट तो पाहात नाहीं. तसें तो न करील तर उपासनेचें फळ काय ?

" **तया देहावसान[1] जैं पावें। तैं तिहीं मातें स्मरावें।**
**मग म्यां जरी न पावावें। तरी उपास्ति[2] ते कायसी॥ ...**
**तिहीं जे वेळीं मी स्मरावा। ते वेळीं स्मरिला कीं पावावा।**
**तो आभारही[3] जीवा। साहवेचि ना॥**
**तें ऋणवैपण[4] देखोनि अंगीं॥ मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं।**
**भक्ताचिया तनुत्यागीं। परिचर्या करीं॥**

—ज्ञानेश्वरी, अ. ८, श्लो. १४ टीका

देवांचें भक्तवात्सल्य व दयाळुत्व यापेक्षां अधिक काय वानावें ? साधकांना यापेक्षां हिताच्या अधिक सूचना काय द्याव्या ?

तथापि शेवटचें म्हणून इतकेंच सांगावेंसें वाटतें कीं **दासबोध** ग्रंथांत परमार्थ साधण्यासाठीं प्रपंचांत कसें वागावें याबद्दलच्या उपयुक्त सूचना आहेत; करितां त्या

१ देहान्तसमय. २ उपासना. ३ उपकारांचें ओझें. ४ ऋणीपणा.

' ग्रंथराजा- 'चा **सूक्ष्म** दृष्टीनें साधकांनीं अभ्यास करावा. तसेंच, **एकनाथी भागवत** हा ग्रंथ तर साधकांनीं नित्यपाठांत ठेवावाच ठेवावा. कारण, '**भगवद्गीता**' ही सर्व उपनिषद्रूपी गायींचें दोहन करून काढलेलें दुग्ध होय, ' ज्ञानेश्वरी ' ही त्या दुग्धाचें मंथन करून काढलेलें लोणी होय, आणि ' नाथभागवत ' म्हणजे तें लोणी कढवून केलेलें तूप होय. हें लोणकढत तूप श्रीतुकाराम-महाराजांनीं खूप खाल्लें[1], तेव्हां त्यांस दिव्य रूप प्राप्त होऊन ते संतजनांचे भूप[2] बनले व सदेह वैकुंठी जाण्यास समर्थ झाले. असा तो महाप्रासादिक ग्रंथ नित्य पाठांत ठेवावा अशी आमच्या प्रिय वाचकांस आमची प्रेमाग्रहाची सूचना आहे. या ग्रंथास श्रीकृष्णाचा व श्रीदत्तगुरूंचाही वर आहे. निष्ठेनें या ग्रंथाचीं बारा पारायणें करील त्यास सगुण-निर्गुण साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं, असें अनुभविक संतांचें सांगणें आहे. आम्ही सूचना सांगून सांगून किती सांगणार ? या सद्ग्रंथाची जो कास धरील, त्याला, साधकांना अत्यंत उपयुक्त अशा सर्व प्रकारच्या सूचना मिळून, श्रीएकनाथमहाराजांप्रमाणें त्याचा संसारच परमार्थरूप होईल व घरीं दारीं स्वानंद दुमदुमेल.



१ श्रीतुकाराममहाराजांनीं नाथभागवताची भंडाऱ्या डोंगरावर बसून एकशें आठ पारायणें केलीं होतीं. ( कोणी हजारही म्हणतात ), यावरून या ग्रंथाची योग्यता ओळखावी. २ अग्रगण्य.

# खास स्त्रीसाधकवर्गासाठीं !

" स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा-पति[1] ॥ १ ॥
हेचि विष्णूची महापूजा । अणु भाव नाहीं दुजा ॥ ध्रु० ॥
सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ २ ॥
निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ३ ॥ "

मागें साधकांसाठीं म्हणून ज्या सूचना केल्या आहेत, त्या स्त्रीपुरुषांना सामान्य असल्यामुळें स्त्रीसाधकांनींही त्यांचा विचार करावाच ; परंतु स्त्रीत्वामुळें कांहीं विशेष परिस्थिति व्यवहारांत उत्पन्न होत असल्याकारणानें त्यांच्यासाठीं म्हणून कांहीं विशेष सूचना करणें अवश्य वाटतें. वास्तविक पाहतां स्त्रियांचें अंतरंग, स्त्रियांच्या अडचणी, स्त्रियांच्या भावना जशा स्त्रियांनांच समजतील, तशा, पुरुष कितीही ज्ञानी झाला तरी त्यास समजणें शक्य नाहीं. याकरितां स्त्रीसाधकांसाठीं सूचना साधक वर्गांतील एखाद्या अनुभविक स्त्रीनेंच करणें योग्य आहे. अशी स्त्री याच उद्देशानें केव्हां पुढें येईल तेव्हां येवो ( पण जरूर यावी अशी आमची इच्छा आहे ), तोंपर्यंत आम्ही शास्त्रांच्या व संतांच्या उक्तीला धरून व ईश्वरेच्छेनें तशा कांहीं थोर मातांची भेट झाली आहे त्यांचें व त्यांच्या चारित्र्याचें स्मरण करून हा लेख यथामति लिहीत आहों. त्याचा साधकवर्गांतील स्त्रियांनीं आपल्या प्रकृतीस व परिस्थितीस मानवेल अशा रीतीनें विचार करावा व ग्राह्यांशाचें ग्रहण करून ' आत्यंतिक क्षेम ' प्राप्त करून घ्यावें अशी विनंति आहे.

या स्त्रीसाधकवर्गांत विवाहित व अविवाहित स्त्रियाही असूं शकतील ; तसेंच ब्राह्मण व ब्राह्मणेतर, सुवासिनी व विधवा, क्वचित् पुनर्विवाहित व कुसंगतीनें भ्रष्टशीला पण अनुतापित, वयानें – वृद्ध, वयस्क व कुमारी, परिस्थितीनें – श्रीमंत व गरीब, शिक्षणानें – उच्च शिक्षित व अल्पशिक्षित, भाग्यानें – सुखी व दुःखी, संतानानें – सपुत्रिक व निपुत्रिक, तसेंच सुसंततिवती व कुसंततिवती, क्वचित् जन्मजातीनें वेश्या, इत्यादि नाना प्रकाराच्या, नाना जातींच्या व नाना दर्जाच्या स्त्रिया असूं शकतील. त्या सर्व भाग्यवानच होत. मुमुक्षुदर्शनंतर देहभावाचा तिरस्कार व देवभावाचा पुरस्कार ज्यांच्या अंतःकरणानें घेतला, त्यांना ' भाग्यवंत म्हणों तयां । शरण गेले पंढरीराया ' या तुकोपनिषद्वचनाप्रमाणें भाग्यवंत म्हणण्यास काय हरकत आहे ?

---

१ पतिसेवा.

## भारताचें मुकुटमणि-वैशिष्ट्य

स्त्रियांचे धर्म आपल्या धर्मशास्त्रांत, स्मृति व पुराणग्रंथांत अनेक ठिकाणीं अनेक प्रकारें सांगितले आहेत. ते सामान्य धर्मही ज्या स्त्रिया योग्य रीतीनें आचरतील, त्या असामान्य झाल्याशिवाय राहाणार नाहींत. जगांतील इतर देशांहून आमच्या भरत-भूमीचें वैशिष्ट्य अनेक बाबतीत आहे, तथापि त्या सर्व वैशिष्ट्यांचें मुकुटमणि-वैशिष्ट्य कोणतें असेल, तर तें आपल्या आर्यस्त्रियांच्या पातिव्रत्याचें होय. आपल्या देशांतील प्राचीन कलाकौशल्य, बुद्धिमत्ता, तत्त्वज्ञान, भक्तिमत्ता, शौर्य, मंत्रविद्या, अध्यात्मविद्या, फार काय योगविद्याही यांमध्यें स्पर्धा करणारे मनुष्य इतर देशांत निपजलेले ऐकावयास व पाहावयास मिळतील. पण आर्यस्त्रीरत्नांच्या पातिव्रत्याची स्पर्धा करणारी स्त्री एकही झालेली इतर देशांच्या इतिहासांत सांपडणार नाहीं. सकृद्दर्शनीं हें आमचें म्हणणें कोणासही धाष्टर्याचें वाटेल, पण थोडासा विचार केल्यानंतर त्याची सत्यता अनुभवास आल्यावांचून राहणार नाहीं.

पाश्चात्यांतील कांहीं विद्यांची व गूढ शोधांची आपल्याकडील लोकांना जशी अजून कल्पनाही आलेली नाहीं, तशी आपल्यांतील आर्यकन्यांच्या पातिव्रत्याची कल्पनाही तिकडील स्त्रियांना अद्याप शिवली नाहीं असे म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. स्वपतिनिष्ठ अथवा परपुरुषविमुख स्त्रिया तेथें नसतील असें आमचें म्हणणें नाहीं. पण तेवढ्यानेंच कांहीं पातिव्रत्य येत नाहीं. केवळ परपुरुषाशीं संबंध न केल्यानें स्त्री पतिव्रता होऊं शकत नाहीं. " **तथा पतिव्रता न स्यात् केवलं योनिरक्षणात्** " असें आपलें शास्त्र सांगतें. परपुरुषाचा स्पर्श न झालेल्या स्त्रिया हिंदुस्थानांतही काय थोड्या आहेत ? परंतु **सावित्री**, **सीमंतिनी**, **दमयंती**, **अरुंधती**, **अनुसूया**, **गुणवती** ( कौशिकपत्नी ), **सुकन्या**, इत्यादिकांची योग्यता इतर स्त्रियांना कधीं आली आहे काय ? तात्पर्य, आर्यस्त्रियांचें 'पातिव्रत्य' म्हणतात ती चीज कांहीं और आहे. ती सामान्यस्त्रीबुद्धिगम्य नाहीं, मग आचारक्षम तरी कोठून असणार ? पण या असामान्य व्रताच्या स्वरूपाची व महतीची अंधुक कल्पना तरी आपल्या आर्यावर्तातील स्त्रियांना असूं शकेल, ती इतर देशांतील स्त्रीवर्गाला असणार नाहीं. म्हणून आम्ही **भरतभूमीचें हें मुकुटमणि-वैशिष्ट्य** असें वर म्हटलें आहे. या गोष्टीचा प्रत्येक आर्यपुत्रानें अभिमानच बाळगला पाहिजे. ( या असाधारण वैशिष्ट्यावर हल्लींचा अनार्य संस्कारानें उत्पन्न झालेला ' नवमतवाद ' घाव घालूं पाहत आहे, ही मोठ्या दुःखाची व शरमेची गोष्ट आहे. पण असाही

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आत्मविश्वास वाटतो कीं वर उल्लेखिलेल्या प्राचीन पतिव्रतादेवींचा पुण्यमेरु अचल आहे व त्यांचें रक्त आमच्या आर्यकन्यांच्या धमनींतून वहात असल्यामुळें अनार्य कल्पनांचें बीज अथवा रोपडें त्यांच्या मनोभूमींत मूळ घेऊन बसणार नाहीं. )

पतिव्रता स्त्री देवादिकांनाही वंद्य होते. पंचमहाभूतांवर नव्हे, निसर्गनियमांवरही तिची सत्ता चालू शकते. मोठमोठ्या तपस्व्यांना व योग्यांनाही अगम्य अशा शक्ति तिच्यांत केवळ पतिनिष्ठेनें उत्पन्न होतात. याची उपपत्ति जरी आपल्यास नीटशी कळली नाहीं, तरी असें होतें खास. याबद्दलचीं उदाहरणेंही सांपडतात. आर्य स्त्रियांना याबद्दल केव्हांही संशय वाटणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. हा विषय वाढवेल तितका वाढवितां येईल. पण विस्तारभयास्तव हात आटोपताच घेतला पाहिजे.

" स्त्रियांमध्यें **सती, पतिप्रेमिका, साध्वी** आणि **पतिव्रता** अशा चार पायऱ्या आहेत.

( १ ) केवळ स्वपतीवरच ज्यांची निश्चल प्रीति असते, अर्थात् ज्या कुवर्तनी नव्हेत, त्यांना **सती** म्हणावें. पण अशा सर्व सतींना पतिप्रेम पूर्णपणें जिंकतां येतें असें नाहीं.

( २ ) सतीप्रमाणें शरीराचें व मनाचें पावित्र्य राखतातच, शिवाय बुद्धीच्या चतुराईनें ज्या स्त्रिया पतीचें चित्त नेहमीं प्रसन्न राखूं शकतात, त्या '**पतिप्रेमिका**' समजाव्या.

( ३ ) सतीत्व व पतिप्रेमिकत्व असलें म्हणजे तेवढ्यानें साध्वीत्व येतें असें नाहीं. ( 'साधु' शब्दाचें स्त्रीलिंगी रूप 'साध्वी' होय. ) व्यवहारांत एखादा मनुष्य नीतिमान् व सज्जन असला तरी तेवढ्यानें त्यास साधु म्हणतां येणार नाहीं. सज्जनपणा + कडक उपासना + भूतदया + तितिक्षा + परोपकार + परमार्थाभ्यास, इत्यादि मिळून साधुत्व. त्याप्रामाणें सतीत्व + पतिप्रेमिकत्व + वरील गुण, मिळून '**साध्वीत्व**' येतें.

( ४ ) सती, पतिप्रेमिका व साध्वी या तिघींच्या गुणसमुच्चयानेंच केवळ पतिव्रता पदवी प्राप्त होऊं शकणार नाहीं; तर वरील तीनही गुण + पतिदेहावर व पतिजीवावर ईश्वरबुद्धीची अचल धारणा धरणारीच '**पतिव्रता**' पदवीस पात्र होऊं शकते. पतीशिवाय दुसरें व्रतच जिला माहीत नाहीं, तीच पतिव्रता ( 'पतिरेव व्रतं यस्या अखंडा सा पतिव्रता' ) होय. पतिस्वरूपावर याप्रमाणें जिची वृत्तीची अखंड धारा

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

असते, तिच्या ठिकाणीं ‘ तीव्रसंवेगा ’ मुळें अध्यात्मप्रकाश ( Divine Light ) उत्पन्न होऊन आत्मविकासही ( Expansion of self ) सहज होतो. संकल्पसिद्धि व आत्मिक बलाची पूर्णता ( Will-power & development of spiritual powers ) तिच्या ठिकाणीं सहज उद्भुत होते. इच्छाशक्तीनें ब्रह्मा-विष्णु-महेश्वरांना बाळकें बनविण्याची ‘ कर्तुमकर्तु अन्यथाकर्तु ’ शक्तिही प्राप्त होते ! असें हें पातिव्रत्याचें तेज आहे. ” *

वर सांगितलेल्या चार प्रकारांशिवाय आणखीही प्रकार दाखवितां येतील, त्यांचीं स्वरूपें अथवा लक्षणेंही निराळ्या भाषेनें सांगतां येतील, परंतु पतीला केवळ परमेश्वर मानून त्याला आपलें प्रेमसर्वस्व वाहणें व त्याच्या आज्ञा निर्विकल्प मनानें वेदाज्ञेप्रमाणें पाळणें हें पतिव्रतेचें सामान्य लक्षण मानण्यास कोणाचाही मतभेद होणार नाहीं. अशा लक्षणाच्या पतिव्रता स्त्रिया केवळ पतिनिष्ठेनें सिद्धावस्थेस पोंचतात. त्यांना दुसऱ्या साधनाची गरजच पडत नाहीं. त्यांचे अविद्याअस्मितादि पंच क्लेश आपोआप शमन पावतात; योग्यांना अभ्यासातिरेकानेंही साध्य होण्यास कठिण असा ‘ आवरणविक्षेपभंग ’ त्यांचा होतो ; अष्टांगयोगाचा खटाटोप न करितां त्यांना ‘ ऋतंभरा प्रज्ञा ’ व ‘ धर्ममेघ ’ नांवाचा समाधिही साध्य होतो. ‘ दूरदर्शन ’ व ‘ दूरश्रवण ’ नांवाच्या सिद्धि त्यांना घरबसल्या प्राप्त होतात. देवतांचीं दर्शनें व संभाषणें होऊं लागून त्यांची वशता प्राप्त होते. असें हें पातिव्रत्याचें सामर्थ्य आहे.

**सा**वित्रीनें यमधर्मराजावरही आपली छाप पाडून पतीचा जीव परत मिळविला. **सी**मंतिनीनें आपल्या वैधव्याची सीमा कशी ओलांडली हें सर्वप्रसिद्ध आहेच. ती नेहमीं नवें नवें दंपत्यपूजन करीत असे. तिची ती ख्याति ऐकून दोघां ब्राह्मणकुमारांनीं द्रव्यसंपादनाच्या इच्छेनें दांपत्यवेष घेऊन तिजकडून पूजा वगैरे करून घेतली, पण त्यांपैकीं ज्यानें स्त्रीवेष धारण केला होता तो कायमचा स्त्रीरूपच बनला ! एक तपस्वी नदीतीरावर एका वृक्षाखालीं बसून बारा वर्षें तपश्चर्या करीत होता, त्याच्या अंगावर झाडावरील बगळीनें एकदां मलविसर्जन केलें, त्याबरोबर रागानें वर पाहतांच ती पक्षिणी मरून पडली ! तेव्हां आपणास

* दिगंबरदासकृत ‘ आदर्शविवाह ’ अथवा ‘ सौ. गजलक्ष्मी सुंदरीचें अद्भुत चरित्र ’ ( अप्रकाशित ) हें आर्यांच्या विवाहसंस्कृतीवर दिव्य प्रकाश पाडणारें एक अप्रतिम पुस्तक आहे. आमच्या ‘ श्रीदुर्गादत्तमंदिर–पुस्तकमाले–’ मधून यथावकाश प्रसिद्ध होईल. सज्जनाचा आशीर्वाद असावा.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तपाची सिद्धी प्राप्त झाली असें समजून तो तीर्थयात्रेस निघाला. वाटेंत आपल्या वाक्सिद्धीनें निग्रहानुग्रहाचे चमत्कार लोकांना दाखवीत, एका पतिव्रतेच्या घरीं येऊन 'भवती भिक्षां देहि' म्हणाला. त्या वेळीं ती पतिव्रता स्त्री पतीच्या सेवेंत गुंतली असल्यामुळें तात्काळ बाहेर येऊं शकली नाहीं. ब्राह्मणास राग आला व शाप देतों म्हणाला. तें ऐकून ती पतिव्रता स्त्री म्हणाली – मी त्या झाडावरची बगळी नव्हे ! हें तिचें वाक्य ऐकून ब्राह्मणास आश्चर्य वाटलें. कारण दूरदेशीं व अगदीं एकांतांत घडलेली ती गोष्ट होती. म्हणून ब्राह्मणानें विचारलें – तुला ही गोष्ट कशी कळली? त्या स्त्रीनें म्हटलें, या प्रश्नाचें उत्तर मिथिलापुरांतील धर्म नांवाचा व्याध ( खाटीक ) तुला देईल, तिकडे जा. तिच्या सूचनेप्रमाणें, तेथून पुष्कळ दूर असलेल्या मिथिलापुरांत त्यानें धर्मव्याधाचा शोध काढून तो त्याच्या घरीं गेला. त्यानें या ब्राह्मणास पाहतांच अमुक बाईकडून तूं आलास काय म्हणून विचारलें. त्या वेळीं तारायंत्र अगर टेलिफोन नसल्यामुळें अर्थातच या ब्राह्मणास त्या धर्मव्याधाच्या प्रश्नाचें आश्चर्य वाटून, तुला कसें कळलें असें त्यानें विचारलें. धर्मव्याध म्हणाला, माझ्या देवाच्या सेवेनें मला हें ज्ञान झालें. ते त्याचे देव पाहण्याची इच्छा दर्शविल्यावरून त्यानें या ब्राह्मणास आपल्या घरीं नेऊन आपल्या देवाचें दर्शन करविलें. ते देव म्हणजे दुसरे कोणी नसून त्याचे वृद्ध मातापितर होते. हें पाहून त्या ब्राह्मणास मोठें आश्चर्य वाटलें व आपल्या तपाचा अभिमान सोडून तो आपल्या घरीं जाऊन आपल्या मातापित्याच्या सेवेला लागला ! तात्पर्य, अशा एकनिष्ठ पितृसेवेनें व एकनिष्ठ पतिसेवेनें अशी दिव्य प्रज्ञा ( अतींद्रिय ज्ञान ) प्राप्त होतें. पण या झाल्या पुराणांतल्या गोष्टी. त्या भोळ्या ( म्हणजे खुळ्या ) लोकांनींच ऐकाव्या असें अलीकडील शहाणे लोक म्हणतील. अशा शहाण्या ( नव-शिक्षित ) लोकांनीं गोरखपूर येथील सुप्रसिद्ध हिंदी 'कल्याण' मासिकाच्या गेल्या माघ ( फेब्रुवारी १९३५ ) महिन्याच्या अंकांतील '**एक सती**' हा लेख वाचून पाहावा. आमचें हें पुस्तक संकल्पापेक्षां फारच वाढत चाललें, तथापि प्रिय वाचकांच्या प्रेमासाठीं व आनंदासाठीं ती गोष्ट थोडक्यांत तरी दिल्यावांचून राहवत नाहीं.

( थोड्या दिवसांखालीं घडलेली गोष्ट ) —

उत्तर हिंदुस्थानांत हरदोई जिल्ह्यांत इकनार नांवाचें गांव आहे. तेथील पं. छोटेलालजोची कन्या रेशमदेवी नांवाची ; हिचें शिक्षण हिंदी चौथ्या इयत्तेपर्यंत झालेलें ; पण लहानपणापासून तुलसीरामायण वाचण्याचा अतिशय नाद. वयाच्या १३ व्या वर्षी हिचें लग्न कसरावाँ गांवांत राहणारे पं. दीनदयालजी मिश्र यांचे

सुपुत्र पं. वंशीधरजी यांच्याशीं झालें. हा मुलगा त्या वेळीं इंग्रजी ७ व्या इयत्तेंत शिकत होता. लग्नानंतर तो इकनार येथें श्वशुरगृहीं एकदोनदा येऊन गेला. गेल्या ज्येष्ठ महिन्यांत या मुलीला श्वशुरगृहीं पाठविण्याचा मुहूर्त ठरविला. त्या मुहूर्ताच्या पूर्वी चार दिवस तिचा पति भयंकर आजारी असल्याची बातमी आली. लगेच दुसऱ्या दिवशीं सकाळीं ही मुलगी पित्याच्या आज्ञेनें आपल्या मामाबरोबर नवऱ्याच्या घरीं जाण्यास निघाली. आपल्या प्रियतमाच्या दर्शनाच्या उत्कंठेनें मार्ग चालत असतां त्या मुलीच्या तोंडून एकदम शब्द निघाले कीं, 'मामा, काम होऊन गेलें, आतां जाणें व्यर्थ आहे.' मामा म्हणाले,–'घाबरूं नको.' पण त्या गांवच्या जवळपास पोंचतात न पोंचतात तोंच एकाकडून समजलें कीं वंशीधरजी इहलोक सोडून गेले, त्यांचें प्रेत गंगाकिनाऱ्यावर चाललें आहे; आतां गांवांत न जातां तिकडेच गेलेलें बरें. हे वज्रतुल्य शब्द ऐकून रेशमदेवीच्या हृदयावर जो आघात झाला असेल त्याचें वर्णन कोणाच्यानेंही करवणार नाहीं. पण तिची मुद्रा शांत व गंभीर होती. तिची गाडी स्मशानमार्गानें चालूं लागली व अखेर पतीच्या शवाचें तिला दर्शन घडलें. तिनें एकदम धांव घेऊन पतीच्या गळ्यास मिठी मारली व आपल्या साडीच्या पदरानें त्याचें तोंड पुसून ती म्हणाली, 'नाथ, बोला!' पण कोण बोलणार? पुनः दुसऱ्यांदा म्हणाली –'बोललेंच पाहिजे.' इतक्यांत लोकांनीं तिला ओढून काढलें व पुनः प्रेताकडे जाऊं दिलें नाहीं. तिनें आपल्या श्वशुराच्या व दीरादिकांच्या पायाला स्पर्श करून सांगितलें कीं आपण आतां सती जाणार! मला जाऊं द्या. पण तसें तिला कोण करूं देणार? तिला तिच्या मामा वगैरेनीं खेंचून गाडींत बसविलें. तसें करीत असतां ती मूर्च्छित पडली. तशाच अवस्थेंत तिला इकनार गांवीं माहेरीं आणलें. ३।४ तासांनीं शुद्धीवर येतांच उठून पतीकडे जाण्यास पाहूं लागली. परंतु बलात्कारानें तिला प्रतिबंध करण्यांत आला. तिनें आपलें आतां कांहीं चालत नाहीं असें जाणून शांतपणें उठून स्नान करून घेतलें व रोजच्याप्रमाणें तुलसीची पूजा व आरति करून श्रीरामायणाचा शेवटचा पाठ वाचला व सती जाण्याचा आपला निश्चय पुनः प्रगट केला, तेव्हां एका वृद्धानें म्हटलें–पतीच्या शरीरावांचून कोणी स्त्री सती जाऊं शकत नाहीं वगैरे. त्या वेळीं त्या साध्वीनें आपली करांगुली आरतीच्या दिव्यावर धरली; ती अगदीं मेणबत्तीसारखी पेटूं लागली. अर्धी पेटल्यानंतर म्हणाली, 'पाहा, माझ्या पतिदेवाचें शरीर अजून जळलें नाहीं, चिता तयार आहे, लोक त्यास (प्रेतास स्नान घालीत आहेत; त्वरा करा, मला स्नान घाला. नसलेस हें घर वगैरे सर्व भस्म होऊन जाईल,' हें ऐकून लोक आश्चर्यानें घाबरे

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

झाले व तेथें एकच कोलाहल माजून राहिला. त्या देवीनें आपली पेटत असलेली करंगळी भिंतीला चिरडून विझविली, त्याचा भिंतीवर डाग उमटला. तो लोकांना दाखवून ती म्हणाली, ' ही खूण माझ्या मातेकरितां मीं ठेविली आहे, ( माता त्यापूर्वी आपल्या कोणा नातलगास भेटण्याकरितां परगांवीं गेलेली होती, ) ही खूण दाखवून तिला सांगा कीं तुझी रेशमदेवी पतीबरोबर जात आहे. ' यानंतर ती उठून उभी राहिली. घरांतील मूठभर दर्भ घेऊन काखेंत मारलें व एका हातांत आपलें अंतकालापर्यंतचें आश्रयदातें परमप्रिय रामायणाचें पुस्तक व दुसऱ्या हातांत आरति घेऊन चालूं लागली व जवळच्या एका अश्वत्थवृक्षाखालीं जागा साफ करवून दर्भ टाकून त्यांवर पूर्वाभिमुख एका पायावर उभी राहिली. मुखानें रामराम ध्वनि एकसारखा चालला होता. आरतीचें ताह्मण खालीं ठेवून दोन्ही हातांनीं रामायणाचें पुस्तक घट्ट दाबून धरलें. दोन तीन मिनिटांनंतर एकदम दक्षिणेकडे तोंड करून आसन घालून बसली. ओठ हालतच होते, पण आवाज नव्हता. एका मिनिटाच्या आंत सर्व शरीरांतून धूर निघूं लागून खालच्या भागापासून शरीरानें पेट घेतला. त्यांत पुनः चमत्कार हा कीं जेवढें अंग जळत होतें तेवढेंच अंगावरील लुगडेंही जळत होतें. शेवटीं मस्तकापर्यंत अग्नि पोंचला, तेव्हां तेथून एक ज्वाळा निघाली ती २५।३० फुटापर्यंत उंच जाऊन नाहींशी झाली व सर्व शरीर जळून भस्म झालें! हजारों लोकांनीं सतीच्या नांवाचा जयजयकार केला! दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या संयोगावांचून ( बाहेरच्या प्राकृत अग्नीच्या स्पर्शाशिवाय ) केवळ प्रेमाग्नीनें प्रज्वलित झालेल्या त्या सतरा वर्षांच्या बालिकेच्चें पवित्र शरीर योगाग्नींत शांत होऊन गेलं! मातापित्यांची कूस व जीवन धन्य झालें. पातिव्रत्यधर्माच्या अढळ व अलौकिक नियमाचें तेज जगांत चमकलें व अढळ राहिलें. या अप्राकृत अग्निदग्ध सतीला प्राकृत सरकारचा कायदा काय करणार? आतां तेथें तिची समाधि बांधली गेली असून, तिच्या दर्शनानें व स्थानिक लोकांकडून तिच्या चरित्रश्रवणानें लोक आपणांस कृतार्थ मानीत आहेत. ( या गोष्टीचा लेखक – पं० श्रीलालारामजी शुक्ल – अखेरीस म्हणतो )—

**पुत्रि पवित्र किये कुल दोऊ।**
**सुयश धवल जग कह सब कोऊ॥**

* * * *

पृथ्वीच्या पाठीवरील इतर देश भौतिक चमत्करांनीं भरले आहेत, तर आपला भारतदेश अभौतिक चमत्कारांनीं भरला आहे. पण हे चमत्कार पाहाण्यास भारतीय लोकांना डोळे नाहींत व ऐकण्यास कान नाहींत! श्रीचिदंबरप्रभूचे परम भक्त

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

व शिष्य श्रीराजाराममहाराज यांची समाधि बेळगांव-शहापूरच्या जवळ आहे. त्यांच्या समाधीची गोष्ट अशी सांगतात कीं शहापूरचे शिंपी व नेवगी (वैश्य जातीचे) लोक यांचे शिष्य होते. राजाराममहाराजांनीं शहापुरास आपला देह ठेवला, तेव्हां त्यांचें शव दोघेही गांवाबाहेर घेऊन गेले. तेथें त्यांच्या शरीरास अग्निसंस्कार प्रथम आम्ही करणार, आम्ही करणार, असा उभय पक्षांत तंटा सुरू झाला व तो इतका विकोपास पोंचला कीं हाणामारीनें एकमेकांचीं डोकीं फुटून रक्तें निघालीं! इतक्यांत असा चमत्कार झाला कीं चिदंबरदास राजाराममहाराज कबीराप्रमाणें एकदम उठून बसले! हें पाहून लोक विस्मित व शांत झाले आणि हात जोडून उभे राहिले. महाराजांनीं त्या जागेवर सिद्धासन घालून, योगाग्नीनें आपला देह जाळून घेतला! उजव्या पायाच्या अंगुष्ठापासून जळण्यास सुरवात झाली व कापूर जळतो त्याप्रमाणें सर्व देह जळून गेला! हा चमत्कार डोळ्यांनीं पाहिलेलीं वृद्ध माणसें आम्हांस लहानपणीं भेटलीं होतीं. त्यांपैकीं शहापुरास नेवग्यांच्या थोर घरांतील एक ९० वर्षांची वृद्ध बाई होती. हिची भेट आम्हांस आमच्या वयाच्या सुमारें २० व्या वर्षी झाल्याचें आठवतें. ही साध्वी योगिनी मोठ्या अधिकाराची असून तिनें आम्हांस अजपाजपाची माहिती व कांहीं योगखुणाही सांगितल्या होत्या. असो.

श्रीमाणिक प्रभूंच्या चरित्रांत, त्यांच्या भक्तांपैकीं एका न्हाव्याच्या पोरानें कडक थंडीच्या दिवसांत थंड पाण्याची वाटी आपल्या बेंबीवर ठेवून त्या पाण्यास उकळी आणली व माणिक प्रभूंशीं वाद करण्याच्या उद्देशानें आलेल्या एका शास्त्रीबुवांची खोड मोडली, अशी गोष्ट आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या पाठीवर मुक्ताबाईकडून मांडे भाजविले ही गोष्ट तर प्रसिद्धच आहे. मांडे भाजण्याइतकी पाठ योगाग्नीनें तप्त करणें ही गोष्ट सामान्य नव्हे! हें त्यांचें योगसामर्थ्य पाहून त्यांचा छलक विसोबा खेचर त्यांना शरण गेला. (हाच तो ज्ञानोबांचा शिष्य विसोबा खेचर मागाहून नामदेवाचा गुरु झाला.) असा हा वैश्वानर अग्नि सर्वांच्या शरीरांत असतोच. योगाभ्यासानें तो प्रगट करितां येतो. पण पतिव्रता स्त्रियांना योगाभ्यासाचे वगैरे सायास न करितां ही क्रिया अथवा अशा सिद्धी सहज साध्य होतात. पुण्यश्लोक नलराजाची पत्नी दमयंती हिनें अरण्यांत आपल्यावर पापी नजर ठेवणाऱ्या एका व्याधास जाळून भस्म केलें तें याच अग्नीनें. पातिव्रत्यधर्मानें ही शक्ति – अंतर्ज्ञानाची व योगाग्निप्राकट्याची – कशी येते, याबद्दल वरील पतिव्रता रेशमदेवीचें हें अगदीं ताजें उदाहरण होय.

* * * *

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

अबला या शरीरानें अबला म्हणजे दुर्बला असोत, पण मनानें महान् सबल असतात अथवा होऊं शकतात. नव्हे, 'अबला या बलाच्या म्हणजे शक्तीच्या प्रतीकच होत,' असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु त्यांना योग्य दिशा दाखविणारा पाहिजे. त्यांना योग्य शिक्षण दिलें पाहिजे. तें शाळेंतून मिळणार नाहीं. व्यावहारिक शिक्षणसुद्धां जर त्यांना सव्यंग मिळत आहे (अशी हल्लीं सर्वत्र ओरड आहे) तर मग धार्मिक शिक्षण अव्यंग तऱ्हेचें तिकडून कसें मिळूं शकेल? शाळेंत नाहीं म्हणून घरांत तरी हें शिक्षण त्यांना कोण देऊं इच्छितो? आपल्या कन्या धर्मवीर व राष्ट्रवीर पुत्र प्रसविणाऱ्या व्हाव्या अशी इच्छा किती आईबापांच्या पोटीं असेल? कोणी म्हणतील आपल्या कन्या वीरपत्नी व वीरमाता होऊं नयेत असें आम्ही इच्छितों काय? नाहीं. पण आम्ही विचारितों – तशा व्हाव्यात असें तरी तुम्ही इच्छितां काय? ज्याप्रमाणें आपली मुलगी मॅट्रिक व्हावी, बी. ए. व्हावी. एम्. ए. व्हावी असें इच्छितां व त्या धोरणानें वागतां, त्याप्रमाणें आपली संतती (पुत्र किंवा कन्या) धर्मवीर व राष्ट्रवीर व्हावी अशी इच्छा करून त्या धोरणानें वागतां काय? कोण वागत असतील, त्यांची धन्य होय!

"अनेक उत्सव, अनेक संस्था, अनेक चळवळी झाल्या तरी जोंपर्यंत अध्यात्म-बलयुक्त (केवळ अध्यात्मज्ञानानें युक्त नव्हेत) माता, पत्नी व कन्या उत्पन्न होणार नाहींत, तोंपर्यंत मनुष्यजातीची पूर्ण उन्नति केव्हांही होणार नाहीं. सुप्रसिद्ध अमेरिकन तत्त्ववेत्ता प्युरिटन (?) साहेबांनीं म्हटल्याप्रमाणें परमात्मा मातृरूपानें (स्त्रीरूपानें) जगांत अवतीर्ण झाल्याशिवाय पूर्ण विकास व उन्नति (Perfection) मनुष्यमात्राची होणार नाहीं."

— सौ. गजलक्ष्मीसुंदरीचरित्र

"We will never be able to see humanity united and happy, till God comes down on earth as woman."

— *World Mother*

महानुभाव द. कृ. दामले 'गृहस्थाश्रमां'त म्हणतात – "स्त्री गृहिणी आहे. स्त्रीत्वाला उचित असें शिक्षण हल्लीं मुलींना दिलें जात नाहीं. जें दिलें जातें त्यास शिक्षण म्हणावयास लाज वाटते. सद्वृत्ति, भारदस्तपणा, गांभीर्य, औदार्य, प्रेम, इत्यादि गुणांसंबंधीं उपेक्षा होत आहे व अस्सल विचारशक्तीला आणि कल्पनाशक्तीला जी ओहोटी लागली आहे, त्याकडे पाहून जीव कासावीस होतो ... मूढ समानत्वाच्या

तत्त्वावर पुरुषांच्या व्यवहारांत पुरुषांशीं बायकांकडून स्पर्धा करविण्यांत अर्थ नाहीं. Masculine Spirit ( पुरुषाचा आवेश ) जो, तो बायकांत वाढून उपयोग नाहीं. ( कारण ) —

" कर्कश विचारांशीं, आनंद म्हणून ज्याला मानितात त्याचें खरोखर वांकडें आहे. आनंद देणें किंवा घेणें हा बुद्धिमत्तेचा धर्मच नव्हे. सुंदर चित्रापासून, मधुर आवाजापासून, गंधयुक्त सुंदर पुष्पापासून, काव्यापासून तसेंच मनोहर रूपापासून मनाला ज्या जातीचा अवर्णनीय आनंद होतो व जो सर्वांना मनापासून हवा असतो, त्याच जातीचा आनंद कोमल स्त्रियांच्या शुद्ध स्वभावापासून आणि अध्यात्मज्ञानात्मक दिव्य प्रेमापासून होत असतो. हे दोन गुण त्यांच्या अंगीं फार मोठे आहेत.

" मनाचा उच्छृंखलपणा मोडून त्याला शांत करावें हें काम स्त्रियांचेंच होय व तें यांनींच करावें. काव्य आणि वेदान्त यांचा मिलाफ झाला असतांना आचाराला आणि विचाराला तेज चढून आनंदाला भरतें येतें ; त्याप्रमाणें संसारांत वनिता ही कविता आहे आणि पुरुष हा वेदान्त आहे. अथवा स्त्री ही भावना असून पुरुष हा विवेक आहे. अथवा स्त्री ही वृत्ति असून पुरुष हा बुद्धि आहे. या उभयतांचा सुंदर संयोग जमून आला असतांना जीवाच्या कल्याणाचा, सदाचाराचा आणि सुखाचा उत्कर्ष होऊन त्यास धन्यता वाटल्यावांचून कधींही राहणार नाहीं.

" कोमल स्त्रियांच्या शुद्ध स्वभावापासून आणि दिव्य प्रेमापासून होणारा आनंदही अप्राकृत असतो. पुरुषाला आपल्या शहाणपणाचा आणि पुरुषपणाचा कितीही अभिमान असला तरी वरील दोन गुणांत स्त्रियांची बरोबरी त्याच्यानें होऊंच शकत नाहीं. म्हणून प्रेमाच्या आणि सद्गुणाच्या भाषेंत त्यांच्याशीं बोलूं लागल्यानंतर तेथें आनंदाला सीमाच उरणार नाहीं. " इत्यादि.

**" गृहिणी सचिवः सखी मिथः । प्रियशिष्या ललिता कलाविधौ ॥ "**
असें कालिदास म्हणतात.

* * * *

परमार्थसाधक संतांनीं क्वचित्प्रसंगीं स्त्रियांची निंदा केलेली आढळते. " एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये " ( तु. ) असा इशाराही ते साधकांस देतात. यांत स्त्रियांची निंदा करण्याचा त्यांचा हेतु नसून, स्त्रियांना आपल्या उपभोग्य वस्तु समजून केवळ वैषयिक बुद्धीनें त्यांच्याकडे जे पाहतात, त्यांच्या त्या पशुबुद्धीची ते निंदा करितात. स्त्रियाही ज्या केवळ पुरुषांना वैषयिक बुद्धीनेंच मोहांत

पाहूं पाहतात, त्यांच्या त्या बुद्धीचीच संत निंदा करितात असें मानावें. त्याचेंही कारण असें कीं **विषयानंदाचा लोभ हा निर्विषयानंदाच्या लाभाला मुकविणारा आहे**; इंद्रियग्राह्य 'क्षुद्र' विषयसुख हें बुद्धिग्राह्य अतीन्द्रिय अशा 'आत्यंतिक' सुखाला अडविणारें आहे आणि हेंच 'महासुख' मिळविण्याकरितां तर नरजन्म आहे. तो व्यर्थ जाऊं नये, कवडीच्या लोभानें रत्नाचा लाभ गमावूं नये, अशीच त्यांची म्हणजे संतांची कळकळीची इच्छा आहे. बाकी स्त्रियांविषयीं त्यांचा परम आदर आहे. कबीरदास आपल्या एका दोहऱ्यांत स्त्रियांची सरसकट निंदा करणाऱ्या अर्धवट लोकांना उद्देशून म्हणतात —

**"नारीकी निंदा मत करो, नारी रतनकी खाण ।**
**जिस खानीसे पैदा हुये, शुक भीष्म हनुमान ॥"**

(**अर्थ**)—स्त्रियांची निंदा करूं नका ! कारण ती रत्नाची खाण आहे; या खाणींतूनच भीष्म, शुक, हनुमान, इत्यादिकांसारखीं महान् 'वैष्णववीर' रत्नें उत्पन्न झालेलीं आहेत. या उद्गारांवरून त्यांचा स्त्रियांविषयीं आदर कसा आहे तो पाहा. या आदरास आपण सदैव पात्र असावें, अशी शुभेच्छा प्रत्येक आर्यस्त्रीनें धारण करावी.

पाश्चात्य विद्वानांचेही स्त्रियांविषयींचे उद्गार लक्षांत घेण्यासारखे आहेत. पुरुषांनीं आपली दृष्टि सुधारण्यासाठीं व स्त्रियांनीं आपले गुण वाढविण्यासाठीं ते आम्ही खालीं देत आहों —

"A mother, a sister, a wife, a daughter, ... what magic dwells in those tender names! Blot them out and the world would be for us only a heart-breaking wilderness and life a bitter weed which we would gladly cast away."

—*R. P. Downes*

पुनः दुसऱ्या ठिकाणीं हाच ग्रंथकार 'आदर्श स्त्री' विषयीं कसे उद्गार काढतो ते पाहा —

"The woman who shall be, will be beautiful in Chastity ... The woman who shall be, will be empowered and guarded by a living Piety. ... Lastly the woman that shall be, will be beautiful in Benevolence and service."

"*The feminine is the spiritual.* That is its essential character. A woman without religion is unnatural. Separate her from

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

God and you take away her woman-hood.... The ideal woman therefore will have affiance in God." —*R. P. Downes*

स्त्रियांच्या पातिव्रत्याविषयीं, धर्म व देवभावनेविषयीं वगैरे कांहीं पाश्चात्यांचे विचार किती उच्च व किती आदराचे आहेत हें वरील उद्गारांवरून विद्वान वाचकांना समजून येईल.

ज्ञानेश्वरी, दासबोध, भागवत वगैरे श्रवण करून आपण परमार्थाभ्यास करीत आहों असें मानणाऱ्या साध्वींनीं वरील उद्गारांत सांगितलेले गुण ( पतिनिष्ठा व इतर सर्व प्रकारचें पावित्र्य, तसेंच परोपकार व भूतसेवा – नुसती भूतदया नव्हे, – धर्म व देवभक्ति इत्यादि ) आपल्या अंगांत कितपत उतरले आहेत, याचें निरीक्षण करावें. या सद्गुणांच्या संपादनावांचून, अभ्यासावांचून नुसत्या धार्मिक ग्रंथांचें वाचन अथवा श्रवण, तशीच देवाची भक्ति व इतर धार्मिक आचरण ही नुसती कवाईत अथवा फार दिवसांपासून जडलेलें तें एक सात्विक व्यसन म्हटलें जाईल. आम्ही छातिठोकपणें असें सांगूं शकतों कीं भक्ति व इतर धार्मिक व्रताचरण यांच्या बळावर पातिव्रत्य, परोपकार, भूतदया, भूतसेवा, इत्यादि सद्गुणांचा अव्हेर अथवा उपेक्षा केली, तर ती स्त्री भगवंताला प्रिय होणार नाहीं; उलट देवाची प्रत्यक्ष भक्ति न करतां जी स्त्री वरील सद्गुणांचा अभ्यास करील, तसें आचरण ठेवील, तीच भगवंताला अधिक प्रिय होईल.

* * * *

स्त्रियांना आपला पति आपल्या वचनांत वागावा अशी साहजिक इच्छा असते. ही इच्छा पूर्ण होण्याकरितां त्या नाना तऱ्हेचे प्रयत्न करीत असतात. कैक वेळा तशा इच्छेनें प्रेरित होऊन त्या मंत्रतंत्र, अंगारेधुपारेही करितात. त्याचा परिणाम कित्येक वेळां भयंकर होतो. नवऱ्यानें आपल्यावर प्रीति करावी, त्यानें आपण सांगूं तसें वागावें, दुसऱ्या स्त्रीवर जडलेली प्रीति त्यानें सोडावी, म्हणून एका बाईनें नवऱ्यावर जादू केला, त्या योगानें तो प्राणास मुकला, याबद्दलची हकीकत ता. २७।५।३५ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया' च्या अंकांत 'Woman who resorted to black magic' या सदराखालीं छापून प्रसिद्ध झाली आहे, ती हवीतर वाचून पाहावी. 'नवा काळ' वगैरे पत्रांतही ती छापून आली आहे. अशीं पुष्कळ उदाहरणें सांपडतात. करितां साध्वी स्त्रियांनीं अशा फंदांत न पडतां वरील सद्गुण अंगांत बाणण्याचा प्रयत्न करावा. या सद्गुणाच्या तेजानें, ईश्वरभक्तीच्या बळानें व पतीवरील

निष्कपट प्रेमानेंच पत्नीला पति वश होऊन राहातात. **हाच नवऱ्याला मुठींत धरण्याचा मंत्र** आहे. एकदां द्रौपदीची व सत्यभामेची गांठ पडली. तेव्हां द्रौपदीवर पतींचें प्रेम पाहून सत्यभामेला हेवा वाटला व तिनें प्रश्न केला कीं ' हे द्रौपदी ! तूं आपल्या पांचही नवऱ्यांना कसें अगदीं मुठींत ठेवलें आहेस ! ते तुझ्यावर कधीं रागावलेले दिसत नाहींत. असा काय मंत्रतंत्र तूं केला आहेस मला सांग, म्हणजे मीही तसें करून कृष्णाला मुठींत ठेवीन, ' त्यावर द्रौपदीनें तिला उत्तर दिलेलें आहे. तो संवाद महाभारतांत वनपर्वांत मोठा सुंदर रीतीनें वर्णिलेला आहे. भारतांतील गोष्टींचीं मराठी पुस्तकेंही झालीं आहेत. त्यांतून हा द्रौपदीसत्यभामासंवाद प्रत्येक साध्वीनें जरूर वाचून पाहावा, म्हणजे '**नवऱ्यास मुठींत धरण्याचा मंत्र**' त्यांना मिळेल. असो.

तात्पर्य, **पतिभक्ति हा स्त्रियांचा महामंत्र होय.** पण भक्ति करण्यास योग्य असा एक ईश्वरच आहे. हें विसरतां कामा नये. नुसता पति तारक म्हणणें हें अज्ञान आहे. मनुष्य मनुष्याला काय तारणार ?

> **" पातिव्रत्यधर्म स्त्रियांसी ।**
> **परी समजलें पाहिजे ' पति हृषीकेशी ' ।**
> **ईश्वरावीण उपास्यत्व नाहीं कवणासी ।**
> **हा निश्चयेंसीं ब्रह्मसूत्रसिद्धांतु ॥ ७०४ ॥ "**
>
> —संप्रदायसुरतरु, अ. २०

अर्थात् **पतिभक्ति करणें म्हणजे ईश्वरबुद्धीनें त्याची सेवा करणें.** हाडामासाच्या पतिशरीराची हाडामासाच्या पत्नीशरीरानें सेवा केली, त्याचें फळ काय येणार ? तर हाडामासाची तुष्टिपुष्टि ! ती विनाशी व क्षणिक ! सेवा करतांना शरीराचे श्रम तितकेच, पण बुद्धीच्या संकल्पानुसार फळांत अंतर. बुद्धीचा संकल्प म्हणजे ' भावना. ' " मंत्रे, तीर्थे, द्विजे, देवे, दैवज्ञे, भेषजे, गुरौ । यादृशी भावनां कुर्यात् सिद्धिर्भवति तादृशी ॥ " म्हणजे मंत्र असो, तीर्थ असो, किंवा देव, ब्राह्मण, ज्योतिर्विद, औषध व गुरु वगैरे कोणीही असो, त्यांच्या ठिकाणीं जशी भावना करावी तसें फळ मिळतें. काशी, रामेश्वर किंवा द्वारका, पंढरपूर वगैरे क्षेत्रांतील, किंवा गांवोगांवच्या देवळांतील अथवा घरच्या देव्हाऱ्यांतील मूर्ति पाषाणाच्या किंवा धातूच्या असतात, त्यांमध्यें ईश्वरभावनाच करावी लागते. ती जशी ज्याची उत्कट असेल, तसें त्याला फळ येतें. अशी ही ईश्वरभावना दगडधातूंच्या मूर्तींत जर

करतां येते, तर ती चैतन्ययुक्त पतिशरीरांत करतां येणार नाहीं काय? पतीची हरएक प्रकारें सेवा करावी लागते, ती ईश्वरभावनेनें केली, तर ईश्वर आभारी नाहीं का होणार? सर्व क्रियेंत (सर्व गृहकार्यांत) ही भावना ठेवली, तर त्या गृहिणीच्या सर्व क्रिया भगवत्परच होतील. गृह हें पतीचें; त्या अर्थी त्याच्या आज्ञेनुसार व इच्छेनुसार करावीं लागणारीं गृहकार्यें म्हणजे सर्व त्याची सेवा. ती त्याच्या प्रीत्यर्थ करावयाची आणि तो म्हणजे ईश्वर, अर्थात् हातून घडणारीं सर्व कर्में म्हणजे गृहकृत्यें ही ईश्वरसेवा. अशी सुंदर भावना मनाला लावून दिली, ठसवून मोडली, म्हणजे आणखी दुसरा धर्म तो काय राहिला? पुरुष आपल्या पत्नीशीं कामसेवन करीत असतां त्याला कामाचाच तेवढा लाभ होतो, पण पत्नीला कामलाभ व्हावयाचा होऊन, पतिमनोरथ पुरविल्यामुळें तिला ईश्वरसेवारूप धर्मलाभही घडतो. श्रीगुलाबरावमहाराज आपल्या ‘संप्रदायसुरतरु’ ग्रंथांत यासंबंधानें म्हणतात —

**“... यालागीं यथाविधि काम सेवावा। तेणें पुरुषास तंव कामचि मिळे बरवा।**
**स्त्रियेस मात्र आघवा। कामेंही मिळों शके धर्म॥**
**पतीस मानूनि भगवंत। पुरवितां पतिमनोरथ।**
**तरी कामेंचि स्त्रियांस धर्म मिळत। जैसें विषांतूनि अमृत मिळे वैद्यां॥”** इत्यादि.

— संप्रदायसुरतरु, अ. २०

विधुरांनीं काय करावें, विधवांनीं काय करावें, वेश्यांनीं व वेश्यागमयांनीं काय करावें, कामवृत्ति प्रबळ झाली असतां काय उपाय योजावा वगैरेबद्दलच्या सूचना श्रीगुलाबरावमहाराजांनीं आपल्या संप्रदायसुरतरु ग्रंथांत विस्तारेंकरून दिल्या आहेत, त्या कल्याणेच्छु जनांनीं त्या ग्रंथांतच पाहाव्या अशी शिफारस करून पुढील विषयाकडे वळतो.

## बालकांत भगवद्बुद्धि

शालिग्रामांत विष्णुबुद्धि अथवा बाणांत शंकरबुद्धि, त्याप्रमाणें पतींत ईश्वरबुद्धि करून त्यास भजावें असें वर सांगितलें. हें ईश्वरभजन केवळ पतीच्या शरीरापुरतेंच नसून त्याच्या सर्व प्रकाराच्या इतर सेवेंतही करून आपली भावना व्यापक करण्याचा प्रयत्न करावा. या ‘इतर सेवेंत’ बालकांची सेवा प्रामुख्यानें गणण्यासारखी आहे. करितां ती करतांना ‘बालकांत भगवदबुद्धि’ करण्याचा अभ्यास करावा. हा अभ्यास

सर्वांत सुंदर व गोड आहे. आपल्या बालकांची सर्व प्रकारची सेवा स्त्रियांना करावीच लागते. ही सेवा आपलीं तीं बालकें हाडामासाचीं समजून केली कीं ती त्यांच्या विष्ठामूत्रांत गेली म्हणून समजावें. तर तसें न करितां हीं बालकें – ( कन्या असो वा पुत्र असो ) माझा गोपालकृष्ण, माझा राम, माझा दत्त – अशा भावनेनें केली कीं ती सर्व भगवंतालाच पोंचली. '**कर्में बदलतां येत नाहींत, भावना बदलावी,**' म्हणजे काम झालें. मुलांच्या पालनपोषणासंबंधानें मागें ( पृ. २८५–२८७ ) 'संतांची एक सुंदर दृष्टि' म्हणून दिली आहे, ( ती पुनः एकदा वाचून पाहावी ) त्यापेक्षां वरील दृष्टि अधिक सुंदर आहे. ही संतांचीच उच्च शिकवण होय. सुदैवानें तुमच्या घरीं हे गोपालकृष्ण कमीअधिक असतील, तर त्यांना तेल लावतांना, न्हाऊं घालतांना, स्तन्य देतांना, कपडे लेववितांना, जेवूं घालतांना, 'अंगाई' म्हणून निजवितांना, आपणांस यशोदा, कौसल्या अथवा अनसूयादि कल्पून त्या लेकरांच्या ठिकाणीं भगवद्भावाची अखंड धारा चालू ठेवावी ; 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः' या वचनाप्रमाणें हीं माझ्या स्वामीचींच प्रतिरूपें अथवा विभूति होत या दृष्टीनें त्यांजकडे पाहात असावें. हे गोपालकृष्ण जेव्हां दंगा करूं लागतात, तेव्हां इंद्राला राग येऊन तो वज्र उभारतो अथवा मुसळधारा पाऊस पाडतो, पण ती कृष्णलीला पाहून अग्नीला हर्षविस्मय होतो व तो इंद्रास आवरतो. सूर्यचंद्रही अग्नीला मदत करितात. मग सर्वच देव आपल्या भिन्न भावना सोडून त्या कृष्णलीलेशीं तन्मय होऊन आनंद पावतात. [ दीड दोन वर्षांचें मूल, उपायअपाय न जाणणारें ( Innocent ), तांदळांत डाळ, डाळींत तांदूळ वगैरे लीला करूं लागतें ; तेव्हा आईचा हात रागानें वर उठतो, पण तोंड हसूं लागतें ; त्या वेळीं हात खालीं उतरतांना अगदीं बलहीन होऊन उतरतो आणि डोळ्यांतून प्रेमाचीं किरणें त्याच्या चिमुकल्या देहावर पसरतात ; त्या वेळीं त्या यशोदामाउलीचा तो निरुपायाचा गंमतीचा हसरा चेहरा अगदीं पाहण्यासारखा असतो. ]

अलीकडचे विद्वान लोक, 'बायकांनीं आतां **चूल व मूल** सोडून जरा घराबाहेर नजर दिली पाहिजे, देशकार्यांत पुरुषांना मदत केली पाहिजे' वगैरे बुद्धिवाद सांगत असतात ! पण चूल व मूल सांभाळणें किती कठिण काम आहे याची त्यांना यथार्थ कल्पना नसते. चूल एखादे वेळीं स्वैपाक्याच्या स्वाधीन करतां येईल, पण आईनें

१ हाताची देवता इंद्र, मुखाची अग्नि, डोळ्याची सूर्यचंद्र ; अर्थात् इंद्र म्हणजे हात, अग्नि म्हणजे तोंड व सूर्यचंद्र म्हणजे डोळे असें समजावें.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

मूल दाईच्या किंवा ‘ बॉय ’ च्या स्वाधीन करून चालणार नाहीं. धड नेणतें नाहीं व जाणतें नाहीं, असें मूल आईला कसें त्रास देऊन सोडतें, तें जेवतांखातांना आईच्या पोटांत किती खडे घालतें, त्याची सेवासुश्रूषा करितांना तिचा किती वेळ मोडतो व घरचें कामधाम करीत असतां त्याला आवरणें किती कठीण असतें, याची कल्पना पुरुषांना असत नाहीं. बाप हा कामाधामावरून घरीं आला व मूल हसूं-खेळूं लागलें म्हणजे त्याला घटकाभर उचलून कडेखांद्यावर घेऊन आपली करमणूक करून घेईल. पण मूल एकदां रडूं लागलें म्हणजे ‘ त्वमेव शरणं ’ असें म्हणून त्याला आईच्याच स्वाधीन करावें लागतें ! मुलांचा दंगा, कोलाहल, खेळ, हट्ट वगैरे पाहिले म्हणजे श्रीगोपाळकृष्णानें यशोदामातेलाच नव्हे तर सगळ्या गोकुळाला कसें सतावून सोडलें होतें, त्याची आठवण होते. यशोदामातेनें काळाचा काळ असा त्या बाळाचा त्रास कसा सहन केला असेल असें वाटतें. स्वामी रामतीर्थांनीं बालकांना ‘ जुलमी राजा ’ असें म्हटलें आहे. कारण त्याचेवर कोणाचीही सत्ता चालत नाहीं, त्याची सत्ता सर्वांवर चालते, असें मोठें मजेदार वर्णन केलें आहे. असो. साध्वी स्त्रिया आपल्या बालकांवर भगवद्बुद्धि ठेवून त्याची लीला पाहात चालल्या, त्याच बुद्धीनें त्याची न सुटणारी सेवा करीत राहिल्या, म्हणजे त्यांची परमार्थोन्नति कशी लीलेनेंच होत जाते, याचा अनुभवच घेऊन पाहिला पाहिजे.

चुलीच्या बाबतींत बोलावयाचें झाल्यास, जेवण म्हणजे नुसती पोटाची खळगी भरणें असें ज्यांना वाटतें, त्यांना स्वैपाक्याच्या हातचें अन्न काय व खाणावळींतील डबा काय, सारखेंच. ज्यांना जेवण म्हणजे केवळ क्षुधाशमन नसून त्यापेक्षां त्यांत कांहीं विशेष आहे असें वाटतें, त्यांनाच **‘ मातृहस्तेषु भोजनं ’** चें महत्त्व कळतें. माता किंवा तितक्याच प्रेमानें व कळवळ्यानें वाढणारी पत्नी यांच्या प्रेमळ हातांतून ताटांत पडणारें अन्न सेवन करितांना अन्नरसाबरोबर दुसरा एक पवित्र रस जेवणाऱ्याच्या पोटांत जात असतो, वाढणाऱ्याच्या हातांतील विद्युत् त्या अन्नांत शिरत असतें, तिचा परिणाम शरीरांतील सप्त धातूंवर होत असतो. हें तत्त्व जाणणारा मनुष्य स्वैपाक्याच्या हातचें अथवा खाणावळींतील अन्न कधींही पसंत करणार नाहीं. आमचे एक पैसेवाले डॉक्टर मित्र आहेत, मोठे कुटुंबवत्सल आहेत, ते म्हणतात, कामाकरितां दोन गडी जास्त ठेवीन, पण एक स्वैपाकी ठेवणार नाहीं. एकदां डॉ. बेझंटबाई मद्रासहून कलकत्त्याला चालल्या होत्या, तेव्हां आम्ही हुबळीस होतों. तेथील आमच्या एका थिआसोफिस्ट मित्रांना स्टेशनवर गाडीच्या वेळेस दूध घेऊन येण्याबद्दल तार आली. तेव्हां आम्हीं म्हटलें—दुधाबद्दल तुम्हांला तार

कां ? कांहीं कांहीं स्टेशनांवर ' रिफ्रेशमेंट रूम ' ( जेवण व फराळ मिळण्याची सोय ) असते, चालत्या गाडींत सुद्धां चहा, कॉफी, फराळ, वगैरे हवे ते जिन्नस मिळण्याचा डबा असतो, त्यांत दूध मिळत नाहीं काय ? त्यावर त्यांनीं बेझंटबाईची राहणी सांगितली. ते म्हणाले, भलत्याच्या हातचें त्या कांहीं खात नाहींत. त्यांनीं आपल्या रोजच्या स्वैपाकाकरितां एक काशीकडील ब्राह्मण ( लक्ष्मणभय्या नांवाचा ) ठेवला आहे. तो मारुतीचा उपासक ; म्हणून त्याच्याकरितां अड्यार येथें लहानसें मारुतीचें देऊळही त्यांनीं बांधून दिलें आहे. ( हें आम्हीं तेथें गेल्या वेळीं पाहिलें आहे. ) दूध किंवा कोणताही पदार्थ ज्याच्या हातून येतो, त्याच्या बऱ्यावाईट विचाराच्या लहरी ( Thought Currents ) त्याच्या हातांतून त्या पदार्थांत उतरतात व त्याचा परिणाम तो पदार्थ सेवन करणाऱ्याच्या बुद्धीवर होतो. तो योगादि अभ्यासानें सूक्ष्म झालेल्या बुद्धीलाच कळतो. म्हणून त्या केव्हांही भलत्यासलत्याच्या हातचें कांहीं खात नाहींत, इत्यादि. हें ऐकून श्रीरामकृष्ण परमहंस व गौरांगप्रभु हे भलत्याच्याच हातचें कांहीं घेत नसत हें त्यांच्या चरित्रांत वाचलेलें आठवलें व समाधान वाटलें. साध्वी स्त्रियांचें लक्षण सांगतांना आमच्या शास्त्रकारांनीं " कार्येषु मंत्री करणेषु दासी, **भोज्येषु माता** शयनेषु रंभा " असें म्हटलें आहे. यांत पतीला अन्न वाढतांना जणूं ती माता, असें म्हटलें आहे. पतीच्या रुचि ओळखून त्याला आवडेल, ( रुचेल व पचेल ), असें अन्न तयार करणें व तें प्रेमानें वाढणें, तो जेवीत असतांना आपली नजर ताटांतून त्याच्या पोटांत पोचविणें, प्रत्येक ग्रासाबरोबर तुष्टि, पुष्टि व क्षुधाशांति' होत चाललेली पाहून आपणही प्रेमतुष्ट होणें, अशा त्या गृहलक्ष्मीच्या हातच्या अन्नाची गोडी, भाडोत्री स्वैपाक्याच्या हातच्या अन्नांत येईल काय ? पण हें, तो रस जाणण्याचें इंद्रिय असणारालाच कळेल. नुसत्या पोटभरूला कसें कळणार ? अशा रीतीनें अन्न तयार करणें व तशा रीतीनें तें वाढणें ही केवढ्या मोठ्या जबाबदारीची गोष्ट आहे, हें केवढ्या शारीरिक व मानसिक श्रमाचें काम आहे, हें जाणणारा मनुष्य त्यांच्या ' चूल ' सांभाळण्याबद्दल केव्हांही तुच्छता दर्शविणार नाहीं. ( येथें हीही थोडीशी सूचना द्यावीशी वाटते कीं कांहीं श्रीमंत साध्वी, ज्यांच्या घरांत स्वैपाकी पानकी वगैरे असतात, त्या स्वैपाकी वाढीत असतांना येऊन पाहात देखील नाहींत. हा एक प्रकारें आळस व देवाचे ठायीं कृतघ्नताही होईल. तर असें न करितां त्या माउलींनीं आपण आपल्या हस्तें प्रेमानें निदान अन्नशुद्धि करण्याची व शेवटीं दूध ताक वगैरे वाढण्यची वहिवाट ठेवावी. वर सांगितल्याप्रमाणें जेवणाऱ्यांच्या पानावर प्रेमाची नजर ही राखावीच. )

मूल सांभाळण्याचें काम किती कठिण आहे हें थोडेंसें वर सांगितलें आहे. तेथें त्याच्या शरीर सांभाळण्याचीच कठिणाई दर्शित केली आहे. तथापि मूल सांभाळणें याचा तेवढाच अर्थ नसून त्यापेक्षां फार मोठा आहे असें समजावें. मूल सांभाळणें म्हणजे त्याचें शरीर सांभाळणें एवढाच अर्थ जे करितात, ते बागेंतील फुलझाडांइतकीही आपल्या मुलांची काळजी घेत नाहींत असें म्हणण्यास आम्हांला भीति वाटत नाहीं. कारण असे आईबाप आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहेत. हातांत पैसे झाले म्हणजे ( पूजेकरितां ) देवाला भट व मुलाला मास्तर लावून मोकळे होतात ! नंतर तो भट पूजा कशी करितो व मास्तर कसा शिकवितो आणि मुलगा कसा शिकतो हें पाहतही नाहींत ! मुलाच्या कपड्यालत्त्यांकरितां व शिक्षणाकरितां बाप हवे तेवढे पैसे खर्च करील, पण वेळ खर्च करणार नाहीं !! मुलें हीं राष्ट्रवृक्षाचीं उमलणारीं फुलें आहेत हें त्यांना माहीत नसतें. हीं बालकेंच उद्यां राष्ट्राचे आधारस्तंभ होणार आहेत असें ज्यांना वाटत नाहीं, किंवा बालकांना पाहून ज्यांना बालमुकुंदाचें प्रेम उत्पन्न होत नाहीं, त्यांना पशुबुद्धि म्हटलें तर आपल्या पूर्वज ऋषींना किंवा संतांना वाईट वाटणार नाहीं. मास्तर वगैरे ठेवून आम्ही मुलांस कांहीं शिकवितों असें वाटतें, पण मुलेंच आम्हांस **प्रेम, क्षमा, आनंद, दया, सरलता,** इत्यादि दैवी गुणांचें पुस्तकांतून न मिळणारें शिक्षण कसें बेमालूम देत असतात व त्यांचें त्याबद्दल आम्ही किती उतराई झालें पाहिजे, याची आपणांस कल्पनाही असत नाहीं !

" शब्दानें जिचें वर्णन होणें शक्य नाहीं, परंतु जिचें ज्ञान असणें अवश्य आहे, अशी दिव्य स्थिति प्रत्यक्ष उदाहरणानें मुलें पितरांस शिकवितात. हे जे मुलांचे आपणांवर उपकार होत आहेत, त्यांची फेड त्यांच्या संगोपनानें आपणांकडून कांहींच होत नाहीं. जीवन्मुक्ताची अवधूत परमहंस स्थिति पाहिली म्हणजे आपल्या ठिकाणीं पूज्यभाव उत्पन्न होतो ; परंतु बालकाची तीच स्थिति पाहिली असतां, पालनकर्तृत्वाचा अभिमान ती भावना उत्पन्न होऊं देत नाहीं. वस्तुतः बालकाचे पितरांवर उपकार आहेत. प्रेमाच्या कर्तव्यांत आम्ही पराकाष्ठा करून ' दिव्यप्रेम ' साध्य करून घेतलेलें नसतें, म्हणून तें ईश्वरी कार्य सिद्ध होण्यासाठीं आम्हांस पुनःपुनः पुत्रसेवेंत नियुक्त करण्यांत येतें. पुष्कळ अभ्यासानें एकदां ' विश्वव्यापक प्रेम ' लाभलें म्हणजे शंकराच्या कृपेनें संतति बंद होते." इत्यादि.

—द. कृ. दामलेकृत ' गृहस्थाश्रम '

तात्पर्य, चुलीप्रमाणें मूल सांभाळण्याची जबाबदारी ही बायकांव्यतिरिक्त पुरुष केव्हांही घेऊं शकणार नाहींत. बायकांनीं मूल योग्य रीतीनें सांभाळणें म्हणजे राष्ट्राची

***********************************************

एक मोठीच सेवा केली असें समजलें पाहिजे. साप म्हणून भुई बुडविल्याप्रमाणें खोलवर विचार न करितां जुन्यावर टीका करणें व सुधारणा म्हणून कांहीं तरी बरळणें व करूं लागणें हें योग्य नाहीं. हा उपदेश संसारांतील सर्वसाधारण स्त्रीपुरुषांना लागू आहे, तथापि आमच्या साधक भगिनींच्या कक्षेबाहेरचाही तो नाहीं, अशी आमची प्रेमाची समजूत आहे. त्यामुळें बायकांच्या 'चूल-मुला-' विषयीं इतकें लिहावें लागलें. आपलीं मुलें रूपानें सुंदर, गुणानें सुंदर, शरीरानें गुटगुटीत, उत्तम आरोग्यवान व आयुष्यवान, भाग्यवान व भक्तिमान निपजावीं अशी मंगल इच्छा प्रत्येक साध्वीनें धारण केली पाहिजे. आपल्या कुलांत अधर्मी, अज्ञानी, अवगुणी व 'अब्रह्मवित्' म्हणजे ब्रह्म न जाणणारी प्रजा उत्पन्न होऊं नये, असें उपनिषत्कालीन ऋषि म्हणत असत. अशी मंगल इच्छा प्रत्येक साध्वी स्त्रीनें धारण करणें ईश्वरसंकल्पास अनुसरून आहे. त्याकरितां मुलांच्या शालाशिक्षणाबरोबर धार्मिक शिक्षणाची तिनें काळजी घेतली पाहिजे. **मुलांना विद्यावान करण्यापेक्षां गुणवान करण्याकडे लक्ष ठेवलें पाहिजे.** कारण विद्वान असून दुर्गुणी असलेल्या मनुष्यापेक्षां अविद्वान असून सद्गुणी असलेला मनुष्यच संसारांत सुखाचे दिवस पाहातो. सद्गुणांचें वळण लहानपणापासून लावलें तर लागतें; मोठेपणीं लागत नाहीं. याकरितां मुलांना लहानपणापासून **( १ ) आज्ञाधारकपणा** म्हणजे सांगितलेलें ऐकणें व सांगतांक्षणीं ऐकणें, **( २ ) खरें बोलणें** ( मस्करीनेंही खोटें न बोलणें ) **( ३ ) सकाळीं** ( अगदीं पहाटे ) **उठणें व ( ४ ) विनय** म्हणजे उद्धटपणानें कोणाकडेही न वागणें हे चार गुण प्रेमानें शिकविण्याची काळजी घेतली पाहिजे. या चार गुणांबरोबर बाकीचे सगळे सद्गुण आपोआप येतात आणि हे चार गुण नसले, तर बाकीचे हजार सद्गुण असले तरी व्यर्थ होतात. पण हे गुण त्यांना जुलमानें न शिकवितां प्रेमानेंच शिकवावे. मुलांवर **भीतीचा दाब ठेवण्यापेक्षां प्रीतीचें वजन ठेवावें.** त्यांना भागवत धर्माचें शिक्षण लहानपणापासून द्यावें. ( " **कौमार आचरेत्प्राज्ञ धर्मान् भागवतानिह** " असें भागवतांत सांगितलें आहे. **रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप** वगैरे ग्रंथांचें वाचन त्यांजकडून लहानपणींच करवावें. देवाचीं स्तोत्रें, सूर्यनमस्कार वगैरे त्यांना शिकवावे; तसेंच सार्वजनिक हिताला विघातक—रस्त्यावर केरकचरा फेंकणें अथवा दुसऱ्या तऱ्हेची घाण करणें, देवालयांत कथापुराण चाललें असतां गोंगाट करणें, रस्त्यावरील भिंतीवर चिकटविलेल्या जाहिराती फाडणें किंवा कशानें तरी खराब करणें, इत्यादि प्रकारचीं—'परापकारक' कृत्यें न करण्याबद्दल त्यांना सक्त ताकीद द्यावी; इतकेंच नव्हे तर 'परोपकारक' कृत्यें करण्याबद्दल

उत्तेजन द्यावें. ह्या सर्व व्यावहारिक नीतीच्या शिक्षणाचीही काळजी घेणें जरूर आहे. स्वकुलाभिमान, स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान यांचें बाळकडू त्यांना लहानपणींच पाजलें पाहिजे. रामविजय – हरिविजयादिकांप्रमाणें देशांतील प्राचीन व अर्वाचीन वीरपुरुषांचीं चरित्रेंही त्यांच्याकडून लहानपणींच वाचविलीं पाहिजेत. तात्पर्य, तीं धर्मवीर व राष्ट्रवीर निपजतील, त्यांच्यांत आत्मसंरक्षण व वैरीनिग्रहण करण्याची धमक उत्पन्न होईल, असेंच शिक्षण द्यावें. जिजाबाई व दादोजी कोंडदेव यांनीं असें शिक्षण लहानपणींच शिवरायाला दिलें होतें. देवभक्तीच्या व स्वधर्माच्या शिक्षणानें शिवराय नेभळट बनले नाहींत ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. लहानपणीं मुलांना देवाधर्मास मान देण्यास शिकविलें, धर्माच्या आज्ञा त्यांना पाळण्यास लावलें, तर मोठेपणीं तीं वडिलांस मान देऊं लागतील, त्यांचा अपमान करणार नाहींत.

लहान मुलांच्या डोकीवर हल्लीं पुष्कळ आईबाप ख्रिश्चन टोपी ( हॅट ) घालतांना दिसतात! जरीची टोपी त्यांना बरी दिसणार नाहीं काय ? मुलें कांहीं साहेबी टोपी मागत नाहींत, पण आईबापच त्यांना त्या टोपीची आवड लावितात व साहेब बनवितात ! मग मोठेपणीं त्या मुलानें एखादी मडम घरांत आणली तर त्याचा काय दोष ? त्या टोपीवांचून काय अडतें ? मुलगा सुंदर दिसायला त्याला बूट व असली हॅट कशाला ? सुंदर चर्मी जोडे किंवा वहाणा व सुंदर जरीची टोपी त्याला वाईट दिसेल काय ? स्वदेशी व्रतांत जसा देशी कपड्याचा अभिमान बाळगा-वयाचा, तसा स्वधर्मव्रतांत आपल्या कुलाचाराचा व पोषाखाचाही अभिमान बाळगला पाहिजे. बायकांनीं देशी कपड्याचा झगा नेसून तुळसीला प्रदक्षिणा घालण्यापेक्षां परदेशी सुताचें लुगडें नेसून प्रदक्षिणा घातलेल्या चालतील ! बायकांनीं हल्लीं चोळ्यांच्या ऐवजीं पोलक्यांचा जरी परिपाठ पुष्कळसा पाडला आहे, तरी पोलकें हें चोळ्यांचीच एक नवीन तऱ्हा म्हणतां येईल. पण पुरुष पोषाखांत जसे नखशि-खान्त साहेब बनले आहेत, तशा बायका झगे नेसून मडमा बनल्या नाहींत, हे त्यांचे मोठे उपकार आहेत. आपला आर्यधर्म आर्यावर्तांत जगविला आहे तो पुरुषां-पेक्षां बायकांनींच अधिक जगविला आहे असें अनेक विद्वानांचें मत आहे. मोठेपणीं नोकरीकरितां किंवा राजकारणाकरितां तसली टोपी व बूट घालावेच लागले तर घालावे, पण लहानपणीं मुलांना विधर्मी पोषाखाची संवय लावणें बरें नाहीं असें आमचें मत आहे. लोकमान्यांचा आपल्या महाराष्ट्रीय पोषाखाबद्दल किती अभिमान होता हें लोकविश्रुत आहेच. मुलांना लहानपणापासून साध्या पोषाखाची व साध्या जेवणाची संवय केली पाहिजे. जेवतांना हेंच पाहिजे, तेंच नको असें त्यांनीं कधींही

म्हणूं नये. अशी संवय त्यांना पुढच्या आयुष्यांत फार उपयोगी पडते. अमेरिकेचे प्रसिद्ध महापुरुष बेंजामिन फ्रँकलिन यांना त्यांच्या आईबापांनीं लहानपणीं जेवतांना जिभेच्या कसल्याही खोडी न ठेवण्याबद्दल जो कृतीचा उपदेश केलेला होता, तो आपल्यास पुढील आयुष्यांत किती उपयोगी पडला याचा त्यांनीं आपल्या चरित्रांत आदरयुक्त उल्लेख केला आहे. तात्पर्य, जेवणांत व पोषाखांत कसलाही दिमाख नसण्याबद्दल लहानपणापासून संवय लावली पाहिजे. परक्या संस्कृतीचा द्वेष न करितां आपल्या संस्कृतीचा अभिमान वाढवितां येईल तर उत्तम गोष्ट आहे. पण हा स्वाभिमान वाढविण्याकरितां परक्यांच्या चालीरीतींचा थोडा द्वेष उपदेशावा लागला तर त्यांत पाप नाहीं. अवगुणाचा द्वेष केल्याशिवाय सद्गुणाचा अभिमान अथवा प्रेम दृढ होऊं शकत नाहीं. इंद्रियलोलुप्याचा द्वेष केल्याशिवाय जितेंद्रियत्वाची प्रीति उत्पन्न होणार नाहीं व झाली तरी टिकणार नाहीं. बूट घातले म्हणून काय झालें, हॅट घातली म्हणून काय बिघडलें, असें म्हणणें अगदीं ढिल्या मनाचें काम आहे. स्वाभिमानाचें शिक्षण देण्याकरितां म्हणून लहानपणीं मुलांना तशा वृत्ति मुद्दाम शिकविल्या पाहिजेत. 'स्व–' चा अभिमान एकदां खरीखरीनें जडला, तर तो पुढें कोठपर्यंत पोंचेल हें सांगतां येत नाहीं; तसेंच हें 'स्व-' त्व जरीच्या टोपींतच आहे काय, चर्मी जोड्यांतच आहे काय असें म्हणून सोडीत गेलों, तर तें कुठपर्यंत सुटेल हेंही सांगतां येणार नाहीं! साधक–मातोश्रींनीं आपल्या मुलांना स्व-अभिमान (दुरभिमान मात्र नव्हे) प्रत्येक बाबतींत वाढवीत वाढवीत, आपल्या कपड्यालत्त्यांच्या रीतीपासून तों आपलें घराणें, आपला देश, आपली संस्कृति, आपला धर्म यांतून नेत नेत स्वयंभू परमात्म्यापर्यंत पोंचविण्याचें ध्येय ठेवलें पाहिजे. मुलांना 'धर्मभोळे' करूं नका, पण 'धर्मनिष्ठ' अवश्य करा, अशी आमची सूचना आहे.

मुलांच्या शिक्षणासंबंधीं या आमच्या सूचना अगदीं निर्दोष व पूर्ण आहेत, असें म्हणण्याचें धाडस आम्ही करीत नाहीं. दुसरें–त्या साधक-बंधुभगिनींकरितां लिहिल्या आहेत, सर्व जनतेकरितां खास नाहींत. करितां जनतेला न आवडल्यास तिनें आमच्यावर टीका करण्याचें कारण नाहीं. साधकांनींही पटल्यास स्वीकाराव्या हें सांगणें नकोच. फक्त मुलांच्या सुशिक्षणाची अशी काळजी घेणें साधकांच्या कर्तव्यकक्षेबाहेर नाहीं, एवढेंच सांगण्याकरितां इतका विस्तार केला असें समजावें. अशा शिक्षणानें मुलें अज्ञानाचीं सज्ञान म्हणजे पशूचीं मनुष्य व मनुष्याचीं देव बनतील. **आपल्या वंशांत सुप्रजा निर्माण व्हावी** असा आपल्या पितरांचा संकल्प आपण अंशतः तडीस नेला असें होईल. **आसुरी संपत्तीनें जीवांचा अधःपात व दैवी संपत्तीनें**

**जीवांचा उद्धार होतो, हा सृष्टीचा कायदा जाणून जे आईबाप आपली संतति दैवीसंपत्तिमान करण्याबद्दल काळजी घेतात, ते सृष्टिकर्त्याच्या कृपेस खरोखर पात्र होतात.** देव, ऋषि व पितर त्यांना आशीर्वाद देतात. तें कुळ, तो वंश पृथ्वीच्या पाठीवर ' आकल्प ' म्हणजे आचंद्रार्क राहो ( कधीं नष्ट न होवो ) अशी प्रार्थना संत देवाकडे करितात. " **आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझिया सकळां हरिच्या दासां ॥** " हा भजनाच्या अखेरीस रोज म्हटला जाणारा नामदेवरायाचा अभंग प्रसिद्धच आहे. लहानपणीं मुलांना असें धार्मिक गृहशिक्षण मिळालें, तर मोठेपणीं विधर्मी व अधर्मी शिक्षकांकडून शिकविलीं जाणारीं कुधर्मी मतें त्यांच्या मनांवर परिणाम करूं शकणार नाहींत. स्फटिकाप्रमाणें तीं शुद्ध म्हणजे कुसंगतींतही अलिप्त राहतील. केवढी योग्यता ही ? ईशसंकल्पास हें केवढें साहाय्य बरें ? असें शिक्षण देणारे आईबाप अथवा शिक्षक हे थोरल्या देवाच्या व राष्ट्रदेवतेच्याही उच्च कृपेस पात्र झाल्यावांचून कधींही राहणार नाहींत. असो.

* * *

## स्त्रीरोगांवर सुंदर रामबाण औषध

( मागें पृष्ठ २८७ मध्यें पुरुषसाधकवर्गासाठीं दिलेल्या खास सूचनांमध्यें ' **संसारांतील सुस्थिति** ही परमार्थप्राप्तीला साहाय्यकारी असते ' यासंबंधानें लिहितांना, ' प्रथम **शरीराचें आरोग्य** सांभाळण्याचा बुद्धिपुरःसर व लक्षपूर्वक प्रयत्न केला पाहिजे ' असें सांगितलें आहे. ती सूचना स्त्रीवर्गालाही लागू आहेच, पण स्त्रीवर्गासाठीं म्हणून एका थोर पाश्चात्य डॉक्टरांचें मत वाचण्यांत आलें, तें येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटल्यावरून मुद्दाम देत आहों. )

" गृहकृत्यें किंवा घरकामें करीत गेल्यानें दुसराही मोठा फायदा कसा होतो हें Ladie's Guide ( स्त्रियांचा वाटाड्या ) या ग्रंथांत ( पृ. २३४ ) एका विद्वान अमेरिकन डॉक्टरनें सांगितलें आहे. तो म्हणतो — ' पुष्कळ लोकांना कांहीं विशिष्ट व्यायामांपेक्षां शारीरिक श्रम केल्यानें आरोग्यदृष्ट्या अधिक फायदा होतो. स्त्रियांविषयीं सांगावयाचें म्हणजे साधारणपणें गृहकृत्यांची योजना अशी असते कीं त्यायोगें त्यांच्या कोणत्याही एका भागावर विशिष्ट ताण न पडतां कामांच्या वैचित्र्यामुळें त्यांच्या सर्व स्नायूंना निरनिराळे व्यायाम आपोआप घडतात. अशा हजारो रोगी व अशक्त कन्या आढळतात कीं त्यांचे गृहवैद्य त्यांना नानाप्रकारचीं औषधें पाजतात आणि त्यांपासून गुण न आल्यामुळें हवापालट करणें, सॅनिटोरियममध्यें एक वर्ष राहणें,

यांसारख्या फार खर्चिक उपायांची शिफारस करितात. पण अत्यंत महत्त्वाची वा जरूरीची गोष्ट म्हणजे कांहीं आठवडे अथवा महिने त्यांनीं आपल्या आयांची जागा घेणें अर्थात् आयांचीं सर्व कामें करणें, हाच त्यांच्या आरोग्य संपादनाचा मुख्य उपाय असतो; याकडे कोणी लक्ष देत नाहीं! त्यांनीं कांहीं काल पेटी, गिटार (तंतुवाद्य) वाजविण्याचें बंद करावें आणि स्वैंपाक करणें, कपडेलत्ते धुणें, झाडलोट करणें, सारवणें, शिवणें, इत्यादि ज्या हजारों लहानसान कामांनीं त्यांच्या आयांना व आज्यांना घट्ट व सुदृढ केलें, तीं सर्व कामें स्वतः करण्यास सुरवात करावी म्हणजे झालें. एक तरुण स्त्री क्षयरोगानें आजारी होती, तिच्या कौटुंबिक वृद्ध अनुभविक डॉक्टरानें तिची जगण्याची आशा सोडली होती आणि तिचे आप्तेष्ट तिच्या प्रयाणाची मार्गप्रतीक्षा करीत होते. अशा त्या स्त्रीला आम्ही हें गृहकृत्यांचें 'प्रिस्क्रिप्शन (औषध) दिलें. त्यायोगें ती सहा महिन्यांत बरी झाली आणि तशीच ती नंतर निरोगी राहिली. पण असलें गृहकृत्याचें प्रिस्क्रिप्शन दिल्याबद्दल ती आमच्यावर कायमची रुष्ट झाली आणि अशा तऱ्हेचें प्रिस्क्रिप्शन जो डॉक्टर देईल तो तरुण स्त्रियांच्या कायमच्या रोषास व तिरस्कारास पात्र होईल.' असें सांगून ते विद्वान डॉक्टर शेवटीं म्हणतात कीं 'स्वयंपाकघर, स्नानघर (धुण्याची जागा) आणि बागबगीचा यांच्याइतका स्त्रियांना व्यायामापासून उत्तम फायदे करून देणारा जिमखाना किंवा आखाडा या जगांत दुसरा कोणताही नाहीं. हीं स्थळें निसर्गाचे आखाडे किंवा तालीमखानें होत आणि त्यांना विशिष्ट उपकरणांसाठीं कांहीं खर्च करावा लागत नाहीं. ते नेहमीं उपयोगासाठीं सज्ज म्हणजे तयार असतात" इत्यादि.

सुधारकांनीं व स्त्रियांच्या खऱ्या कैवाऱ्यांनीं तसेंच स्वकल्याणेच्छु सर्व स्त्रियांनीं या अमेरिकन डॉक्टराच्या महत्त्वाच्या उद्गाराचें मनन करावें.*

* * * *

**मुलींच्या शिक्षणाबद्दलही** कांहींतरी लिहिल्याशिवाय राहवत नाहीं. मुलांचें शाळेंतील शिक्षण सदोष (Defective) असल्याबद्दल हल्लीं जशी सर्वत्र हाकाटी आहे, तशीच मुलींच्या शिक्षणाबद्दलही आहे. त्यांतल्या त्यांत सुधारणा म्हणून विद्वान लोक करताहेत. परंतु अद्याप त्याबद्दल सर्वांचें एकमत झालेलें नाहीं. तथापि शालाशिक्षणाबरोबर गृहशिक्षण–त्यांना पुढें गृहिणीपदास व मातृपदास पोंचावयाचें

---

* गोमंतकांतील आदर्श साध्वी अर्थात् सौ. सीताबाई कुंडईकर यांच्या सुंदर चरित्र-पुस्तकाला श्री. नागेश वासुदेव गुणाजी यांनीं लिहिलेला पुरस्कार.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

आहे हें धोरण ठेवून—साधक-मातोश्रींनीं देण्याची काळजी घेतली पाहिजे. धर्मशिक्षणाची काळजी तर मुलांच्यापेक्षां मुलींची जास्त घेतली पाहिजे. कारण, पुढें त्यांना राष्ट्रमाता व्हावयाचें आहे. तुळसीपूजा, प्रदक्षिणा व प्रार्थना, इत्यादि गोष्टी लहानपणापासूनच त्यांना शिकविल्या पाहिजेत. **इष्ट अभ्युदयाच्या प्रार्थनेच्या योगें अंतरांत अभ्युदयाच्या कल्पना बळावत जातात.** या बळावलेल्या अभ्युदयकल्पनाच पुढें कार्यकारी होतात. ईश्वर व त्याच्या प्रार्थना यांवर विश्वास उत्पन्न झाला, म्हणजे कल्याणाच्या यथार्थ कल्पना अंतरांत उद्भवूं लागतात. कल्याणाचा मार्ग आपोआप दिसूं लागतो. पण ईश्वरप्रार्थनेबरोबर सत्यनिष्ठा, असत्यद्वेष, परोपकारबुद्धि, उद्योगतत्परता, गुरुजनांविषयीं आदर, तसेंच भावंडांचें प्रेम व त्यांची सेवाशुश्रूषा, इत्यादि गुणांचें शिक्षणही देण्याबद्दल काळजी घेतली पाहिजे. देवाची भक्ति करीत राहिलें आणि हे सद्गुण अंगीं आणिले नाहींत, तर देवाला ती आपली भक्ति गोड लागणार नाहीं; मग भक्ति करणारें माणूस लहान असो वा मोठें असो; स्त्री असो वा पुरुष असो.

कन्यादानासारखें पुण्य नाहीं; कन्यादानाचें पुण्य पृथ्वीदानाच्या पुण्याइतकें आहे; ब्रह्मलोकप्राप्ति हें त्याचें फल आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. ती कन्या उगीच कशी तरी वाढवायची, आपणास पोसण्यास कठिण म्हणून दुसऱ्याच्या गळीं बांधायची, अथवा गरजू मनुष्याला विकून तिच्या भाराइतके पैसे मिळवायचे असा तिचा उपयोग करायचा नाहीं. केला तर ब्रह्मलोकप्राप्तीऐवजीं नरकलोकप्राप्तीच होणार. याकरितां कन्या उभयकुलानंदिनी होईल, दोन्ही बाजूंच्या मिळून १०८ कुळांचा उद्धार करणारी होईल, अशा सद्गुणांनीं संपन्न करून तिला सत्पात्रीं अर्पण केलें पाहिजे. धर्मशिक्षणानें सुसंस्कृत, उपासना-तपःप्रेमी अशी तयार करून तिचें विध्युक्त दान केल्यास पृथ्वीदानाचें फळ म्हणतात. त्याचें कारण हेंच कीं अशी एक कन्या अनेक कर्तृत्वी व पुण्यशील पुत्र निर्माण करणेची खाण, म्हणजेच तितकीं कुटुंबें पुढें तयार करण्याची मूर्तिमंत शक्ति तयार करून दिल्याची कामगिरी केल्यासारखी होते. यापेक्षां कन्येचें महत्त्व अधिक काय सांगावें ? वेंकटेशस्तोत्राची फलश्रुति सांगतांना देवीदासानें " पुत्रार्थियानें तीन मास । आणि कन्यार्थियानें षण्मास " त्या स्तोत्राचें अनुष्ठान करावें असें सांगितलें आहे. यावरून पुत्रसंततीपेक्षां कन्यासंततीची किंमत दुप्पट ठरविल्याचें स्पष्ट आहे. पण बाळंतिणीला कन्या झाली असें ऐकतांच तिची सासू, सासरा, नवरा, नणंद, वगैरे सर्व माणसें कपाळाला आठ्या घालतात. स्वतः बाळंतीणसुद्धां मनाला फार लावून घेते. तें इतकें कीं

**************************************************

त्यायोगें तिच्या प्रकृतीवर परिणाम होतो. हें जाणून कित्येक शहाण्या सुइणी, मुलगी झाली असली तरी मुलगा म्हणून सांगून, तितका वेळ तिला खुषींत ठेवतात; आणि ती चांगली हुशार होऊन आपल्या स्वास्थ्यावर आली म्हणजे गोड शब्दांनीं प्रस्तावना करून मुलगी सांगतात व तिच्या हातीं देतात ! आतां या समजुतीस काय करावें ? हुंड्याच्या चालीमुळें वगैरे कन्येच्या लग्नाच्या वेळीं बापास मोठा त्रास होतो, त्या कारणास्तव कन्याप्रसवाची वार्ता थोडी उद्वेगजनक होते. तथापि शास्त्रदृष्टीनें कन्याजन्म तिरस्करणीय नसून आदरणीय आहे, हें सांगण्याकरितांच एवढें येथें लिहिलें आहे. नहून कन्याजन्म व तिचा विवाह वगैरे या बाबतींत या ग्रंथांत लिहिण्याचें कारण नाहीं. नाहीं म्हटल्यास थोडेंसें आहेही. याचें कारण —

हल्लींच्या सामाजिक परिस्थितीमुळें कित्येक मुलींचीं लग्नें वयाला २०।२५ वर्षें झालीं तरी होत नाहींत, अशा आर्यकन्या आपल्या पित्याच्या घरीं आपलें शील संभाळून स्वतःकरितां व मातापितरांस दुःखमुक्त करण्याकरितां ईश्वरोपासना करणाऱ्या दिसतात. थोर घराण्यांतील अशा एक दोन कन्या विवाहहेतूनें तीव्र नामोपासना करून आपलें ध्येय उत्कृष्ट रीतीनें साध्य करून घेतलेल्या आमच्या पाहाण्यांत व ऐकण्यांत आहेत. त्यांपैकीं एक ब्राह्मणकन्या ' रामकृष्णहरि ' नामाचा रोज २०।२५ हजार जप करणारीं, बापाची स्थिति खालावल्यामुळें हुंडा देण्यास सामर्थ्य नसल्यानें, गुणानें उत्तम पण वर्णानें किंचित् काळसर असल्यानेंही, वयाच्या १५ व्या वर्षांपासून ५।६ वर्षें बाप, बंधु, वगैरे खटपट करीत असतां लग्न जुळून न येणारी, अशी मुलगी जप करूं लागल्यापासून एकदीड वर्षांत अशा उत्तम स्थळीं पडली कीं त्याचें वर्णन करवत नाहीं. एका सुशिक्षित सज्जन तरुणाची पहिली बायको वारली व त्यानें या मुलीस मागणी घालून करून घेतली. नवरा दुसरेपणाचा म्हणण्यापुरताच; पण वयाला अनुरूप असून त्याला सेक्रेटरिएटमध्यें सुमारें ४०० रुपये पगार आहे. या मुलीचें माहेर आमचें दुरून आप्तही लागतें. जपाच्या तपानेंच हा लाभ झाला असें तिचे बंधु वगैरे व स्वतः ती मानीत असते. नवराही अशा गुणाची पत्नी लाभल्याबद्दल देवाचे आभार मानितो. ( तिचे बंधुवर्गही नामानुष्ठानतत्पर असून या तपाचे दाखले त्यांना मिळालेले आहेत. ) दुसरी एक उच्च कुलांतील मराठ्याची कन्या अशीच प्रौढ झालेली, तिला आमचें ' नामजपाचें महत्त्व ' भाग १ ला, हें पुस्तक तिच्या मोलकरणीकडून वाचावयास मिळालें व ती नामानुष्ठानास लागली. सहा महिन्यांत तिचें लग्न एका थोर सरदार घराण्यांतील अनुरूप वराशीं झालें. पण वरील दोन्ही गोष्टी आम्हांस पक्क्या माहीत असतां

त्यांचीं नांवें प्रसिद्ध करण्यास परवानगी नसल्यामुळें करितां येत नाहींत याबद्दल फार वाईट वाटतें. कांहीं लोक थोडेंसें पुण्यकर्म करून मोठें केल्याचा आव आणतात, पण कांहीं लोक मोठें पुण्यकर्म करून तें किंचितही बाहेर कळूं नये म्हणून काळजी घेत असतात ! असो.

प्रारब्धानें प्राप्त झालेल्या परिस्थितींत खिचपत पडलें असतांना आपत्ति निवारण करण्याकरितां कांहीं लोक लौकिक व कांहीं लोक दैविक प्रयत्न करीत असतात. कांहीं लौकिक व दैविक दोन्हीं तऱ्हेचे प्रयत्न करीत असलेले दृष्टीस पडतात. 'Spiritual help in Material affairs' म्हणजे 'लौकिक गोष्टींत यश येण्याकरितां अदृश्य दैवी शक्तीचें साहाय्य' किती आवश्यक असतें याबद्दलची मीमांसा पुनःपुनः करण्याचें कारण नाहीं. कारण या आमच्या पुस्तकाचे वाचक दैवी शक्तीवर म्हणजे धर्मावर विश्वास ठेवून चालणारे आहेत. असा विश्वास धरून आम्ही त्यांच्याशीं हितगुजाच्या गोष्टी बोलत आहों. कन्येचा विवाहसंस्कार हा किती पवित्र आहे, तो कोणत्या वैज्ञानिक पायावर ( Scientific Bases ) उभारलेला आहे, याचा विचार न करितां पाश्चात्य शिक्षणसंस्कारानें विकृतबुद्धि झालेल्या आमच्या कांहीं आर्यकन्या, आपल्याला लग्नच नको, नवऱ्याची गुलामगिरी जन्मभर कोणीं करीत राहावें, अशा अनार्य कल्पनांनीं समाजाचें स्वास्थ्य, समाजाची घडी विस्कळित करीत आहेत, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे ! त्यांना माहित नाहीं कीं नवऱ्याची गुलामगिरी (?) न केली तर आईबापांच्या घरीं राहिल्यास त्यांची किंवा बंधूंची करावी लागेल, अथवा पुरुषांप्रमाणें ऑफिसांत नोकरी धरल्यास तेथील वरिष्ठांची गुलामगिरी करावी लागेल. प्रत्येक मनुष्यव्यक्तीच नव्हे, तर **सृष्टींतील प्रत्येक परमाणु परतंत्र म्हणजे एकमेकांवर अवलंबून असलेला आहे.** एका परमेश्वरावांचून स्वतंत्र असा कोणींच नाहीं. त्याला जे शरण गेले, त्याच्या स्वरूपाशीं जे संलग्न झाले, तेच प्रकृतीच्या महाबंधनापासून सुटले, त्यांनाच 'मुक्त' म्हणजे खरे 'स्वतंत्र' म्हणतां येईल; नहून **स्वतंत्र म्हणजे 'स्वैर' किंवा 'स्वच्छंदी' नव्हे.** कांहीं प्रौढ मुली अलीकडे स्वैरवृत्तीनें राहण्याकरितां लग्नच नको म्हणतात किंवा शास्त्र व समाजबंधनांना झुगारून देऊन प्रीतिविवाह करितात. यास नवशिक्षित लोक 'लव्ह–मॅरिएज' असें गोड नांव देतात. पण हें 'लव्ह–मॅरिएज' कीं 'लस्ट–मॅरिएज' हें थोडेंसें अंतर्मुख होऊन विचार केला असतां समजून येतें. 'स्वातंत्र्य' हें ध्येय प्रत्येक जीवाचें असलें पाहिजे; पण ही 'सर्वतंत्रस्वतंत्रता' भोगावयाची झाल्यास, शास्त्रानें घालून दिलेल्या नियमानें प्रथम परतंत्र झालें पाहिजे.

असा जो किंवा जी शास्त्रनियमपरतंत्र होईल, तो किंवा तीच खरें 'स्वातंत्र्य-' सुख म्हणजे आत्मानंद अनुभवील. या आत्मानंदाचें वर्णन मागें पुष्कळ ठिकाणीं आल्यामुळें येथें पुनः देत नाहीं. मनुष्यजन्माचें हें अंतिम ध्येय साधण्याकरितांच स्त्रियांना विवाहाचें बंधन शास्त्रानें लावून दिलेलें आहे. जन्ममरणरूप संसाराचें महान् बंधन तोडून टाकण्याकरितां विवाहरूप संसाराचें लघुबंधन लावून घेणें मोठें हितकारक आहे. आतां जन्मभर ज्याच्याशीं कायावाचामनानें निगडित होऊन जावयाचें, त्याच्या कुलशीलादिकांचें परीक्षण करण्याकरितां पराकाष्ठा करणें योग्य आहे आणि अशी कराकाष्ठा करूनच आईबाप मुलीचें लग्न करीत असतात. हें परीक्षण केव्हां तरी चुकतें त्यास उपाय नाहीं. परंतु आईबापांनीं अशा रीतीनें लग्न करून दिलेल्या नवरानवरींचीं कुटुंबें शेंकडा किती सुखी आहेत, आणि मुलींनीं थोडेंसें प्रौढ झाल्यानंतर आईबापांची संमति न घेतां आपल्या अननुभवी बुद्धीच्या पसंतीनें 'प्रेमविवाह' करून घेतलेलीं कुटुंबें शेंकडा किती सुखी आहेत, याचा समजांतील आढावा काढल्यास काय उत्तर मिळतें तें पाहावें: याबद्दलची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. पण एवढें खरें कीं मुलींनीं विवाहाशिवाय केव्हांही राहूं नये. कारण,

## विवाह म्हणजे केवळ विषयभोगाकरितां नाहीं.

त्याचा कांहीं उच्च हेतु आहे. अथवा तसा उच्च हेतु धरूनच पूर्वजांनीं विवाहसंस्था निर्माण केलेली आहे. बापानें मुलीच्या लग्नाची हेळसांड केल्यास, 'ऋतुमती कन्येनें तीन वर्षें वाट पाहून वडिलांचा विचार न घेतां स्वतः लग्नाचा विचार करावा, आपल्याशीं सदृश गुणांचा पति न मिळाल्यास गुणहीनाशींसुद्धां लग्न लावावें' असें बौधायन सूत्रांत सांगितलें आहे. कन्येच्या मनांत विषयकल्पना उद्भवण्यापूर्वी तिचा विवाह करून दिला म्हणजे पतीवर ती अगदीं निर्मल व निष्काम प्रेम करूं लागते आणि हेंच प्रेम शाश्वत होतें. तसें सकाम प्रेम होत नाहीं. याकरितां 'अष्टवर्षा भवेत्कन्या' म्हणजे वयाच्या आठव्या वर्षी मुलगी 'कन्या' संज्ञेस पात्र होते, तेव्हां तिचें लग्न करावें असें शास्त्रांत सांगितलें आहे. (आठव्या वर्षापूर्वी 'नग्निका,' व दहाव्या वर्षानंतर 'रजस्वला'–['दशोर्ध्वे तु रजस्वला'] इत्यादि निरनिराळ्या संज्ञा निरनिराळ्या वयांत तिला प्राप्त होतात.) कन्या-अवस्थेमध्यें दान करणें यालाच 'कन्यादान' म्हणतात; या कन्यादानाचेंच 'ब्रह्मलोकावाप्ति' फळ आहे. पण कालमानाप्रमाणें हें वयोमान बदलत जातें असें दिसून येतें. आतां तर तें पुष्कळच बदललें आहे. जवळ जवळ वेदकालापर्यंत पोंचलें

आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां हें बरें कीं वाईट 'याचा खरा उकल एक हरीच जाणे.' तथापि प्राप्त परिस्थितींत खालील उतारा लक्षांत घेण्यासारखा आहे.

" स्त्रियांच्या विवाहाची वयोमर्यादा हा विषय मोठ्या जिज्ञासेचा आहे. याकरितां **घोषा, लोपामुद्रा** यांचीं उदाहरणें विचारांत घेण्यासारखीं आहेत. या दोघींचाही विवाह अत्यंत उशीरा झाला होता. घोषेचा विवाह लांबण्याचें कारण तिच्या अंगावर कांहीं रोग होता; तो अश्वींच्या कृपेनें बरा झाल्यावर तिचा विवाह झाला. विवाहाच्या वेळीं ती वयांत आलेली होती असें म्हणण्यापेक्षां 'वयातीत' होती असें म्हणावें लागतें. लोपामुद्रेचेंही तसेंच होतें. अगस्त्य-लोपामुद्रासंवादांत प्रथम-संभोगाविषयीं बोलणें चाललें आहे; तेथें उभयतांच्या अंगावर वृद्धपणानें सुरकुत्या पडल्याचें वर्णन आहे. या दोन उदाहरणांवरून त्या कालीं विवाहाची वयोमर्यादा निश्चित होती असें दिसत नाहीं, लोपामुद्रेचा विवाह उशीरा झाल्याचें पुराणांतही लिहिल्याचें आढळतें." — ऋग्वेदकालीन समाजस्थिति*

याच लेखांतील खालील उतारेही लक्षांत घेण्यासारखे आहेत —

" विवाहसंस्था उत्पन्न झाली होती. विवाह म्हणजे बापानें मुलीचें सालंकृत कन्यादान करावयाचें (ऋ. ३ – ३१ – १). विवाहापूर्वी कन्येला मागणी घालीत (१० – ८५ – १४)....वधूचा पित्याच्या घराशीं असलेला संबंध विवाहानंतर नष्ट होतो (१० – ८५ – ३६). वडील माणसें मुलगी दिलेल्या घरीं म्हातारी व्हावी अशी इच्छा करीत (१० – ८५ – २७). व्यभिचार हा निंद्य समजत. व्यभिचारी स्त्रियांना उघड रीतीनें समाजांत वावरणें जड जाई (२ – २९ – १)....कितीही अवहेलना होत असली किंवा पति दुराचारी असला तरी स्त्रिया नवऱ्याला सोडून जात नसत (१० – ३४ – १७)." इत्यादि.

श्रीदत्तजन्मासंबंधीं निरनिराळ्या प्रकारच्या कथा पुराणांत उपलब्ध आहेत. (एकच इतिहास भिन्नभिन्न पुराणांत भिन्नभिन्न तऱ्हेनें कां सांगितला जावा? कोणती गोष्ट खरी मानावी? या शंकेवर 'कल्पभेदात्कथाभेदः' असें उत्तर देऊन समाधान केलें जातें, ही गोष्ट विद्वानांत प्रसिद्ध आहे.) दत्तजन्मासंबंधींची पुढील सुंदर गोष्ट ब्रह्मांडपुराणांतर्गत श्रीदत्तमाहात्म्यांत प्रसिद्ध आहे. अशी ती मार्कंडेय व अग्निपुराणांतही

* 'पुरुषार्थ' मासिकाच्या मार्गशीर्ष १८५५ च्या अंकांतील म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा लेख.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

असल्याचें समजतें. कौशिक नामक ब्राह्मणाची पत्नी 'सती' नांवाची ( हिला गुणवती असें दुसरें नांव आहे. ) ही पुराणप्रसिद्ध अनसूयेच्या बहिणीची कन्या होती. ही पूर्वजन्मींची अधिकारी असल्यानें लहानपणींच आईबापांच्या घरीं थोड्याशा शिक्षणानें आत्मज्ञानसंपन्न झाली. पण पतिव्रताधर्माचें आचरण घडावें म्हणून, उत्तम प्रकारची पतिसेवा घडावी म्हणून तिनें वृद्धया एका दुर्गुणी व व्याधिग्रस्त अशा वराशीं लग्न लावलें व त्याची एकनिष्ठपणानें ती सेवा करूं लागली. एके दिवशीं संध्याकाळीं तो ब्राह्मण घरच्या ओसरीवर बसला असतां रस्त्यावरून एक सुंदर वेश्या जातांना त्यानें पाहिली व पत्नीस हाक मारून, तिच्या घरीं घेऊन चल, असें सांगितलें. 'सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः' म्हणतात तें खोटें नाहीं. त्या सतीनें ती गोष्ट मान्य करून रात्रौ सर्व कामधाम आटोपल्यानंतर, त्या पण्यांगनेला पण्य ( द्रव्य ) देण्यासाठीं आपले कांहीं दागिने पदरास बांधून घेऊन, पतीच्या पायाला कुष्ठ झाल्यामुळें चालतां येत नव्हतें, म्हणून त्याला पाठीवर घेऊन पतीच्या सूचनेप्रमाणें ती वाट चालूं लागली. त्या नगरीच्या राजानें त्या दिवशीं मांडव्य-ऋषीला गैरसमजानें शूळावर चढविलें होतें. तपःसामर्थ्यानें तो ऋषि शूळावर तसाच बसला होता. अंधारांतून जातांना कौशिकमुनीच्या अंगाचा त्याच्या पायाला धक्का लागला; तेव्हां त्याला फार वेदना झाल्या. त्या वेदनेच्या भरांत त्यानें शाप दिला कीं ज्याचा धक्का लागून माझे प्राण व्याकुळ झाले, तो, सूर्योदय होतांच गतप्राण होईल! ही कठोर शापवाणी ऐकतांच सतीचें तेज खवळलें. तो ब्राह्मणही घाबरून गेला. त्याला खालीं ठेवून सती हातांत पाणी घेऊन उभी राहिली व म्हणाली, "काय, सूर्य उदयाला येऊन माझ्या पतीचे प्राण घेणार व मला वैधव्य आणणार? कसा उदयाला येतो तें पहात्यें!" सूर्योदयाची वेळ होऊन गेली तरी पतिव्रतेच्या शापभयानें सूर्य उदयाला येईना. सृष्टीचीं कार्यें बंद झालीं! ऋषींचीं ब्रह्मकर्में राहिलीं. हें संकट काय आहे, हें जाणून निवारण करण्याकरितां ऋषि देवांना शरण गेले. इंद्रादिक देव ब्रह्मदेवाला व ब्रह्मदेव विष्णूला शरण गेला. श्रीविष्णूनें शंकरासही पाचारण केलें. सर्व देवांना सतीचें माहात्म्य कळून चुकलें. हिची समजूत घालून सूर्याला उदयास येण्याबद्दल परवानगी मागावयाची, तर तिला तूं वैधव्य स्वीकार असेंच सांगावयाचें! हें सांगण्याचें धैर्य कोणाला होईना. हिच्यावर वजन पडेल अशी कोणाची तरी हिला भीड घातली पाहिजे, असा विचार ठरला. तेव्हां धनिकाला दुसऱ्या तुल्य धनिकाची, राजाला तुल्य राजाची, बलवंताला तुल्य अथवा बळानें अधिक अशा बलवंताचीच भीड घातली पाहिजे; तसेंच

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

तपस्व्याला तसल्याच तपस्व्याची घातली पाहिजे, त्याशिवाय हें काम निभावणार नाहीं, असें जाणून, सर्व देव एकमतानें अत्रिआश्रमांत अनुसूयेची प्रार्थना करण्याकरितां गेले व तिला त्या जागीं घेऊन आले. अनुसूयेला पाहातांच या मुलीनें तिजपुढें मान वांकवून नमस्कार केला व येण्याचें कारण विचारलें. अनुसूयेनें सांगितलें, सूर्योदयावांचून सर्व जगताचा क्षय होण्याची वेळ आली आहे, करितां तूं हातांतील पाणी टाकून दे. सूर्य उदयास आल्यानंतर तुझ्या पतीचा देह पडला तर मी माझ्या तपोबलानें त्याला उठवीन. या अनुसूयेच्या वचनावर सतीचा विश्वास जडला. कारण मावशीची योग्यता ती जाणत होती. सतीनें हातांतील उदक सोडून दिलें, त्याबरोबर सूर्य क्षितिजावर आला व तत्काळ कौशिकमुनि मांडव्य ऋषीच्या अमोघ शापवाणीप्रमाणें गतप्राण झाला! त्या काळीं अनुसूयेनें आपल्या कायावाचामनानें आचरिलेल्या पातिव्रत्याचरणधर्माची प्रतिज्ञा करून त्या ब्राह्मणास उठविलें व त्या आपल्या जामात्याचें शरीरही दिव्य करून सोडलें. हें पाहून देवांनीं त्या दोघींवर पुष्पवृष्टि केली आणि हा अनुसूयेचा जगतावर मोठा उपकार झाल्यामुळें, जगदुत्पत्तिस्थितिसंहारकर्ते ब्रह्माविष्णुमहेश्वर हे तिन्ही देव अनुसूयेला प्रसन्न होऊन हवा तो वर मागून घे, अशक्य असलेला वरही आम्ही तुला देऊं, असें म्हणाले. त्याबरोबर अनुसूयेनें 'तुम्ही तिघेही माझे पुत्र व्हा' असा वर मागून घेतला. त्याप्रमाणें विष्णूच्या अंशानें **दत्त**, ब्रह्मदेवाच्या अंशानें **चंद्र** व शंकराच्या अंशानें **दूर्वास** याप्रमाणें तीन मुलगे जन्मास आले अशी कथा आहे. इतर सर्व दत्तजन्माच्या कथांमध्यें चांगले हरिदास हीच कथा पसंत करितात. कारण यांत उत्तम नीति आहे. बायकांच्या सांगण्यावरून तिन्ही देव अनुसूयेच्या घरीं भिक्षा मागण्यास गेले व नग्न होऊन भिक्षा घाल म्हणाले व तिनें यांना बालकें बनविलें अशीही कथा आहे. पण यापेक्षां वरील कथेंत निराळा रस उत्पन्न होतो. या सतीनें सूर्योदय बंद केला व योगेश्वर श्रीकृष्णानेंही रासक्रीडेची रात्र ब्रह्मषण्मासाची केली, हीं दोन्हीं सामर्थ्यें एक आहेत. याची उपपत्ति विद्वान लोक कशीही लावोत. पण तपस्व्यांना व योग्यांनाही दुष्प्राप्य असें पतिव्रताधर्माचें सामर्थ्य आहे, यांत संशय नाहीं. या सतीचें पूर्वजन्मवृत्तही चिंतनीय आहे. ही सती म्हणजे दुसरी कोणी नसून नर्मदा नदी होती.[१] ती स्वर्गांत एकदा इंद्रसभेस गेली असतां, सभा बरखास्त

---

१ गंगा, गोदा, नर्मदा इत्यादि नद्या अमुकाला प्रसन्न झाल्या, अमुकांकडे बोलल्या, याचा अर्थ नद्या म्हणजे त्यांतील पाणी नव्हे, तर त्या नद्यांच्या अभिमानी देवता असें समजावें. या इतर देवतांप्रमाणेंच साकार व शक्तिमान आहेत.

झाल्यानंतर नर्मदा बसलेलें स्थान देवगुरु बृहस्पति यांनीं पाण्यानें प्रोक्षण केलें. हें पाहून नर्मदेला अपमान वाटला व तिनें तसें करण्याचें कारण विचारलें. त्याबरोबर तूं अजून अविवाहित आहेस, म्हणून तुझ्या बसण्यानें भ्रष्ट झालेलें स्थान मीं जलप्रोक्षणानें पवित्र करून घेतलें असें त्यांनीं उत्तर दिलें. तें ऐकून नर्मदेनें आपला कुमारी राहण्याचा आग्रह सोडून दिला व भूलोकीं कर्दम ऋषीच्या पवित्र कुळांत जन्म घेऊन वर सांगितल्याप्रमाणें विवाह करून घेतला, अशी कथा आहे.

तात्पर्य, ब्राह्मणाचे मुलगे जसे मुंजीवांचून ( असंस्कारी ) राहत नाहींत, तसेंच मुलींनींही पण असंस्कारी राहतां कामा नये आणि मुलींचा ( आर्यकन्यांचा ) विधिसंस्कार म्हटला म्हणजे शास्त्रोक्त विवाह. विवाहावांचून त्या शुद्ध होऊं शकत नाहींत. ( आर्यकन्या म्हणजे नुसत्या ब्राह्मणकन्याच नसून इतर वर्णांच्या कन्यांनाही हा नियम लागू आहे, असें समजावें. )

**वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकः स्मृतः ।**
**पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ॥**

—मनु० २।६७.

**अर्थ**—स्त्रियांना विवाहविधिच वैदिक संस्कार, पतिसेवाच गुरुकुलवास व गृहकृत्येंच त्यांचें अग्निहोत्र होय, असें मन्वादि स्मृतिकार म्हणतात.

साधकवर्गापैकीं आर्यकन्यांकरितां हा सूचनालेख असल्यामुळें असवर्ण किंवा प्रतिलोम विवाहादि मतांचा विचार करण्याचें येथें कारण नाहीं. इंद्रियलोलुपतेचा तिरस्कार ज्या कन्यांना अथवा पुरुषांना कबूल झाला, तेच साधकवर्गांत बसण्यास अधिकारी होत. त्यांच्याकडून इंद्रियांच्या क्षणिक सुखाकरितां मनाच्या लहरीप्रमाणें अशास्त्रीय विवाह कधींच घडणार नाहींत, अशी आमची खात्री आहे. पण एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं शिकारीचे कुत्रे किंवा शर्यतीचे घोडे तयार करणारे, प्रजाजननशास्त्रकोविद पाश्चात्य लोक, हे त्या कुत्र्यांच्या व घोड्यांच्या पूर्वीच्या सातसात पिढ्यांचा इतिहास लिहून ठेवतात ; क्षेत्र-( भूमि- ) ही उत्तम तयार करण्याची व त्यांत बीजही उत्तम पेरण्याची काळजी घेतात ; तशा कुत्र्यांना व शर्यतीच्या घोड्यांना हलक्या जातीच्या कुत्र्यांशीं व हलक्या घोड्यांशीं संपर्कही करूं देत नाहींत, हलक्या जातीशीं मिसळूं देत नाहींत. ( याला इंग्रजींत ' आयसोलेटिंग ' म्हणतात. ) हें पाहिलें म्हणजे आमच्या शास्त्रकारांनीं वधूवरसंयोगाच्या बाबतींत किती सूक्ष्म विचार केला आहे हें चांगलें दिसून येतें.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**जर्मनीचे चॅन्सलर,** व्हिएन्ना येथील 'फेडरेशन ऑफ् इंडियन स्टूडंट्स् ॲब्रॉड' या संस्थेच्या पत्राला उत्तर देतांना हिंदू लोकांसंबंधानें आपलें आदराचें मत प्रदर्शित केल्यानंतर म्हणतात —

"नाझी पक्षाची वंशशुद्धीची कल्पना अन्यवंशीयांना बाधक नाहीं. **भिन्न वंशीयांशीं विवाह तेवढे आम्हांला नको आहेत, कारण त्यायोगें उभयतांचे गुण लोप पावतात.**" इत्यादि

— **केसरी** ता. १९ एप्रिल १९३५ चा अंक

भौतिक शास्त्रांच्या शोधानें भौतिक उन्नतीच्या शिखरावर चढलेल्या थोर राष्ट्रांतील एका थोर पुरुषाचे हे विचार आहेत, एवढेंच आमच्या लोकांनीं लक्षांत घेतलें म्हणजे पुरे.

**राष्ट्राचें बळ व वैभव** हें त्याची संपत्ति, व्यापार, विद्या, कलाकौशल्य, सैन्य व शस्त्रास्त्रसामुग्री इत्यादींवर अवलंबून असतें, तसेंच, **लोकसंख्येवरही अवलंबून असतें.** ही लोकसंख्या राष्ट्रांतील चैनबाजीमुळें, संततिनियमनाच्या फाजील प्रचारामुळें घटत चालल्याचें नजरेस आल्यावरून जर्मनी, फ्रान्स, इटली वगैरे देशांतून संततिवृद्धीकरितां विवाहाचे कायदे होत आहेत. विवाहबद्ध दंपतींना तसेंच लेंकुरवाळ्या कुटुंबांना सरकारकडून विशेष तनखा व विशिष्ट सवलती मिळत आहेत, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. पण ह्या विवाहबद्धतेंत लोकसंख्यावृद्धीचाच उद्देश मुख्य आहे. हा उद्देश आपल्या विवाहपद्धतींत आमच्या पूर्वजांनीं दूरदृष्टीनें आधींच राखला आहे.* शिवाय मरणोत्तर जीवनामध्यें (Life after death) याचा कसा फायदा करून घेतां येईल, याचाही विचार आमच्या कन्यादानपद्धतीच्या विवाहसंस्कारामध्यें सुदूरदृष्टि पूर्वजांनीं करून ठेवला आहे. तसा इतर कोणत्याही धर्मांत केलेला नाहीं. मनुष्यजन्माचें ध्येय 'नराचें नारायण' होणें अथवा 'जीवशिवांचें लग्न' साधणें याकरितां पुरुषास इतर कांहीं साधनें असलीं तरी, स्त्रियांना तें लग्न साधण्याकरितां हें लग्न अत्यंत अवश्य आहे. **स्त्रियांतील गुप्त अथवा सुप्त दैवी तेज प्रगट होण्याकरितां लग्न हें उत्तम साधन आहे.** आपल्या दिव्य धर्मशास्त्रानें त्याचा प्रयोग (प्रोसेस) दाखवून दिला आहे. हा योग्य रीतीनें साधला, तर हें अद्भुत दैवी तेज कसें प्रगट होतें हें मागें दिलेल्या पतिव्रता स्त्रियांच्या उदाहरणांवरून ध्यानांत येईल.

---

* कन्यादान करते वेळीं 'प्रजोत्पादनाकरितां ही कन्या तुला मी देतों' असा संकल्पच उच्चारला जातो.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

या गोष्टींचा विचार करून आडवेळेच्या पावसाच्या लोंढ्यांत वाहून न जाण्याबद्दल स्वतः खबरदारी घ्यावी व इतर भगिनींनाही शक्य त्या प्रयत्नानें सावध करावें; कारण असा प्रयत्न करणें ही एक मोठी धर्मसेवा, समाजसेवा, राष्ट्रसेवा व ईश्वरसेवाच आहे, अशी आमची साधक-बंधुभगिनींना सूचना आहे. **समाजाचा चारही बाजूंनीं होत असलेला अधःपात, धर्मवीर अशा आर्यमहिलांनींच मनावर घेतल्यास बंद होईल** असें आम्हांस वाटूं लागलें आहे. नव्हे, एका इंग्रजी ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें परमेश्वरानें आतां स्त्रीरूपांतच अवतार घेऊन भूमीवर येणें केल्यास जगाचा अधःपात टळेल. त्याला ही दया केव्हां येते पाहूं.

* * * *

## मुलींचें कॉलेजांतील शिक्षण

वेदकालीन समाजांत '**ब्रह्मवादिनी**' व '**गृहिणी**' अशा दोन प्रकारच्या स्त्रिया नांदत असत. पैकीं ब्रह्मवादिनींना उपनयन, अग्निहोत्र व वेदाध्ययन यांचा हक्क असे. ("द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्यो वध्वश्च। तत्र ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे॥"—यमस्मृति) कालगतीनुसार हे कायदे पुढें बदलले. हल्लीं स्त्रियांचें उपनयन आर्यांमध्यें कोणीं केलेलें दिसत नाहीं. (आर्यसमाजिस्ट व पार्शी लोकांत मात्र मुलींची मुंज केलेली दिसून येते. आम्हीं हे समारंभ पाहिले आहेत.) हल्लीं स्त्रियांचें उपनयन म्हणजे त्यांना कॉलेजांत पाठविणें या रूपाचें होऊन बसलें आहे. हल्लींचीं कॉलेजें म्हणजे पूर्वीचा आपला गुरुकुलवास. हल्लींच्या या गुरुकुलांमध्यें धर्मशिक्षणाचें नांवही नसतें. उलट विधर्मी व कुधर्मी संस्कार मात्र विद्यार्थ्यांच्या व विद्यार्थिनींच्या मनावर ठसतात अथवा ठसविले जातात. पाश्चात्यांप्रमाणें युवक–युवतींना एकत्र शिक्षण मिळत असल्यामुळें, निकट सहवासाच्या योगें त्यांच्यामध्यें अनैतिक संबंध जडतो, याबद्दल हल्लीं सर्वत्र हाकाटी उडालेली आहे. गोरखपूर येथील जगप्रसिद्ध 'कल्याण' नामक हिंदी मासिकाच्या जून १९३५ च्या अंकांत '**विनाशके पथपर**' या मथळ्याखालीं लेख प्रसिद्ध झाला आहे. तो अखिल कल्याणेच्छु स्त्रीपुरुषांनीं वाचण्यासारखा आहे. लाहोरच्या एका सज्जनानें अत्यंत करुणापूर्ण भाषेंत पंजाबच्या नवशिक्षित युवकयुवतींमध्यें फैलावलेल्या व्यभिचाराची चर्चा करून, या अधःपातापासून समाजाला बचावण्याचा उपाय कोणी सांगेल काय, असें विचारलें आहे. त्या पत्रांत सदरहू लेखक म्हणतो—

"आमचे रामलक्ष्मण व भीष्मार्जुन यांचा आदर्श आज नष्ट होऊन गेला; सीतासावित्रीचें नांव घेतांनाही जीभ कांपते; त्यांचें नांव घेण्याची आमच्यांत लायकी राहिली नाहीं. दुसऱ्या प्रांतांची आपणास माहिती नाहीं, पण पंजाबांत – विशेषतः लाहोरांत आज जें चाललें आहे, तें पाहून व ऐकून हृदय फाटून जातें! डोळ्यांतील अश्रु थांबत नाहींत. ... कॉलेज हें युवकयुवतीचें आकर्षक केंद्र आहे; सिनेमाही त्याला मदत करितात. ... आजकालच्या संततिनिरोधाच्या उपायांमुळें तर अनर्थ जास्तच वाढला आहे. स्वतंत्रतेच्या नांवावर मर्यादाभंगाचा नंगा नाच चालू आहे. ... विवाहाचा तंटाच कशाला हवा, असा भाव वाढत चालला आहे. ... घरांतून पळून जाणें व पळविणें हे प्रकार वाढले आहेत. अदूरदर्शी तरुणतरुणी मन मानेल तसें वागताहेत." इत्यादि इत्यादि. यावर संपादकमहाशय परमसज्जन हनुमानप्रसाद पोद्दार यांनीं उत्तर इतक्या विनयाचें, कळकळीचें व गंभीर विचाराचें दिलेलें आहे कीं तें मूळांतच वाचून पाहिलें पाहिजे. हा लेख फारच मोठा आहे. यांत त्यांनीं या अधःपाताचीं कारणें दर्शवून, तीं टाळण्याचे उपाय उत्तम रीतीनें सुचविले आहेत. या समग्र सूचना विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहींत. तथापि आमच्या सात्त्विक वाचक भगिनींना या गोष्टीची माहिती असणें योग्य वाटल्यामुळें त्याचा सारांश येथें देतों.

ते म्हणतात — "पत्रलेखक महोदयांचें म्हणणें कितपत खरें आहे हें सांगतां येत नाहीं. तथापि तें अगदींच खोटें म्हणतां येणार नाहीं. त्याला कांहीं वाईट अनुभव आल्यामुळें तो फारच दुःखी झालेला दिसतो व त्याची आग्रहाची आज्ञा असल्यामुळें हें लिहावें लागत आहे"...

"आपल्या भारत देशाचा प्राण धर्म आहे. धर्मज्ञानच शिक्षणाचा मुख्य विषय आहे. धर्मज्ञानहीन मनुष्य आर्यसंस्कृतीमध्यें पशुसमान मानला जातो ... केवळ अर्थकरी विद्या ही खरी विद्या नव्हे...**धर्मभावना लुप्त होते, तेथें संयम राहत नाहीं** व संयमाच्या नाशाबरोबर व्यभिचार फैलावणारच. चालू शिक्षणाचा एक फार वाईट परिणाम असा झाला आहे कीं भारतवर्षांतील आपले पूर्वज, आपलें साहित्य, आपली संस्कृति, याचप्रमाणें आपली सारी त्यागमयी जीवप्रणाली यांबद्दल अश्रद्धा झाली आहे. **देशाच्या गुलामगिरीपेक्षां मानसिक गुलामगिरीनेंच फार नुकसान होतें.** ... जुन्या चालीच्या मनुष्यांना (नवे लोक) अंधविश्वासी म्हणतात, परंतु आजकाल पाश्चात्यांची अंध नक्कल (नवशिक्षित लोकांत) इतकी वाढली आहे कीं तिला सीमाच राहिली नाहीं! जुनें सोनेंही त्यांना लोखंडाप्रमाणें

भासत आहे ! आमच्या मुलींच्या मनांवरही याचा परिणाम होऊन, शिकून सवरूनही पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावामुळें त्यांच्यांतून धर्म, लज्जा, शील, मर्यादा, मनःसंयम, परमेश्वरभक्ति या गोष्टी निघून गेल्या आहेत. व्यभिचारबुद्धीचें हें एक कारण आहे. "...

"बालविवाहापासून समाजाची हानि झाली आहे व होत आहे, परंतु त्याचें परिवर्तन आज 'युवतीविवाह' व 'विवाहाची अनावश्यकता' या रूपांत जें होत आहे, तें तर त्यापेक्षांही भयंकर आहे. ... बालविवाह वाईट खरा, पण त्याच्या पोटीं एक मोठा लाभ होता, तो आज नाहींसा झाला आहे. हिंदुधर्मानुसार होणारा विवाह हा एक धार्मिक संस्कार आहे. दोन जीवात्म्यांचें परस्पर सात्विक (मधुर) मीलन आहे. * त्यांत कामवासनेस स्थान नाहीं. त्यांत धर्म आहे, रूपाचा मोह नाहीं. ... मातापित्यांच्या द्वारें होणाऱ्या या निश्चित संबंधांत उच्छृंखलता व रूपावर मोह यांस स्थान नव्हतें. यांतही चूक होत होती, परंतु आपल्या मुलांच्या भावी कल्याणाची काळजी वाहणारे आईबाप बंधु वगैरे मनाच्या कसल्याही मोहास बळी न पडतां शांत चित्तानें निर्णय करीत होते ... हल्लींच्या उच्च शिक्षणाबरोबर मुलींमध्यें फॅशनचा रोग वाढला ... शेतकरी अथवा दुकानदाराचा मुलगा इंग्रजी शिकूं लागला किंवा शिकला कीं शेती व दुकानदारी करूं शकत नाहीं. त्याला नवीन फॅशनचे बूट, क्रीम, लोशन, स्नो, साबण, पावडर, चष्मा, फोटोग्राफीचें सामान, इत्यादि वस्तूंची अशी संवय लागते कीं त्याचें आयुष्य आळसी, खर्चिक व ऐदी बनतें ! हाच रोग आमच्या मुलींमध्येंही जोरानें वाढत आहे ! शिकलेल्या किंवा शिकत असलेल्या मुली घरकाम करण्यास नाखूष असतात. त्यांना या कामाची लाज वाटते ; कंटाळा येतो. फॅशन करणें, वर्तमानपत्रें वाचणें, काव्य करणें व गाणें, फोटो काढणें, लेख लिहिणें, सभांत व सिनेमानाटकांत जाणें, इत्यादि गोष्टी त्यांना फार आवडूं लागल्या आहेत. एका पंजाबांतून दरवर्षी सौंदर्याच्या सामानासाठीं कांहीं कोटी रुपये परदेशांत

---

* पाश्चात्य ग्रंथकारांचे विवाहबाबतींतील विचार —

"Two human souls make one divine. ... Perfect love casteth out fear ; true love thinketh no evil. ... Marriage means mutual help by sacrifice. "..." A bachelor cuts himself off from a great blessing for fear of some trifling annoyance "..." A bachelor is a nondescrift in human society like the odd half of a pair of shears, of little use until joined to his mate." — *Frankline*

जात असल्याचें समजतें !... ज्या कलांच्या विस्तारामुळें राष्ट्राच्या हृदयांत क्षयरोग उत्पन्न झाला आहे, ज्या कला युवकयुवतींना शारीरिक व मानसिक व्याधींनीं ग्रस्त करून काळाच्या दाढेंत देण्यास व त्यांच्या पवित्र आदर्शचारित्र्याचा नाश करण्यास साहाय्य करीत आहेत, त्या 'कला' नसून कराळ 'काळ' च आहेत. दुसरा प्रश्न असा आहे कीं कलेच्या दृष्टीनें कलांचा कितीसा प्रसार होत आहे ? कलेच्या उन्नतीच्या दृष्टीपेक्षां माझ्या मतें धनप्राप्तीची दृष्टीच अधिकांशानें त्यांत आहे. ज्या सिनेमा-चित्रपटांत सुंदर तरुण स्त्रियांचें अर्धनग्न अंगाचें प्रदर्शन व त्यांचें शृंगारिक गायन असतें, तोच चित्रपट पाहण्यास जास्त लोक जातात व जेथें जास्त लोक जातात तेथेंच जास्त पैसा उत्पन्न होतो. म्हणूनच नव्या नव्या फिल्म कंपन्या मोठमोठ्या पगारावर नव्या नव्या सुंदर तरुण स्त्रिया शोधशोधून आणतात. (यांत त्या कंपन्यांची व या नटींची दृष्टि कलावृद्धीकडे असते कीं द्रव्याकडे, याबद्दल मोठासा विचार करण्याचें कारण नाहीं.) पण दुःखाची गोष्ट ही कीं धार्मिक वळणाच्या कुलांतील कुलवधूही लाजलज्जा सोडून परपुरुषांबरोबर मिळून त्यांच्या अंगाचा स्पर्शही होऊं देऊन राजरोस नाट्य दाखविण्याकरितां कां बरें याव्यात ?"

"सुधारणेमध्येंही संयमाची जरूरी आहे. असंयमपूर्ण सुधारणेनें जितका नाश होतो, तितका सुधारणा न झाल्यानें होणार नाहीं. या विध्वंसक सुधारणेचें हें दुष्ट फल आहे कीं आमच्या सदाचरणी, शीलसंपन्न, पुण्यचरित्रा व धर्मभीरु अशा देवपूजिता कुलवधू मोहवश होऊन डोळे झांकून, नारकीय अग्निकुंडांत उडी मारण्यास तयार झाल्या आहेत व या गोष्टीला आम्ही भ्रांत उन्मत्त पुरुष म्हणतों आहों– उन्नति !!!"

"माझ्या मतें या पापापासून बचण्याचे उपाय हे आहेत – कालाच्या प्रतिकूलतेमुळें कठीण तर आहेच, पण सावधानतेनें उत्साहपूर्वक अनवरत (न थांबतां, एकसारखा) प्रयत्न करीत राहिल्यास पुष्कळ अंशानें साध्य होण्यासारखें आहे.

(१) शक्य तों शिक्षणक्रमामध्यें धार्मिक व सदाचारासंबंधीं पुस्तकें ठेवणें.

(२) शाळा व कॉलेजें यांत मुलगे व मुली यांना एकत्र शिक्षण न देणें.

(३) मुलींना इंग्रजी उच्च शिक्षण देण्याचा मोह सोडणें.

(४) युवती होण्याच्या आंत (वयाच्या १४ ते १६ पर्यंत निदान) मुलींचें लग्न करण्याचा पालकांनीं प्रयत्न करणें.

*****************************************************

(५) शक्य तों मुलांनासुद्धां फार वय होईपर्यंत अविवाहित न ठेवणें. मीं विश्वासार्ह व्यक्तीकडून ऐकलें आहे कीं भारतवर्षाच्या एका मोठ्या शहरांतील युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांत शेंकडा ९० अविवाहित विद्यार्थी वाईट रोगानें पछाडलेले आहेत ! ही कांहीं आश्चर्याची गोष्ट नव्हे. अरण्यवासी विरक्त पुरुषांच्या हृदयांत सुद्धां जर दुःसंगतीमुळें विकार उत्पन्न होतो, तर मग विलासपूर्ण, धर्मभयशून्य वातावरणांत, फॅशननें राहणारे, शृंगारिक कविता व कादंबऱ्या वाचणारे, नाटकें–सिनेमा पाहणारे, कृत्रिम उपायांनीं संततिनिरोधनाचे उपाय जाणणारे आणि शिक्षणाच्या वगैरे निमित्तानें एकत्र वास करणारे युवक व युवती यांच्याकडून पवित्र राहण्याची आशा करणें, हें त्यांच्या योग्यतेपेक्षां अधिक आशा करणें होय. नव्हे, ही एक दुराशाच होय. याकरितां **त्यांचा योग्य वयांत विवाह करून देणेंच उत्तम.**

(६) शिकत असलेल्या मुलींतही फॅशन न शिरेल व त्या घरचें कामकाज खुद्द करूं शकतील अशी संवय मातापित्यांनीं आपल्या कृतीनें त्यांना लावली पाहिजे. विलासीपणा, आळस व चैनबाजी यांपासून त्यांचें रक्षण केलें पाहिजे. तसेंच ही गोष्ट लक्षांत ठेवावी कीं **गृहकार्यांत दक्ष व चरित्रवती कर्तव्यपरायण स्त्रीच खरी सुशिक्षित होय, अनेक भाषा शिकलेली ती सुशिक्षित नव्हे !**

(७) जे खरीखुरी सुधारणा करूं इच्छितात त्या महानुभावांनीं आत्मसंयमन व धिम्या चालीनें चालण्याची कृपा करावी. फांद्या सुधारण्यासाठीं झाडाच्या मुळावर धाव घालूं नये. भोगविलासाकडे प्रवृत्ति होईल असा उपदेश करूं नये ... रोग व दारिद्र्य, इत्यादि कारणांमुळें संततिनिरोधाची आवश्यकता असते, पण त्यासही उत्तम इलाज आत्मसंयमनच आहे."

(८) "याचप्रमाणें विधवा भगिनींनाही कांहीं तरी सांगून त्यांचें मन बिघडवूं नये, त्यांना संयमापासून च्युत करूं नये. विधवाच वाईट चालीला लागतात असें मानणें योग्य नाहीं. आजही शेंकडों विधवा पवित्राचरणी आहेत. त्यांचा पवित्र शीलपालनाचा आत्मविश्वास व त्यासंबंधीं त्यांची प्रबल इच्छाशक्ति याला धक्का देऊं नये."...

"या सूचना देण्यांत माझी कांहीं चूकही होण्याचा संभव आहे. समाजसुधारणेचा यथार्थ उपाय दाखवूं शकेन असा मी अनुभवी व दूरदर्शीही नाहीं आहे. याकरितां सज्जनांनीं मला क्षमा करावी अशी मी प्रार्थना करितों." इत्यादि लिहून या

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

बाबतींत कृपा करून कोणीं माझ्याशीं पत्रव्यवहार करूं नये ' अशी विनंति करून '**क्षमाप्रार्थी हनुमानप्रसाद** ' अशी सही केली आहे.

आतां, कॉलेजांतील सुशिक्षित स्त्रीपुरुषांप्रमाणें अशिक्षितांमध्येंही स्त्रीपुरुषांचा अनैतिक संबंध असत नाहीं काय, असें कोणीं विचारतील. त्याचें उत्तर असें कीं हा दोष अशिक्षितांमध्यें कदाचित् जास्तही असूं शकेल. म्हणून सुशिक्षितांमध्यें तो असणें समर्थनीय होईल काय ? मग अशिक्षित व सुशिक्षित यांमध्यें फरक तो काय राहिला ? शिक्षणानें जर शील ( Character ) बनणार नाहीं, तर त्या शिक्षणाचा उपयोग काय ? **शील बिघडविण्यास अधिकांशानें कारणीभूत होणारें तें कुशिक्षण असून, शीलसंवर्धन करणारें तेंच सुशिक्षण होय,** असें विद्वानांचें मत आहे. कॉलेज-कुमारकुमारींपैकीं कोणीच शुद्धाचरणी असणार नाहीं असें आम्ही किंवा इतर कोणीही म्हणणार नाहीं. पण आर्यांच्या उच्चवर्णांतील कन्यांनीं परधर्मीयांशीं विवाह केल्याचीं उदाहरणें कॉलेज-कुमारींमध्यें आढळतात. तसेंच उच्चवर्णीय आर्यपुत्रांनीं परधर्मीय कन्यांशीं विवाह करण्याची मनोवृत्ति कॉलेजशिक्षणांत तयार होते, हें नाकबूल करतां येणार नाहीं ( मुसलमान युवती मात्र यास अपवाद दिसतात. ) § बाकी, सकलगुणसंपन्न किंवा सकलदोषसंपन्न असा जगांत एकही मनुष्य किंवा संस्था असूं शकणार नाहीं. बव्हंशांच्या दृष्टीनेंच कोणासही गुणी किंवा अवगुणी म्हटलें जातें, एवढेंच. असो.

* * *

एका महाराष्ट्रीय विद्वानाचेही स्त्रीशिक्षणाबद्दलचे विचार पाहा: " सुमाता, सुनागरिका व सुगृहिणी बनणें हेंच स्त्रियांचें ध्येय असलें पाहिजे, किंबहुना हेंच स्वाभाविक आहे, याविषयीं जे साशंक असतील त्यांनीं एकवार **आधुनिक जर्मनीकडे नजर फेकावी. स्त्रियांनीं उच्च शिक्षणाच्या मागें लागणें हें हल्लींच्या नाझी सरकारला मुळींच मान्य नाहीं. त्यांच्या मतें**

§ " मुसलमान युवती परधर्मीयांशीं विवाह करीत नाहींतच; पण मुसलमान युवकांस युरोपियन युवती आपल्या मोहजाळांत अडकवून त्यांनीं मुसलमान धर्म स्वीकारूनही जनानखान्यांत प्रवेश केला, तर तेंही त्यांना ( म्हणजे मुस्लीम युवतींना ) खपत नाहीं. अशा युरोपियन स्त्रियांना देहान्त शासन करण्याच्या उद्देशानें मुसलमान स्त्रियांची एक गुप्त संस्था स्थापन झाली असून, जगाच्या प्रत्येक भागांत या संस्थेचे हस्तक पसरले आहेत. "

— **नवशक्ति,** ता. २३।६।३५ चा अंक पाहा

**********************************************

**स्त्रीजन्माची सार्थकता गृहव्यवस्था व शिशुसंगोपन यांतच आहे.** आदर्श स्त्री तीच कीं, जी सुमाता व सुगृहिणी असते आणि याच तत्त्वावर स्त्रियांना जर्मनींत घराबाहेरच्या कोणत्याही धंद्यांत वा व्यवहारांत न पडण्याचे पाठ आज मिळत आहेत ... त्यांच्या नाजूक व प्रेमळ प्रकृतीला अपत्यसंगोपन, रुग्णपरिचर्या, यांसारखीं वत्सलतेचीं किंवा गृहव्यवस्था, पाकसिद्धि, शिक्षण, कशीदा, यांसारखीं लालित्यपूर्ण कामेंच योग्य. **गृह हेंच त्यांचें कार्यक्षेत्र व सुगृहिणी बनणें हाच त्यांचा आदर्श** ... अशा प्रकारच्या ज्ञानानेंच आर्यमहिलांचा उद्धार होणार आहे. एवंगुणविशिष्ट स्त्रीरत्नें जेव्हां घराघराला शोभवितील, तेव्हांच घरोघर सुख, समाधान, संपन्नता, सुशीलता व स्वदेशाभिमान नांदूं लागतील. ”

— **स्त्रीशिक्षण सुधारणेचें दिग्दर्शन** — या सदराखालीं ‘ सह्याद्रि ’ मासिकाच्या जून १९३५ च्या अंकांत डॉ. बाळकृष्ण, एम्. ए., पीएच्. डी. यांनीं लिहिलेला लेख.

* * *

“ सर्वत्र **दारिद्र्य** व **बेकारी** वाढत चाललेली दिसते, याचें कारण अन्नवस्त्रादि आवश्यक जिन्नसांचा तुटवडा नसून त्यांच्या वांटणीची विषमता हें होय. ... ज्ञान वाढलें, त्या प्रमाणांत स्वार्थबुद्धि कमी न होतां उलट वाढत गेली. ... त्या स्वार्थाचा प्रतिकार करून स्वार्थत्यागाची भावना वाढविणें हा सामाजिक आपत्तीवरील खरा उपाय आहे. लोकसंख्या कमी करणें हा नव्हे. ... **हिंदी लोकांच्या वाढत्या दारिद्र्याचें कारण येथील वाढती लोकसंख्या हें नव्हे.** हिंदुस्थानांतील ज्या सुशिक्षित आणि विचारक्षम समाजावर राष्ट्राचा अभ्युदय अवलंबून आहे, त्या **समाजानें संततिनियमन करून आत्मघात करण्याचें ठरविणें हा केवळ राष्ट्रघातकीपणा होणार आहे.** ”

— ‘ **ज्ञानमंदिर** ’ मासिकाच्या ता. १५।४।३५ च्या अंकांत म. श्रीपाद महादेव वर्दे, ॲडव्होकेट, यांचा लेख.

**वैवाहिक जीवन व स्त्रीजन्माचें वैभव** याबद्दल युरोपियन तत्त्ववेत्त्याचें मत —

“ It is the greatest glory of the feminine incarnation, the great opportunity which women have and men have not. Men have other opportunities but that really wonderful privilege of

motherhood is not theirs. It is woman who do this great work for the helping of the world, for the continuance of the race, and they do it at a cost suffering of which we men can have no idea."

याचा भाव एवढाच कीं पुरुषांमध्यें इतर अनेक शक्ति असतील, पण खरोखर अद्भुत अशी मातृपदाची शक्ति, जी बायकांतच आहे, ती त्यांच्यांत नाहीं. जगताची स्थिति राखून धरण्याकरितां पुढील पिढींत कर्तृत्ववान् व भाग्यशाली संतति निपजविण्याची मातृपदाची सुवर्णसंधि निसर्गदेवतेनें स्त्रियांनाच बहाल केली आहे, पुरुषांना ज्याची कल्पनाही करवणार नाहीं अशीं प्राणान्तिक दुःखें सहन करून जगत्स्थितीला साहाय्य करण्याचें काम स्त्रियाच करीत असतात ! पुरुषी कर्तव्याची गोडी आणि बुद्धीवर फाजील ताण बसणारी जी पुरुषी पेशाची विद्या तिचा हव्यास दूर ठेवला, तरच या बहुमोल ईश्वरदत्त देणगीचा, मातृपदाच्या संधीचा फायदा घेतां येईल. सामाजिक चळवळीच्या पुढारीपणाचा मोह किंवा हल्लींच्या युनिव्हर्सिटीच्या पदव्यांची राक्षसी महत्त्वाकांक्षा ज्यांच्यांत उद्भवली आहे त्यांना, वरील गोष्टीचें तात्त्विक व स्वपरजनसुखकारक स्वरूप नुसतें ऐकून घेण्याचाही धिम्मेपणा नसतो हें पाहाण्यांत आलें म्हणजे मनाला मोठें दुःख होतें !

* * *

## स्त्रियांची समाजसेवा

हल्लींच्या कांहीं नवशिक्षणसंपन्न आर्यकन्या समाजसेवा ( Social Service ) करण्याकरितां म्हणून उच्च शिक्षण घेऊन आजन्म ब्रह्मचर्यव्रत धारण करण्याची इच्छा करितांना दिसून येतात. ही त्यांची परोपकाराची इच्छा व स्वार्थत्यागवृत्ति चांगली नाहीं असें कोण म्हणेल ? पण समाजसेवा अथवा राष्ट्रसेवा करण्याकरितां आपला 'एक आत्मा' अर्पण करणें यामध्यें व योग्य तऱ्हेनें मातृपदारूढ होऊन त्याच सेवेकरितां 'अनेक आत्मे' निर्माण करणें यामध्यें खरें अथवा अधिक श्रेय कोणाला द्यावें याचा विचार विचारवंतांनींच करावा.

दुसरी गोष्ट – राष्ट्रसेवेच्या बुद्धीनें आजन्म ब्रह्मचारी राहण्याची ज्यांची खरीखुरी इच्छा असेल, त्यांनीं ती योग्यता अंगीं आणण्यासाठीं कॉलेजांत जाऊन उच्च शिक्षण खुशाल घ्यावें; परंतु ज्यांना वैवाहिक जीवन घालविण्याची इच्छा असेल त्यांनीं कॉलेजांतील उच्च शिक्षण घेऊन आपल्या शक्तीचा, आयुष्याचा व द्रव्याचा अपव्यय

करण्यांत काय अर्थ बरें ? हल्लीं पुरुषांना देखील कॉलेजांतील शिक्षणानें फायदा होत नाहीं. बी. ए. झालेले लोक देखील ३०।३५ रु. पगाराच्या नोकरीवर राहतात, (यू. पी. मधील एका ग्रॅज्युएटानें ५।६ वर्षें प्रयत्न करून नोकरी लागली नाहीं म्हणून विष खाऊन प्राण दिल्याची खबर १९३५ एप्रिल-मेच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे!) परीक्षाही दिवसेंदिवस कठिण झाल्या आहेत, मुलांच्या बी. ए. परीक्षेपर्यंतच्या शिक्षणास जो पैसा खर्च होतो, त्याचें व्याजही त्यांच्या पगारांतून निघत नाहीं! असा हल्लींचा अनुभव असतांना, मुलींना कॉलेजांतील शिक्षण देण्याचा मोह शहाणे सुरते व धार्मिक आईबापही सोडीत नाहींत याला काय म्हणावें ? दुसरें असें कीं, '**मेधा व प्रज्ञा स्त्रियांना उपजत असते व पुरुषांना शिकवावी लागते**' (–कालिदास). एल्‌एल्. बी. वकील व बॅरिस्टरही अशिक्षित पत्नीच्या व्यवहारचातुर्यापुढें नम्र झालेले दिसून येतात. व्यवहारचातुर्याला कॉलेजचें मोठेंच शिक्षण पाहिजे असें नाहीं. फुकट कालाचा व द्रव्याचा अपव्यय मात्र तो आहे. आमचे साधक बंधुभगिनी तरी हा मोह सोडून आपल्या कन्यांना सुगृहिणी व सुमाता होण्याचें योग्य शिक्षण देतील व राष्ट्रदेवतेचे आणि स्वर्गस्थ पूर्वजांचे, ऋषींचे व संतांचे आशीर्वाद घेतील अशी आम्ही आशा करितों.

* * *

**विधवा भगिनींना निराळ्या सूचना** तरी काय द्यावयाच्या ? 'नरका नारायण होय' ही नरजन्माची योग्यता अथवा नरजन्माचें अंतिम ध्येय डोळ्यांपुढें निरंतर ठेवून, त्यांनीं आपलें वर्तन पवित्र व भगवत्पर ठेवावें. उच्च कुलांतील बालविधवांचें आयुष्य सासर किंवा माहेरच्या माणसांची निरपेक्ष सेवा करण्यांतच जात असतें. पुष्कळ ठिकाणीं अशा विधवांना सासूसासऱ्यांकडून, दीरभाव्यांकडून, नणंदाभावजयांकडून फारच अपमान व हाल सोसावे लागलेले दृष्टीस पडतात. ना पतिसुख, ना पुत्रसुख, अशा विधवांना ईश्वरभक्तीशिवाय मनाच्या समाधानाला दुसरी जागाच नसते! घराण्याच्या व तिच्या स्वतःच्या पूर्वपुण्याईनें मनाचा ओढा ईश्वरभक्तीकडे लागल्यास ती कशी करावी, कोणते नियम पाळावे वगैरे सांगणारें, कोणीतरी जाणतें मनुष्य पाहिजे असतें. ईश्वरभक्तीचा योग्य मार्ग दाखवून देणारें जाणतें माणूस मिळणें फार कठिण असतें. तसें माणूस शोधण्यास पुरुषांप्रमाणें बाहेर कोठें जाणें स्त्रियांना शक्य व सुरक्षितपणाचें नसतें. ईश्वरभक्तीचा मार्ग दाखवून देणारा संतांशिवाय दुसरा कोण आहे ? पण खरे संत या काळीं फार दुर्लभ झाले

आहेत. भाविक लोकांच्या भाविकपणाचा फायदा घेऊन आपली तुंबडी भरणारे दांभिक लोक संतांच्या वेषानें फिरत असतात. ही गोष्ट आतांचीच नव्हे, तर पूर्वीपासून चालत आली आहे. श्रीतुकाराममहाराजांच्या वेळींही तसले लोक होते. त्याबद्दल त्यांचे उद्गार पहा —

**" ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥**
**स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥ २ ॥**
**भांग भुर्का हें साधन । पची पडे मद्यपान ॥ ३ ॥**
**तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥ "**

**" परद्रव्य परनारी । अभिलाषूनि नाक धरी ॥**
**जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ "**

**" एक करिती गुरुगुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥...**
**परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ॥**
**तुका म्हणे निर्भर चित्तीं । अधोगतीं जावया ॥ "**

तात्पर्य, स्त्रियांनीं, त्यांत तरुण विधवांनीं गुरु करण्याच्या भानगडींत न पडतां, घरच्या गुरुजनांच्या म्हणजे वडिलांच्या ( सासूसासरे किंवा आईबाप वगैरेंच्या ) आज्ञेंत राहून त्यांची योग्य ती सेवा करीत कुळदेव किंवा इष्टदेवतेचें **ध्यानयुक्त नामस्मरण** करीत असावें. श्रीरामविजय, हरिविजय, भक्तिविजय, संतलीलामृत, वगैरे ग्रंथ घरच्या घरीं वाचावे. अध्यात्माची गोडी लागल्यास दासबोध, एकनाथी भागवत, वगैरे ग्रंथ वाचावे.

## मुमूक्षूंनीं प्रासादिक ग्रंथ वाचण्याची पद्धत

इष्ट देवाची मूर्ति समोर ठेवून, तिच्या ठिकाणीं गुरुत्व-भाव कल्पून, तिजवर बुका, कुंकूं, वगैरे वाहून, उदबत्ती लावून, एकान्तांत बसून अध्यात्मग्रंथ वाचूं लागावें आणि वाचतांना श्रीगुरु सांगत आहेत व आपण ऐकत आहों अशी भावना धरावी. म्हणजे त्यांतील रहस्याचा प्रकाश होईल. अशी संतांची शिकवण आहे. '**गुरु तारक नसून गुरुभाव तारक आहे.**' ( याबद्दलचें विवेचन मागें अनेक ठिकाणीं आलेंच आहे. ) इष्टदेवाच्या ठिकाणीं गुरुभाव कल्पून वर सांगितलेल्या भावनेनें वाचीत गेल्यास रहस्यप्रकाश लवकर होतो. अशा भावनेनें अध्यात्मग्रंथांचें वाचन विधवांनींच करावें असें नाहीं, तर सधवांनीं व मुमुक्षु आणि साधक पुरुषांनींही करावें. नाथभागवतासारखा एखादाच ग्रंथ पारायणाचा मुख्य ग्रंथ करावा. इतर ग्रंथ

********************************************

मजेखातर फावल्या वेळेस हवेतर वाचावे. पण नित्य पारायणाचा ग्रंथ एकच असावा. त्या ग्रंथाचीं पारायणावर पारायणें करावीं. पहिल्या खेपेपेक्षां दुसऱ्या पारायणाच्या खेपेस ग्रंथांतील शब्दांचा अधिक प्रकाश होतो, दुसऱ्यापेक्षां तिसऱ्या खेपेस अधिक होतो. ग्रंथकाराच्या शब्दांशीं व विचारांशीं आपलें जसजसें तादात्म्य होत जाईल, तसतसा त्यांतील तत्त्वाचा अधिकाधिक प्रकाश होईल. ( गुरु केला असणाऱ्यांनीं देखील वरील सूचनेप्रमाणें भावना करून गुरूनीं आज्ञापिलेल्या ग्रंथाचें पारायण करीत असावें. त्याचा अधिक फायदा होईल. )

इंदुरांतील एक विद्वान वकील, त्यांचा वेदान्तावर व भक्तिमार्गावर विश्वास, पुष्कळ ग्रंथ वाचलेले, पण ग्रंथांत सांगितलेल्या कोणत्याच गोष्टीचा अनुभव न आल्यामुळें थोडेसे अश्रद्ध झालेले, कोणाही साधुसंतावर विश्वास नसणारे, पण हरिदास-पुराणिकांच्या कथा न चुकवितां दूर बसून ऐकणारे असे प्रामाणिक जिज्ञासु, यांना आमच्या एका मित्रानें[1] पुढीलप्रमाणें सूचना सांगितली–"रोज रात्रौ जेवणखाण आटोपल्यानंतर (किंवा रात्रौ उपवास केल्यास बरें) देव घरांत अथवा दुसऱ्या कोणत्याही सोयीच्या ठिकाणीं बसून, श्रीकृष्णाची सुंदर तसबीर अथवा मूर्ति, आपल्या डोळ्यांसमोर त्या मूर्तीचे डोळे येतील इतक्या उंचीवर भिंतीला लावून अथवा चौरंगावर ठेवून, प्रकाशाकरितां समय लावून सुवासिक उदबत्ती व तुपाचें निरंजन पेटवून त्या प्रकाशांत डोळ्यांत डोळा घालून वासुदेवद्वादशाक्षरी मंत्राच्या बारा माळा करा व एकनाथी भागवत, जगद्गुरु श्रीकृष्ण सांगत आहेत व आपण ऐकत आहें, अशी भावना करून वाचा. याप्रमाणें रोज फक्त एक तास करीत बसा. श्रीतुकाराममहाराजांनीं या ग्रंथाचीं १०८ पारायणें केलीं (कोणी १००० म्हणतात) पण तुम्ही कामधंद्याचे लोक, फक्त १२ पारायणें करण्याचा संकल्प करा आणि देवतासाक्षात्काराचा कांहीं अनुभव येतो कीं नाहीं, पाहा." हें ऐकून त्यांना विश्वास उत्पन्न झाला व त्याप्रमाणें ते मोठ्यानें प्रेमानें व निश्चयानें करूं लागले. त्यांस भागवताच्या सहाव्या पारायणांतच जागृतावस्थेमध्यें वृंदावनाचा देखावा दिसून तेथें विलक्षण ( अप्राकृत ) प्रकाशांतें[2] मुरलीधर कृष्णाचें, नूपुरांच्या आवाजासहित नृत्य व मधुर मुरली-नादश्रवणासह दर्शन झालें. 'नामजपाचें महत्त्व' या पहिल्या भागांत वामनराव यरझरवीकरांची गोष्ट दिली आहे, त्याप्रमाणें

---

१ बंधु वै. दिगंबरदास कामत यांनीं. २ हा प्रकाश सूर्य, चंद्र, अग्नि किंवा विद्युत्‌चा नव्हता.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

या आमच्या वकीलसाहेबांना विलक्षण आनंदाचा अनुभव आला. पहिल्या प्रथम प्रकाशदर्शन झालें, तो प्रकाशच इतका आल्हादकारक होता कीं त्याचें वर्णन कांहीं महिन्यांच्या भेटीनंतर त्या मित्रांना सांगतांना ते रोमांचित होऊन अर्धमूर्च्छितावस्थेंत गेले व कांहीं मिनिटांनीं त्यांनीं दर्शनाचा अनुभव सांगितला. आठव्या पारायणाच्या वेळीं तर सौंदर्यनिधि श्रीकृष्णानें यांना घट्ट प्रेमालिंगन दिलें व 'या हृदयींचें त्या हृदयीं घातलें,' त्या अनुभवाचें वर्णन ते काय करणार व आम्ही काय लिहिणार?

## देवतादर्शनाचे इतर कांहीं अनुभव

एक ८।१० वर्षाची श्रीमंताची कन्या, लहानपणापासून कृष्णभक्ति करणारी, तिच्या भक्तीच्या गोष्टी कानावर आल्यावरून आमच्या बंधूंनीं तिला त्या मार्गांत उत्तेजन देण्याकरितां प्रेमानें एक कृष्णाचा फोटो व स्तोत्राचीं वगैरे लहान लहान पुस्तकें देऊन पाठविलीं. त्यानंतर कांहीं वर्षांनीं तिचें तशाच थोर घराण्यांतील नवऱ्याशीं लग्न झालें. ईश्वरकृपेनें श्रीमंतीमुळें हिचेवर कामधामाचा बोजा नसल्यामुळें, श्रीकृष्णचरित्र वाचणें, स्तोत्रें म्हणणें, नामस्मरण करणें यांत तिचा वेळ जाऊं लागला. तिला श्रीकृष्णाचीं ओझरतीं दर्शनें होऊं लागलीं. घर फार मोठें, ओसरीवरून परसांत जाणें म्हणजे शंभर दीडशें पावलें चालावीं लागतात! कोठें प्रकाश, कोठें थोडासा अंधार, अशा वेळीं चालतांना कोणी पुरुष आपल्याबरोबर आहे असा भास तिला व्हावयाचा! केव्हां केव्हां मुलाच्या पायांतल्या घुंगुराप्रमाणें आवाज ऐकूं यावयाचा, असें चालू झालें. असें काय होतें हें तिला समजेना. ही कांहीं भूतचेष्टा तर नसेल ना, अशी तिला शंका वाटूं लागली. ती एकदां आपल्या माहेरच्या कुलदेवास माहेरच्या माणसांबरोबर गेली. तिकडे असतांना वडिलांच्या दीक्षेप्रमाणें देवस्थानांतील लोकांची वरदळ कमी झाल्यानंतर ही एकटीच प्रदक्षिणेस जात असे; त्या वेळीं प्रदक्षिणा घालतांना पीतांबर झळकायचे, रत्नखचित मुकुट दिसायचा असें होऊं लागलें; असें एकदोनदां झाल्यानंतर घाबरून ती आपल्या मोलकरणीस बरोबर घेऊन प्रदक्षिणा घालूं लागली. तेव्हांपासून हीं दृश्यें दिसण्याचीं बंद झालीं. (आतां ती लेंकुरवाळी झाली आहे, त्यामुळें प्रेम बहिर्मुख झालें व विभागलें गेलें. श्रीमंतीमुळें बाहेर कोठें येणें जाणें नाहीं. कथापुराण नाहीं, श्रवणमनन नाहीं, सत्संग नाहीं, त्या कारणानें तिला चुकल्याचुकल्यासारखें वाटतें, असें आमच्या कानावर आलें आहे, असें असलें तरी श्रीहरीच्या दरबारांत तिची हजिरी लागली असल्यामुळें तोच तिला पुढील मार्ग दाखवील, असा आमचा भरंवसा आहे.)

एक सुमारें ५० वर्षें वयाची ब्राह्मण विधवा स्त्री, (जिचे चिरंजीव हल्लीं एक फर्स्टक्लास सबजज्ज आहेत) तिची आमची गांठ थोड्या वर्षापूर्वी हुबळीस पडलेली होती. ती श्रीसिद्धारूढस्वामींची परम भक्त, तिला श्रीकृष्णाचीं दर्शनें व मुरलीनादश्रवण वारंवार होत असतात. तिला वेदांतश्रवणाचाही पुष्कळ संस्कार असल्यामुळें दृश्य मिथ्या व सगुणरूप मायिक अशा वृत्ति उठतात. तथापि अंतरांत परम समाधान वाटतें व विलक्षण आनंदाचा अनुभव येतो, वगैरे अनेक स्वानुभवाचे उद्गार तिनें आमच्याकडे सांगितले आहेत. धन्य आहे अशा मातोश्रींची ! जन्मजन्मंतरींच्या निष्काम भक्तीचें हें फळ होय.

एक तरुण सोळा वर्षांची मुलगी; नामनिष्ठ व ध्याननिष्ठ; नित्य मानसपूजा करणारी; तिच्या अंगाला विलक्षण सुवास येऊं लागला. तिची सासू, नणंदा, शेजारच्या मैत्रिणी तिला तूं कसलें अत्तर लावतीस म्हणून विचारूं लागल्या. ती म्हणाली, आपणास अत्तरबित्तर लावणेचें माहीत नाहीं. एकदां नवऱ्यानेंही तोच प्रश्न केला. त्याला तिनें तेंच उत्तर दिलें. तेव्हां तो म्हणाला, तूं खोटें बोलतेस. तें ऐकून तिला फार वाईट वाटलें. तिनें मानसपूजेच्या वेळीं एक दिवस देवाकडे प्रार्थना केली व त्यानंतर तो वास येणें बंद झालें.

(मंगळवेढ्याचे सीतारामहाराज यांच्या अंगास असाच सुवास येत असे व त्यांच्या अंगावर सर्प खेळत असत म्हणे.)

एका थोर घराण्याच्या वृद्ध स्त्रीनें आमचें नामजपाचें पहिलें पुस्तक पाहून नवऱ्याबरोबर नामानुष्ठानास सुरुवात केली. तिला सहा महिन्याच्या अभ्यासांत दिव्य प्रकाशदर्शन होऊं लागलें. त्या प्रकाशांत देवतादर्शनही होतें. तिच्यानंतर तिच्या पतिराजास तोच अनुभव येऊं लागला. " आम्हीं दोघांनीं एकदम सुरवात केली पण तिचें पाऊल मजपेक्षां फार पुढें ( Advanced ) आहे. " असें त्यांनीं मोठ्या प्रेमानें थोड्या महिन्यांपूर्वी आमच्याकडे येऊन सांगितलें. (हे रावबहादूर असून ५०० रु. पेन्शन घेणारे आंग्लविद्याविभूषित, पंडित गृहस्थ, बाहेरून सुधारक व आंतून अंतर्निष्ठ देवभक्त आहेत. नांवें देतां येत नाहींत म्हणून वाईट वाटतें.)

'**ईश्वराच्या दयेचें जाज्वल्य उदाहरण**' या नांवाचा लेख माघ संवत् १९९१ (फेब्रुवारी १९३५) च्या '**कल्याण**' च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्यांत १५ जानेवारीस झालेल्या बिहारच्या भूकंपाच्या वेळीं एका कृष्णभक्त मुलीवर तीन भिंती कोसळून पडल्या; भूकंपाचे धक्के थांबल्यानंतर मातीचे ढीग उपसून

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

काढण्यास आरंभ झाला. त्यांत तीन दिवसांनंतर ह्या मुलीस बाहेर काढण्यांत आलें. मूर्च्छितावस्थेंतून शुद्धीवर आल्यानंतर तिनें त्या भयंकर प्रसंगीं एक पीतवस्त्रधारी परम सुंदर बालक येऊन आपल्या पाठीवर हात फिरवीत असे, त्या वेळीं मातीच्या भारानें आपणांस होणाऱ्या वेदना कशा शांत होत व झोंप लागे; पुनः जागृति आल्यानंतर भारानें अत्यंत श्रम होत, तेव्हां पुनः तो बालक प्रगट होऊन हात फिरवी व धीर देई, ही हकीकत दिली आहे. इतर कांहीं लोकही जिवंत बाहेर निघाले आहेत, तीहि ईश्वरी दयाच; पण ही एक कृष्णभक्त-बालिका हिला त्या भयंकर स्थितींत श्रीकृष्णानें प्रत्यक्ष दर्शन देऊन तारलें हें त्यांत विशेष आहे, असें लेखकानें म्हटलें आहे. तिच्या बापाचें नांव गांव वगैरे सर्व त्यांत प्रसिद्ध झालें आहे. ह्या काळांतही भगवंताचीं प्रत्यक्ष दर्शनें त्याच्या भक्तांना होत असतात, हें यावरून सिद्ध होतें.

तात्पर्य, पुरुषांपेक्षां बायकांची अंतररचना कोमळ, प्रेमळ व वात्सल्यभावानें युक्त असल्यामुळें आणि त्यांना पुरुषांप्रमाणें बाह्य उपाधीचें जंजाळ नसल्यामुळें ध्यान अथवा एकाग्रता लवकर साधते व त्यामुळें अदृश्य सृष्टींतले चमत्कार त्यांना लवकर अनुभवास येतात. त्यांच्या विमल भावामुळें त्यांजवर ईश्वरी कृपाही लवकर होते. त्यांना कोणाच्याही संगतीस लागण्याचें कांहीं कारण नाहीं. परमार्थमार्गाला सत्संगाची जरूरी असते, नव्हे, सत्संगावांचून परमार्थ कधीं कोणाला साध्य झालेला नाहीं. परंतु बायकांनीं बाहेरच्या सत्संगाची फारशी हांव धरूं नये. लोकमर्यादेप्रमाणें वर्तन ठेवून म्हणजे मुख्यतः आपलें शील संभाळून वागणें अत्यंत जरूर आहे. कारण —

**"स्त्री ही संस्कृतीचें संरक्षण करणारी व संतति वाढविणारी आद्य शक्ति आहे. स्त्रियांची सुस्थिति हें सुधारणेचें मोजमाप आहे. नव्या पिढीच्या नसानसांतून नवशक्ति भरणारी ही महान् देवता आहे. स्त्री ही परमेश्वरी अवतारी विभूतींची, विद्वानांची, धार्मिकांची, शूर वीरांची जननी आहे. वर्णशुद्धि, जातिशुद्धि, कुलशुद्धि, ह्या सर्व स्त्रियांच्या अधीन आहेत. उत्तम संतति ही स्त्रियांच्या अधीन आहे; म्हणूनच स्त्रियांच्या संरक्षणाबद्दल आमच्या संस्कृतींत अतिशय विचार केलेला आहे.** स्त्रिया स्वभावतः दुर्बल आहेत व पावित्र्य हें कांचेप्रमाणें एकदां फुटलें कीं पुनः न सांधणारें आहे. म्हणून स्त्रियांवर स्वसंरक्षणाची जबाबदारी टाकणें हें घातुक आहे. स्त्रियांच्या रक्षणाचा विचार करतांना —

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने।**
**रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥**

**********************************************

असें मनूनें म्हटलें आहे. याचा अर्थ एवढाच आहे कीं स्त्रियांना स्वसंरक्षणाची जबाबदारी पेलणार नाहीं, म्हणून कौमार्यांत पित्यानें, तारुण्यांत नवऱ्यानें व म्हातारपणीं मुलांनीं त्यांचें संरक्षण केलें पाहिजे. ”

—‘ **हंस** ’ साप्ताहिक, ता. २७ जून १९३५ चा अंक

‘ न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ’ याचा अर्थ ‘ स्त्रियांना स्वातंत्र्य देऊं नये ’ असा आधुनिक विद्वान करितात व हा शास्त्रकारांनीं स्त्रियांवर जुलूम केला आहे म्हणतात ! हा त्यांचा केवळ हेतुविपर्यास करण्याचा प्रयत्न आहे. त्या वचनाचा अर्थ तसा नसून ‘ स्त्रीजाति स्वातंत्र्याला अर्ह म्हणजे योग्य नाहीं, ’ असा आहे. हें त्यांचें अनुभविक सांगणें आहे. स्त्रियांच्या स्वाभाविक दुर्बलतेमुळें त्यांचें रक्षण करण्याची जबाबदारी पिता, पति व पुत्र यांचेवरच शास्त्रकारांनीं ठेवली आहे. ही स्त्रीजातीची शास्त्रकारांनीं करुणा केली आहे कीं त्यांजवर जुलूम केला आहे, याचा विचार विवेकवंतांनींच करावा. ज्या शास्त्रकारांनीं ‘ न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ’ म्हटलें आहे, त्यांनींच ‘ यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ’ असें सांगितलें आहे, याचा नको का विचार करावयाला ? एखादा पुरुष प्रापंचिक कामकाजाकरितां किंवा पारमार्थिक कार्याकरितां पाहिजे तिकडे व पाहिजे त्या समाजांत एकटा फिरूं शकेल ; डोंगरावर एकटा बसून तप करूं शकेल ; तसें स्त्री करूं शकेल काय ? तसा तिनें प्रयत्न केल्यास तिचा हेतु सिद्धीस जाईल काय व ती सुरक्षित राहूं शकेल काय ? स्वतःच्या शक्तीनें शत्रुनिबर्हणपूर्वक आत्मसंरक्षण करण्याची पात्रता त्यांच्यांत नाहीं. अपवाद म्हणून झाशीच्या राणीसारखी शूर अबला एखादी दाखवितां येईल. पण ती एखादीच. हजारांत नव्हे लाखांत एखादी ! पण अपवाद हा नियम केव्हांही होऊं शकत नाहीं. मुलांनाही आपण स्वातंत्र्य देत नाहीं, याचें कारण त्यांची दुर्बलता. मग स्वातंत्र्य न देणें ही वडिलांची त्यांचेवर करुणा कीं जुलूम ? याचा विचार स्त्रियांनींही करावा.

आमच्या एका भगिनीचे दोन नवशिक्षित तरुण मुलगे गांवांत झालेल्या सभेस जाऊन येऊन आईकडे शिफारस मारूं लागले कीं आज सभेंत ‘ बायकांनींही देशकार्यासाठीं पुरुषांबरोबर सहकार्य केलें पाहिजे ; चुलीकडेच न बसतां द्रव्यार्जनाचे कामींही त्यांनीं पुरुषांना मदत केली पाहिजे. ’ असा ठराव पास झाला, इत्यादि. यांतील एक तरुण पदवीधर मुलगा त्या सभेचा अध्यक्षही होता. पण आईला तो मुलगाच. आई विनोदानें त्यांना म्हणाली, “ तुम्ही हातांत बांगड्या घालून चुलीकडे बसा म्हणजे आम्ही ऑफिसांत जाऊन कामें करूं. तुम्ही पाळणा हालवीत

रहा, मुलाबाळांची चाकरी करा, आम्ही साहेबांची चाकरी करूं." मागें आम्हीं लिहिल्याप्रमाणें चूल व मूल सांभाळण्याच्या कामाचा तपशीलही त्यांजपुढें तिनें ठेविला. तो ऐकून त्यांचीं सभेंतील बोलणीं जिकडच्या तिकडे राहिलीं. मायलेकांचा विनोद ; पण त्यांत गोड उपदेश आहे. सुधारलेल्या जर्मन सरकारचें या बाबतींतील मत मागें ( पृष्ठ ३५४ वर ) दिलेंच आहे. सारांश, स्त्रियांनीं ज्याप्रमाणें प्रपंचव्यवहारांत स्वतंत्रपणें रहाटणें धोक्याचें आहे, त्याप्रमाणें परमार्थकार्यातही स्वतंत्रतेनें वागणें भयाचें आहे. संत अथवा गुरु झाले तरी ते परपुरुष आहेत, ही दृष्टि ठेवून त्यांच्याशीं दूर अंतरानें वागणेंच केव्हांही श्रेयस्कर होईल. अशा रीतीनें वागल्यास आधुनिक **बुवाबाजीस बळी पडण्याचा प्रसंग त्यांच्यावर येणार नाहीं.** मागें सुचविल्याप्रमाणें स्त्रियांनीं घरीं बसून नामनिष्ठ व ध्याननिष्ठ राहून प्रासादिक ग्रंथांचें सेवन करावें. हे प्रासादिक ग्रंथ म्हणजे कागदाचीं पुस्तकें नसून ग्रंथरूपानें संतच अवतीर्ण झालेले आहेत असें समजावें. यांची सेवा म्हणजे गंधफूल घालून पूजा-प्रदक्षिणा करणें मात्र नव्हे. तर मागें सांगितलेल्या युक्तीनें एकान्तांत बसून ते प्रेमानें व सद्भावानें वाचणें. या मार्गांतील आपल्यापेक्षां जाणत्या स्त्रिया कोणी मिळतील तर त्यांच्याशीं संगत ठेवून श्रवण, मनन करणें चांगलें. पण खात्रीनें सांगतों कीं ध्याननिष्ठ व नामनिष्ठ भक्तांना घरबसल्या योग्य गुरु येऊन भेटतील व सर्व संशयांचा नाश करून परमार्थप्राप्ति करून देतील अथवा परमात्मा कृपा करील व अंतरांतच दिव्य ज्ञानाचें स्फुरण होईल. अस्तु.

**स्त्रियांना परमार्थाचा अधिकार केव्हां येतो** व त्यांना कोणत्या अधिकाराच्या पुरुषानें उपदेश करावा, याबद्दल नाथांनीं भागवतांत उत्तम सूचना दिली आहे, तिचें मनन करून स्त्रिया व पुरुष आत्मनिरीक्षण करितील व अधिकाराबाहेर न वागण्याची सावधगिरी घेतील तर उभयतांचेंही कल्याण होईल. भगवान उद्धवास सांगतात —

**" त्यजूनियां प्रपंचाची हांव । नावडे विषयांचें नांव ।**
**वैराग्यें उठला सद्भाव । घेऊनि धांव परमार्थीं ॥**
**अतिथी आणि पतिपुत्रासी । भोजनीं समता नित्य जिसी ॥**
**धनलोभ नाहीं मानसीं । परमार्थी तिसी अधिकारु ॥...**
**सद्गुरुप्राप्तीची अति आर्त । काया वाचा वित्त जीवित ।**
**कुरवंडी करूनि सांडित । परमार्थार्थ सद्भावें ॥**
**यापरी निजपरमार्था । सद्भावें जे विनटे वनिता ।**
**तिसी उद्धवा हें उपदेशितां । दोष सर्वथा लागेना ॥...**

**स्त्रीपुरुष-अवलोकन । जयाचे दृष्टीं समसमान ।**
**ऐसे अनुभवीं जो परिपूर्ण । तोचि स्त्रियांसी जाण उपदेशी ॥**
**कां अपेक्षोनियां वित्त । चतुर्वर्णा उपदेशित ।**
**ते धनलोभें लोलुप येथ । नाहीं घेईजेत गुरुत्वें ॥ "**

—ए. भा. अ. २९, श्लो. ३१ टीका

असा अधिकार अंतःकरणांत कितपत आला आहे याचा विचार ज्याचा त्यानें करावा व नंतर उपदेश देणें व घेणें याचा व्यवहार करावा. स्त्रियांनीं तोंपर्यंत नामनिष्ठ राहून भगवंताची अनन्य भक्ति करावी व ग्रंथरूप संतांचें सेवन करावें.

* * *

## कोणती स्त्री वैकुंठास जाऊं शकते ?

याबद्दलही नाथांचे सुंदर उद्गार अथवा सूचना आहेत, त्या सर्व लक्षांत ठेवून अमलांत आणल्यास संसारही अत्यंत गोड होईल.

**" जे शुद्धसत्वेंकरूनि संपन्न । कदा नुलंघत पतीचें वचन ।**
**जे निर्विकल्प पतिव्रता पूर्ण । तिसी निवासस्थान वैकुंठ ॥**
**जे पतिपुत्रां आणि अतिथा । भोजनीं न देखे भिन्नता ।**
**जे धनलोभेंवीण पतिव्रता । ते जाण तत्त्वतां वैकुंठवासी ॥**
**जे पतीतें मानी नारायण । जे कोणाचे न देखे अवगुण ।**
**जे निर्मोह पतिव्रता पूर्ण । तिसी निवासस्थान वैकुंठ ॥ "**

— एकनाथी चतुःश्लोकी भागवत

वर सांगितलेले वर्तनाचे नियम म्हणजे कांहीं वेदान्त नव्हे. ही शुद्ध व्यावहारिक नीति आहे. पण किती गोड आहे ! याप्रमाणें जी स्त्री प्रपंचांत वागेल, तिला दुसरा गुरु नको, व्रतोपवास नकोत, कांहीं नको. भगवान तिचा ऋणी होऊन तिला वैकुंठांत घेऊन जाईल. भगवान ऋणी होतो वगैरे ही आपली उगीच प्रेमाची भाषा आहे. बाकी '**कर्मानुसार गति**' हा परमेश्वरानें सृष्टीचा गुण करून ठेवला आहे. तो एक सृष्टिनियमच आहे. जीव आपल्या गुणतारतम्यानुसार इहलोकीं जीं कर्में करितो, त्याचा परिणाम त्याच्या लिंगदेहावर होतो व कर्माप्रमाणें सृष्टिनियमानुसार त्याच्या लिंगदेहाचे परमाणु बनत अथवा बदलत जातात. हें परमाणु ज्या तत्त्वाचे बनतात,

त्या तत्त्वाच्या परमाणूंनीं विश्वांत जे लोक ( गोल ) बनलेले असतात, त्या लोकांप्रत ह्या सदृश्य तत्त्वाचा लिंगदेह आकर्षिला जातो. हें कार्य कोणी केल्यावांचून आपोआप ( ऑटोमॅटिक ) होत असतें. असे हे सृष्टीचे सुंदर नियम आहेत ते कोणाच्यानेंही उल्लंघन करवणार नाहींत. हा गूढ शोध आमच्या अतींद्रिय-( दिव्य- ) द्रष्ट्या ऋषींनीं लावून इष्टलोक-प्राप्तीसाठीं इष्ट परमाणूंचे थर उत्पन्न करणाऱ्या कर्मांचे प्रयोग ( प्रोसेस ) लिहून ठेवले, त्याला शास्त्र म्हणतात. अनिष्ट ग्रहाची बाधा निवारण करण्याकरितां विवक्षित मंत्राचा जप, विवक्षित वस्तूचें दान, विशिष्ट रंगाचें रत्न व वस्त्रधारण, तसेंच औषधीसेवन किंवा विशिष्ट द्रव्याचें विशिष्ट मंत्रांनीं हवन वगैरे ज्या क्रिया सांगितल्या आहेत, त्या अगदीं विज्ञानाला म्हणजे सायन्सला धरून आहेत. या बहिरंग यज्ञादिकर्मांपेक्षां यौगिक क्रियेनें हे परमाणु लिंगदेहाचेच नव्हेत, तर स्थूलदेहाचेही – लवकर बदलतात. ज्ञानेश्वरीच्या ६ व्या अध्यायांत १४ व १५ व्या श्लोकांच्या टीकेंत, योग्याच्या शरीरपरमाणूंत कसा सुंदर पालट होतो त्याचें विस्तृत वर्णन आहे. तें लक्षपूर्वक वाचून पाहिल्यास श्रीतुकाराममहाराज सदेह वैकुंठास कसे गेले, त्याचें वर्म लक्षांत येईल. अखंड नामानुचिंतनभक्तीनें त्यांची काया जडप्रकृतिपरमाणूंची राहिलीच नाहीं.

**" ब्रह्मरूप होते कायाच कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ "...**
**" गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ।**
**मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ "**
**" प्रेम-अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥**
**सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजीं तयां ॥ "**

असे त्यांचे स्वानुभवाचे उद्गार आहेत. वेदांती लोक चित्त चैतन्य करण्याचा उपदेश करितात, तर हे भक्ताग्रणी इंद्रियें व देहही ब्रह्मरूप करून दाखवितात.

तात्पर्य, भक्तीचा महिमा अगाध आहे. भक्तीच्या योगें अत्यंत दुराचारीही तरून जातो. स्त्रिया वैश्य, शूद्र, इत्यादि सर्व परमगतीला पोंचतात. " स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् " — अशी गीतामाउली ग्वाही देते. स्त्रिया, मग त्या कोणत्याही जातीच्या असोत, सधवा असोत विधवा असोत, वेश्या असोत भ्रष्टशीला असोत, भक्तीची शक्ति इतकी आहे कीं तिची अनन्य वृत्तीनें कास धरल्यास कोणाही पातक्यास ती पावन करूं शकते.

“ जैसें तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ।
मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ...
तैसे क्षत्री, वैश्य, स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥
मग जातीं व्यक्तीं पडे बिंदुलें । जेव्हां भावें होती मज मीनले ।
जैसे लवणकण घातले । सागरामाजीं ॥ ...
यालागीं पापयोनिही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।
मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ”

— ज्ञानेश्वरी, अ. ९, श्लो. ३२ वरील टीका



# नामयोगरहस्य

ॐ तत्सत् — श्रीसद्गुरु प्रसन्न

**इच्छावें तें जवळीं आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥**
**नामरूपीं पडली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ २ ॥**
**मुकीयाचे परी जीवीं । साखर जेवीं खादली ॥ ३ ॥**
**तुका म्हणे काय बोले । आतां भलें मौन्यचि ॥ ४ ॥**

**निर्भर मानसीं झालों आनंदाचा । गोडावलीं वाचा नामघोषें १**
**आतां भय माझें नासलें संसारीं । झालोंसें यावरी गगनाचा २**
**तुका म्हणे ह्या तों संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ३**

**चिं**तामणीचा प्रकाश वाढत चालला. कदाचित् वाचकांच्या नेत्रांना तो त्रासदायक होईल. म्हणून त्यावर आवरण घालणें ( आवरणें ) च योग्य. करितां आतां तसें करूं.

परमात्मप्राप्तीचा सर्वोत्तम व सुलभ उपाय मंत्रजपच होय. सृष्टिरचनेच्या कालापासून तों आतांपर्यंत परमपदाची प्राप्ति करून घेतलेल्या महापुरुषांत प्रायः सर्व याच (मंत्रजप) साधनद्वारा पूर्णतेला गेलेले दिसून नेतात. भक्तीचें सर्वोत्तम अंग नाममंत्रच आहे असें संतांचें सांगणें आहे. मंत्रामध्यें जें सामर्थ्य दिसून येतें, तें इतर साधनांत—उपायांत दिसून येत नाहीं. मंत्राचें बळ हें आहे कीं त्याच्यायोगें सच्चिदानंद प्रभूचें आकर्षण होतें व तो प्रभु भक्तांच्या अधीन होऊन राहतो.

पहिल्या भागाच्या पुस्तकांत, नामजप सकाम असो किंवा निष्काम असो, संख्या ठेवून केला म्हणजे कसा फायदेशीर होतो, याची विस्तृत माहिती अथवा प्रक्रिया **श्री**मद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामींच्या मुखांतील दिली आहे. **श्री**रामदासस्वामींचें तसेंच **श्री**अक्कलकोटस्वामींचेंही संख्यायुक्त जपाबद्दलचें मत सांगून **श्री**टेंभेस्वामींनीं सांगितल्याप्रमाणें बाराकोट जपानें जन्मकुंडलींतील बारा स्थानांची शुद्धि करून घेऊन प्रत्यय मिळविलेल्या एका नामयोग्याचे अनुभव सांगितले आहेत. इतर लोकांचेही अनुभव सांगून, नामस्मरणासंबंधानें जिज्ञासूंच्या मनांत उद्भवणाऱ्या शंकांचें यथामति व यथाशास्त्र निरसन केलें आहे.

**वेदाहूनही नाम वरिष्ठ आहे; वेदानुयायी लोकांना तें तारक आहे, इतकेंच नव्हे, तर वेदबाह्य लोकांनाही नाम तारक आहे.**

**************************************************

**नामास कर्मसाद्गुण्य नाहीं ; श्रद्धेवांचूनही नाम फलतें. कारण ती त्याची वस्तुशक्ति आहे.**

**नाम कसल्याही अशुचिकाळीं घेण्यास बिलकूल हरकत नाहीं.**

**ज्ञान्यालाही ज्ञानपरिपाकार्थ नामस्मरणाची आवश्यकता आहे, मग अज्ञान्याची काय कथा ?**

**गुरूपदेशाशिवायही नामस्मरण केल्यास तें व्यर्थ जात नाहीं ; त्यायोगें भगवत्प्रसाद व सद्गुरुलाभ होतो.**

**" नाम ब्रह्म नाम ब्रह्म । येणें पुरती सकळ काम ॥ "**

( भगवन्नामें हीं भगवंताचे ध्वनिरूप अवतार होत. अर्थात् नाम व नामी एक आहेत. )

**पुराणांतच नव्हे, तर वेदामध्येंहि हरिनामाची स्तुति गाइली आहे.**

**संत, गुरु व सद्गुरु यांत काय भेद आहे व त्यांच्याकडे कसें वागावें ?**

**गुरु तारक नसून गुरुभाव तारक आहे ; नामस्मरणानेंच हरिगुरु-कृपा होते.**

इत्यादि विषय संतवचनांच्या आधारानें यथामति वर्णिले आहेत ; पण असें किती सांगितलें तरी थोडेंच. कारण भगवंताचा महिमा व गुण जसे अनंत, तसा त्याच्या नामाचा महिमा व गुणही अनंतच आहेत. वेद व शेषरुद्रादिकही ते वर्णूं शकणार नाहींत. फार काय, प्रत्यक्ष भगवानही आपल्या नामाचा महिमा जाणूं शकत नाहीं.

**' तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा '**

— तुकाराम

तेथें आमच्यासारख्या पामराचा काय पाड ? तथापि **' तुझिया सत्तेनें तुझे गुण गाऊं '** या संतवचनाप्रमाणें, त्या प्रभूच्या सत्तेचा आश्रय करून ही नामसेवा आम्हीं चालविली आहे. कल्पनेपेक्षां ग्रंथ पुष्कळ वाढला. आतां —

**नामानें नामीचें अनुसंधान कसें करावें ?** हें त्याच्याच प्रेरणेप्रमाणें सांगून वाचकांची रजा घेऊं.

गुरुदेव प्रसन्न झाले, त्यांनीं विद्याही कृपेनें दिली, पण त्या विद्येची उपासना संप्रदायपद्धतीनें केली तरच ती फळते ; नसल्यास भलतेंच कांहींतरी होतें, असें श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात.

" श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे ।
परी ते ( विद्या ) फळे । संप्रदायें उपासिलीया ॥ ...
येऱ्हवीं अमृतमंथना । सारिखें होईल अर्जुना ।
जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ "

—ज्ञानेश्वरी, अ. १८

याप्रमाणें संप्रदायाचें महत्त्व आहे. हा संप्रदाय परमार्थविद्येपुरताच आहे असें कोणी समजूं नये. व्यावहारिक विद्येंतही तो असतोच. कॉलेजमधील एम्. एस्सी., एम्. बी. बी. एस्. वगैरे वगैरे जे ' कोर्स ' आहेत, ते अभ्यासितांना त्यांनीं ठरविलेल्या विशिष्ट पद्धतीनेंच अभ्यासिले पाहिजेत. ही विशिष्ट पद्धत अथवा ' कोर्स ' म्हणजेच संप्रदाय. हे संप्रदाय जाणणारे व विद्यार्थ्यांस निर्दोष व निर्व्यंग रीतीनें समजावून देणारे प्रोफेसर म्हणजेच गुरु. पण प्रोफेसराच्या तोंडून व्याख्यानें प्रत्यक्ष ऐकल्याशिवाय व औषधें तयार करण्याचे अथवा रासायनिक द्रव्याच्या मिश्रणाचे प्रयोग प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय नुसतीं पुस्तकें वाचून त्या विद्येंत कोणीही पारंगत होऊं शकत नाहीं. त्याप्रमाणेंच ह्या परमार्थमार्गींतील म्हणजे अभौतिक अशा अध्यात्मविद्येंतील, ब्रह्मविद्येंतील गुरुसंप्रदायाचें आहे. दुसरें कांहीं नाहीं. ' संप्रदाय ' शब्दानें उगीच घाबरून जाण्याचें कारण नाहीं. आपल्या नामस्मरणरूप साधनाचा, नामयोगाचाही तसाच एक संप्रदाय आहे. तो संत-सद्गुरुचरणाला वंदन करून येथें प्रगट करितों. तो भगवत्कृपेंतील मुमुक्षूंना आनंददायक होईल अशी आशा आहे.

* * * *

## नामस्मरण व नामोच्चारण

' नाम ' हें रूपाचें निदर्शक आहे. करितां नाम उच्चारल्याबरोबर डोळ्यांपुढें ( अंतश्चक्षूंपुढें ) नामाचें ' रूप ' उभें राहिलें पाहिजे. ' आंबा ' म्हटल्याबरोबर डोळ्यांपुढें आंबा राहतो, बेडूक राहत नाहीं; व ' बेडूक ' म्हटल्याबरोबर बेडूक दिसतो, भोपळा दिसत नाहीं; व ' भोपळा ' म्हटल्याबरोबर ' मोटार ' कांहीं भासत नाहीं. तात्पर्य, ज्याचें नाम घ्यावें त्याचें रूप दिसावें ( लक्षांत यावें ) तरच तें ' नामस्मरण ', नसल्यास ' नामोच्चारण ' होईल.

" नाम घेताहे वैखरी । चित्त धांवे विषयावरी ॥
कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजीं विस्मरण ॥
नामरूपां नाहीं मेळ । अवघा वाचेचा गोंधळ ॥ "

***************************************************
असें होऊन काय उपयोग आहे ? तर

**" नवल स्मरणाची ठेव । स्मरणामाजीं प्रगटे देव ॥**
**एका जनार्दनीं नाम । नामीं प्रगटे आत्माराम ॥**

असें झालें पाहिजे.

**वाचेनें नाम व मनानें स्मरण** चाललें पाहिजे. **स्मरण म्हणजे वाच्य वस्तूचें ध्यान.** असें झालें तरच फलसिद्धि त्वरित घडेल. हेंच नामस्मरणाचें तत्त्व आहे. आतां नामाबरोबर नामीचें ध्यान घडलें नाहीं तर तें अगदींच व्यर्थ जातें असें समजूं नये.

**" नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥ "**

असें श्रीतुकाराममहाराज म्हणतात. पण ही कनिष्ठ पायरी आहे, हें ध्यानांत ठेवावें. कारण तेच दुसऱ्या एका अभंगांत सांगतात—

**" नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥**
**ऐसें धरूनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥ "** इत्यादि.

याचें कारण असें कीं, ' अधिकारिभेदाच्छास्त्रभेदः ' या वचनाप्रमाणें अधिकारभेदानुसार उपदेशभेद असतो.

**' अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तैसें देऊं ॥ '**

—तुकाराम

तेव्हां **नामीच्या ध्यानासहित नामाचें स्मरण** चाललें म्हणजे त्वरित व अधिक फलदायक होतें हें निश्चयानें जाणावें व तसें करण्याचा प्रयत्न करावा.

**श्रीगुलाबरावमहाराज** म्हणतात—

**" वाचे गावें नाम, मनीं ध्यावें ध्यान । बुद्धि-समाधान ठेवूनियां ॥**
**जीव देव दोन्ही करूनियां एक । स्वयें सच्चित्सुख होआवें कीं ॥**
**आळंदीवल्लभीं अलोट सुप्रेम । एवढेंचि वर्म साधनाचें ॥ "**

याचेंच नांव नामसंप्रदाय. पण असें ध्यानयुक्त नामस्मरण एकदम घडणें कठिण आहे. अनेक वासनाजालानें गुरफटलेलें मन नानाविध वृत्तींच्या – कल्पनेच्या – द्वारें भटकूं लागतें. पण आपण कंटाळूं नये. पैजेनें त्या मनाशीं झगडा करावा. हरिनामापुढें त्याचें बळ कितीसें चालणार ? पण **नेटाचा प्रयत्न पाहिजे**. जागृतींत नामस्मरण इतकें झालें पाहिजे कीं स्वप्नांत देखील त्याचा ठसा उमटला पाहिजे. स्वप्नांत

नामस्मरण चालूं लागलें म्हणजे मग ‘ नको जपमाळा कांहीं ’ (—ए.) ह्या वचनाप्रमाणें जपमाळेची व संख्येची गरज नाहीं. ‘ सर्वकाळ ’ – ‘ अखंड ’ नामप्रवाह सुरू होण्यासाठीं जपमाळा व संख्या यांचा फार उपयोग होतो. अखंडता लागल्यानंतर मग त्यांची गरज नाहीं. मुख्य तात्पर्य अखंडतेचें आहे.

**“ नलगे जपमाळ । राम वदे ‘ सर्वकाळ ’ ॥**
**एका जनार्दनीं राम । ‘ अखंड ’ जपे हृदयधाम ॥ ”**

**श्रीनिवृत्तिनाथ** म्हणतात —

**“ अखंड जप तूं नाममंत्र वाचे । त्याहूनि दैवाचें कोण जगीं ॥...**
**निवृत्ति म्हणे नाम जपावें नित्यता । आपणचि तत्त्वता होईल हरि ॥”**

असो.

* * *

## नामोच्चारणाचे प्रकार

नामस्मरण म्हणजे नामानें नामीचें अनुसंधान करणें ; तें कसें करावें, हाच विचार या प्रकरणांत मुख्य आहे ; तथापि त्यापूर्वी नामोच्चारणाचे प्रकारही कळणें अवश्य असल्यामुळें प्रथम ते देतों. नामोच्चारणेच्या धारेला **जप** अशी संज्ञा आहे. शास्त्रांत या जपाचे प्रकार **वाचिक, उपांशु** व **मानस** असे तीन सांगितलें आहेत, त्यांची फळेंही निरनिराळीं आहेत.

१. **वाचिक जप** — साधारण आपण व्यवहारांत बोलतों, तितक्या मोठ्यानें म्हणजे लोकांस ऐकूं जाईल अशा स्वरानें जो जप केला जातो, त्यास ‘ वाचिक ’ म्हणतात. याचें फळ – इहलोकींची सुखप्राप्ति.

२. **उपांशुजप** म्हटला म्हणजे आपला शब्द आपल्याच कानांत पडेल इतका हळू उच्चारावयाचा. याचें फळ – स्वर्गप्राप्ति.

३. **मानसजप** म्हणजे ओठ किंवा जीभही न हालवितां फक्त मनानेंच शब्दोच्चार करणें. ह्या जपाचें फळ – मोक्षप्राप्ति.

तसेंच वाचिक जपापेक्षां उपांशु शतपटीनें व मानस सहस्रपटीनें फलदायक, असें शास्त्रांत सांगितलें आहे.

या जपांत कोणी **वाचिक, उपांशु, मानस, ध्यान** व **अनन्य** असे पांच प्रकार सांगतात. उपांशु व मानस यांच्या मध्यभागीं **ध्यान** नांवाचा एक प्रकारही दक्षिणेंतील

(मद्रास प्रांतांतील), ग्रंथांत सांपडतो. उपांशु जपांत ओठ व जीभ हालून उघड्या ओठांमधून शब्दोच्चाराचा वायु फुसफुसण्याप्रमाणें (Whispering) बाहेर निघतो. पण असा वायु बाहेर न निघतांना, ओठ उघडे ठेवून अगर झांकून फक्त जीभ हालवून जो शब्दोच्चार केला जातो, त्यास म्हणजे नादरहित ध्वनीस 'ध्वान' असें म्हणतात. उपांशु जप कर्णगोचर असतो, पण ध्वान जप फक्त मनोगोचर असतो. याच्या योगें एकाग्रता अधिक होते. हा जप फार वेळ करितां येणार नाहीं. तथापि निदान तीन माळा होईपर्यंत तरी एकान्तांत बसून करावा. हा साधला म्हणजे 'मानस' जप करण्याची योग्यता येते. मानस जपांत जपाचीं अक्षरें जीभ हालविल्याशिवाय फक्त मनानेंच उच्चारावयाचीं असतात. मानस जपाचा अभ्यास बराच काळ झाला म्हणजे 'ध्यान जप' व तो पचनीं पडला म्हणजे 'अनन्य जप' करितां येतो. याविषयींचें एका महान् प्रसिद्ध गूढशास्त्रकोविदाचें सोपपत्तिक विवेचन खालीं दिलेलें आहे. तें लक्षपूर्वक वाचून पाहावें.

नामजपाच्या मार्गे लागलेले लोक केवळ जिभेच्या गतीपेक्षां पुढें जात नाहींत.

(१) **वाचिक** जपानें म्हणजे वाणीनें स्पष्ट उच्चार करण्यानें गतिविशिष्ट व ज्ञानविशिष्ट ज्ञानतंतुकंप सुरू होऊन, हृदयाकाशांत असलेल्या वायूंत कंपाकार निर्माण होतात.

(२) **उपांशु** जपानें म्हणजे फक्त ओठ व जीभ हालून होणाऱ्या उच्चारांनीं त्या ज्ञानतंतुकंपाला नियमिताकार निर्माण होतो. त्यापुढें नेत्रेंद्रियांतील 'लेनोलीज़' मध्यें ते कंप जाऊन तेथें प्रकाशाकाराचें देवताबीज निर्माण होऊन मानसिक जप व्हावा लागतो.

(३) **मानसिक** जपानें म्हणजे ओठ, जीभ वगैरे न हालवितां केवळ मनोमय स्पष्ट उच्चारानें व तो उच्चार आपल्या अंतःश्रवणावर येईल अशा रीतीचा जप केल्यानें त्या मंत्रोच्चारदेवतेचा देहाकार कंपाकारस्वरूपांतून ईथरच्या लहरीच्या स्वरूपांतून स्थूल तेजाकार होऊन, त्या जड तेजांतून केवळ चैतन्यस्वरूपी मानस तेजाकार स्वरूपाचा—स्वर्गीय तेजाकार स्वरूपाचा बनतो. 'देवता हिरण्मयाः' याप्रमाणेंच देवतास्वरूप नुसतें बनल्यानें पूर्ण कार्य घडत नाहीं. 'स्थूल' व 'सूक्ष्म' देहापर्यंतच या क्रिया पोंचतात. यापुढें त्या देवतेंत सामर्थ्यक्रियाकारी चैतन्यशक्ति भरावी म्हणून 'ध्यान' जपाची आवश्यकता लागते.

*************************************************

( ४ ) **मंत्रध्यानजप**—मनोमय प्रकाशाची ज्या मंत्राचा आपण जप करितों त्या मंत्रार्थानें सूचित जो देवतेचा स्वरूपाकार, त्या स्वरूपाकाराच्या तेजांत ध्यानानें त्याच्या जितक्या अद्वितीय सामर्थ्याची भावना आपण ठेवूं तितकेंच सामर्थ्य त्यांत जागृत होतें. या वेळीं हा आपला जप आपल्या 'कारण' देहापर्यंत पोंचतो. याप्रमाणें त्या तेजाच्या देवतेच्या देहांत चैतन्य भरून ती जागृत होऊन सामर्थ्यवान झाली तर ती आपल्या सामर्थ्यानें आपल्या इच्छेप्रमाणें कार्य करील यांत शंका नाहीं. परंतु आपल्या इच्छेशीं, आपल्या मनाशीं, आपल्या सर्व देहाशीं तिचा संबंध कायमचा जडावा यासाठीं 'अनन्य' जपाची आवश्यकता लागते.

( ५ ) **अनन्यजप** म्हणजे ही तेजःस्वरूपी देवता निराळी व मी जप करणारा निराळा ही भावना नाहींशी होऊन ज्या देवतेचा जप मी तोंडानें करीत आहें व जी देवता मी मनानें तेजोरूप पाहात आहें, ती देवता व मी हे निराळे नसून एकच आहों, हें पटण्यासाठीं व अनुभवास येण्यासाठीं कांहीं काल तें ध्यान आपल्या हृदयांत आपण करीत असतां त्या देवतेच्या हृदयांतही आपलें स्वरूप प्रथम तेजाकार पाहात पुढें आपलें स्वरूप त्या देवतेच्या स्वरूपाचें व सामर्थ्याचेंच भावीत शेवटीं आपण व देवता भिन्न नसून मी व देवता एकच स्वरूपाच्या आहों असें एकरूप ध्यान करूं लागणें याला 'अनन्यजप'[1] म्हणतात. या जपानें आपल्या 'महाकारण' देहापर्यंत सर्व देहांत मंत्रदेवतासामर्थ्याची जागृति होते. ही या क्रमानें होणारी जागृति पद्धतशीर मंत्रजपाचें कार्य पूर्ण करिते. ती 'प्रेयस्-'[2]प्राप्ति करून तर देतेच, पण जर ती पूर्ण सामर्थ्ययुक्त उच्च, सर्वोच्च सामर्थ्यजागृतिकर भावनेची असेल, तिच्यांत जर परिपूर्ण सामर्थ्य जागृत केलें असेल, तर ती 'श्रेयस्' म्हणजे मोक्षही देते. नाहीं तर जेवढ्या सामर्थ्यजागृतीची भावना केली असेल, तेवढें सामर्थ्य देऊन ती शेवटीं आपल्या लोकापर्यंतच घेऊन जाते. म्हणून जप करणारांनीं प्रेयाची ( प्रापंचिक अभ्युदयाची ) इच्छाही न करितां प्रेय देऊन श्रेयाची म्हणजे मोक्षाची सहज प्राप्ति होईल अशा श्रेष्ठ नामरूपाकार देवतेचाच जप करावा. या जपाशिवाय, साकार पूर्णतेशिवाय निराकार अचिंत्य पदप्राप्तीची योग्यताच येत नाहीं.

'वाचिक' जप झाल्याशिवाय 'उपांशु' होत नाहीं. वाचिकापेक्षां उपांशु १०० पट श्रेष्ठ आहे. उपांशु झाल्याशिवाय 'मानसिक' जपाची योग्यता येत नाहीं. मानसिक जप १००० पट श्रेष्ठ आहे. मानसिक झाल्याशिवाय 'ध्यान' जपाची योग्यता येत नाहीं. तो १०,००० पट श्रेष्ठ आहे. ध्यानजप झाल्याशिवाय 'अनन्य' जपाची

१ याला 'अहंग्रहोपासना' असेंही नांव आहे. २ संसारांतील अभ्युदय, उन्नति.

योग्यता येत नाहीं. तो ध्यानजपापेक्षां १००,००० पट श्रेष्ठ आहे. अर्थात् एकलक्षपट अधिक सामर्थ्यसंचय करणारा आहे.

याप्रमाणें जप करणाराला स्वप्नांतच काय, पण प्रत्यक्ष बाह्य सृष्टींतही देवतेच्या दर्शनसाक्षात्काराचा अनुभव मिळतो. असा हा नामजप श्रेष्ठ असून,

**' याच देहीं याच डोळां । भोगीन मुक्तीचा सोहळा ॥ '**

याप्रमाणें मनुष्याला येथेंच ईश्वर करणारा, ईश्वरीसामर्थ्यपूर्ण करणारा आहे.

— **आनंदघनराम, तांसगांव**

*    *    *

## नामानें नामीचें अनुसंधान कसें करावें ?

वरच्या लेखांत जपाचे म्हणजे मंत्रोच्चाराचे पांच-सहा प्रकार सांगितले. या प्रकारांत वाचिक, उपांशु, ध्यान व मानस हे फक्त उच्चारच होतात. **उच्चार हें वाचेचें कार्य व स्मरण हें मनाचें कार्य** होय. वाचेपेक्षां मनस्तत्त्व श्रेष्ठ आहे. म्हणून मानसजप हा मागच्या तीन जपांपेक्षां सहस्रपटीनें श्रेष्ठ आहे. तथापि मंत्राच्या उच्चारापेक्षां मंत्राच्या अर्थाचें ध्यान अधिक श्रेष्ठ आहे आणि हेंच मंत्रयोगामध्यें अभिप्रेत आहे. ' तज्जपस्तदर्थभावनम् ' ह्या पातञ्जलयोगसूत्रामध्यें हेंच सांगितलें आहे. चोवीस अक्षरी गायत्री मंत्राचा, अर्थ न जाणणारा लहान बटु थोड्याशा अभ्यासानें वाचिक व उपांशूनंतर मानसजपही करूं शकेल. ओठ व जीभ न हालवितां तो मनानेंच जप करूं लागेल. हें अगदींच व्यर्थ जाईल असें नाहीं ; पण नुसत्या शब्दांच्या उच्चारापेक्षां त्यांच्या अर्थाची भावनाच श्रेष्ठ आहे. अर्थभावना तयार करण्याकरितांच शब्दाची योजना असते. ही अर्थभावना मनांत अथवा बुद्धींत भरून घेऊनच मंत्राचा जप करणें अत्यंत श्रेष्ठ आहे.

' गाय ' हा शब्द म्हणजे ' नाम ' व त्यानें बोधित होणारी वस्तु जी गाय ती ' नामी ' होय. सूर्य शब्द हें नाम व सूर्याचें तेजोमंडळ हें नामी होय. **नामानें नामी डोळ्यापुढें उभा राहणें याचें नांव नामस्मरण होय.** यालाच नामानें नामीचें अनुसंधान म्हणतात. उत्तम, मध्यम, मंद व अतिमंद अधिकाऱ्यांकरितां —

**नामीच्या अनुसंधानाचे चार प्रकार**

खालीं सांगितले आहेत, त्याचा मुमुक्षूंनीं व साधकांनीं मनाशीं चांगला विचार करून आपल्यास सुलभ वाटेल ती धारणा धरावी व नामजप करूं लागावें.

१. **निर्गुणध्यान,**

२. **सगुणध्यान,** ( यांत मूर्तिचिंतन, लीलाचिंतन, गुणचिंतन, वाक्यचिंतन व विक्षेपनिरसन असे भेद आहेत ),

३. **नामनामी-अभेदचिंतन,** व

४. **नामध्वनीचें अनुसंधान.**

असे ते चार प्रकार होत. त्यांचें विवरण खालीं लिहिल्याप्रमाणें —

१. **निर्गुणध्यान** ' म्हणजे अंतःकरणाधिष्ठानचैतन्य व ब्रह्मांडाधिष्ठानचैतन्य यांचें ऐक्यचिंतन. **' यो बुद्धेः परतस्तु सः '** किंवा **' धियो यो नः प्रचोदयात् '** यांतील तात्पर्य हेंच. ' स्वस्वरूपानुसंधान ' किंवा ' ' प्रत्यगात्मानुसंधान ' यालाच म्हणतात. हें ऐक्यचिंतन म्हणजे घटाकाशमठाकाश-ऐक्याप्रमाणें समजावें. गंगासागरवत् किंवा कीटभृंगऐक्यवत् ऐक्य नव्हे. ( हें ऐक्य उपासकांचें व वरील ऐक्य ज्ञानियांचें होय. दोघांचें पर्यवसान एकच, तथापि हा सूक्ष्मभेद सूक्ष्मदृष्टि लोकांनीं लक्षांत ठेवावा. ) अनंत ब्रह्मांडाला व्यापून असणारें जें चैतन्य तें व त्याचाच जो भाग आपल्या शरीरांतही आहे तो, दोन्ही एकरूप आहेत. हें चिंतन – हें अनुसंधान – यालाच ' सोऽहं ' चें, ' अहं ब्रह्मास्मि- ' वृत्तीचें चिंतन म्हणतात, तें चालवावें. अगदीं प्राकृत भाषेंत ( सोपें करून ) सांगावयाचें म्हणजे – देह मी नव्हे, इंद्रियें मी नव्हे ; प्राण, मन, बुद्धि, चित्त, अहंकार, इत्यादि मी नव्हे. या सर्वांचा साक्षी म्हणजे या सर्वांस प्रकाशित करणारें जें चैतन्य तें मी. याप्रमाणें नामोच्चारणाबरोबर चैतन्याचें अनुसंधान करणें, याला **निर्गुणध्यान** म्हणतात. हाच तात्काळ झेंप घालून फळ मिळवून देणारा **' विहंगम '** मार्ग होय. ( निर्गुण उपासना व अद्वैतज्ञान यांत किंचित् भेद शास्त्रांत सांगितला आहे ; त्याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. तरी वरील प्रकारच्या ध्यानानें तें अविद्यानिवर्तक ज्ञान प्राप्त होईल यांत संशय धरूं नये. ) अशा या ध्यानानें जप चालविला असतां संख्या व माळा लुली पडूं लागेल. तरी हरकत नाहीं. तात्पर्य, नाम उच्चारल्याबरोबर एकदम वृत्ति आत्माकार – – ब्रह्माकार झाली पाहिजे. एवढी धारणा धरवत नसेल त्यानें —

**२. सगुणध्यान** करावें. यांत पुनः **मूर्तिचिंतन**, **लीलाचिंतन**, **गुणचिंतन**, **वाक्यचिंतन** व **विजातीय** विक्षेपनिरसन असे भेद आहेत. मूर्तीचें म्हणजे आपल्या त्या उपास्य देवतेच्या फोटोचें किंवा त्या देवतेच्या काष्ठमय अथवा शिलामय प्रतिमेचें असें ध्यान हवें तर प्रथम प्रथम करावें ; पण त्यापेक्षां सजीव प्रत्यक्ष मूर्तीचें ध्यान करणें उत्तम. एकदम सर्व मूर्ति ध्यानांत न येईल तर एकेका अवयवावर ( पायाला आरंभ करून मस्तकापर्यंत निरनिराळ्या अवयवांवर ) नामाचा संस्कार करीत स्मरण चालवावें. करतां करतां मूर्तीच्या चेहऱ्यावर, पापण्या हालणाऱ्या डोळ्यांवर, नंतर हास्यमुखावर व शेवटीं मुखांतील मंद हास्यावर व अखेरीस हास्यांतील आनंदावर वृत्तिधारणा स्थिर करीत तन्मय ( आनंदमय ) होऊन जावें.

**“ अंगप्रत्यंगीं ध्यानयुक्त । जडोनि ठेलें जें चित्त ।**
**तें आवरूनि समस्त । चिंतावें निश्चित हास्यवदन ॥ ...**
**ध्याना आलें जें हास्यवदन । त्यांतूनही सांडोनि वदन ।**
**केवळ हास्याचें करावें ध्यान । हास्यामाजीं मन घालोनि ॥**
**त्याही हास्याचें सांडूनि ध्यान । हास्यामाजीं जो आनंदघन ।**
**तेथ प्रवेशावावें मन । अति सावधान निजनिष्ठा ॥**
**ते आनंदीं आनंदयुक्त । जाहलिया आपुलें चित्त ।**
**आनंदाची उपलब्धि तेथ । होय सुनिश्चित साधकां ।**

—एकनाथी भागवत, अ. १४, श्लो. ४३ वरील टीका

मनोमय मूर्तीचें असें साधत नसेल त्यानें मागें पृ. ३५८–६० मध्यें सांगितल्याप्रमाणें ध्यान करावें. ( गुरुपुत्रांनीं आपल्या प्रत्यक्ष पाहिलेल्या गुरुमूर्तीच्या ठिकाणीं उपास्य देवतेची भावना करून ध्यान करावें. गुरूक्त मूर्तिध्यान निराळें असेल तर बरेंच आहे. त्याचप्रमाणें स्त्रियांनीं आपल्या पतीच्या ठिकाणीं उपास्य देवतेची भावना करून ध्यानाभ्यास करावा. कल्पनेची मानसमूर्ति तयार करण्यापेक्षां प्रत्यक्ष डोळ्यांपुढें नेहमीं वागणाऱ्या गुरु, पति, इत्यादिकांच्या मूर्तीचें भगवद्भावनायुक्त ध्यान करणें सुलभ व प्रेमानंदवर्धक असतें. ) असो.

* * *

## नाममंत्र व उपास्य-देवता

येथें आणखी एका गोष्टीचा खुलासा करणें अवश्य आहे. तो हा कीं, आपल्या मनाला आवड असते एका अवतारमूर्तीची व गुरूकडून मंत्र मिळतो दुसराच. असें

**************************************************

झालें म्हणजे मनाचा फारच घोटाळा होतो. याकरितां ज्या देवाच्या स्वरूपामध्यें व गुणलीलांमध्यें आपणास सहज प्रेमरस उत्पन्न होतो, त्याच देवाचा मंत्र गुरूकडून घेतला पाहिजे. अथवा तसा मंत्र अथवा उपासना देणारा गुरु निवडला पाहिजे. यावर श्रीगुलाबरावमहाराज म्हणतात—

**" माझी सकळां विनंति । चित्तास फसवूं नये निश्चितीं ।**
**हरिविजय ऐकतां आवडे कृष्णमूर्ति ।**
**तरी गुरूपदिष्ट म्हणूनि मल्हारी पुजूं नये ॥**
**यद्यपि गुर्वाज्ञा प्रमाण । तरी हा विधि तयाचि कारण ।**
**जया गुरु श्रेष्ठ वाटे ईश्वराहून । तया गुर्वाज्ञा तेचि देवता ॥**
**परी जयानें देवासाठीं गुरु केला । तंव देव नावडता सांपडला ।**
**त्यानें जेथें रस उत्पन्न झाला । तेथेंचि जावें ॥**
**गुरु सोडितां पाप पूर्ण । परी रस अपलापणें त्याहूनि कठिण ।**
**मग दुर्धर रस होतां उत्पन्न । नरकही अंगिकारून रसाकडे जाय ॥...**
**विठ्ठल भजतां तुकाराम । स्वप्नीं गुरु मिळाले बाबाजी उत्तम ।**
**जयासी गुरु न वाटे पुरुषोत्तम । तेणें ईश्वरभजनाआधीं गुरु न कीजे ॥**
**जया सकळ देवावरुता । गुरु श्रेष्ठ वाटे तत्त्वतां ।**
**तो आजचि मुक्तीचिया माथां । अधिकारी झाला ॥**
**परी ऐशी गुरुभक्ताची प्रशंसा ऐकोनि ।**
**बळेंचि गुरु श्रेष्ठ मानी उपास्यरस दाबोनी ।**
**तो समर्थोक्त पढतमूर्खस्थानीं । जाऊनि बैसे ॥ "** इत्यादि

—संप्रदायसुरतरु, अ. २०

या सूचनेचा विचार साधकांनीं करणें योग्य आहे. असो.

कांहीं संप्रदायिक गुरु एकच मंत्र सर्व शिष्यांना देतात. कांहीं गुरु शिष्याची आवड ओळखून अथवा विचारून त्या त्या देवतेचा मंत्र त्यास देतात; कोणी शिष्याची जन्मकुंडली पाहून, त्यावरून कोणत्या देवतेचा संबंध या जीवाशीं आहे, कोणती देवता यास ऋणी आहे हें ओळखून, ती उपासना अथवा तो मंत्र त्यास देतात. कारण जी उपासना पूर्वजन्मीं त्या जीवाला घडली असेल, त्याचाच संस्कार या जन्मीं उमटलेला असतो व तोच संस्कार पुढें चालविला म्हणजे ती देवता पूर्वउपासनेनें ऋणी असल्यामुळें, तो मंत्र लवकर सिद्ध होतो. गुरु सांगतील तें प्रमाण अशी दृढतम श्रद्धा ज्याची असेल त्याच्या वृत्तीची चलबिचल होणारच नाहीं. पण

पूर्वजन्मसंस्कारामुळें ज्या मूर्तीची आवड अधिक आहे, त्या मूर्तीचा मंत्र मिळाला नाहीं, तर जो नाममंत्र मिळाला, तो आपल्या इष्ट देवतेचाच असें समजून त्या नामानें त्या इष्ट देवतेचेंच ध्यान करावें. उदाहरणार्थ – श्रीकृष्ण व राम हे दोन्ही विष्णूचेच अवतार, पण रामापेक्षां कृष्णप्रीति अधिक आहे आणि गुरूकडून 'राम' नाम मिळालें, म्हणजे गोंधळ उडतो. मागील आवडी सुटत नाहीं व पुढील जडत नाहीं. राम तोच कृष्ण ठाऊक असलें तरी, त्या आपल्या मागील आवडत्या रूपाची व या भिन्न नामाची सांगड पडणें कठिण जातें. या वेळीं असा विचार केला पाहिजे कीं एका परमात्म्याचेच हे सर्व अवतार आहेत. तो एकाच नामानें बांधलेला नाहीं. त्याला सहस्र नामें आहेत, त्यांपैकींच हें एक आहे, असें जाणून, म्हणजे राम हें नाम कृष्णाचेंच समजून रामनामानें कृष्णाचें ध्यान करण्यास हरकत नाहीं. प्रथम थोडे दिवस हें जड जाण्याचा संभव आहे, पण तसा अभ्यासच चालविला म्हणजे भेदवृत्ति मावळून त्या नामाची व त्या रूपाची सांगड पडते. श्रीतुकाराममहाराजांना स्वप्नांत गुरूकडून 'रामकृष्णहरि' हा मंत्र मिळाला. (स्वप्नांत गुरूकडून मंत्रोपदेश होतो याबद्दल उपनिषदांत व योगवाशिष्ठांतही प्रमाणें सांपडतात. स्वप्नामध्यें जीव 'तैजस' स्वरूप असतो व महात्मे आणि देवता यांचीं शरीरें तैजसरूप असतात, करितां जीवाला बहुधा स्वप्नरूप विशिष्ठ अवस्थेमध्येंच देवतांचीं दर्शनें होतात.) 'रामकृष्णहरि' मंत्रानें श्रीतुकाराममहाराज श्रीविठ्ठलाची उपासना करीत होते, हें प्रसिद्धच आहे. या मंत्राचा जप त्यांनीं रात्रंदिवस अगदीं तीव्रसंवेगानें चालविला. रात्रीं झोंप येईल व नामघोष बंद पडेल म्हणून त्यांनीं आपली शेंडी दोरीनें खुंटीस बांधावी व झोंपेनें हिसका बसला म्हणजे जागृत होऊन पुनः नामस्मरणास लागावें, असा खडतर नामयोगाचा अभ्यास त्यांनीं चालविला.

**" चिंतनासी नलगे वेळ । सर्वकाळ करावें ॥ "**

**" काळ वेळ नसे नामसंकीर्तनीं । उंचनीच योनि हेंही नसे ॥**
**धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ । मग तो कृपाळ सांभाळील ॥ "**

याप्रमाणें करीत असतां पंधरा दिवसांत त्यांना निर्गुण साक्षात्कारही झाला.

**" पंधरा दिवसांमाजीं साक्षात्कार झाला ।**
**विठोबा भेटला निराकार ॥ "**

असें ते स्वतः सांगतात. (निराकार विठोबाचें दर्शन म्हणजे सच्चिदानंदस्वरूपाचा अनुभव) तुकोबारायांच्या या गोष्टीवरून साधकांनीं हें एक तत्त्वही लक्षांत घ्यावें कीं

तीव्रसंवेगानेंच त्वरित सिद्धि प्राप्त होते; असो. नाम कोणतेंही असलें तरी त्यानें निष्ठावंताला हव्या त्या मूर्तीचें ध्यान करण्यास अडथळा होत नाहीं. आम्हांस आढळल्यावरून आम्ही सांगतों कीं याच म्हणजे 'रामकृष्णहरि' मंत्रानें कोणीं श्रीकृष्ण, श्रीराम, श्रीदत्त, वगैरे मूर्तींचीही उपासना करितात. कोणी निर्गुण उपासनेचे अधिकारी ह्याच मंत्रानें, जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ति ह्या अवस्थात्रयाच्या साक्षीचें म्हणजे बुद्धिसाक्षि-चैतन्याचें अनुचिंतन चालवितात – चैतन्याकडे वृत्ति फिरवून तदाकारतेचा अभ्यास करितात. 'रामकृष्णहरि' या मंत्रानें कोणी प्रणवाची- (ॐकाराची)ही उपासना करितात. राम, कृष्ण, हरि हे तीन शब्द **अ**कार, **उ**कार व **म**कार या अर्थी घेतात. 'रामकृष्णहरि' या मंत्रानें कोणी **भूर्-भूवर्-स्वर्** ह्या त्रिलोकीचें अधिष्ठानचिंतनपूर्वक ध्यान करून चित्ताची व्यापकता वाढवितात.

> **("वृत्ति ऐसी वाढवावी। पसरूनि नाहींच करावी।**
> **पूर्णब्रह्मास पुरवावी। चहूंकडे॥**
> **वस्तु वृत्तीस कवळे। तेणें वृत्ति फाटोन वितळे।**
> **निर्गुण आत्माच निवळे। जैसा तैसा॥"**
>
> —दासबोध ९।९)

कोणी 'राम-कृष्ण-हरि' या मंत्रानेंच '**अहं-ब्रह्म-अस्मि**,' '**तत्-त्वम्-असि**,' '**अयं-आत्मा-ब्रह्म**' इत्यादि महावाक्यांच्या अर्थाचें अनुसंधान धरितात. कोणी देश-ईश-भक्त म्हणतात कीं, 'राम-कृष्ण-हरि' मंत्रानें हिंदुस्थानचे तीन इलाखे **मुं**बई, **म**द्रास, **बं**गाल यांत व्यापून असणाऱ्या ब्रह्मांशाचें ध्यान करून भारती-यांना **श्र**द्धा, **मे**धा, **य**श, **प्र**ज्ञा, **वि**द्या, **बु**द्धि, **श्री**, **ब**ल, **आ**युष्य, **ते**ज व **आ**रोग्य देण्याकरितां प्रार्थना चालवावी. तात्पर्य, साधकांच्या बुद्धीचें हें कौशल्य आहे. त्यांनीं आपल्या बुद्धीच्या मगदुराप्रमाणें — चित्ताच्या व बुद्धीच्या आकलनशक्तीप्रमाणें — ध्यान धरून नाममंत्राचा अखंड जप करावा. म्हणजे सिद्धि ही ठेवलेलीच. त्यांत संशय धरूं नये. ('सीताराम' ह्या नामानें 'विठ्ठल-रखुमाई' ची उपासना करणारे सत्साधकही आमच्या आढळण्यांत आहेत. त्यांचें चित्ताचें समाधान अचल व गुणकारी असलेलेंहि दिसून येतें.*) मुख्यतः

* पहिल्या भागांतील आमचे प्रसिद्ध मित्र वै. रामचंद्र बाळकृष्ण ऊर्फ गाडाप्पा अण्णा कामत – ज्यांच्यामुळेंच ती लेखनस्फूर्ति आम्हांस मिळाली – त्यांचा नाममंत्र 'सीताराम' असून, उपास्य 'विठ्ठलरखुमाई' होतें.

ध्येयवस्तु प्रथम ठरविली पाहिजे, नंतर कोणत्याही नामानें त्या वस्तूचें स्मरण करण्याचा अभ्यास केला पाहिजे, म्हणजे सर्व कांहीं सुलभ होऊन जाईल. कळकळीची इच्छा असली म्हणजे हृदयस्थ सद्गुरु परमात्मा आंतून किंवा बाहेरून कोणत्याही द्वारें योग्य त्या प्रेरणा करितो. साधकानें सद्भावानें त्या मार्गासच प्रथम लागलें पाहिजे. असो.

याप्रमाणें धारणा करणें कठिण वाटल्यास नामस्मरण करीत असतां उपास्य देवतेच्या '**लीलांचें चिंतन**' करावें. रामविजय, हरिविजय, दत्तप्रबोध, गुरुचरित्र, इत्यादि ग्रंथांतून आपण ज्या अवतारलीला ऐकल्या किंवा वाचल्या आहेत त्यांचें चिंतन चालवावें. तसेंच प्रभूच्या भक्तवात्सल्यादि परम कल्याण – '**गुणांचें चिंतन**' सद्गदित अंतःकरणानें करावें. त्याचप्रमाणें नामस्मरण करीत असतां 'कल्याणानां निधानं', 'सुहृदं सर्वभूतानां', 'त्वमेव शरणं मम', 'सत्यं परं धीमहि', 'ब्रह्मानंदं०', 'मूकं करोति वाचालं', 'योगक्षेमं वहाम्यहं', 'त्वमादिदेवः पुरुषः पुराणः', 'यत्र योगेश्वरः कृष्णः', 'किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किम् । आत्मना पूरितं विश्वं महाकल्पांबुना यथा ॥' याप्रमाणें संस्कृतज्ञ लोकांनीं संस्कृत गीता-उपनिषत्-पुराणांतील आपणास आवडतील व पटतील अशा वाक्यांचें अनुचिंतन चालवावें. इतरांना संतांच्या मराठी वाक्यांचें – उदाहरणार्थ

**'म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।**
**तैसा नोहे उखितें । आघवें मीचि ॥'**

अशीं स्वरूपप्रतिपादक, अथवा

**'प्रेमसुख देईं प्रेमसुख देईं । प्रेमेंवीण नाहीं समाधान ॥'**

अशीं करुणापर (प्रार्थनात्मक) वचनें निवडून त्यांचें नामस्मरणाबरोबर चिंतन चालवावें. 'भामती'कारांनीं म्हटल्याप्रमाणें ही '**शाब्दज्ञानसंततीरूपा उपासना**' होय.

येथपर्यंत सगुणध्यानांतर्गत **मूर्तिचिंतन**, **लीलाचिंतन**, **गुणचिंतन** व **वाक्यचिंतन** हे भेद सांगितले. आतां **विक्षेपनिरसनासंबंधानें** सांगावयाचें राहिलें. तें असें कीं, सगुण ध्यानास बसलें असतां, सगुण मूर्तीच्या ऐवजीं केव्हां केव्हां अगदीं विजातीय अनपेक्षित वस्तु – हत्ती, घोडा, स्त्री, पुत्र, वृक्ष, वल्ली, इत्यादि डोळ्यांपुढें येतात. त्या वेळीं प्रभुच ह्या रूपानें आपल्यापुढें उभा आहे असें चिंतन चालवावें व म्हणावें कीं

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

'प्रभो! या रूपानें मजपुढें यावें असें तुला आज वाटलें काय? तुझें स्वागत असो. याच रूपांत मी तुला पाहातों. यांतील तुझा तूंपणा मात्र मला विसरवूं नको.' इत्यादि (सारांश, मन भटकलें तरी भटकूं द्यावें, पण जप चालू असावा; जपादि सत्कर्म चालू असतां मन जिकडे जाईल तिकडे पवित्रताच तें उत्पन्न करील; शत्रूविषयीं त्या वेळीं तें कल्पना करूं लागेल, तर कांहीं दिवसांनीं शत्रूचीही अनिष्ट बुद्धि पालटून जाईल, अशी संतांची शिकवण आहे.) मन अनावरच होऊन बुद्धीला अतिशय त्रास वाटूं लागेल (ह्या त्रासाचें भाग्य सत्साधकासच अनुभवायला मिळेल. आळशी–अल्पतृप्त–मनुष्याच्या नशीबीं तें नाहीं.) तर त्या साधकानें श्वासावर लक्ष ठेवून नामस्मरण चालवावें. शालिग्रामावर विष्णुभावना करितात त्याप्रमाणें **श्वासवायूवर भगवद्भावना करावी.** याविषयींचें विवरण नाथभागवतांत ११ व्या अध्यायांत ४२ व्या श्लोकामध्यें पूजेचीं अकरा अधिष्ठानें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं ७ वें वायूचें सांगितलें आहे, त्यांत भगवान म्हणतात—

> **"वायूच्या ठायीं भगवद्‌बुद्धि। ज्याची ढळों नेणे कधीं।**
> **वायूचेनि भूतां चेतनसिद्धि। जगातें त्रिशुद्धि धरिता तो॥**
> **वायुरूपें मीचि जाण। जालों सर्व भूतांचा प्राण।**
> **प्राणाचा मी मुख्य प्राण। मद्‌रूपें पवन यां हेतु॥...**
> **मद्‌रूपें दृढभावन। वायूचें जो करी आपण।**
> **तें पवनाचें पूजन। पूजास्थान सातवें॥"**

—एकनाथी भागवत, अ. ११

(दासबोधामधील १७ व्या दशकांतील पांचव्या समासांतील अजपाजप उपासना व वरील उपासना जवळजवळ एक आहेत.) अस्तु.

(३) वर सांगितल्याप्रमाणें नामस्मरणाबरोबर सगुणध्यानाचा प्रकारही बुद्धीला जड वाटेल त्यानें '**नामनामीअभेदचिंतन**' करून नामस्मरण चालवावें. याचा अर्थ–नामाहून नामी म्हणून कोणी निराळा आहे व तो मागाहून आपल्यास भेटणार असें भावूं नये. नाम हेंच नामी म्हणजे परमात्मा आहे अशी भावना करावी. खालील वचनांचा विचार करावा.

> **"नाम आणि मुरारि। दोन नसती॥"** —वा. पं.

> **"तुका म्हणे नाम। चतन्य–निजधाम॥"**

"क्षण एक पुरे हो भक्तध्यानाला । जपरूपचि श्रीराम सगळा ।
भिन्न न भाविजे देव-दासांला । आत्मारामचि मंत्रमंत्रार्थु ॥"

—श्रीरामदासपंथक्रमसार, स. ७

"न स्वर्गेषु न तीर्थेषु नौषधीषु नभेषु च ।
ऋषयो देवताः सन्ति मंत्रा एव तु देवताः ॥
साधकानां फलं दातुं तत्तद् रूपं धृतं सुरैः ।
मुख्यं स्वरूपं तेषां तु मंत्रा एव न चेतरत् ॥"

—मेरुतंत्र, प्रकाश ४

"...मंत्ररूपचि देवता असती । नामरूपचि जगत्पति ।
परी अभय द्यावया साधकाप्रती । प्रगट होती तीव्रसंवेगें ॥
(५२०) कार्य करिती विग्रह धरोन । परी मंत्रस्वरूपें व्यापक पूर्ण ॥"

—संप्रदायसुरतरु, अ. २२

"तथैव मंत्रराजोऽहं नादरूपोऽव्ययः शिवः ।
मदधीनं जगत्सर्वं मंत्राधीनोऽहमेव हि ॥
मंत्रोऽहं मंत्रगम्यात्मा मंत्राकारो निरामयः ।
स एव मंत्रराजोऽहमचिंत्योऽनंतशक्तिदः ॥"

—श्रीमद्वासुदेवानंद-सरस्वतीस्वामिकृत श्रीदत्तषोडशावतारजयंतीकल्प, पृ. ६५

"कृष्णनाम, कृष्णगुण, कृष्णलीलावृंद ।
कृष्णेर स्वरूपसम, सब चिदानंद ॥"

—श्रीकृष्णचैतन्य गौरांगप्रभु

'**नाम-ब्रह्म**' हा विषय पहिल्या भागांत (पृ. ७७ ते ८१) आलेला आहे, तो पुनः वाचून पाहावा; म्हणजे हें तत्त्व, हा सिद्धान्त अधिक उज्ज्वल होईल, आनंद वाटेल; सर्व संशय निघून जातील.

याप्रमाणें हरिनामें हीं हरिरूप आहेत अशा धारणेनें नामस्मरण चालवावें. ही धारणा सर्वकाळ राहणें शक्य नाहीं, तरी प्रतिदिवशीं तास अर्धा तास अथवा कांहीं माळा होईपर्यंत एकान्तांत बसून या धारणेनें नामस्मरण करावें व भगवंताच्या सन्निधानसुखांत रमावें. (बाकीच्या वेळीं सदोदित नुसता वाचिक जप चालला तरी पुरे.) याप्रमाणें—

*************************************************

( १ ) नामानें नामीच्या **निर्गुण स्वरूपाचें** ( कूटस्थ साक्षिचैतन्याचें ) ध्यान ( चिंतन ) ; तें होत नसल्यास

( २ ) **सगुणरूपाचें** ध्यान ( मूर्तिचिंतन, लीलाचिंतन, गुणचिंतन वगैरेसह ) ; व तें साधत नसल्यास

( ३ ) **'नामच नामी'** असें ध्यान चालवावें व हेंही घडत नसल्यास म्हणजे अगदीं मंद अधिकाऱ्यानें —

( ४ ) **नामध्वनीवरच लक्ष** ठेवून नामस्मरण चालवावें. वाल्मीकीला नामीच्या स्वरूपाची कल्पनाही नसतांना त्यानें नामस्मरण केलें व तेंही उलट्या प्रकारें ! पण त्यास केवढी सिद्धि प्राप्त झाली, हें सर्वांस माहीत आहेच. तात्पर्य, नामाची ही **वस्तुशक्ति** म्हणजे स्वभावसामर्थ्य होय. नामाची शक्ति अचिंत्य आहे. 'नामाची शक्ति रामालाही माहीत नाहीं. रामानें एका अयोध्येचाच उद्धार केला, पण त्याच्या नामानें त्रैलोक्याचा उद्धार केला व करीत आहे' असें **श्रीतुळसीदास** म्हणतात. असें तें प्रभूचें मंगल नाम सर्वकाळ सर्व कार्यांत अखंड उच्चारीत असावें. त्वरित सिद्धि पाहिजे असेल त्यांनीं हें वैखरीचें नामानुष्ठान कसें करावें, याबद्दल श्रीजठारकृत '**स्वा**नंदसाम्राज्य' ग्रंथांत सांगितलें आहे, तें अगदीं **अनुभवाचें** व **फारच महत्त्वाचें** असल्यामुळें सत्साधकांकरितां खालीं देत आहें —

"भगवन्नामश्रवण, कीर्तन, भजन व जप यांमध्यें सर्व वर्णांचा, किंबहुना मनुष्यमात्राचा अधिकार असून वेळीं अवेळीं, शुचिअशुचि काळीं, कार्याकार्यांत, हवा तेव्हां उच्चार चालविला तरी तो कल्याणकारक व पुण्यजनक आहे. परंतु सद्यःसिद्धीचा अनुभव आणि प्रति दिवशीं आपली **उन्नति होत आहे कीं नाहीं,** अथवा **कालच्यापेक्षां अंतःकरणाची स्थिति आज किती बदलली आहे** अशा प्रकारची **प्रत्यक्ष प्रतीति** घेण्याची ज्या मुमुक्षूची उत्कट इच्छा असेल, त्यानें तर उपर्युक्त जें साधन म्हणजे **वाणी, श्रोत्र व बुद्धीची अविरल धारा,** हींच चालविलीं पाहिजेत [ — "एकान्तस्थलीं सुखासनीं बसून, हस्तांत माला धारण करून, मुखानें भगवन्नामाचा ( ध्वनियुक्त ) उच्चार करावा व मालेनें जपसंख्या धरावी. नामाचा ध्वनि आपल्या कर्णगोचर होई ( म्हणजे समीप कोणी बसल्यास त्यास ऐकूं जाय ) इतकाच उंच व स्पष्ट असावा. जपकाळीं नेत्रमीलन करावें किंवा भगवत्प्रतिमा समोर असावी. **नेत्र, कर्ण, जपमाला आणि शब्दोच्चार या**

**सर्वांची अविरल संघातानें धारा चालली पाहिजे**...बुद्धीचे व्यापार बंद होण्याकरितां, शब्दधारेंत श्रवणाची धारा कडक निग्रहानें गुंतवून साधकानें खबरदार राहिलें पाहिजे." ] तेव्हांच साक्ष पटेल. वत्सा ! भाविक मुमुक्षूस अनुभूति पटणें ही कांहीं मोठी गोष्ट नव्हे. पण नाहीं. अभाविक, नास्तिक, पाखांडी, धर्मभ्रष्ट, कसाही मनुष्य असो – प्रतिज्ञेनें सांगतों कीं, नेत्र मिटून श्रवण, वाणी व बुद्धि अशा तिघांच्या अविरल अखंड धारेनें नित्य तीन घटिका ( ७२ मिनिटें ) असें एक मंडळ ( म्हणजे चाळीस दिवस ) साधन करून अनुभव पाहावा. आरंभ केल्याच्या सातव्या दिवसापासून मनोधर्मांच्या लहरी पालटण्यास आरंभ होऊन, मंडळसमाप्तीस सर्व लक्षणें अगदीं पालटून अंतःकरणांत मध्यरात्रीच्या काळोखाच्या जागीं मध्यान्हप्रकाश होईल ! ज्या कोणास अनुभव पाहणें असेल त्यानें आसन घालून बसावें. एका हातीं **क्रिया** व दुसऱ्या हातीं **फलसिद्धि** घ्यावी. भगवन्नामाची, साधनाची व साधकांची कुत्सितबुद्धीनें कोणी व्यर्थ निंदा करून आपल्या दुष्कृतसंचयांत अधिकाधिक भर घालून अधोगतीस जाऊं नये." यापेक्षां जास्त काय सांगावें ?

पण या गोष्टी बोलण्याच्या नव्हेत, करण्याच्या आहेत. त्या कशा कराव्या याबद्दल नानातऱ्हेनें वर सांगितलें. उच्चाराच्या व स्मरणाच्या म्हणजे अनुसंधानाच्या खुब्या सांगितल्या. त्यांतील 'नामध्वनिचिंतन' हें अगदीं गौण अधिकाऱ्यांकरितां म्हणून सांगितलें, तरी तें कमी महत्त्वाचें आहे असें समजूं नये. संतांनीं नामस्मरणाच्या नाना तऱ्हेच्या युक्त्या सांगितल्या, तरी त्या सर्वच सर्वांना सारख्या तऱ्हेनें पटतील असें नाहीं. नुसत्या सद्भावानें केलेल्या उच्चाराचें फळ कांहीं कमी नाहीं. कृतयुगामध्यें जें ध्यानानें, त्रेतायुगांत जें यज्ञानें व द्वापारयुगांत जें अर्चनानें फळ मिळतें, कलियुगांत तेंच नामसंकीर्तनानें मिळतें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. येथें '**नामसंकीर्तन**' **म्हणजे मोठ्यानें नामघोष करणें.** रात्रीं घरांत चोर शिरलेले दिसल्यानंतर घराचा मालक बाहेर येऊन ज्याप्रमाणें आरोळ्या ठोकतो, त्याप्रमाणें उच्च स्वरानें व अट्टाहासानें नामस्मरण करावें, म्हणजे श्रीहरी लवकर धावून येईल असेंही संतांनीं सांगितलें आहे. आपल्या घरांत अथवा देवळांत अशा रीतीनें नामस्मरण करण्यास लाज किंवा गैरसोय वाटत असेल, तर गांवाबाहेर निर्जन प्रदेशांत जाऊन खूप जोरानें नामघोष करून प्रभूला आळवावें असेंही सांगितलें आहे. देवालयांतील सामुदायिक नामसप्ताहाचा हेतु हाच आहे. सर्वांबरोबर ओरडून

***************************************************

मनापासून नामघोष चालवीत असतां अंतःकरणांत प्रेमानंदाचा उद्भव होतो. तात्पर्य, कशा तरी तऱ्हेनें असो, अंतःकरणपूर्वक नामस्मरण करावें.

* * *

## चार वाचा व त्यांचीं स्थानें

जपांतील अक्षरांचा उच्चार वाचेनें होतो. या वाचा **परा, पश्यंती, मध्यमा** व **वैखरी** अशा चार आहेत. परेचें स्थान **नाभि**, पश्यंतीचें **हृदय**, मध्यमेचें **कंठ** व वैखरीचें **मुख**, असें श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. कोणी प्राचीन ग्रंथकार, परेचें स्थान गुदद्वाराकडील 'मूलाधार चक्र' सांगून पुढील वाचांचीं स्थानें पुढील चक्रें सांगतात. स्थानांचा हा बारीक विचार सोडून दिला तरी, असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, वाचिक, उपांशु व ध्यान हे जप 'वैखरी' वाणीनें होतात. ओठ झांकून, जीभ न हालवितां म्हणजे वर्णांचा उच्चार न करितां कंठांतून घुमघुमणाऱ्या स्वरांत मनानें चोदना करून केलेला जप 'मध्यमा' वाणीनें होतो. (अभ्यासी पुरुष ओठ झाकून अशा हुंकारांत जप करूं लागला असतां तो मंत्र जवळच्या लोकांना अगदीं तोंडानें उच्चारल्याप्रमाणें ऐकूं येतो. थोड्याशा अभ्यासानें हें साधतें.) मानस जप हा 'पश्यंती' वाणीनें व पुढील ध्यान व अनन्य जप हे 'परा' वाणीनें होतात, असें समजावें.

श्रीएकनाथमहाराज या चार वाचांचें लक्षण सांगतात—

**" नादाचें प्रथम स्फुरण । घोषवंत सूक्ष्म प्राण ।**
**ती नांव 'परा' वाचा जाण । प्रथम लक्षण ॐकारीं ॥**
**तोचि नादयुक्त प्राण । अंतःकरणीं होय स्फुरण ।**
**ते 'पश्यंती' वाचा जाण । विवेकलक्षण तीमाजीं ॥**
**नाभीपासूनि नाभिस्वरीं । जे घुमघुमी कंठवरी ।**
**ते 'मध्यमा' वाचा खरी । स्वयें श्रीहरि सांगत ॥**
**अकार उकार मकार । स्वरवर्णयुक्त उच्चार ।**
**जेथ प्रगट होय ॐकार । ते वाचा साचार 'वैखरी' ॥ "**

पुनः त्यांचें स्पष्टीकरण करितात—

**" त्याचि ॐकारासी प्राणसंगतीं । आधारादि[1] चक्रीं ऊर्ध्वगति ।**
**तेथ वाचांची होय अभिव्यक्ति[2] । परा पश्यंती मध्यमा ॥**

---

१ मूळाधारादि चक्रांत. २ स्पष्टता.

परा वाचेच्या अभ्यंतरीं । जन्मे पश्यंती ज्येष्ठ कुमारी ।
मध्यमा जन्म तिच्या उदरीं । एवं परस्परीं जन्मती ॥
तैशाचि येरीतें येरी । नोसंडोनि क्षणभरी ।
चालती उपराउपरी । चक्रींच्या चक्रांतरीं समवेत ॥
'आधारचक्रीं'[1] परा वाचा । 'स्वाधिष्ठानीं' जन्म पश्यंतीचा ।
'मणिपुरी-' हूनि विशुद्धीचा । ठायीं मध्यमेचा रिगूनिगू ॥
तेथूनिया मुखद्वारीं । वाचा प्रकाशे वैखरी ।
ते स्वरवर्ण उच्चारीं । नाना मंत्रीं गर्जत ॥"

—एकनाथी भागवत, अ. २१, श्लो. ३६ ते ४० वरील टीका पाहावी.

असो. 'उच्चारण' हें वाचेचें कार्य व 'स्मरण' हें मनाचें कार्य हें मागें सांगितलेंच आहे. पण वाचेच्या उच्चाराचे अनंत ठसे मनावर पडले म्हणजे मनाचा मल (जडता) धुऊन जाऊन त्याचें उत्तम शुद्धीकरण होतें व असें शुद्धता पावलेलें मनच 'स्मरण' करण्यास समर्थ होतें. याप्रमाणें मनानें एकदां गोविंदनामाचा 'छंद' घेतला म्हणजे काम झालें.

"गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥
आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥
तुका म्हणे आळी । जीवें नुरेचि वेगळी"

अशी स्थिति प्राप्त होते.

अशा रीतीनें नामाचा छंद लागून चारी वाणीनें नाम सुरू झालें म्हणजे शरीरांतील सप्त धातूंतूनही तो ध्वनि निघूं लागतो. वैखरी वाणी बंद झाली किंवा केली, तरी आंतील नाम बंद होत नाहीं. गतप्राण चोखामेळ्याच्या हाडांतून व जनाबाईच्या शेणींतूनही विठ्ठलनामाचा ध्वनि ऐकूं येत होता म्हणतात, ती गोष्ट खोटी नाहीं. संजय एकदां दुपारच्या वेळीं श्रीकृष्णाच्या दर्शनास गेला असतां, एका मंचकावर

---

१ मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपुर, अनाहत, विशुद्ध व आज्ञाचक्र या षट्चक्रांचीं स्थानें अनुक्रमें गुद, लिंगमूल, नाभि, हृदय, कंठ व नेत्र अशीं असून त्यांच्या पाकळ्या अथवा आरा अनुक्रमें ४, ६, १०, १२, १६ व २ अशा आहेत. यांत स्वरवर्णांच्या ५० मातृका विभागून दिल्या आहेत. आज्ञाचक्राच्या वर मस्तकांत सहस्रदल कमल आहे. त्याला 'ब्रह्मरंध्र' असें म्हणतात. योग्यांचें हें अगदीं शेवटचें गतिस्थान होय.

रुक्मिणी, कृष्ण व अर्जुन पहुडलेले त्यानें पाहिले. तो त्यांच्या उशाकडील बाजूस बसला. अर्जुनाचें काय हें भाग्य, असें म्हणून विस्मय करूं लागला. तों पलंगाखालीं लोंबत असलेले अर्जुनाचे लांब केश त्याला दिसले व ते त्यानें सहज हातांत धरून पाहिले. तेव्हां त्यांच्यांतून 'कृष्ण कृष्ण' असा एकसारखा ध्वनि चाललेला त्यास ऐकूं आला! कोण ही भक्तांची नामनिष्ठा! धन्य आहे त्यांची व त्यांच्या नामनिष्ठेची. (बोला 'हरिभक्त व हरिनामकी जय!')

कल्याणेच्छूंनीं या गोष्टी विचारांत घेऊन वेदांताच्या फाजील अथवा अपूर्ण ज्ञानानें हुरळून न जातां,

**"मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसी॥"**
**"नामें तरला नाहीं कोण। ऐसा द्यावा निवडून॥"**

इत्यादि श्रीतुकोबारायांच्या व इतर संतांच्या स्वानुभवी वचनांचा विचार करून हें साधन आपलेंसें करून घ्यावें व भगवंताच्या पूर्ण कृपेस पात्र व्हावें व इतरांसही करावें, अशी सर्व सज्जनांस लोटांगणपूर्वक प्रार्थना आहे.

**"फळ पावाल अवलीळा। भोग वैकुंठसोहळा॥**
**तुका म्हणे त्याच्या नांवें। तोचि होईल स्वभावें॥"**

* * *

उत्तर हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध **रामचरण** नामक साधूनें आपल्या '**शब्दप्रकाश**' नामक हिंदी छोट्या ग्रंथांत आपले नामस्मरणाचे अनुभव सांगितले आहेत. विस्तारभयास्तव ते येथें समग्र देतां येत नाहींत. पण वाचकांकरितां त्यांचा सारांश येथें दिल्यावांचून राहवत नाहीं. तो सारांश असा कीं, **रामनामाच्या अखंड स्मरणानें म्हणजे वैखरी वाणीच्या सतत उच्चारानें मध्यमा वाणी आपोआप उघडते; मध्यमेनें म्हणजे कंठांत** (जिव्हा हलल्यावांचून) **नामजप आपोआप चालतो.**[1] **मध्यमेचें अनुष्ठान पूर्ण झालें म्हणजे**

[1] आम्ही पांच वर्षांखालीं (शके १८५२) "महाराष्ट्रांत 'रामकृष्णहरि' नामाचें शतकोटि अनुष्ठान" नांवाचीं पत्रकें काढून वांटलीं होतीं. त्यावरून शेंकडों लोक तें अनुष्ठान करूं लागले. त्यांत मुंबईच्या आमच्या एका सुशिक्षित मित्राची आई (वयानें सुमारें ६५) रोज २५।३० हजारपर्यंत जप करीत असे. एक दिवस रोजच्याप्रमाणें रात्रौ झोंपण्याचे वेळीं नियमित जप संपवून हातांतील माळ खालीं ठेवून डोळे मिटून पडली, पण झोंप येईना व दांत, ओंठ व जीभ यांची हालचाल

**पश्यंती वाणी उघडून हृदयांत जप आपोआप सुरू होतो; तें अनुष्ठान पूर्ण झालें म्हणजे परावाणी उघडते. नाभींत जप स्फुरूं लागतो.** नंतर शरीरांतील सर्व नाड्यांमधून, रोमरोमांतून जप सुरू होतो; सुषुम्नेचें द्वार खुलें होतें व अष्टांगयोग्यासही जेथें जाणें अत्यंत प्रयासाचें आहे, त्या शिखानाडींतील सहस्रदल कमलांत या नामयोग्याची गति होते, म्हणजे तिकडील अनुभव यास चाखावयास मिळतो. हा केवळ रामनामाच्या अखंड उच्चाराचा परिणाम होय.

वैखरी वाणीच्या जपापेक्षां मध्यमेचा, मध्यमेपेक्षां पश्यंतीचा व पश्यंतीपेक्षां परेचा जप **कोटिकोटि पटीनें अधिक फलदायी आहे,** असें परमहंस श्रीपद्मनाभस्वामी म्हणतात —

**कोटिजन्म पाप वैखरी वाचेनें । नाम उच्चारण भस्म होय १**
**वैखरी दंडोनि गातां मध्यमेनें । फल कोटिगुणें जाण बापा २**
**त्याच्या कोटिगुणें फल पश्यंतीनें । नाम उच्चारणें होय जाणा ३**
**वैखरी, मध्यमा, पश्यंती या तिन्ही । वाचा आवरोनि परावेनें ४**
**नाम घेतां देवदासां स्वात्मभेटी । होय तत्काळचि अभिन्नत्वें ५**
**पद्मनाभ म्हणे अभिन्नत्वें भेटी । म्हणोनियां तुटी नव्हे पुन्हां ६**

* * *

## श्वासांत नामस्मरण

दुसऱ्यासही ऐकूं जाईल असा वर्णोच्चार स्पष्ट करून नाम जपण्याचा अभ्यास आरंभीं पुष्कळसा झाला म्हणजे ओंठ झांकून तोंडांत जीभ हलवीत जप करूं लागावें. हा अभ्यास बरेच दिवस करून मग जिभेचीही हालचाल बंद करून फक्त मनानें जप करूं लागावें. प्रत्येक श्वासाबरोबर जप चालावा.

---

बंद केली, तरी जप बंद होईना; तो कंठांत सुरू झाला! बिचारीला मध्यमा, पश्यंती वगैरे नांवें ऐकूनही ठाऊक नसल्यामुळें सकृद्दर्शनी घाबरून गेली. तसेंच, गोव्यांत हा जप करणाऱ्या एका बाईच्या कंठांत, नंतर हृदयांत व नंतर नाभींत 'रामकृष्णहरि' मंत्र सुरू झाला. प्रथम ती घाबरून गेली, पण आनंदही वाटूं लागला. हें आम्हांस तिनें कांहीं महिन्यांनंतरच्या भेटींत कळविलें. दोन्ही अनुभव ऐकून आमच्या प्रयत्नाचें साफल्य झालें असें वाटून पराकाष्ठेचें समाधान झालें. संतांच्या वाणीचा हा अनुभव आहे. त्यांनीं 'आधीं केलें व मग सांगितलें' असें असल्यामुळें हा अनुभव कृति करणाऱ्या कोणासही आलाच पाहिजे व येत असतो.

**********************************************

**" नका धरूं कांहीं आस । राम जपा श्वासोश्वास ॥**
**नाम श्वासोश्वासीं वसे । तेथें ब्रह्म उभें असे ॥...**
**ब्रह्मा विष्णु महेश । नामीं लक्ष्य श्वासोश्वास ॥ "**

—श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर

या अभ्यासानें दिव्यप्रकाशदर्शन तसेंच अनाहत नादाचें श्रवण घडतें. लययोगांत ' नादानुसंधान ' श्रेष्ठ मानलें आहे. नामस्मरणानें तेंच साधतें. खालच्या सूचनाही लक्षांत घ्याव्या—

**" मनही मनमें जाप करि, दर्पण उज्ज्वळ होय ।**
**दर्शन होवै रामका, तिमिर जाल सब खोय ॥**
**श्वासा लेवै नामबिना, सो जीवन धिक्कार ।**
**श्वासश्वासमें राम जप, यही धारणा धार ॥ "**
**" होठ कंठ चाले नहि, जिभ्या रटै न नाम ।**
**राम हमारा जप करै, हम बैठे आराम ॥ "...**
**" श्वासोसो सोऽहं भयो, सोहंसो ॐकार ।**
**ॐकारसो राम भयो, साधु करो विचार ॥ "**

हा श्वासांतील जप तालबद्ध करावा. जपाची गति ( Speed ) एकसारखी ठेवावी ; कमी जास्ती करू नये. याचा अर्थ – श्वास आंत घेतांना जितके मणि ओढणें होतें, तितकेच मणि बाहेर सोडतांनाही ओढावे. यायोगानें श्वासही तालबद्ध होतो. ( हा आरोग्यासही चांगला. ) असो.

## श्वासांतील नामजपाचे प्रकार

वाणीनें नाम उच्चारण्याचे प्रकार मागें ( पृ. ३७२–७५ ) सांगितले ; त्याप्रमाणेंच श्वासांतील नामस्मरणांतही कांहीं भेद दाखवितां येतील. सूक्ष्मबुद्धि पुरुषांना त्यापासून आनंद होईल.

( १ ) ओठ झांकून जिभेच्या अत्यंत अल्प चालनानें ' ध्वान ' नामक[1] जप चालवीत असतां श्वासाच्या गतीवर लक्ष ठेवणें हा एक प्रकार.

१ कोणी ध्वानाला वाचिक व उपांशु यांच्यामध्यें ठेवतात –

**" उच्चैस्त्वेकगुणः प्रोक्तो ध्वानो दशगुणः स्मृतः ।**
**उपांशुः स्याच्छतगुणः साहस्रो मानसः स्मृतः ॥ "** —हरीतः

आणि या ध्वानजपाचें लक्षण—' इति वर्णानुपलब्ध्या स्वरमात्रोपलब्धेर्ध्यानंः ' असें केलें आहे.

**************************************************

( २ ) दुसरा प्रकार म्हणजे श्वासामध्यें ' मानस ' जप करणें. श्वासांवर लक्ष राखून मनानेंच नाममंत्रांतील अक्षरांचा स्पष्ट उच्चार करणें.

( ३ ) तिसरा प्रकार श्वासाच्या आंतबाहेर जाण्यायेण्यानें जो सूक्ष्म ध्वनि होतो, तो ध्वनिच आपला नाममंत्र आहे अशी भावना करणें. उदाहरणार्थ — आगगाडीचें एंजिन चालूं असतां जो आवाज होतो, त्यावर लहान मुलें म्हणतात – आगगाडी काय म्हणते ? ' कशासाठीं पोटासाठीं, कशासाठीं पोटासाठीं ', इत्यादि त्या आवाजावर या शब्दांची भावना धरली, कीं अगदीं तेच शब्द भासूं लागतात. दुसरें उदाहरण टेलिग्राफिक शब्दांचें. तारमास्तर त्या यंत्रावर बोटें ठेवून तारेचा संदेश पाठवूं लागला, किंवा बाहेरून आलेला ऐकूं लागला म्हणजे आम्हांस ते शब्द ' कट्टकड, कडकट्ट ' असेच ऐकूं येतात, पण त्याला त्या आवाजामधून ' ए बी सी डी ' अक्षरेंच ऐकूं येतात व भराभर त्या अक्षरांचे बनलेले ते शब्द तो लिहून घेऊं लागतो. अशी तन्मयता आपल्या श्वासावर व नाममंत्रावर करून सोडावी. अभ्यासानें ही साधते. ( श्वास व उच्छ्वास यांवर ' धरितां सो व सोडितां हं ' याप्रमाणें ' सोऽहं ' शब्दाची भावना प्रसिद्धच आहे. ) भिंतीवरील घड्याळाच्या लंबकांदोलनानें जो ' कट्टकट्ट ' आवाज होतो, त्यावर सुद्धां आपल्या नाममंत्राची भावना बसवितां येते. अभ्यासानें ती इतकी साधते कीं आकाशांतील उडणाऱ्या पक्ष्याच्या शब्दांतही तो नाममंत्र स्फुरूं लागतो. श्रीरामकृष्णपरमहंसांना असें होत असे. नुसतें मंत्राचें स्फुरण नव्हे, तर मंत्रदेवतेचें दर्शन त्या पक्ष्याच्या शब्दांत त्यांना होई व त्या वेळीं ते अर्धमूर्छितावस्थेंत जात.

( ४ ) याशिवाय चौथा प्रकार म्हणजे मागें पृ. ३८२ वर सांगितल्याप्रमाणें वायूवर भगवद्भावना करून ध्यान अथवा मानसजप करणें. सारांश, व्यायामपटु मनुष्य आपल्या शरीराचे स्नायु कमावतो, त्याचप्रमाणें साधकानें आपली भावना अथवा वृत्ति कमाविली पाहिजे. सगळें आपल्या वृत्तीच्या अभ्यासावर अवलंबून आहे.

आतां कोणत्या वाणीचा जप किती काल करावा, याचें थोडेंसें प्रमाणही पुढच्या दोहऱ्यांत दाखविलें आहे, तें जिज्ञासूंनीं हवें तर लक्षांत घ्यावें —

**" आठ मास मुखसूं जपै, सोलह मास कंठजाप ।**
**बत्तीस मास हिरदै जपै, मनमें रहै न पाप ॥**

**नाभिनासिकामांहि करी, सोहं सोहं जाप ।**
**सोई अजपा जाप है, छुटे पुण्य अरु पाप ॥**

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**नाभिनासिकामांहि करी, घाल हिंडोला झूल ।**
**उपजे अति आनंदहि, रहै न दुःखका मूल ॥**
**पांच बरस जाप नाभिसो, रग रग बोलै राम ।**
**देहजीव निजभक्त हो, पहुंचे हरिके धाम ॥**
**नाम उठा कर नाभिसूं, गगनमांहि लै जाय ।**
**जहां होय परकाश संही, शुकदेव दिया बताय ॥ "**

(महानुभाव श्रीगोविंदानंदस्वामी परमहंस यांनीं छापलेल्या 'सत्पुरुषवाक्यरत्नावली' नामक पुस्तकांतून वरील उतारा घेतला आहे.)

वर दिलेलें कालाचें परिमाण मंद–तीव्र अधिकाराप्रमाणें जास्तकमीही होऊं शकेल. पण ह्या गोष्टी बोलून वाचून टाकण्याच्या नव्हेत, करून पाहाण्याच्या आहेत, हें पुनः पुन्हा सांगावेंसें वाटतें. असो.

मुख्यतः ध्यानरहित जपापेक्षां **ध्यानयुक्त जपच श्रेष्ठ** असें जाणून, तसें करण्याचा प्रयत्न करावा. परंतु हें नेहमीं साधणें कठिण ; याकरितां जपानें वाणीस श्रम झालेसें वाटलें कीं, मनानें फक्त ध्यान करावें व ध्यानानें मन श्रमी झालेसें वाटलें कीं, वाणीनें जपास सुरुवात करावी.

**" जपाच्छ्रान्तः पुनर्ध्यायेत्, ध्यानाच्छ्रांतः पुनर्जपेत् ।**
**जपध्यानाभियुक्तस्य क्षिप्रं, योगः प्रसिद्ध्यति ॥ "**

याप्रमाणें जप व ध्यानानें युक्त झालेल्या साधकाचा योग लवकर सिद्ध होतो.

* * *

आतां वर सांगितलेल्या ध्यानाच्या खुब्यांपैकीं जी आपल्या बुद्धीस धरतां येईल, अथवा जी सोपी व सुकर वाटेल, ती धरून साधनास लागावें. एकाच्या साधनाचा अनुभव दुसऱ्यास तसाच येतो असें नाहीं. प्रकृति-भिन्नत्वामुळें निरनिराळ्या साधकांना निरनिराळे दिव्य अनुभव येतात. सर्वांचें पर्यवसान मात्र शेवटीं एकाच अनुभवांत होतें. 'नामनामी-अभेदबुद्धीनें' नामस्मरण अथवा 'नामध्वनीवर लक्ष ठेवून' नामस्मरण करणें हें कोणासही सुलभच जाईल अशी आम्हांस आशा आहे. 'एका हातीं क्रिया व दुसऱ्या हातीं फल' अशा प्रकारचा हा '**मोठा यज्ञ**' करून '**साक्षात्कार**' मिळवावा. कल्याणेच्छूंनीं आळस करूं नये. पण पुष्कळसें करून कांहीं प्रत्यय आला नाहीं म्हणून घाबरूनही जाऊं नये व चिकाटी सोडूं नये. सर्व सुखाचा

सागर, निरतिशय आनंदाचा व ज्ञानाचा आणि निरतिशय शाश्वत शांतीचा महोदधि परमात्मा जवळच म्हणजे आपल्या हृदयांतच आहे याची जाणीव ठेवावी.

सारांश, हिंसादिदोषरहित, तसेंच विधिनिषेध, सोवळें-ओवळें, काल-अकाल, इत्यादींचा निर्बंध नसणारें, महापापांचा नाश करून सर्व इष्टार्थ देऊं शकणारें असें मृत्युलोकांत **कामधेनु, कल्पतरु** अथवा **चिंतामणी** असेल तर तें भगवन्नामच आहे हें निःसंशय समजावें व तत्परायण व्हावें.

**नामचिंतामणिः कृष्णश्चैतन्यरसविग्रहः ।**
**पूर्णः शुद्धो नित्यमुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः ॥**

**" आपलें कल्याण इच्छिणें जयासी । तेणें या नामासी विसंबूं नये १**
**करील परिपूर्ण मनींचे हेत । ठेविलिया चित्त नामापाशीं २**
**भुक्ति आणि मुक्ति वोळंगिती सिद्धि । होईल कीं वृद्धि आत्मनिष्ठे ३**
**एका जनार्दनीं जपतां हें नाम । पुरवील काम जो जो हेतु " ४**

यापेक्षां अधिक काय सांगावें अथवा लिहावें ? परमेश्वर लेखक-वाचकांस नामनिष्ठ करून त्यांची कल्याणाभिवृद्धि करो, असें **त्या**जकडे प्रार्थून हा लांबलेला निर्विषयांचा विषय, त्या निर्विषयानंदस्वरूप परमात्म्याचें स्मरण करून, आज पुरा करितों.

**माझा नव्हे गुरूंचा तो, दिसे जो का इथें गुण ।**
**दोष जो का दिसे येथें, तो माझा ; गुरुचा नव्हे ॥**

" Farewell to ye, farewell to all,
My readers, till at Heaven's call ;
We must meet at last to live for ever,
The Life Divine we strive for here. "

**—श्री. सीतानाथ तत्त्वभूषण**

**ॐ तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीगुरुदेवदत्त !**



# परिशिष्ट

'**नाम**जपाचें महत्त्व, भाग १ ला' यांत (पृ. ९-१०) '**सकाम नामस्मरणाचा पहिला प्रकार**' श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामींच्या मुखांतून ऐकण्यांत आला तेवढाच दिला आहे. स्वामिमहाराजांचा ओघ 'निष्काम जपाचें महत्त्व' सांगण्याकडे होता व ऐकणाऱ्याची आवडही तशीच होती. दुसरें, निष्काम नामस्मरणाचे दोन प्रकार पुढें दिलेले आहेत; त्यांचें नांव मात्र 'निष्काम', पण 'सर्वकामनापूर्ति' हें त्याचें फळ आहे. पण जीवाला तेवढा धीर मात्र पाहिजे. तेवढी सबूरी ( Patience ) सर्वांना नसते. तसे लोक त्यांतील मार्जन-तर्पण-होम वगैरेंचा खुलासा विचारतात. त्यांच्याकरितां धर्मसिंधूंतील पुढील उतारा दिला आहे—"जपसंख्येच्या दशांश संख्येनें **होम** करावा. होमाच्या दशांश **तर्पण** करावें. होमाविषयीं शक्ति नसेल तर होमसंख्येच्या चौपट जप करावा. ... 'अमुकां देवतां तर्पयामि नमः' असा 'नमोन्त' मूळ मंत्र उच्चारून मस्तकावर **मार्जन,** तर्पणाच्या दशांशानें करावें व मार्जनाच्या दशांशानें **ब्राह्मणभोजन** करावें," इत्यादि. पण या कार्यास चांगल्या वैदिक ब्राह्मणाचें साहाय्य घेणें चांगलें. कारण, निष्कामांत हजार गुन्हे माफ, पण सकामांत लहानशी चूकही क्षम्य नसते.

**जपाची माळा**—पुरुषांनीं रुद्राक्ष, तुळशी, स्फटिक, वगैरेंची; देवीचा जप असल्यास स्फटिक किंवा तुळसीची; सुवासिनींनीं पोवळ्यांची; पुत्रेच्छावतींनीं पुत्रवंती मण्यांची व विधवांनीं तुळसी अथवा रुद्राक्षांची माळ वापरावी. मणि ओढतांना आंगठ्याजवळचें (तर्जनी) बोट माळेस लावूं नये व मेरुमणि उल्लंघूं नये.



## ब्रह्मविहार अथवा जगच्छांत्यर्थ अनुष्ठान !

वृत्तपत्रें व प्रवचनव्याख्यानादिकांमधून शांतीच्या उपदेशाचा हल्लीं सर्वत्र पाऊस पडत असतां अजून जग इतकें निष्ठुर व स्वार्थी कां बरें उरलें आहे? धर्माच्या नांवाखालीं दंगे, मारामाऱ्या व स्वातंत्र्याच्या नांवाखालीं असंख्य प्राणहानिकारक लढाया कां बरें होत आहेत? या प्रश्नाचें उत्तर गूढ मानसशास्त्रकोविद लोक एकच आहे असें सांगतात व तें हें कीं, लेखकवक्त्यांची 'बुद्धिशक्ति' च वाचकश्रोत्यांच्या केवळ बुद्धीकडे अर्जी ( Appeal ) करीत आहे. उभयपक्षांची 'भावनाशक्ति' बापुडवाणी होऊन पडली आहे. "Feelings are the master and Intellect

is the servant" म्हणजे भावनाशक्ति ही स्वामिनी (धनीण) असून बुद्धि तिची नोकर – मोलकरीण आहे, हें विद्वानांच्या लक्षांत येत नाहीं! आत्मस्वरूपांत स्थिर राहून मनोमय वाणीनें – विचारसंक्रमणशक्तीनें समष्टीच्या भावनेमध्यें, (Thought world मध्यें) खळबळ उडवून देण्याची प्रक्रिया हातीं घेतली जाईल, तेव्हांच इष्टसिद्धि घडून येईल.

अंतःकरणांत प्रथम '**विचार**', नंतर मुखांतून '**उच्चार**' व त्यानंतर हातानें तसा '**आचार**' म्हणजे क्रिया घडत असते; आणि क्रियेनें (कर्मानें) फळ उत्पन्न होतें. अर्थात् **जगांतील अशांतीच मूळ, स्वार्थी व अशांतिकारक विचारच होत.** तेच बदलण्याचा प्रयत्न केला पाहिजे. (यावर पुष्कळ लिहावेंसें वाटतें, पण आतां अवकाश नसल्यामुळें थोडक्यांत लिहितों.) जगच्छांतीच्या विचारांचें तद्बोधक शब्दांनीं अनुष्ठान समाजांत जोरानें सुरू झालें पाहिजे. '**सर्वे भद्राणि पश्यंतु**' (म्हणजे सर्व लोक कल्याण पावोत) या अष्टाक्षरी मंत्राचें अनुष्ठान दररोज एक घटका तरी मुमुक्षूंनीं व साधकांनीं करावें. (किंवा मागें पृ. ३८० – ८१ मध्यें सुचविल्याप्रमाण आपला नाममंत्र जपत असतां कांहीं माळा 'सर्वे भद्राणि पश्यंतु' या भावनेनें जपाव्या. Thought is creative power म्हणजे विचार अथवा बळकट इच्छा ही एक कार्यकारी शक्ति आहे, हें मानसशास्त्रांतील तत्त्व जाणून जगत्कल्याणाच्या विचाराचीं आंदोलनें सर्व जगांत पसरावीं. 'सर्व' शब्द उच्चारतांना पृथ्वीचा नकाशा डोळ्यापुढें आणावा. या भावनानुष्ठानाचा परिणाम जगावर व स्वतःवरही चांगला होईल. सर्वांना कल्याणबुद्धीची प्रेरणा करण्याबद्दल 'भूतभावन' भगवंताची प्रार्थना करून 'नामचिंतामणी'च्या प्रेमळ वाचकांची आतां रजा घेतों.

ॐ तत्सत् – श्रीः।

**"सर्वे भद्राणि पश्यन्तु"**